## अनुलोमन औषधें.

कृत्वापाकंमलानांयद्भित्वाबंधमधोनयेत् ॥
तच्चानुलोमनंज्ञेयंयथाप्रोक्ताहरीतकी ॥ २२ ॥

जें औषध मल म्हणजे वातादि दोष यांचा पाक करून परस्पर बद्ध आहलेले जे वातादि दोष त्यांना वेगळे वेगळे करून अधोभागीं नेतें अथवा वातमूत्रपुरीषादिकांचा जो बंध त्या बंधाला म्हणजे बद्धकोष्ठतेला मोकळें करून अधोमागीं नेऊन गुदावाटें पाडितें तें औषध अनुलोमन जाणावें; उदाहरण—हरीतकी.

## स्रंसन औषध.

पक्तव्यंयदपक्त्वैवश्लिष्टंकोष्ठेमलादिकं ॥
नयत्यधःस्रंसनंतद्यथास्यात्कृतमालकः ॥ २३ ॥

पुढें पाक होण्याविषयीं योग्य असे जे वातादिक दोष ते कोष्ठाचे आश्रयेंकरून राहिले होत्साते त्यांचा पाक न करितां त्यातें जें औषध अधोभागीं दडपून गुदावाटें बाहेर पाडितें तें औषध स्रंसन संज्ञक जाणावें; उदाहरण—बाहाव्याच्या शेंगेचा मगज.

## भेदन औषध.

मलादिकमबद्धंवायद्बद्धंपिंडितंमलैः ॥
भित्वाऽधःपातयतितद्भेदनंकटुकीयथा ॥ २४ ॥

वातादि दोषेंकरून अबद्ध अथवा बद्ध असे जे मळमूत्रादिक ते ग्रथित जाहले असतां त्यांचा भेद करून त्यातें जें औषध अधोभागीं नेऊन गुदावाटें पाडितें तें भेदन संज्ञक जाणावें; उदाहरण—कटुकी. ( प्राकृतांत कुटकी असें नांव होय. )

## रेचन औषधें,

विपक्वंयदपक्वंवामलादिद्रवतांनयेत् ॥
रेचयत्यपितज्ज्ञेयंरेचनंत्रिवृतायथा ॥ २५ ॥

पोटामध्यें विशेषेंकरून अन्नादिकांचा चांगला पाक जाल्या असतां अथवा कांहीं कच्चें राहिलें असतां त्या अन्नादिकांस पातळ करून त्यांस जें औषध अधोमार्गीं नेऊन गुदावाटें ढाळ करितें तें औषध रेचन संज्ञक जाणावें; उदाहरण—निशोत्तर. (याचें नांव निशोचर असेंही आहे. )

## वमन औषध.

अपक्वपित्तश्लेष्माणबलादूर्ध्वंनयेत्तुयत् ॥
वमनतद्धिविज्ञेयंमदनस्यफलंयथा ॥ २६ ॥

पक्वदशेस आलें नाहीं असें पित्त व कफ याना हटकेरून जें औषध तोंडावाटें ओकवितें तें औषध वमन सज्ञक जाणावें, उदाहरण—गेळफळ. ( कोणी मेणफळ असेंही म्हणतात. )

## संशोधन औषधें.

स्थानाद्बहिर्नयेदूर्ध्वमधोवामलसंचयम् ॥
देहेसंशोधनतत्स्याद्देवदालीफलंयथा ॥ २७ ॥

आपल्या स्वस्थानीं जो वातादिकाचा संचय जाहला त्याला ऊर्ध्वभागीं नेऊन त्यातें जें औषध तोंडावाटें व नाकावाटें बाहेर काढितें अथवा त्या संचयाला अधोमार्गी नेऊन गुदावाटें दाळाबरोबर किंवा शिश्नावाटें मूत्राबरोबर काढितें तें औषध देहाचे ठायीं संशोधन जाणावें; उदाहरण —देवडगरी. ( देशात देवडागर असें म्हणतात. )

## छेदन औषध.

श्लिष्टान्काफादिकान्दोषानुन्मूलयतियद्बलात् ॥
छेदनतद्यथाक्षारोमरिचानिशिलाजतु ॥ २८ ॥

जें औषध परस्पर एकात एक मिळाले असे जे कफादि दोष त्यास आपल्या शक्तीकरून फोडून वेगळे वेगळे करितें ते औषध छेदन जाणावें; उदाहरण—यवक्षारादिक व मिर्चे श्लोकात बहुवचनेंकरून सुंठ, पिंपळी व शिलाजित.

## लेखन औषध.

धातून्मलान्वादेहस्यविशोष्योल्लेखयेच्चयत् ॥
लेखनंतद्यथाक्षौद्रनीरमुष्णवचायवाः ॥ २९ ॥

जीं औषधें रसादिधातु व वातादिदोष यांचें शोषण करून याना पातळ करितात तीं औषधें लेखन जाणावीं, उदाहरण—मध, उष्णजळ, वेखड, जव.

## ग्राही औषधें.

दीपनपाचनंयत्स्यादुष्णत्वात्द्रवशोषकम् ॥
ग्राहितच्चयथाशुंठीजीरकंगजपिप्पली ॥ ३० ॥

जीं औषधें अग्नि प्रदीप्त करितात, व आमादिकाचें पाचन करितात, व उष्णवार्य आहेत ह्मणून जलस्वरूप जे कफादिदोष व धातु व मळ याचें शोषण करितात तीं औषधें ग्राही जाणावीं; उदाहरण---सुंठ, जिरें, गजपिंपळी.

## स्तंभन औषधें.

रौक्ष्याच्छैत्यात्कषायत्वाल्लघुपाकाच्चयद्भवेत् ॥
वातकृत्स्तंभनंतत्स्याद्यथावत्सकटुंटुकौ ॥ ३१ ॥

जीं औषधें रुक्षगुणेंकरून, व शीतवीर्येंकरून, व तुरटरसेंकरून युक्त असतात व पाकेंकरूनही हलकीं असतात अशा प्रकारचीं जीं औषधें तीं वायूला उत्पन्न करितात यास्तव तीं औषधें स्तंभन जाणावीं, उदाहरण---कुडा व टेंटु.

## रसायन औषधें.

रसायनंचतज्ज्ञेयंयज्जराव्याधिनाशनम् ॥
यथामृतारुदंतीचगुग्गुलुश्चहरीतकी ॥ ३२ ॥

जीं औषधें शरीराची जरा व रोग यांस दूर करितात तीं औषधें रसायनें जाणावीं; उदाहरण---गुळवेल, रुदंती, गुग्गूळ, हरीतकी.

## वाजीकरण औषधें.

यस्माद्द्रव्याद्भवेत्स्त्रीषुहर्षोवाजीकरंचतत् ॥
यथानागबलाद्यास्तुबीजंचकपिकच्छुजं ॥ ३३ ॥

जीं औषधें धातूला वाढवून स्त्रियांविषयीं हर्षयुक्त शक्ति देतात तीं औषधें वाजीकरण जाणावीं; उदाहरण---नागबला आदिशब्देंकरून शतावरी साखर दूध इत्यादि व कवचबीज.

## धातूंची वृद्धि करणारीं औषधें.

यस्माच्छुक्रस्यवृद्धिःस्याच्छुक्रलंचतदुच्यते ॥
यथाश्वगंधामुसलीशर्कराचशतावरी ॥ ३४ ॥

ज्या औषधांपासून धातूची वृद्धि होते तीं औषधें शुक्रल जाणावीं; उदाहरण---आसंध, मुसळी, साखर, शतावरी इत्यादि जाणावीं.

## धातूला चेतविणारीं व त्याची वृद्धि करणारीं औषधें.

दुग्धंमाषाश्चभल्लातफलमज्जामलानिच ॥
प्रवर्तकानिकथ्यंतेजनकानिचरेतसः ॥ ३५ ॥

शुक्र धातूला चेतविणारीं व त्या धातूला उत्पन्न करणारीं अशीं औषधें दूध, उडीद, भिलाव्याचे फलाची मज्जा ( ह्मणजे मध्यें बी असते ती ) व आवळकठी इ. जाणावीं.

## वाजीकरण औषधांचा निषेध.

प्रवर्तनीस्त्रीशुक्रस्यरेचनंबृहतीफलम् ॥ जातीफलंस्तंभकंचशोषकंहरीतकी॥३६॥

शुक्र धातूला चेतविणारी स्त्री आहे, व त्या धातूला रेचन करणारें मोतेरिंगणीचें फळ अथवा रानवांगें किंवा रिंगणीफळ आहे, व स्तंभन करणारें जायफळ आहे, व शोषण करणारी हरीतकी ( म्हणजे हिरडा ) आहे असें जाणावें; " शोषणीचहरीतकी या ठिकाणीं श्लोकांत कालिंगक्षयकारिच असाही पाठ आहे. त्याचा अर्थ, कलिंगडें वीर्याचा क्षय करितें असें जाणावें. "

## सूक्ष्म औषधें.

देहस्यसूक्ष्मछिद्रेषुविशेद्यत्सूक्ष्ममुच्यते॥तद्यथासैंधवंक्षौद्रंनिंबस्नैलरुबूद्भवम् ॥ ३७॥

शरीराचे ठायीं बारीक बारीक रोमरंध्रादिक छिद्रें आहेत त्याचे ठायीं जी औषधें प्रवेश करितात तीं औषधें सूक्ष्म जाणावीं; उदाहरण—सैंधव, मध, कडूनिंब, तिळाचें तेल, एरंडतेल इत्यादिक जाणावीं.

## व्यवायी औषधें.

यस्मात्द्रव्याद्भवेत्स्त्रीषुहर्षोवाजीकरंचतत् ॥
यथानागबलाद्यास्तुबीजंचकपिकच्छुजं ॥ ३८ ॥

जीं औषधें अपक्वच साऱ्या देहाला व्यापून मग मद्य व विष याचे सारखीं पाकीमत जातात तीं औषधें व्यवायी जाणावीं, उदाहरण—भांग व अफु.

## विकासी औषधें.

संधिबंधांस्तुशिथिलान्यत्करोतिविकाशितत् ॥
विश्लेष्यौजश्चधातुभ्योयथाक्रमुककोद्रवाः ॥ ३९ ॥

जीं औषधें सर्वांगाचे सधीचे बंधनास शिथिल करून रसादि धातूंपासून उत्पन्न जालें जें ओज ( ह्मणजे बळ ) त्याला शिथिल करितात तीं औषधें विकाशी जाणावीं, उदाहरण—सुपारी व कोद्रु धान्य.

## मदकारी पदार्थ,

बुद्धिंलुंपतियद्द्रव्यमदकारितदुच्यते ॥

तमोगुणप्रधानंचयथामद्यंसुरादिकं ॥ ४० ॥

जो पदार्थ तमोगुण प्रधान असून बुद्धीला आच्छादितो तो पदार्थ मदकारी जाणावा; उदाहरण—सुरादिक मद्य.

## प्राणहारक औषधें.

व्यवायिचाविकाशिस्यात्सूक्ष्मच्छेदिमदावहम् ॥
आग्नेयंजीवितहरंयोगवाहिस्मृतंविषं ॥ ४१ ॥

पूर्वी सांगितलीं जीं व्यवायी औषधें व विकाशी औषधें व सूक्ष्म औषधें व छेदी औषधें व मदकारी औषधें व आग्नेय औषधें या सहांचे गुणेंकरून जें द्रव्य युक्त असतें तें द्रव्य प्राणहारि जाणावें; उदाहरण—विष बचनागादिक. तें योगवाही जाणावें. कारण, कोणी आचार्य श्लोकांत ' योगवाह्यमृतंविषं ' असाही पाठ म्हणतात त्याचा अर्थ, तेंच विष योगवाहि ( म्हणजे त्याला कांहीं संस्कार विशेषेंकरून ज्या ज्या अनुपानाशीं योजिलें त्या त्या अनुपानाचे गुण वाढवून अमृततुल्य ) होतें.

## प्रमाथी औषध.

निजवीर्येणयत्द्रव्यंस्रोतोभ्योदोषसंचयं ॥
निरस्यतिप्रमाथिस्यात्तद्यथामरिचवंचा ॥ ४२ ॥

जीं औषधें आपल्या प्रभावेंकरून कान, तोंड, नाक इत्यादिकांचे छिद्रांमध्यें कफादि दोषाचा संचय जाहला असतां त्या संचयाला दूर करितात, तीं औषधें प्रमाथी जाणावीं; उदाहरण—वेखंड व मिऱ्यें.

## अभिष्यंदी पदार्थ.

पैच्छिल्यागौरवाद्द्रव्यंरुद्धारसवहाःशिराः ॥
धत्तेयद्गौरवंतत्स्यादभिष्यंदियथादधि ॥ ४३ ॥

जो पदार्थ आपल्या पिच्छल गुणेंकरून व जड गुणेंकरून रसवाहिनी शिरांना रोधून शरीराला जड करितो तो पदार्थ अभिष्यंदि ( म्ह. कफकारक ) जाणावा; उदाहरण—दहीं.

इति श्री दामोदरसूनु शार्ङ्गधरेण विरचितायां सूत्रस्थाने प्रथमखंडे
दीपनपाचनादिश्चतुर्थोऽध्यायः ॥ ४ ॥

# अथपंचमोऽध्यायः



**वैद्याला शरीराचे विशेष ज्ञानावांचून चिकित्सा करितां येत नाही, यास्तव शारीर सांगतों.**

कलाःसप्ताशया.सप्तधातवःसप्ततन्मला ॥ सप्तोपधातव
सप्तत्वचःसप्तप्रकीर्तिताः ॥ ४४ ॥ त्रयोदोषानवशतस्नायूनांस
धयस्तथा ॥ दशाधिकचद्विशतमस्थ्यांचत्रिशततथा ॥ ४५ ॥
सप्तोत्तरमर्मशतंशिराःसप्तशतंतथा ॥ चतुर्विंशतिराख्याता
धमन्योरसवाहिकाः ॥ ४६ ॥ मांसपेश्य.समाख्यातानृणा
पंचशतंबुधैः ॥ स्त्रीणांचविंशत्यधिकाःकंडराश्चैवषोडश ॥ ४७ ॥
नृदेहेदशरध्राणिनारीदेहेत्रयोदश ॥ एतत्समासतः प्रोक्तं
विस्तरेणाधुनोच्यते ॥ ४८ ॥

शरीराचे ठायीं रसादि धातूची जीं स्थाने त्याच्या मर्यादाभूत अशा सात कला आहेत व कोष्ठामध्यें सात आशय ह्मणजे स्थानें आहेत, व रस, रक्त, मांस, मेद, अस्थि, मज्जा, शुक्र असे सात धातु आहेत; व त्या धातूचे सात मळ आहेत, व धातूचे जवळ राहणारे असे सात उपधातु आहेत, व शरीराला त्वचा ह्मणजे कातड्या सात आहेत, व वात, पित्त, कफ हे तीन दोष आहेत, व शरीराला दोऱ्यासारखीं व वेलीसारखीं नऊशें बंधनें आहेत याना स्नायु असें म्हणतात व दोनशें दहा संधी म्हणजे सांधे आहेत; श्लोकांत चकार आहे ह्मणून याहून कांहीं अधिकही संधी आहेत असें जाणावें, व शरीराला आधारभूत व बळकट अशीं तीनशें अस्थि म्हणजे हाडें आहेत, व जीवाचीं आधारभूत अशीं एकशें सात मर्में आहेत, व दोष, धातु, मळ याना वाहणाऱ्या अशा सातशें शिरा आहेत, व चकारास्तव आणखीही शिरा आहेत; व रस वाहणाऱ्या चोवीस धमनी ह्मणजे नाडी आहेत, व पुरुषाचे शरीरात मांसपेशी ह्मणजे मांसाचीं खंडें लावट अशीं पांचशें आहेत, व स्त्रियाना पांचशाहून वीस अधिक आहेत, व कंडरा म्हणजे मोठे मोठे स्नायु सोळा आहेत, व पुरुषाच्या देहाचे ठायीं दहा रंध्रें म्हणजे छिद्रें आहेत, व स्त्रियाना याहून अधिक तीन छिद्रें आहेत, याप्रकारें कलादिक संक्षेपेंकरून सांगितलें आतां विस्तारेंकरून सांगतों

## कलांचे प्रकार.

मांसासृक्मेदसांतिस्रोयकृत्प्लीन्होश्चतुर्थिका ॥
पंचमीचतथांत्राणांषष्ठीचाग्निधरामता ॥ ४९ ॥
रेतोधरासप्तमीस्यादितिसप्तकलाःस्मृताः ॥

पहिली कला मांसाला धारण करते तिला मांसधरा म्हणतात व दुसरी कला रक्ताला धारण करिते तिला रक्तधरा म्हणतात व तिसरी मेदाला धारण करिते तिला मेदोधरा म्हणतात व यकृत् व प्लीहा यांची चवथी कला ती या दोहोंचेमध्यें राहते म्हणून तिला कफधरा असें म्हणतात व अंत्रें ( ह्मणजे आंतडीं ) यांना धारण करणारी जी पांचवी कला तिला पुरीषधरा असें म्हणतात, व अग्नीला धारण करणारी जी सहावी कला तिला पित्तधरा असें ह्मणतात. व सातवी कला शुक्रधातूला धारण करिते ती रेतोधरा जाणावी, या प्रकारें सात कला जाणाव्या.

## आशयांचे प्रकार.

श्लेष्माशयः स्यादुरसितस्मादामाशयस्त्वधः ॥ १५० ॥
ऊर्ध्वमग्न्याशयोनाभेर्वामभागव्यवस्थितः ॥ तस्योपरिति-
लंक्लेयंतदधः पवनाशयः ॥ ५१ ॥ मलाशयस्त्वधस्तस्यव.
स्तिर्मूत्राशयःस्मृतः ॥ जीवरक्ताशयमुरोज्ञेयाः सप्ताश-
यास्त्वमी ॥ ५२ ॥ पुरुषेभ्योधिकाश्चान्येनारीणामाशया-
स्त्रयः ॥ धरागर्भाशयः मोक्तस्तनौस्तन्याशयौमतौ ॥ ५३ ॥

वक्षस्थळाच्या ठायीं कफाचा आशय म्हणजे स्थान आहे, व कफस्थानाचे किंचित् अधो भागीं आमाचें स्थान आहे; व नाभीचे वर डावेकडे अग्नीचें स्थान आहे. व त्या अग्निस्थानाचे वर तीळ आहे त्याला क्लोम असें म्हणतात तेंच पिपासास्थान होय; व अग्निस्थानाचे अधोभागीं मळांचें स्थान आहे त्या स्थानालाच पक्वाशय असें म्हणतात तो वामभागीं आहे; त्याचे समीप दक्षिणभागीं चर्मखलनकाकार मूत्राला आधार असा बस्ती आहे; व जीवतुल्य रक्त आहे त्या रक्ताचें स्थान ऊर आहे. या प्रकारें सात आशय म्हणजे स्थानें जाणावीं व पुरुषांपेक्षां स्त्रियांना तीन स्थानें अधिक आहेत; एक गर्भाचें स्थान व स्तनमंबंधीं दुधाचीं स्थानें दोन, अशीं तीन स्थानें जाणावीं.

## रसादि सात धातूंचें विवरण.

रसासृङ्मांसमेदोस्थिमज्जशुक्राणिधातवः ॥

जायन्तेन्योन्यतःसर्वेपाचिताः पित्ततेजसा ॥ ५४ ॥

रस, रक्त, मांस, मेद, अस्थि, मज्जा, शुक्र हे सात धातु पित्ततेजेंकरून पाचित व होत्साते कर्मेंकरून एकापासून एक उत्पन्न होताहेत; उदाहरण, रसापासून रक्त, व मांस, मांसापासून मेद या प्रकारें सात धातूंचे उत्पत्तीचा क्रम जाणावा.

## सात धातूंचें मळ.

जिव्हानेत्रकपोलानांजलंपित्तंचरंजकं ॥ कर्णविट्रसनादं-
तकक्षामेढ्रादिजंमलं ॥ नखानेत्रमलंवक्त्रेस्निग्ध-
त्वंपिटिकास्तथा ॥ जायंतेसप्तधातूनांमलान्येतान्य-
नुक्रमात् ॥ ५६ ॥

जीभ, डोळे व गाल यांचें जें जळ तें रसधातूंचा मळ जाणावा, व रसधातूस रंज-वेणारें जें पित्त तें रक्तधातूचा मळ जाणावा, व कानाचा मळ तो मांस धातूचा मळ जाणावा, व जीभ, दांत, काख व शिश्नादिक यांचे जे मळ ते मेदोधातूचे मळ जाणावे, व नखें अस्थि-धातूचा मळ जाणावा, व बहुवचनेंकरून केशलोमादिकही अस्थीचा मळ आहे असें जाणावें, व डोळ्यांचा मळ व मुखाची स्निग्धता म्हणजे चिकटपणा हे मज्जाधातूचे मळ जाणावे, व यौवनोद्भव पिटिका ज्या त्या शुक्रधातूचा मळ जाणावा, व श्लोकांत तथा या पदेंकरून श्मश्रु म्हणजे मिशा त्याही शुक्रधातूचा मळ आहे. या प्रकारें सात धातूंचे सात मळ क्रमेंकरून जाणावे.

## सात उपधातु.

स्तन्यंरजश्चनारीणांकालेभवतिगच्छति ॥ शुद्धमांसभवः
स्नेहःसावसापरिकीर्तिता ॥ ५७ ॥ स्वेदोदंतास्तथाकेशास्तथैवौ-
जश्चसप्तमम् ॥ इतिधातुभवाज्ञेयाएतेसप्तोपधातवः ॥ १५८ ॥

स्तनसंबंधीं जें दूध तें रसधातूद्भव व उपधातु जाणावे, व रज म्हणजे स्त्रियांना विटाळ वाहतो तो रक्तधातूचा उपधातु जाणावा. हे दोन उपधातु स्त्रियास काळविशेषीं उत्पन्न होतात व नाहींसेही होतात व शुद्ध मांसापासून उत्पन्न जाहला जो स्नेह तो मांसधातूचा उपधातु जाणावा, व दांत अस्थिधातूचे उपधातू जाणावे, केश मज्जाधातूचे उपधातू जाणावे व ओज शुक्रधातूचा उपधातू जाणावा. या प्रकारें साता धातूंपासून सात उपधातु उत्पन्न जाहले असें जाणावें.

## साता त्वचांचें विवरण.

ज्ञेयावभासिनीपूर्वासिध्मस्थानचसामता ॥ द्वितीयालोहिताज्ञेयातिलकालकज-

न्मभूः ॥ ५९ ॥ श्वेतातृतीयासंख्यातास्थानंचर्मदलस्यच ॥ ताम्राचतुर्थीविज्ञेयाकिलासश्वित्रभूमिका ॥ ६० ॥ पंचमीवेदिनीख्यातासर्वकुष्ठोद्भवस्ततः ॥ विख्यातारोहिणीषष्ठीग्रंथिगंडापचीस्थितिः ॥ ६१ ॥ स्थूलात्वक्सप्तमीख्याताविद्रध्यादेः स्थितिश्चसा ॥ इतिसप्तत्वचः प्रोक्तास्थूलाव्रीहिद्विमात्रया ॥६२॥

पहिल्या त्वचेचें नाम अवभासिनी ती त्वचा सिध्मरोगाची जागा होय, व ... चकार आहे म्हणून पद्मकंटकादिक रोगांचीही जागा होय, व दुसऱ्या त्वचेचें नाव लोहिता ती तिलक व अलक या रोगांची जागा होय, व तिसऱ्या त्वचेचें नाम श्वेता ती चर्मदल रोगाची जागा होय, व चवथ्या त्वचेचें नाम ताम्रा ती किलासकुष्ठ व श्वित्रकुष्ठ यांची जागा होय, व पांचव्या त्वचेचें नाम वेदिनी ती सर्व कुष्ठांची जागा होय, व साहाव्या त्वचेचें नांव रोहिणी ती ग्रंथि व गंडमाळा व गंडमाळेचा भेद अपची रोग याची जागा होय व सातव्या त्वचेचें नाम स्थूला ती विद्रधि रोग व आदिशब्देंकरून अर्श व भगंदर रोग यांची जागा होय, या प्रकारें सात त्वचा सांगितल्या त्या त्वचा साती मिळोन दोन साळींप्रमाणें मोठ्या आहेत असें जाणावें.

## वातादि तीन दोषांचा भेद.

वायुः पित्तंकफोदोषाधातवश्चमलास्तथा ॥ तत्रापिपंचधाख्याताः प्रत्येकंदेहधारणात् ॥ ६३ ॥

शरीरामध्यें वात, पित्त, कफ, हे तीन पदार्थ आहेत. ते रसादि धातूंस दूषित करितात, ह्मणोन त्यांना दोष असें म्हणतात व तेच शरीर धारण करितात व पोषितात म्हणून त्यांना धातु असें म्हणतात. व रसादि धातूंना मलिन करितात, ह्मणोन त्यांना मल असें ह्मणतात. व ते दोष शरीरधारणेंकरून एक एक पांच पांच प्रकारचे जाहले आहेत; उदाहरण- वायू पांच प्रकारचा, व पित्त पांच प्रकारचें व कफ पांच प्रकारचा या प्रकारें जाणावें. यांची लक्षणें व नामें पुढील श्लोकीं सांगेन.

## वायूचें प्राधान्यपूर्वक स्वरूप व पित्ताचें विवरण,

पवनस्तेषुबलवान्विभागकरणान्मतः ॥ रजोगुणमयः सूक्ष्मः शीतोरूक्षोलघुश्चलः ॥ ६४ ॥ मलाशयेचरन्कोष्ठवन्हिस्थानेतथाहृदि ॥ कंठेसर्वांगदेशेषुवायुः पंचप्रकारतः ॥ ६५ ॥ अपानः स्प... [illegible] ॥ व्यानश्चेतिसमीरस्यनामान्युक्तान्यनुक्रमात् [illegible]

वात, पित्त, कफ, या तीन दोषांम[illegible] विभाग कर- ण्याचें, व पित्त, कफ यांना जिकडे पा[illegible] न, व [illegible]

वायूमध्यें रजोगुण फार आहे. व तो वायु सूक्ष्म आहे, व स्वभावेंकरून शीतळ आहे; व रूक्ष, हलका, चंचळ आहे व तो वायु पांच स्थानांचेठायीं गमन करित होत्साता पांच प्रकारचा जाणावा; तीं पांच स्थानें व पांच नामें क्रमेंकरून सांगतों. मलाशय म्हणजे पक्वाशय त्याचे ठायीं जो वायु राहतो त्याला अपान वायु असें ह्मणतात, व कोष्ठामध्यें अग्नीचें स्थान आहे त्या स्थानाचे ठायीं राहतो त्याला समानवायु असें ह्मणतात, व हृदयाचे ठायीं राहातो त्याला प्राणवायु असें म्हणतात, व कंठाचे ठायीं राहातो त्याला उदानवायु असें म्हणतात, व सर्व शरीराचे ठायीं राहातो त्याला व्यान वायु असें म्हणतात. या प्रकारें वायूचीं पांच स्थानें व पांच नामें क्रमेंकरून जाणावीं.

## पित्ताचें विवरण.

पित्तमुष्णंद्रवंपीतंनीलंसत्वगुणोत्तरं ॥ कटुतिक्तरसंज्ञेयंविदग्धंचाम्लतांव्रजेत् ॥ ६७ ॥ अग्न्याशयेभवेत्पित्तमग्निरूपंतिलोन्मितं ॥ त्वचिकांतिकरंज्ञेयंलेपाभ्यंगादिपाचकम् ॥ ६८ ॥ प्लीह्नियकृतियत्पित्तंतादृक्शोणितंनयेत् ॥ यत्पित्तंनेत्रयुगुलेरूपदर्शनकारितत् ॥ ६९ ॥ यत्पित्तंहृदयेतिष्ठन्मेधाप्रज्ञाकरंचतत् ॥ पाचकंभ्राजकंचैवरंजकालोचकेतथा ॥ १७० ॥ साधकंचेतिपंचैवपित्तनामान्यनुक्रमात् ॥

उष्ण व पातळ व पिवळें व निळें या प्रकारचें पित्त आहे व त्या पित्तामध्यें सत्वगुण फार आहे व त्यामध्यें तिखट व कडु हे दोन रस आहेत व तें पित्त उष्णादि पदार्थांचे योगेंकरून विदग्ध ह्मणजे विकृत झालें असतां आंबट होतें अशा प्रकारचें पित्त आहे. तें पित्त पांच स्थानांचे ठायीं राहातें. तीं पांच स्थानें व त्यांचीं पांच नामें क्रमेंकरून सांगतों; कोठ्यामध्यें अग्नीचें स्थान आहे. त्या स्थानाचे ठायीं पित्त आहे तें अग्निस्वरूप असून एक तिळप्रमाण आहे व तें पित्त त्या जागेवरील चार प्रकारचे अन्नाला पचवितें म्हणून त्याला पाचक असें ह्मणतात. व त्वचेचे ठायीं जें पित्त राहतें तें पित्त शरीराचे ठायीं कांति उत्पन्न करितें व चंदनादिकांचा लेप व तेलादिकांचा अभ्यंग, आदिशब्देंकरून स्नानादिक यांना पचवितें त्या पित्ताला भ्राजक असें ह्मणतात. व जें पित्त डावीकडे प्लीहाचे स्थानीं राहून जसें रसापासून रक्ताला उत्पन्न करितें, व तें पित्त दृश्य ह्मणजे दृष्टिगोचर आहे. त्याला रंजक असें ह्मणतात. व दोहों डोळ्यामध्यें जें पित्त राहातें तें पित्त श्वेतनीलपीतादि रूपाचें दर्शन करवितें, त्या पित्ताला आलोचन असें म्हणतात व जें पित्त हृदयाचे ठायीं राहतें तें पित्त मेधारूप व प्रज्ञारूप बुद्धीला उत्पन्न करितें त्या पित्ताला साधक असें ह्मणतात, या प्रकारें पित्ताचीं पांच स्थानें व पांच नामें क्रमेंकरून जाणावीं.

## कफाचें विवरण.

कफःस्निग्धोगुरुःश्वेतःपिच्छिलःशीतलस्तथा ॥ ७१ ॥ तमोगुणाधिकःस्वादुर्वि-
दग्धोलवणोभवेत् ॥ कफश्चामाशयेमूर्ध्निकंठेहृदिचसंधिषु ॥ ७२ ॥ तिष्ठन्करो-
तिदेहेषुस्थैर्यंसर्वांगपाटवं ॥ क्लेदनः स्नेहनश्चैवरसनश्चावलंबनः ॥ ७३ ॥ श्ले-
ष्मकश्चेतिनामानिकफस्योक्तान्यनुक्रमात् ॥

चिकट व पांढरा व बुळबुळीत व शीतळ या प्रकारचा कफ आहे व त्या कफामध्यें तमोगुण फार आहे व मधुर आहे व तो कफ विदग्धपण किंवा पक्वतेमध्ये पावला असतां खारट होतो असा प्रकारचा कफ आहे. तो पांच स्थानीं राहून देहाची स्थिरता व पुष्ट करितो. तीं पांच-स्थानें व त्यांचीं पांच नामें क्रमेंकरून सांगतों; आमाचे स्थानीं जो कफ राहतो त्याला क्लेदन असें ह्मणतात, व मस्तकाचे ठायीं राहतो त्याला स्नेहन असें ह्मणतात, व कंठाचे ठायीं राहतो त्याला रसन असें ह्मणतात, व हृदयाचे ठायीं राहतो त्याला अवलंबन असें ह्मणतात, व संधीचे ठायीं राहतो त्याला श्लेष्मक असें ह्मणतात, या प्रकारें कफाचीं पांच स्थानें व पांच नामें क्रमेंकरून जाणावीं.

### स्नायूचें कार्य.

स्नायवोबंधनंप्रोक्तादेहेमांसास्थिमेदसां ॥ ७४ ॥

स्नायु ह्मणजे देहाचे ठायीं मांस व अस्थि व मेद यांचें बंधन आहेत.

### संधीचें लक्षण.

संधयश्चांगसंधानाद्देहेप्रोक्ताः कफान्विताः ॥

हाडांचे ठायीं [illegible] सांधे संधान [illegible] परस्पर संयोग [illegible] [illegible] त्याला संधी ह्मणतात. त्या [illegible] युक्त असतात.

### अस्थीचें लक्षण.

[illegible] सर्वधातुषु ॥ ७५ ॥

[illegible] सार आहे.

### [illegible] लक्षण.

[illegible] जगुः ॥

[illegible]

## शिरांचें लक्षण.

संधिबंधनकारिण्योदोषधातुवहाः शिराः ॥ ७६ ॥

शिरा संधींचें बंधन करणाऱ्या व वातादि दोष व रसादिधातु यांतें वाहणाऱ्या आहेत.

धमन्योरसवाहिन्योधमंतिपवनंतनौ ॥

शरीराचे ठायीं रसवाहिनी ज्या नाडी आहेत त्या वायूलें धमन करितात म्हणजे वायूला उडवितात म्हणून त्यांना धमनी असें म्हणतात.

## पेशींचें लक्षण.

मांसपेश्योबलायस्युरवष्टंभायदेहिनां ॥ ७७ ॥

मांसपेशी म्हणजे मांसखंडें तीं बलाकारणें व अवष्टंभ म्हणजे आधार त्याकारणें आहेत.

## कंडरांचें कार्य.

प्रसारणाकुंचनयोरंगानांकंडरा मताः ॥

कंडरा म्हणजे मोठाले स्नायु ते हस्तपादादिक जीं अंगें त्यांचें प्रसारण व आकुंचन यांविषयीं समर्थ आहेत.

## रंध्रांचें विवरण.

नासानयनकर्णानांद्वेद्वेरंध्रेप्रकीर्तिते ॥ ७८ ॥ मेहनापानवक्त्राणामेकैकंरंध्रमुच्यते ॥ दशमंमस्तकेचोक्तंरंध्राणीतिनृणांविदुः ॥ ७९ ॥ स्त्रीणांत्रीण्यधिकानिस्युः स्तनयोर्गर्भवर्त्मनः ॥ सूक्ष्मछिद्राणिचान्यानिमतानित्वचिजन्मिनाम् ॥ ८० ॥

नाक, नेत्र, कान यांचे ठायीं दोन दोन रंध्रें आहेत, व शिश्न, गुद, मुख यांचे ठायीं एकेक रंध्र आहे, व मस्तकाचे ठायीं एक रंध्र आहे त्याला ब्रह्मरंध्र असें म्हणतात. याप्रमाणें पुरुषास दहा रंध्रें आहेत; व स्तनसंबंधीं रंध्रें दोन व गर्भमार्गाचे ठायीं एक अशीं तीन रंध्रें पुरुषापेक्षां स्त्रियांला अधिक आहेत असें जाणावें व मनुष्याचे त्वचेचे ठायींही दुसरीं अनंत रंध्रें आहेत तीं सूक्ष्म आहेत. याप्रकारें रंध्रें जाणावीं.

## फुप्फुसादिकांचें स्वरूप.

तद्वामेफुप्फुसंप्लीहादक्षिणेयकृन्मतं । उदानवायोराधारः फुप्फुसंप्रोच्यतेबुधैः ॥ ८१ ॥ रक्तवाहिशिरामूलंप्लीहाख्यातामहर्षिभिः ॥ यकृद्रंजकपित्तस्यस्थानंरक्तस्यसंश्रयः ॥ ८२ ॥

हृदयाचे वामभागीं प्लीहा व फुप्फुस आहेत व दक्षिणभागीं यकृत् आहे त्याला काळ-खंड असें म्हणतात. यांची कार्यें सांगतो. उदानवायूचे आधारभूत फुप्फुस आहे व शिरांचें मूळ प्लीहा आहे व रंजक पित्ताचें स्थान व रक्ताचें स्थान यकृत् आहे असें

## तिलाचें लक्षण.

जलवाहिशिरामूलंतृष्णाच्छादनकंतिलं ॥

शोणित कीटापासून उत्पन्न व दक्षिणभागीं यकृताचे समीप तिळ आहे त्याला असें म्हणतात. तो तीळ जलवाही शिरांचें मूळ आहे, यास्तव तृष्णा म्हणजे ताहान त्याचें आच्छादन करितो असें जाणावें.

## वृक्काचें लक्षण.

वृक्कौपुष्टिकरौप्रोक्तौजठरस्थस्यमेदसः ॥ ८३ ॥

वृक्क म्हणजे कुक्षिगोलक ते जठरस्थ जो मेद त्याला पुष्ट करितात, ... या अमरावरून वुक्कौ पुष्टिकरौ असाही पाठ जाणावा.

## वृषण लक्षण.

वीर्यवाहिशिराधारौवृषणौपौरुषावहौ ॥

वृषण म्हणजे अंड ते वीर्यवाहिनी शिरांचे आधार आहेत, यास्तव पौरुषावह ... हेत. ( म्हणजे पुरुषत्व देतात. ) " बीजवाहि असाहि पाठ आहे. "

## लिंगाचें लक्षण.

गर्भाधानकरंलिंगमयनंवीर्यमूत्रयोः ॥ ८४ ॥

लिंग म्हणजे शिश्न तें वीर्यद्वारें गर्भाला उत्पन्न करितें; आणि वीर्य व मूत्र यांचा मार्ग होय, कोठें बीजमूत्रयो असाही पाठ आहे.

## हृदयाचे व्यापार.

हृदयंचेतनास्थानमोजसश्चाश्रयंपरं ॥

कमळाचे कळ्याप्रमाणें किंचित् विकसित व अधोमुख असें हृदय आहे तें ... स्थान होय, व ओज म्हणजे सर्व धातूंचें तेज त्याचें आश्रय होय.

## शरीर पोषणार्थ लक्षण.

शिरास्नाय्वोनाभिस्थाःसर्वाःव्याप्यस्थितास्तनु ॥ ८५ ॥ पुष्णंतिचानिशंवायोः संयोगात्सर्वधातुभिः ॥

नाभीचे ठायीं राहाणाऱ्या अशा शिरा व धमनी आहेत त्या संपूर्ण शरीरातें व्यापून राहिल्या होत्सात्या रात्रंदिवस वायूचे संयोगेंकरून रसादि संपूर्ण धातूंना सर्व शरीराप्रत नेऊन शरीराचें पोषण करिताहेत.

## प्राणवायूचा व्यापार.

नाभिस्थःप्राणपवनःस्पृष्ट्वाहृत्कमलांतरम् ॥ ८६ ॥ कंठाद्बहिर्विनिर्यातिपातुं विष्णुपदामृतं ॥ पीत्वाचांबरपीयूषंपुनरायातिवेगतः ॥ ८७ ॥ प्रीणयन्देहमखिलंजीवंचजठरानलम् ॥

नाभिस्थ जो प्राणवायु तो हृदयकमलाचे अभ्यंतरीं स्पर्श करून ब्रह्मरंध्राश्रित जें विष्णुपद त्याचे ठायीं अमृत आहे त्या अमृताचें पान करण्यासाठीं कंठाचे बाहेर निघून मस्तकाचे ठायीं प्राप्त होऊन ब्रह्मरंध्राश्रित जें अमृत त्यातें प्राशन करून, मातव्यान वेगेंकरून याच मार्गानें स्वस्थानीं येऊन, संपूर्ण देहातें व जीवातें संतुष्ट करितो व जठराग्नीतें पाचकशक्ति देतो, अथवा हृदयस्थ जो वायु तोच विष्णुपदामृत पिऊन पुन्हां नाभिस्थानीं येऊन मग संपूर्ण करितो, हृदयस्थ वायूलाच प्राण म्हणतात, त्या पक्षीं हा अर्थ जाणावा.

## आयुष्याचें व मरणाचें लक्षण.

शरीरप्राणयोरेवंसंयोगादायुरुच्यते ॥ ८८ ॥
कालेनतद्वियोगाद्धिपंचत्वंकथ्यतेबुधैः

एवं म्हणजे पूर्वोक्त प्रकारेंकरून शरीराशीं प्राणाचा जो संयोग त्याला आयुष्य असें म्हणतात व कालेंकरून शरीर आणि प्राण याचा वियोग जाहला असतां त्याला पंचत्व म्हणजे मरण असें म्हणतात.

नजंतुःकश्चिदमर पृथिव्यांजायते क्वचित् ॥ ८९ ॥
अतोमृत्युरवार्य स्यात्किंतुरोगान्निवारयेत् ॥

पृथ्वीचे ठायीं कोणताही प्राणी कोठेंही अमर नाहीं यास्तव मृत्यूचें निवारण करण्याविषयीं कोणीच समर्थ नाहीं, परतु वैद्यानीं रोग मात्र निवारण करावे.

## रोगनिवारणाविषयीं साध्यादिभेद लक्षण.

याप्यत्वंयातिसाध्यश्चयाप्योगच्छत्यसाध्यतां ॥ १९० ॥
जीवितंहंत्यसाध्यस्तुनरस्याप्रतिकारिणः ॥

चिकित्सा जाहली नाहीं ज्याची असा रोगी त्याचा व्याधि सुखसाध्य असतां कष्टसाध्य होतो, व त्या कष्टसाध्य व्याधीची उपेक्षा केली असता असाध्य होतो, असाध्य जाहला म्हणजे प्राणहरण असे प्रकारें पांच नामें जाणावीं.

## चार पदार्थंकरून देहाची रक्षा.

धर्मार्थकाममोक्षाणांशरीरंसाधनंयतः ॥ ९१ ॥
अतोरुग्भ्यस्तनुंरक्षेन्नरःकर्मविपाकवित् ॥

धर्म, अर्थ, काम व मोक्ष यांचें साधन म्हणजे कारण असें शरीर आहे. यास्तव शुभाशुभ कर्माचें फळ जाणणारा अशा मनुष्यानें रोगांपासून शरीराचें रक्षण करावें.

धातवस्तन्मलादोषानाशयंत्यसमास्तनुं ॥ ९२ ॥
समाःसुखायविज्ञेयावलायोपचयायच ॥

रसादि सात धातु व त्यांचे सात मळ व वातादि तीन दोष हे न्यूनाधिक्य जाहले असतां शरीराचा नाश करिताहेत व सम म्हणजे स्वप्रमाणस्थित असतां सुख, बळ, शरीराची वृद्धि यांतें देताहेत.

## सृष्टिक्रमपूर्वक चतुर्विंशति तत्वनिरूपण.

जगद्योनेरनिच्छस्यचिदानंदैकरूपिणः ॥ ९३ ॥
पुंसोऽस्तिप्रकृतिर्नित्यामतिच्छायेवभास्वतः ॥

महदादिरूप जें जगत् म्हणजे पृथिव्यादि भूतें त्यांचें आदिकारण असून जो इच्छारहित व चिदानंद, ज्ञानमय असा पुरुष आहे त्याला ईश्वर असें म्हणतात, व त्या पुरुषाची संबंधिनी व सत्व, रज, तम यांचे साम्यावस्थेचे ठायीं राहणारी व नित्य अशी प्रकृति आहे तिला अव्यक्त असें म्हणतात; या प्रकृतिपुरुषाचे संबंधाविषयीं दृष्टांत, सूर्याचे क्रियेंकरून जशी प्रतिबिंबासही क्रिया होते त्या प्रकारें पुरुषाचे अधिष्ठानेंकरून म्हणजे आश्रयेंकरून प्रकृतीची चेष्टा जाणावी.

## प्रकृति कसें विश्व निर्माण करिते व पुरुषाला कर्तृत्व कसें तो प्रकार.

अचेतनादिचैतन्ययोगेनपरमात्मनः ॥ ९४ ॥
अकरोद्विश्वमखिलमनित्यंनाटकाकृति ॥

चेतनारहित म्हणजे जड अशी जी प्रकृति ती सृष्टीचे आधीं परमात्म्याचे चैतन्यसंबंधें करून अनित्य [illegible] महदादिरूप जें विश्व त्यातें करिती जाहली; याविषयीं दृष्टांत, [illegible] प्रकारचें खोटें नाटक दाखवितो, [illegible] याप्रकारें

प्रकृतिपुरुष चैतन्येंकरून नानाप्रकारचें अनित्य असें चें विश्व त्यातें नर्तवून पुनः ती प्रकृति त्या पुरुषामध्यें स्वस्वरूपानें प्रविष्ट होऊन राहते अथवा पुरुषसंबंधाचा अभाव जाहला असतां प्रकृति स्वस्वरूपेंकरूनच राहते.

प्रकृतिर्विश्वजननीपूर्वंबुद्धिमजीजनत् ॥ ९५ ॥
इच्छामयींमहद्रूपामहंकारस्ततोभवत् ॥
त्रिविधःसोपिसंजातोरजःसत्वतमोगुणैः ॥ ९६ ॥

विश्वाची जननी अशी जी प्रकृति ती पूर्वं म्हणजे सृष्टीचे आधीं बुद्धीतें उत्पन्न करिती झाली, त्या बुद्धीला इच्छामयी व महद्रूपा असें म्हणतात व त्या बुद्धितत्वापासून अहंकार उत्पन्न होता जाहला, तोही रजोगुण, सत्त्वगुण व तमोगुण इहींकरून तीन प्रकारचा जाहला असें जाणावें.

## तीन प्रकारचें अहंकाराचें कार्य.

तस्मात्सत्वरजोयुक्तादिंद्रियाणिदशाभवन् ॥ मनश्चजातंतान्याहुःश्रोत्रत्वङ्नयनंतथा ॥ ९७ ॥ जिव्हाघ्राणवचोहस्तपादोपस्थगुदानिच ॥ पंचबुद्धींद्रियाण्याहुःप्राक्तनानींतराणिच ॥ ९८ ॥ कर्मेंद्रियाणिपंचैवकथ्यंतेसूक्ष्मबुद्धिभिः ॥

राजस अहंकार आहे साहाय ज्याला व तमोमात्रेंकरून अनुविद्ध ह्मणजे मिश्रित असा जो सात्विक अहंकार त्यापासून श्रोत्र, त्वक्, नयन, जिव्हा, घ्राण, वाक्, हस्त, पाद, उपस्थ, गुद, मन अशीं इंद्रियें उत्पन्न होतीं जाहलीं, त्यांमध्यें पहिलीं पांच बुद्धींद्रियें बुद्धीचा आश्रय आहे ह्मणून. व अवशिष्ट राहिलीं जीं पांच तीं कर्मेंद्रियें जाणावीं; कर्माचा आश्रय आहे ह्मणून व उभयतात्मक ह्मणजे बुद्ध्यात्मक व कर्मात्मक मन आहे असें जाणावें. अथवा राजस अहंकारापासून इंद्रियें, व सात्विक अहंकारापासून इंद्रियांच्या देवता आणि मन असा पृथक्त्वेंकरून उत्पत्तिक्रम जाणावा.

तमःसत्वगुणोत्कृष्टादहंकारादथाभवत् ॥ ९० ॥ तन्मात्रपंचकंतस्यनामान्युक्तानिसूरिभिः ॥ शब्दतन्मात्रकंस्पर्शतन्मात्रंरूपमात्रकं ॥ २०० ॥ रसतन्मात्रकं गंधतन्मात्रंचेतितद्विदुः ॥

राजस अहंकार आहे सहाय ज्यास व सत्वमात्रेंकरून अनुविद्ध ह्मणजे युक्त असा जो तामस अहंकार त्यापासून तन्मात्र ह्मणजे त्या त्या आश्रयावर मुख्य प्रमाणत्वेंकरून राहणारें असें गुणपंचक उत्पन्न होतें जाहलें. त्यांचीं नामें शब्दतन्मात्र, स्पर्शतन्मात्र, रूपतन्मात्र, रसतन्मात्र, गंधतन्मात्र याप्रकारें पांच नामें जाणावीं.

## तन्मात्रपंचकांचें विशेष.

शब्दःस्पर्शश्चरूपंचरसगंधावनुक्रमात् ॥ १ ॥
तन्मात्राणांविशेषाःस्युःस्थूलभावमुपागताः ॥

शब्द, स्पर्श, रूप, रस, गध हे क्रमेंकरून तन्मात्रपंचकाचे विशेष जाणावे; यांचा सुख, दु ख व मोह इहींकरून अनुभव होतो. यास्तव स्थूलभावाप्रत पावले असें जाणावें व तन्मात्रपंचकाचा अनुभव सूक्ष्म आहेत म्हणून होत नाहीं.

## भूतपंचकाची उत्पत्ति.

तन्मात्रपंचकाचस्मात्संजातंभूतपंचकम् ॥ २ ॥
व्योमानिलानलजलक्षोणीरूपंचतन्मतं ॥

शब्दादि पच तन्मात्रांपासून भूताचें पंचक उत्पन्न होतें जाहलें, त्याचीं नामें व्योम, अनिल, अनल, जल, क्षोणी याप्रकारें जाणावीं.

## इंद्रियांचे विषय.

बुद्धींद्रियाणांपंचैवशब्दाद्याविषयामताः ॥ ३ ॥
कर्मेंद्रियाणांविषयाभाषादानविहारिता ॥
आनंदोत्सर्गकौचैवकथितास्तत्त्वदर्शिभिः ॥ ४ ॥

श्रोत्र, त्वक्, चक्षु, जिव्हा, घ्राण हीं बुद्धींद्रियें पाच, याचे शब्द, स्पर्श, रूप, रस, गध हे पाच विषय क्रमेंकरून जाणावे, उदाहरण, श्रोत्रेंद्रियाचा शब्द विषय, व त्वगिंद्रियाचा स्पर्श विषय या क्रमानें जाणावें व वाक्, हस्त, पाद, उपस्थ, गुद हीं कर्मेंद्रियें पांच, याचे भाषा, आदान, विहार, आनद व उत्सर्ग हे पाच विषय क्रमेंकरून जाणावे. उदाहरण, वागिंद्रियाचा भाषाविषय, व हस्तेंद्रियाचा आदान विषय या क्रमानें जाणावें.

## उक्तांचा संक्षेप.

प्रधानंप्रकृतिःशक्तिर्नित्याचाविकृतिस्तथा ॥ एतानितस्यानामानिशिवमाश्रित्ययास्थिता ॥ ५ ॥ महानहंकृतिःपंचतन्मात्राणिपृथक्पृथक् ॥ प्रकृतिर्विकृतिश्चैवसप्तैतानिब्रुधाजगुः ॥ ६ ॥ दशेंद्रियाणिचित्तंचमहाभूतानिपंचच ॥ विकारा. षोडशज्ञेयाः सर्वव्याप्यजगत्स्थिताः ॥ ७ ॥

प्रधान व प्रकृति व शक्ति व नित्या व अविकृति हे प्रकृतीचे पर्याय शब्द जाणावे, ती प्रकृति शिव ( म्हणजे ईश्वर ) याचे आश्रयेंकरून राहाते असें जाणावें व महत्तत्व व अहंकार व पंचतन्मात्रा हीं सात इंद्रियादिकांचीं कारणें आहेत. म्हणून प्रकृतिरूप जाणावीं;

सांख्यमताचे ठायीं ही आठ प्रकारची प्रकृति आहे, व प्रकृतीचीं कार्यरूपें आहेत म्हणून विकृतिरूप ही जाणावीं, व इंद्रियें १० व उभयात्मक मन अशीं ११ इंद्रियें व ५ महाभूतें असे १६ विकार जाणावे, ते संपूर्ण जगातें व्यापून राहिले आहेत असें जाणावें.

## चोवीस तत्वराशी.

**एवंचतुर्विंशतिभिस्तत्वैःसिद्धैर्वपुर्गृहे ॥ जीवात्मानियतोनित्यंवसातिस्वांतदूतवान् ॥ ८ ॥ सदेहीकथ्यतेपापपुण्यदुःखसुखादिभिः ॥ व्याप्तोबद्धश्चमनसाकृत्रिमैः कर्मबंधनैः ॥ ९ ॥**

अव्यक्त १ महान् २ अहंकार ३ शब्दतन्मात्र ४ स्पर्शतन्मात्र ५ रूपतन्मात्र ६ रसतन्मात्र ७ गंधतन्मात्र ८ श्रोत्र ९ त्वक्, १० चक्षू ११ घ्राण १२ रसना १३ वाक् १४ हस्त १५ पाद १६ उपस्थ १७ पायू १८ मन १९ पृथ्वी २० आप २१ तेज २२ वायु २३ आकाश २४ या प्रकारें चोवीस तत्वें जाणावीं. तिहींकरून सिद्ध झालें जें शरीररूप गृह त्या गृहाचे ठायीं पंचविंशतिक म्हणजे पंचविसावा पुरुष सर्वकाळ राहातो त्याला जीवात्मा असें म्हणतात. त्याचा दूत मन आहे असें जाणावें, तो जीवात्मा महादादिकृत सूक्ष्मलिंग-शरीराचे ठायीं राहातो म्हणून त्याला देही असें म्हणतात व कर्मपुरुषही म्हणतात; यास्तव पाप, पुण्य, सुख, दुःख इहींकरून बद्ध आहे असें जाणावें, व मनाशीं सहवर्तमान अशीं जीं कृत्रिम कर्मबंधनें तिहींकरूनही बद्ध आहे असें जाणावें.

## अहंकारादिकांची गति.

आप्नोतिबंधमज्ञानादात्मज्ञानाच्चमुच्यते ॥
तद्दुःखयोगकृद्व्याधिरारोग्यंतत्सुखावहम् ॥ २१० ॥

पुरुष अज्ञानेंकरून क्लेशादिक बंधनाप्रत पावतो व आत्मज्ञानेंकरून मुक्त होतो, व शरीर व शरीरी यांस जो दुःख देतो तो व्याधी जाणावा, व यास जें सुख देतें तें आरोग्य जाणावें.

इति श्रीदामोदरसूनुशार्ङ्गधरेणविरचितायांसंहितायांसूत्रस्थानेप्रथमखंडे
कलादिकाख्यानंनामपंचमोऽध्यायः

# अथषष्ठोऽध्यायः

## आहाराची दोषावस्था.

यात्यामाशयमाहारःपूर्वंमाणानिलेरितः ॥ माधुर्यंफेनभावंचषड्रसोऽपिलभेतसः ॥ ११ ॥ अथपाचकपित्तेनविदग्धश्चाम्लतांव्रजेत् ॥ ततःसमानमरुताग्रहणीमभिधीयते ॥ १२ ॥ ग्रहण्यांपच्यतेकोष्ठवन्हिनाजायतेकटुः ॥

अन्नादिकांचा आहार प्राणवायूनें प्रेरित होत्साता प्रथम आमाशयाप्रत येतो. नंतर तो आहार सहा रसेंकरून युक्त होत्साता माधुर्य ह्मणजे गोडपणा व फेनभाव यांप्रत पावतो, कफस्थान आहे म्हणून मग तो आहार त्याच जाग्यावर असतां पाचक पित्तेंकरून विदग्ध म्हणजे पच्यमानाभिमुख (म्हणजे वरून मात्र परिपक्क झालेला व आंतून कचा) असा होत्साता अम्ल दशेप्रत पावतो, नंतर त्या आमाशयापासून समानवायूकरून ग्रहणी म्हणजे बन्हिस्थान त्या स्थानाप्रत येतो, नंतर त्या ग्रहणीस्थानाचे ठायीं कोष्ठाग्निकरून त्या आहाराचा पाक होतो, तो पाक कटू म्हणजे तीक्ष्ण होतो.

## आहाराची दोषावस्था.

रसोभवतिसंपकादपकादामसंभवः ॥ १३ ॥

अग्निस्थानाचे ठायीं स्थिर राहिला जो आहार त्याचा चांगला पाक जाहला असतां त्यापासून रस होतो, कच्चा आहार राहिला असतां त्यापासून आम होतो.

## रसांचीं कार्यें.

वन्हेर्बलेनमाधुर्यंस्निग्धतांयातितद्रसः ॥ पुष्णातिधातूनखिलान्सम्यक्पक्कोऽमृतोपमः ॥ १४ ॥ मंदवन्हिविदग्धश्चकटुश्चाम्लोभवेद्रसः ॥ विषभावंव्रजेद्वापिकुर्याद्वारोगसंकरं ॥ १५ ॥

त्या आहाराचा रस अग्नीचे बळेंकरून मधुरभाव व स्निग्धता ह्मणजे चिकटपणा यांप्रत पावून संपूर्ण रसादिधातूंचें पोषण करितो यास्तव त्या रसाचा चांगला पाक जाहला असतां त्याला अमृतासारखा जाणावा, व मंदाग्निकरून तो रस विदग्ध ह्मणजे विकाराप्रत पावला असतां विषभावाप्रत पावतो, किंवा अतिसारादिक रोगसमुदाय उत्पन्न करितो.

## आहाराची अवस्था.

**आहारस्यरसःसारःसारहीनोमलद्रवः ॥ शिराभिस्तज्जलंनीतंबस्तौमूत्रमवाप्नुयात् ॥ १६ ॥ तत्कीटंचमलंज्ञेयंतिष्ठत्पकाशयेचतत् ॥.**

त्या आहाराचा जो रस त्याला सार असें ह्मणतात, व सारहीन जो पदार्थ त्याला मलद्रव असे ह्मणतात, व तो द्रव मूत्रवाहिनी शिराद्वारा बस्तीचे ठायीं जाऊन मूत्रसंज्ञेमत पावतो. व अवशिष्ट राहिलें जें कीट तें पकाशयाचे एक देशाचे ठायीं जाऊन मल संज्ञेप्रत पावतें.

## मलाचें अधोगमन.

बलित्रितयमार्गेणयात्यपानेननोदित ॥ १७ ॥
प्रवाहिनीसर्जनीचग्राहिकेतिवलीत्रयम् ॥

अपानवायूनें अध प्रेरित असा जो मळ तो वलित्रितयात्मक जें गुद त्या मार्गेंकरून बाहेर येतो त्या वळीचीं नामें प्रवाहिनी, सर्जनी, ग्राहिका याप्रकारे तीन नामें जाणावीं, व त्याचा आकार शंखावर्तासारखा जाणावा.

## रसाचें कार्यत्वेंकरून अन्यस्थानीं गमन.

रसस्तुहृदययातिसमानमरुतेरितः ॥ १८ ॥
रंजितोपाचितस्तत्रपित्तेनायातिरक्तताम् ॥

सारभूत जो रस तो समान वायूनें प्रेरित होत्साता अग्निस्थानापासून हृदयाप्रत येऊन रंजक पित्तानें रागयुक्त होऊन व पाचक पित्तानें पाचित होऊन रक्तदशेप्रत पावतो.

## रसाचें प्राधान्य.

रक्तसर्वशरीरस्थंजीवस्याधारमुत्तमम् ॥ १९ ॥
स्निग्धंगुरुचलस्वादुविदग्धपित्तवद्भवेत् ॥

तें रक्त सर्व शरीर व्यापून राहिलें होत्सातें जीवाचें उत्तम आधार होय, त्याचे गुण स्निग्ध व गुरु व चंचल व स्वादु याप्रकारचे आहेत व तेंच रक्त विदग्ध ह्मणजे विकृत जाहलें असता पित्तासारखें कटु ह्मणजे तीक्ष्ण व आंबट होतें.

## रसादि धातूंचे उत्पत्तीचा क्रम.

पाचिताःपित्ततापेनरसाद्याधातवःक्रमात् ॥ २२० ॥
शुक्रत्वयांतिमासेनतथास्त्रीणांरजोभवेत् ॥

रसादिक जे सात धातु ते पित्ततापेंकरून परिपक होत्साते क्रमेंकरून एका महिन्यानें शुक्र धातुला उत्पन्न करितात. त्याच क्रमानें एका महिन्यानें स्त्रियास रजस्वलात्व ह्मणजे रक्तरूप रज ते उत्पन्न करितात.

## गर्भाची उत्पत्ति.

कामान्मिथुनसंयोगेशुद्धशोणितशुक्रजः ॥ २१ ॥
गर्भःसंजायतेनार्याःसजातोबालउच्यते ॥

मनाचे संकल्पेंकरून स्त्रीपुरुषांचा मिथुन संयोग ( ह्मणजे रतिसंग ) जाहला असतां शोणित ( ह्मणजे आर्तव ) व शुक्रधातु यांपासून स्त्रियांचे ठायीं गर्भ उत्पन्न होतो. तो गर्भ प्रगट जाहला असतां त्याला बाल असें ह्मणतात.

## कन्यादिगर्भाची उत्पत्ति.

अधिकोरजसःकन्यापुत्रःशुक्राधिकोभवेत् ॥ २२ ॥
नपुंसकंसमत्वेनयथेच्छापारमेश्वरी ॥

गर्भाधानकाळीं ऋतुसंबंधीं रक्ताचें आधिक्य जाहलें असता कन्या होते, व शुक्राचें आधिक्य जाहलें असतां पुत्र होतो, व आर्तवशोणिताचा व शुक्रधातूचा समयोग जाहला असतां नपुंसक होतो, जशी परमेश्वराची इच्छा असते तसा योग होतो.

## बालाचे पाहिले मासीं.

बालस्यप्रथमेमासिदेयाभेषजरक्तिका ॥ २३ ॥ अवलेह्यैकृतैकैवक्षीरक्षौद्रसिता-घृतैः ॥ वर्धयेत्तावदेकैकांयावद्भवतिवत्सरः ॥ २४ । मासैर्वृद्धिस्तदूर्ध्वंस्याद्या-वत्षोडशवत्सराः ॥ ततःस्थिराभवेत्तावद्यावद्वर्षाणिसप्ततिः ॥ २५ ॥ ततोबा-लकवन्मात्राह्रासनीयाशनैःशनैः ॥ मात्रेयंकल्कचूर्णानांकषायाणांचतुर्गुणा २६

बाल्कास प्रथम महिन्याचे ठायीं दूध व मध व साखर किंवा तूप यातून जें उपयुक्त असेल त्याची योजना करून त्यात एक गुंज प्रमाण सुवर्णादिक औषध घालून अवलेहीभूत ह्मणजे चाटण करून द्यावें, व दुसऱ्या मासीं २ गुंजा, तिसरे मासीं ३ गुंजा याप्रमाणें गुंजानीं औषधाची वृद्धि एक वर्षपर्यंत करावी ह्मणजे माशाचें मान होतें, व दुसरे वर्षी २ मासे, तिसरे वर्षी ३ मासे याप्रमाणें माशांनीं औषधाची वृद्धि सोळा वर्षांपर्यंत करावी, मग सोळा वर्षांपासून सत्तर वर्षांपर्यंत औषधभक्षणाविषयीं सोळा माशांचें मान जाणावें; नंतर ती मात्रा बालकास जशी वर्धित केली त्याप्रकारें त्या मात्रेचा अपकर्ष करावा म्हणजे ती उतरीत उतरीत यावें, कारण बाल व वृद्ध यांची समान चिकित्सा आहे म्हणून ती मात्रा कल्करूप व चूर्णरूप व कषायरूप असल्यास चतुर्गुणित योजावी.

## जन्मापासून वीस वर्षेपर्यंत अंजनादिक विचार.

अंजनंचतथालेपःस्नानमभ्यंगकर्मच ॥ वमनंप्रतिमर्शश्चजन्मप्रभृतिशस्यते ॥२७॥
कवलःपंचमाद्वर्षादष्टमान्नस्यकर्मच ॥ विरेकःषोडशाद्वर्षाद्विंशतेश्चैवमैथुनं ॥२८॥

बालकांचे डोळ्यांत अंजन ह्मणजे कज्जलादिक घालणें व अंगाला हरिद्रालेप करणें व स्नान ह्मणजे न्हाऊं घालणें व अंगाला अभ्यंग म्हणजे तेल तूप इत्यादिकांचा चोपड करणें व ओकारी करविणें व प्रतिमर्श म्हणजे निरूहणबस्ती ह्मणोन गुदाचे ठायीं पिचकल्या व चूळ मारावयाचा प्रयोग आहे तो करणें, इतक्यांची योजना बालकाचे जन्मापासून प्रशस्त आहे व पांचा वर्षानंतर कवल म्हणजे गंडूषभेद औषधादिकेंकरून तोंडावाटें चूळ भरून टाकावा याचा प्रयोग आहे त्याची योजना करावी, व आठावर्षानंतर नस्य म्हणजे नाकांत घालण्याविषयीं औषधांचे प्रयोग आहेत त्यांची योजना करावी व सोळा वर्षानंतर विरेक म्हणजे रेचक याची योजना करावी, व वीस वर्षानंतर मैथुनाविषयीं योजना करावी इतक्या योजना त्या त्या काळीं प्रशस्त आहेत असें जाणावें.

## बाल्यादिकांची वयोवस्था.

बाल्यंवृद्धिर्वपुर्मेधात्वग्दृष्टिःशुक्रविक्रमौ ।
बुद्धिःकर्मेंद्रियंचेतोजीवितंदशतोऽन्हसेत् ॥ २९ ॥

जन्मापासून दहा वर्षानंतर बाल्यावस्था हीन होते, व वीस वर्षानंतर शरीराची वृद्धि (म्ह. वाढ) खुंटते व तीस वर्षानंतर शरीर मोठें होत नाहीं; " श्लोकांत छविर्मेधा असाही पाठ आहे, त्यापक्षीं तीस वर्षापर्यंत कांति राहते पुढें रहात नाहीं " व चाळीस वर्षानंतर ग्रंथाचे ग्रहणाविषयीं सामर्थ्य रहात नाहीं व पन्नास वर्षानंतर शरीराची त्वचा शिथिल होते, व साठ वर्षानंतर दृष्टि मंद होते व सत्तर वर्षानंतर शुक्रनाश; ऐशीं वर्षानंतर पराक्रम रहात नाहीं, व नव्वद वर्षानंतर बुद्धि जाते व शंभर वर्षानंतर कर्मेंद्रियांचें चलनवलनादिक रहातें. व एकशें दहा वर्षानंतर चैतन्य जातें व एकशें वीस वर्षानंतर जीवित्व जातें ह्मणजे मरण पावतो याप्रकारें दहा दहा वर्षानंतर एकेकांचा न्हास ह्मणजे हानी होते; साराश जात मात्र बालकाची चिकित्सा रोगावांचून नाहीं. परंतु औषधादिकांनीं शरीर दृढ होतें म्हणून बाल्यावस्थेपासून औषधान्नादिकाचा उपयोगविचार करावा यास्तव घुटी व बालकमात्रा द्यावी.

## वातप्रकृतिक मनुष्याचीं लक्षणें.

अल्पकेशः कृशोरूक्षोवाचालश्चलमानसः ॥
आकाशचारीस्वप्नेषुवातप्रकृतिकोनरः ॥ ३० ॥

ज्या मनुष्याचे केश अल्प असतात, व शरीर कृश असून रुक्ष ह्मणजे निस्तेज असतें व तो मनुष्य वाचाळ असतो, त्याचें मन चंचळ असतें व स्वप्नामध्यें आकाशाचे ठायीं गमनादिक विषय पाहतो इत्यादिक लक्षणेंकरून जो युक्त असतो तो मनुष्य वातप्रकृतिक जाणावा.

## पित्तप्रकृतिक मनुष्याचीं लक्षणें.

अकालेपलितैर्व्याप्तोधीमान्स्वेदीचरोषणः ॥
स्वप्नेपुज्योतिषांद्रष्टापित्तप्रकृतिकोनरः ॥ ३१ ॥

जो मनुष्य पित्ताचे उष्णगुणेंकरून अकालाचे ठायीं वार्धक्येंकरून व्याप्त असतो व पित्ताचे सत्वगुण बाहुल्येंकरून बुद्धिमान असतो व त्याचे शरीराचे ठायीं घाम असतो व तो मनुष्य रोषण ह्मणजे रागीट असतो व स्वप्नाचे ठायीं नक्षत्रें अथवा अग्न्यादिक पदार्थ याला पाहतो, इत्यादिक लक्षणेंकरून जो युक्त असतो तो मनुष्य पित्त प्रकृतिक जाणावा.

## कफप्रकृतिक मनुष्यांचीं लक्षणें.

गंभीरबुद्धिःस्थूलांगःस्निग्धकेशोमहाबलः ॥
स्वप्नेजलाशयलोकीश्लेष्मप्रकृतिकोनरः ॥ ३२ ॥

गंभीर ह्मणजे संपूर्ण कार्याविषयीं क्षमाशील आहे बुद्धि ज्याची तो मनुष्य; व ज्याचें शरीर पुष्ट असून केश स्निग्ध म्हणजे तुकतुकीत असतात, व ज्याच्या शरीरामध्यें महत् म्हणजे मोठें बळ असतें, व जो स्वप्नाचे ठायीं नदी, नद, तडागादिक यातें पाहातो, इत्यादिक,लक्षणेंकरून जो युक्त असतो तो मनुष्य कफप्रकृतिक जाणावा.

## द्विदोषज त्रिदोषज प्रकृतिक मनुष्याचीं लक्षणें.

ज्ञातव्यामिश्रचिन्हैश्चद्वित्रिदोषोल्वणानराः ॥

दोहीं दोषाचे मिलित लक्षणेंकरून द्विदोषज प्रकृतिक मनुष्य जाणावा, व तिहीं दोषाचे मिलित लक्षणेंकरून त्रिदोषज प्रकृतिक मनुष्य जाणावा, व असेच समप्रकृतिक मनुष्यही जाणावे.

## निद्रादिकांची उत्पत्ति.

तमःकफाभ्यांनिद्रास्यान्मूर्च्छापित्ततमोभवा ॥ ३३ ॥
रजःपित्तानिलैर्भ्रांतिस्तंद्राश्लेष्मतमोऽनिलैः ॥

तम ह्मणजे तमोगुण व कफ ह्यांकरून निद्रा येते तिला स्वाप ह्मणतात, व पित्त व तम ह्यींकरून रूपादिकांचे अज्ञान होऊन चेतनारहित मनुष्य पडतो त्याला मूर्च्छा असें

म्हणतात, व रज म्हणजे रजोगुण व पित्त व वायु इहींकरून, चक्रावर बसवून चाक फिरवून मनुष्याला जशी अवस्था होते त्याला भ्रम असें म्हणतात, व कफ व तम व वायु इहींकरून घट पटादि पदार्थांचें अज्ञान होऊन शरीर गुरु म्हणजे जड होतें व जांभई व क्लम म्हणजे ग्लानि हीं लक्षणें होतात व रोग्यासारखी निद्रा येते तिला तंद्रा असें म्हणतात.

## ग्लानीचें लक्षण.

ग्लानिरोजक्षयात्दुःखादजीर्णाच्चश्रमाद्भवेत् ॥ ३४ ॥

संपूर्ण धातूंचें सारभूत जें ओज त्याचे क्षयेंकरून व दुःख व अजीर्ण व श्रम इहींकरून हस्तपादादिक विकळ होऊन हृदयास ग्लानि होते, व आयास न करितां शरीराला श्रम होतात व अन्नावर इच्छा होत नाहीं त्याला ग्लानि असें म्हणतात, व क्लम म्हणतात व केणी हर्षक्षयही म्हणतात.

## आलस्य लक्षण.

यःसामर्थ्येऽप्यनुत्साहस्तदालस्यमुदीर्यते ॥

शरीरांत सामर्थ्य असतां ज्यामुळें काम करण्याविषयीं उत्सुक होत नाहीं त्याला आलस्य असें म्हणतात.

## जांभईचें लक्षण.

चैतन्यशिथिलत्वायःपीत्वैकंश्वासमुद्वमेत् ॥ ३५ ॥
विदीर्णवदनःश्वासंजृंभासाकथ्यतेबुधैः ॥

चेतनेचें स्थान शिथिल जाहलें असतां मनुष्य एक श्वासातें पिऊन मग विदीर्णवदन होत्साता (म्हणजे मुख पसरित होत्साता) त्याच श्वासातें मुखावाटें बाहेर टाकितो त्याला जृंभा असें म्हणतात, लोकांमध्यें जांभई, जांभळी असें म्हणतात.

## शिंकेचें लक्षण.

उदानप्राणयोरूर्ध्वयोगान्मौलिकफस्रवात् ॥ ३६ ॥
शब्दःसंजायतेतेनक्षुतंतत्कथ्यतेबुधैः ॥

उदान म्हणजे कंठस्थित वायु व प्राण म्हणजे हृदयस्थ वायु यांचा शिरद्वारापासून ऊर्ध्वमस्तकाचे ठायीं संयोग होऊन त्यापासून मस्तकांतून कफाचा स्राव होऊन उभयतांचा संयोग होऊन शब्द निघतो त्याला क्षुत् असें म्हणतात, लोकांमध्यें शिंक असें म्हणतात.

## ढेकराचें लक्षण.

उदानकोपादाहारवास्थितवायुश्चयद्भवेत् ॥ ३७ ॥
परमस्योर्ध्वगमनंतदुद्गारंप्रचक्षते ॥

उदानवायूचा कोप होऊन जें उदान वायूचें ऊर्ध्व गमन होतें व अन्नादिकांचा आहार तो स्वस्थानीं जाऊन सुस्थिर राहून वायूचें ऊर्ध्व गमन होतें त्याला उद्गार म्हणतात, लोकांमध्यें ढेंकर असें म्हणतात.

इति श्री दामोदरसूनु शार्ङ्गधरेण विरचितायां संहितायां सूत्रस्थाने आहारादिगतिर्नाम षष्ठोऽध्यायः ॥ ६ ॥

---

# अथसप्तमोऽध्यायः

## रोगांची संख्या.

रोगाणांगणनापूर्वंमुनिभिर्यामकीर्तिता ॥ ३८ ॥
मयाऽत्रप्रोच्यतेसैवतद्भेदाबहवोमताः

ज्वरादिकांची संख्या मुनींनीं सांगितली तीच संख्या या ग्रंथाचे ठायीं सांगतात व कर्त्यास मान्य असे त्या रोगाचे भेद अनेक आहेत असें जाणावें.

पंचविंशतिरादिष्टाज्वरास्तद्भेदउच्यते ॥ ३९ ॥ पृथग्दोषैस्त्रयाद्वंद्वभेदेनत्रिविधः स्मृतः ॥ एकश्चसन्निपातेनतद्भेदाबहवःस्मृताः ॥ २४० ॥ प्रायशःसन्निपातेन पंचस्युर्विषमज्वराः ॥ तथाऽगंतुज्वरोऽप्येकस्त्रयोदशविधोमतः ॥४१॥ अभिचार ग्रहावेशशापागंतुकास्त्रिधा ॥ श्रमादाहारक्षताच्छेदाच्चतुर्धाघातकज्वरः ॥४२॥ कामार्द्भीतेःशुचोरोषाद्विषादौषधगंधतः॥ अभिषंगज्वराःषट्स्युरेवंज्वरविनिश्चयः

पंचवीस प्रकारचे ज्वर आहेत. त्यांचे भेद सांगतों. वातज्वर १ पित्तज्वर २ कफज्वर ३ वातपित्तज्वर ४ वातकफज्वर ५ पित्तकफज्वर ६ वातादि तीन दोष मिळून सन्निपातज्वर ७ व त्या सन्निपात ज्वराचे भेद अनेक आहेत असें जाणावें, व त्या पासून बहुतकरून संतत ८ व सतत ९ व अन्येद्यु १० व तृतीयक ११ व चातुर्थिक १२ असे पांच प्रकारचे विषमज्वर उत्पन्न होताहेत; व एक प्रकारचा आगंतुक ज्वर त्याचे भेद १३ आहेत त्यातें सांगतों. अभिचार ज्वर १ व ग्रहावेश ज्वर २ व शापज्वर ३ हे

तीन प्रकारचे ज्वर आगंतुक संज्ञक जाणावे; व श्रमापासून उत्पन्न जाहालेला जो ज्वर तो ४ व अग्न्यादि तापेंकरून उत्पन्न ५ व क्षतेंकरून उत्पन्न ६ व शस्त्रादिकांनीं छेदनेंकरून उत्पन्न ७ असे हे चार प्रकारचे ज्वर आघात संज्ञक जाणावे, व मनामध्यें इच्छिली जी स्त्री ती प्राप्त न जाहली असता त्यापासून उत्पन्न जाहला जो ज्वर तो ८ व भीतीपासून उत्पन्न ९ व शोकेंकरून उत्पन्न १० व रोषेंकरून ११ व स्थावर ह्मणजे बचनागादिक विष आणि जंगम ह्मणजे सर्पादिकांचें विष यांचे सेवनेंकरून १२ व तीव्र औषधांचा जो गंध त्याच्या वासेंकरून उत्पन्न जाहला जो ज्वर तो १३ असे हे सहा, प्रकारचे ज्वर अभिषंगसंज्ञक जाणावे; या प्रकारें तेरा आगंतुक ज्वर व पहिले बारा असे पंचवीस प्रकारचे ज्वर जाणावे.

## अतिसार रोग.

पृथक्त्रिदोषै सर्वैश्चशोकादामाद्भयादपि ॥ अतिसारः सप्तधा स्यात्

अतिसार सात प्रकारचा त्याचीं नावें-वातातिसार १ पित्तातिसार २ कफातिसार ३ त्रिदोषातिसार ४ शोकातिसार ५ आमातिसार ६ भय होऊन होतो तो ७. या प्रकारें सात प्रकारचा अतिसार जाणावा.

## संग्रहणी रोग.

ग्रहणी पंचधा मता ॥ ४४ ॥ पृथग्दोषैःसन्निपातात्तथाचामेन पंचमी ॥

संग्रहणी रोग पांच प्रकारचा त्याचीं नावें—वातसंग्रहणी १ पित्तसंग्रहणी २ कफसं॰ ग्रहणी ३ सन्निपातसंग्रहणी ४ आमसंग्रहणी ५. याप्रकारें पांच प्रकारचा संग्रहणी रोग जाणावा

## प्रवाहिका.

प्रवाहिका चतुर्धा स्यात्पृथग्दोषैस्तथास्रतः ॥ ४५ ॥

प्रवाहिका अतिसाराचा भेद आहे. ती चार प्रकारची, वातप्रवाहिका १ पित्तप्रवाहिका २ कफप्रवाहिका ३ रक्तप्रवाहिका ४. या प्रकारें जाणावी.

## अजीर्ण,

अजीर्णं त्रिविधं प्रोक्तं विष्टब्धवायुनामतः॥पित्ताद्विदग्धंविज्ञेयंकफेनामनदुच्यते॥४६॥ विषाजीर्णरसादेक

अन्नाचा परिपाक होत नाहीं त्याला अजीर्ण म्हणतात. ते तीन प्रकारचें, वायूपासून

जें अजीर्ण होतें त्याला विष्टब्धाजीर्ण म्हणतात, व पित्तापासून होतें त्याला विदग्धाजीर्ण म्हणतात, कफापासून होतें त्याला आमाजीर्ण म्हणतात; व चवथें अजीर्ण अन्नाचे रसापासून होतें त्याला विषाजीर्ण असें म्हणतात. या प्रकारें चार प्रकारचें अजीर्ण जाणावें.

## अलसक विषूच्यादि रोग सांगतों.

दोषैःस्यादलसस्त्रिधा ॥ ४७ ॥ विषूचीत्रिविधाप्रोक्तादोषैःसात्यात्पृथक्पृथक् ॥ दंडकालसकश्चैवएकवस्याद्विलंबिका ॥ ४८ ॥

वात, पित्त, आणि कफ या तीन दोषांच्या वेगळ्या वेगळ्या लक्षणेंकरून अलसक रोग तीन प्रकारचा. तो अजीर्णापासून होतो, तशीच विषूची वातादि दोषभेदेंकरून वेगळी वेगळी तीन प्रकारची जाणावी तिला मोडशी असें म्हणतात, व दंडकालसक आणि विलंबिका हे दोन रोग त्या मोडशीचेच भेद आहेत असें जाणावें.

## अर्शरोग.

अर्शांसिषद्विधान्याहुर्वातपित्तकफास्तत ॥ सन्निपाताच्चसंसर्गात्तेषांभेदोद्विधास्मृतः ॥ ४९ ॥ सहजोत्तरजन्मभ्यांतथाशुष्कार्द्रभेदतः ॥

अर्शरोग सहा प्रकारचा—वातार्श १ पित्तार्श २ कफार्श ३ सन्निपातार्श ४ रक्तार्श ५ संसर्गार्श ६. या प्रकारें सहा प्रकारचा अर्शरोग जाणावा; याला लोकांमध्यें मूळव्याध असें म्हणतात. या सहा प्रकारच्या अर्शाचे भेद दोन प्रकारचे आहेत; एक सहज म्हणजे देहाचे बरोबर उत्पन्न होतात; आणि दुसरे उत्तरजन्म म्हणजे जन्म झाल्यानंतर मिथ्याहारविहारादिकेंकरून वातादिक कुपित होऊन त्यांहींकरून उत्पन्न होतात. ते व तसेच आर्द्र व शुष्क या भेदेंकरून दोन प्रकारचे, आर्द्र म्हणजे कांहीं मोड कोरडे व रुक्ष राहतात व कांहीं मोड स्रवतात असें जाणावें.

## अर्शाचा भेद चर्मकील रोग.

त्रिधैवचर्मकीलानिवातात्पित्तात्कफादपि ॥ २५० ॥

चर्मकील म्हणजे गुदोष्ठाचे जवळ चामखिळांसारखे मांसरूपी मोड होतात ते मोड स्थिर असून कठीण असतात. ते तीन प्रकारचे, वातचर्मकील १ पित्तचर्मकील २ कफचर्मकील ३. या प्रकारें तीनप्रकारें चर्मकील रोग जाणावे.

## कृमिरोग.

एकविंशतिभेदेनकृमयःस्युर्द्विधोच्यते । बाह्यास्तथाऽभ्यंतरेचतेपुयूकादयश्चिराः ॥५१॥

ह्रिलिल्याश्चान्येतरचराकफाचेहृदयादकाः ॥ अंत्रादाउदरावेष्टाश्चुरवश्चमहागुहाः ॥५२॥ सुगंधादर्भकुसुमास्तथारक्ताश्चमातराः ॥ सौरसालोमविध्वंसारोमद्वीपाउदुंबराः ॥५३॥ केशादाश्चतथैवान्येशकृज्जातामकेरुकाः ॥ लेलिहाश्चसलूनाश्चसौरुरादाःककेरुकाः ॥ ५४ ॥ तथान्यःकफरक्ताभ्यांसजातःस्नायुकःस्मतः ॥

एकवीस प्रकारचे कृमि आहेत. ते कृमि देहाचे वर राहणारे व अभ्यंतरीं राहणारे या भेदेंकरून दोन प्रकारचे. त्यांमध्यें यूका म्हणजे उवा १ चिरा २ लिखा ३. हे तीन प्रकारचे कृमि देहाचे वर राहणारे व अठरा प्रकारचे अंतरकृमि आहेत व त्यांना लोकांमध्यें जंत असें म्हणतात, त्यांचे भेद सांगतों—हृदयाद १ अंत्राद २ उदरावेष्ट ३ चुरव ४ महागुह ५ सुगंध ६ दर्भकुसुम ७, हे सात प्रकारचे कृमि कफजन्य जाणावे, व मातर १ सौरस २ लोमविध्वंस ३ रोमद्वीप ४ उदुंबर ५ केशाद ६, हे सहा प्रकारचे कृमि रक्तजन्य जाणावे व मकेरुक १ लेलिह २ सलून ३ सौसुराद ४ ककेरुक ५. हे पांच प्रकारचे कृमि मलजन्य जाणावे; याप्रमाणें अठरा प्रकारचे अभ्यंतरकृमि व तीन प्रकारचे बाह्यकृमि वर सांगितले ते, असे एकवीस प्रकारचे कृमि जाणावे. तसाच कफरक्तापासून उत्पन्न होतो त्याला स्नायु असें म्हणतात, लोकांमध्यें नारू असें म्हणतात.

## पांडुरोग.

पांडुरोगाश्चपंचस्युर्वातपित्तकफैस्त्रिधा ॥ ५५ ॥ त्रिदोषैर्मृत्तिकाभिश्च

पांडुरोग पांच प्रकारचा, त्याचीं नावें वातपांडु १ पित्तपांडु २ कफपांडु ३ त्रिदोषज पांडु ४ माती खाऊन खाऊन त्यापासून होतो तो मृत्तिकाज पांडु ५.या प्रकारें पांच प्रकारचा पांडुरोग जाणावा.

## कामला व कुंभकामला व हलीमकरोग.

तथैकाकामलास्मृता ॥ स्यात्कुंभकामलाचैकातथैवचहलीमकं ॥ ५६ ॥

कामलारोग एकप्रकारचा, त्याला काविळ किंवा कामिण असें म्हणतात. तो रोग पांडुरोगाची उपेक्षा केली असतां होतो किंवा स्वतंत्रही होतो. त्या काविळीचे भेद दोन आहेत, एक कुंभकामला आणि दुसरा हलीमक असें जाणावें.

## रक्तपित्तरोग.

रक्तपित्तंत्रिधाप्रोक्तंऊर्ध्वगंकफसंगतम् ॥ अधोगंमारुताज्ज्ञेयंतद्वयेनाद्विमार्गगम् ॥५७॥

रक्तपित्त तीन प्रकारचें. एक ऊर्ध्वगामी एक अधोगामी आणि एक दोहों मार्गांनीं पडतें तें.

1965

त्यांमध्यें जें ऊर्ध्वगामी मुखादिकावाटें पडतें तें कफसंबंधें करून जाणावें; अधोमार्गानें म्हणजे गुदादिकांवाटें जें पडतें तें वातसंबंधेंकरून जाणावें व दोहों मार्गांनीं जें तें कफ आणि वायु यांचे संबंधेंकरून पडतें असें जाणावें. एवं तीन प्रकारचें रक्तपित्त होय.

## कासरोग.

कासाःपंचसमुद्दिष्टास्तेत्रयस्तुत्रिभिर्मलैः ॥
उरःक्षताच्चतुर्थःस्यात्क्षयाद्धातोश्चपंचमः ॥ ५८ ॥

कासरोग पांच प्रकारचा, वातकास १ पित्तकास २ कफकास ३ व उरामध्यें कुठारादिकांनीं प्रहार केल्यासारिखी पीडा होऊन त्या पीडेपासून होतो तो उरःक्षतकास ४ व धातुक्षयकास ५. या प्रकारें पांच प्रकारचा कासरोग जाणावा. याला लोक खोकला असें म्हणतात.

## क्षयरोग.

क्षयाःपंचैवविज्ञेयास्त्रिभिर्दोषैस्त्रयश्चते ॥
चतुर्थःसन्निपातेनपंचमःस्यादुरःक्षतात् ॥ ५९ ॥

क्षयरोग पांच प्रकारचा, वातक्षय १ पित्तक्षय २ कफक्षय ३ सन्निपातक्षय ४ उरःक्षतक्षय ५. या प्रकारें क्षयरोग ५ प्रकारचा जाणावा, त्याला राजयक्ष्मा असें म्हणतात.

## शोषरोग.

शोषाः स्युःषट्प्रकारेणस्त्रीप्रसंगाच्छुचोव्रणात् ॥
अध्वश्रमाच्चव्यायामाद्वार्धक्यादपिजायते ॥ २६० ॥

क्षयाचा भेद शोषरोग आहे तो सहा प्रकारचा, स्त्रियांचे अतिसेवनेंकरून जो शोष होतो तो १ व कांहींएक शोक होऊन त्यापासून होतो तो २ व शरीरव्रण अथवा आगंतुक व्रण होऊन त्यापासून होतो तो ३ व मार्गानें फार चालल्याचे श्रमेंकरून होतो तो ४ व शरीराला फार श्रम होऊन त्यापासून होतो तो ५ व शरीर जरेंकरून व्यास जाहलें म्हणजे होतो तो ६. या प्रकारें सहा प्रकारचा शोषरोग जाणावा.

## श्वासरोग.

श्वासाश्चपंचविज्ञेयाःक्षुद्रःस्यात्तमकस्तथा ॥
ऊर्ध्वश्वासोमहाश्वासःछिन्नश्वासश्चपंचमः ॥ ६१ ॥

श्वासरोग पांच प्रकारचा, क्षुद्रश्वास १ तमकश्वास २ ऊर्ध्वश्वास ३ महाश्वास ४ छिन्नश्वास ५. या प्रकारें पांच प्रकारचा श्वासरोग जाणावा, त्याला लोक दमा असें म्हणतात.

## हिक्कारोग.

कथिताःपंचहिक्कास्तुतासुक्षुद्रान्नजातथा ॥
गंभीरायमलाचैवमहतीपंचमीतिच ॥ ६२ ॥

हिक्कारोग पाच प्रकारचा, क्षुद्रहिक्का १ अन्नजाहिक्का २ गंभीराहिक्का ३ यमलाहिक्का महतीहिक्का ५ या प्रकारें हिक्कारोग पाच प्रकारचा जाणावा त्याला लोकामध्यें उचकी असें म्हणतात.

## जठराग्नीचें विकार,

चत्वारोऽग्निविकाराःस्युर्विषमोवातसंभवः ॥
तीक्ष्णःपित्तात्कफान्मदोभस्मकोवातपित्तकः ॥ ६३ ॥

जठराग्नीचे विकार चार प्रकारचे, वातदोषेंकरून विषमाग्नि जाणावा १. पित्तदोषेंकरून तीक्ष्णाग्नि जाणावा २ व कफदोषेंकरून मंदाग्नि ३ व वातपित्तदोषेंकरून भस्मकाग्नि ४. याप्रकारें अग्नीचे चार विकार जाणावे.

## अरोचक रोग,

पंचैवारोचकाज्ञेयावातपित्तकफैस्त्रिधा ॥ सन्निपातान्मनस्तापात्

अरोचक रोग पाच प्रकारचा, वातारोचक १ पित्तारोचक २ कफारोचक ३ सन्निपातारोचक ४ व मनाला दुःख होऊन त्या संतापेंकरून होतो तो मनस्तापकारोचक ५, याप्रकारें पाच प्रकारचा अरोचकरोग जाणावा, त्याला लोकामध्यें अवदणें असें म्हणतात.

## छर्दिरोग.

छर्द्यः सप्तधामताः ॥ ६४ ॥ त्रिभिर्दोषैःपृथक्तिस्रःक्रिमिभि सन्निपाततः ॥
घृणयाचतथास्त्रीणांगर्भाधानाच्चजायते ॥ ६५ ॥

छर्दिरोग सात प्रकारचा, वातछर्दि १ पित्तछर्दि २ कफछर्दि ३ व जंतांचे होते ती ४ व सन्निपातछर्दि ५ व अमेध्य व पूतिपदार्थांचे दुर्गंधेंकरून मनाला होते ती ६ व स्त्रियांना गर्भ राहिला म्हणजे होते ती ७. या प्रकारें जाणावी. तिला लोकामध्यें ओकारी असें म्हणतात.

## स्वरभेद रोग,

स्वरभेदा षडेवस्युर्वातपित्तकफैःक्षयः ॥ मेदसा स

स्वरभेद सहा प्रकारचा, वातस्वरभेद १ पित्तस्वरभेद २

भेद दुष्ट होऊन त्यापासून होतो तो ४ व सन्निपातज ५ व क्षयरोगापासून अथवा धातुक्ष-यापासून होतो तो ६ या प्रकारें सहा प्रकारचा स्वरभेद जाणावा.

## तृष्णारोग.

तृष्णाचषड्विधाप्रोक्तावातात्पित्तात्कफादपि ॥
त्रिदोषैरुपसर्गेणक्षयाद्धातोश्चषष्ठिका ॥ ६७ ॥

तृष्णारोग सहा प्रकारचा, वाततृष्णा १ पित्ततृष्णा २ कफतृष्णा ३ त्रिदोषतृष्णा ४ व आगंतुक शस्त्रादिकेंकरून क्षत होऊन त्यापासून होते ती उपसर्गतृष्णा ५ व धातुक्षया-पासून होते ती ६. याप्रकारें सहा प्रकारची तृष्णा जाणावी. तृष्णा म्हणजे मनुष्याला सर्वकाळ पाणी प्यावयाची इच्छा होते आणि पाणी प्यालें असतांही तहान रहात नाहीं, पुनः इच्छा होते तिला तृष्णा असें म्हणतात. व्यवहारांत तहान असेंही म्हणतात.

मूर्छाचतुर्विधाज्ञेयावातपित्तकफैःपृथक् ॥ चतुर्थीसन्निपातेन

मूर्च्छा रोग चार प्रकारचा वातमूर्छा १ पित्तमूर्छा २ कफमूर्छा ३ सन्निपातमूर्छा ४. याप्रकारें चार प्रकारची मूर्छा जाणावी. ती पित्त व तमोगुण यांपासून होते. तिला मोह असेंही म्हणतात; मूर्छा म्हणजे संज्ञा व चेष्टा यांना वाहणाऱ्या अशा ज्या नाडी म्हणजे शिरा त्या सर्व वातादिकांनीं आच्छादिल्या असतां अकस्मात् शरीरामध्यें तमोगुण वाढून सुखदुःखाचें ज्ञान जाऊन मनुष्य काष्ठपाषाणासारिखा धरणीवर पडतो, त्या व्याधीला मूर्छा असें म्हणतात.

## भ्रमनिद्रातंद्रासन्यास या रोगांचीं लक्षणें.

सयेरःथभ्रमःस्मृतः ॥ ६८ ॥ निद्रातंद्राचसंन्यासोग्लानिरेकैकशःस्मृतः ॥

भ्रम १ निद्रा २ तंद्रा ३ संन्यास ४ ग्लानि ५ हे पांच रोग एकेका प्रका-रचे आहेत. यांचीं क्रमेंकरून लक्षणें, रजोगुण पित्त व वायु या तिहींपासून होतो आणि चाक फिरतें त्या वेळेस त्याजवर बसून जी अवस्था होते तशी अवस्था होते त्याला भ्रम असें म्हणतात, व तमोगुण व कफ या दोहोंपासून उत्पन्न, आणि इंद्रियें व मन यांना पडून बाहेर घटपटादिक पदार्थांचें ज्ञान रहात नाहीं तिला निद्रा असें म्हणतात व इंद्रि मोह पडून कांहीं निजला व कांहीं जागा असा असून डोळ्यांला झांपड पडते तिला त्यसें म्हणतात व वाचा म्हणजे वाणी व देह व मन यांचा व्यापार राहून मेल्यासारखा पड़ होउन पडतो, त्याला संन्यास असें म्हणतात हीच गाढ निद्रेची अवस्था जाणावी; ग्लानीचें लक्षण याच खंडीं सहावे अध्यायाचे शेवटीं सांगितलें आहे त्याजवरून जाणावें.

संपूर्ण नेत्ररोगाचे कारणभूत असे अभिष्यंदरोग ते चार प्रकारचे, त्यांचीं नामें, रक्ताभिष्यंद १ वाताभिष्यंद २ पित्ताभिष्यंद ३ कफाभिष्यंद ४ याप्रकारें चार प्रकारचे अभिष्यंद जाणावे.

## अधिमंथरोग.

चत्वारश्चाधिमंथाःस्युर्वातपित्तकफास्रतः ॥ ५ ॥

अर्थ—त्या अभिष्यंदरोगाची उपेक्षा केली असतां त्यापासून वात, पित्त, कफ, रक्त या भेदेंकरून चार प्रकारचे अधिमंथरोग उत्पन्न होऊन त्याचे ठायीं निस्तोदस्तंभ इत्यादिक पूर्वोक्त अभिष्यद रोगाचीं लक्षणें होतात. विशेष लक्षणें तर डोळ्यांचीं बुबळें गळून पडल्याप्रमाणें वाटतात, डोळ्यांत मंथन केल्याप्रमाणें वाटनें, अर्ध मस्तकास फार पीडा होतात आणि अधिमंथ वातज असतां वातलक्षणें शूळादिक होतात, पित्तज असता पित्ताचीं लक्षणें दाहादिक होतात अशा सर्व लक्षणेंकरून युक्त असतात असें जाणावें. या अधिमंथाचे ठायीं अंजनादिक मिथ्या उपचार केले असता ते दृष्टि नष्ट करितात तो प्रकार सांगतों. कफाधिमंथ मिथ्याउपचारें करून कुपित होऊन सात दिवसात दृष्टि नष्ट करितो. रक्ताधिमंथ मिथ्या उपचारें करून कुपित होऊन सात दिवसांत दृष्टि नष्ट करितो. रक्ताधिमंथ मिथ्या उपचारें करून पांचा दिवसांत दृष्टि नष्ट करितो. वाताधिमंथ सहा दिवसांत दृष्टि नष्ट करितो. पित्ताधिमंथ कुपित झाला असतां तत्काळ दृष्टि नष्ट करितो. याप्रकारें अधिमंथाचीं लक्षणें जाणावीं.

## सर्वाक्षिरोग.

सर्वाक्षिरोगाश्चाष्टौस्युस्तेषुवातविपर्ययः॥अल्पशोफोन्यतोवातस्तथापाकात्ययः स्मृतः ॥ ६ ॥ शुष्काक्षिपाकश्चतथाशोफोध्युषितएवच ॥ हताधिमंथइत्येतेरोगाः सर्वाक्षिसंभवाः ॥ ७ ॥

सारा डोळा व्यापून जे रोग होतात त्यांना सर्वाक्षिरोग ह्मणतात. ते आठ प्रकारचे त्याचीं नामें, वातविपर्यय १ अल्पशोफ २ अन्यतोवात ३ पाकात्यय ४ शुष्काक्षिपाक ५ शोफ ६ अध्युषित ७ हताधिमंथ ८ याप्रकारें सर्वाक्षिरोग आठ प्रकारचे जाणावे.

## षंढ.

पुंस्त्वदोषाश्चपंचैवप्रोक्तास्तत्रेर्ष्यकःस्मृतः॥आसेक्यश्चैवकुंभीकः सुगंधिःषंढसंज्ञकः ॥८॥

पुंस्त्वदोष ह्मणजे धातुजन्य विकार, तेणेंकरून मनुष्याला नपुंसकत्व प्राप्त होतें तें पांच प्रकारचें. त्याचीं नावें ईर्ष्यक १ आसेक्य २ कुंभिक ३ सुगंधि ४ षंढ ५ याप्रकारें जाणावें.

## शुक्रधातु.

शुक्रदोषास्तथाष्टौस्युर्वातादिपंचात्कफेनच ॥ कुणपश्चास्रपित्ताभ्यांपूयाभःश्लेष्म

पित्ततः ॥ ९ ॥ क्षीणंच वातपित्ताभ्यांग्रथिलंश्लेष्मवाततः ॥ मलाभंसन्निपातात्स्यु: क्रदोषाःइतीरिताः ॥ ४१० ॥

पुरुषाचे शुक्रधातूचे ठायीं दोष आठ प्रकारचे आहेत त्याचीं नामें, वातशुक्रदोष १ पित्तशुक्रदोष २ कफशुक्रदोष ३ कुणप ४ पयाभ ५ क्षीण ६ ग्रंथिल ७ मलाभ ८ याप्रकारें शुक्रदोष आठ प्रकारचे जाणावे.

## स्त्रियांचे रोग त्यांमध्यें प्रथम आर्तवदोष सांगतों.

अथस्त्रीरोगनामानिप्रोच्यन्तेपूर्वशास्त्रतः ॥ अष्टावार्तवदोषाःस्युर्वातपित्तकफैस्त्रिधा ॥ ११ ॥ पूयाभ कुणपंग्रथिक्षीणंमलसमंतथा ॥

स्त्रियाचें आर्तव ह्मणजे रजस्वलात्व त्याचे ठायीं दोष आठ प्रकारचे आहेत. नावें, वातज आर्तवदोष १ पित्तज आर्तवदोष २ कफज आर्तवदोष ३ पूयाभ आर्तवदोष ४ कुणप ५ ग्रंथि ६ क्षीण ७ मलसम ८ याप्रकारें आठ प्रकारचे आर्तवदोष जाणावे.

## प्रदररोग.

तथ.चरक्तप्रदरंचतुर्विधमुदाहृतम् ॥१२॥ वातपित्तकफैस्त्रिधा चतुर्थंसन्निपाततः॥

रक्तप्रदर म्हणजे दुष्टार्तवप्रवृत्ति तिला धुपणी म्हणतात, ती स्त्रियाला होते. तो रोग चार प्रकारचा वातप्रदर १ पित्तप्रदर २ कफप्रदर ३ सन्निपातप्रदर ४ याप्रकारें चार प्रकारचा प्रदररोग जाणावा.

## योनिरोग.

विंशतिर्योनिरोगाः स्युर्वातपित्तकफादपि ॥ १३ ॥ सन्निपाताच्चरक्ताच्च लोहितक्षयकस्तथा ॥ शुष्काचवामिनीचैवपंढिरातमुखीतथा ॥ १४ ॥ सुचीमुखी विप्लुताचजातघ्नीचपरिप्लुताउपप्लुतामाक्चरणा महायोनिश्चकर्णिका ॥१५॥ स्यान्नंदाचातिचरणा योनिरोगा.तीरिताः ॥

योनिरोग वीस प्रकारचे त्याचीं नामें, वातला १ पित्तला २ श्लेष्मला ३ सन्निपातजा ४ रक्तजा ५ लोहितक्षया ६ शुष्का ७ वामिनी ८ पंढिता ९ अंतर्मुखी १० सूचीमुखी ११ विप्लुता १२ पुत्रघ्नी १३ परिप्लुता १४ उपप्लुता १५ माक्चरणा १६ महायोनि १७ कर्णिका १८ नंदा १९ अतिचरणा २० याप्रकारें वीस प्रकारचे योनिरोग जाणावे.

## योनिकंदरोग.

चतुर्विधयोनिकंदवातपित्तकफैस्त्रिधा ॥ १६ ॥ चतुर्थंसन्निपातेन

योनिकंदरोग वात, पित्त, कफ, सन्निपात या भेदेंकरून चार प्रकारचा जाणावा.

## गर्भजरोग

तथाष्टौगर्भजागदाः ॥ उपविष्टकगर्भ: स्यात्तथानागोदरः ॥ १७ ॥ मक्कलो

मूढगर्भश्चविष्टंभोगूढगर्भक ॥ जरायुदोषोगर्भस्यपातश्चाष्टपकाः स्मृताः ॥ १८ ॥
गर्भसंबंधी रोग आठ प्रकारचे त्याचीं नावें, उपविष्टकगर्भ १ नागोदर २ मक्कल ३ मूढगर्भ ४ विष्टंभ ५ गूढगर्भ ६ जरायुदोष ७ गर्भपात ८ याप्रकारें आठ प्रकारचे गर्भज रोग जाणावे.

## स्तनरोग,

पचैवस्तनरोगा. स्युर्वातात्पित्तात्कफादपि ॥ सन्निपातात्क्षताच्चैवतथास्तन्योद्भवागदाः ॥ १९ ॥ बालरोगेषुकथिताः

स्तनरोग वात १ पित्त २ कफ ३ सान्निपात ४ व क्षत ५ या भेदेंकरून पांच प्रकारचे जाणावे, व जसजसे स्तनाचे रोगाचे भेद सांगितले तसतसे स्तनाचे ठायीं दूध उत्पन्न होतें. तें दूध वातादि दोषेंकरून विकारातें पावून त्यापासून रोग उत्पन्न होतात, ते बालरोगाचे ठायीं सांगितले आहेत.

## स्त्रियांचे दोष,

स्त्रीदोषास्त्रयःस्मृताः ॥ अदक्षपुरुषोत्पन्नः सपत्नीविहितस्तथा ॥ २० ॥ दैवाज्जातस्तृतीयस्तु

स्त्रियास दुःख उत्पन्न करणारे असे तीन दोष आहेत त्याचीं नावें. अदक्षपुरुषोत्पन्न १ सपत्नीविहित २ दैविक ३ याप्रकारें स्त्रियांचे ठायीं तीन दोष जाणावे.

## बाळंतरोग,

तथाचसूतिकागदाः ॥ ज्वराद्यश्चिकित्स्यास्तेयथादोषयथाबलम् ॥ २१ ॥
बाळंतपणामध्यें ज्वरादिक रोग उत्पन्न होतात त्याना बाळंतरोग म्हणतात. त्या रोगाचें बलाबल पाहून चिकित्सा करावी.

## बालरोग.

द्वात्रिंशतिर्बालरोगास्तेपुक्षीरभवास्त्रय ॥ वातात्पित्तात्कफाच्चैवदंतोद्भेदश्चतुर्थक ॥ २२ ॥ दंतघातोदंतशब्दो ऽकालदंतोऽहिपूतनः ॥ मुखपाकोमुखस्रावो गुदपाकोपशीर्षके ॥ २३ पार्श्वारुणस्तालुकंठोविच्छिन्नंपारिगर्भिकः ॥ दौर्बल्यागात्रशोषश्च शय्यामूत्रंकुकूणक ॥ २४ ॥ रोदनंचाजगाल्लिःस्यादितिद्वात्रिंशतिस्मृतः ॥

बाळकाचे ठायीं रोग होतात यास्तव त्याना बालरोग म्हणतात. ते रोग बावीस प्रकारचे. त्यामध्यें स्त्रीचें स्तनसंबंधीं दूध दुष्ट होऊन त्यापासून जे रोग होतात ते तीन प्रकारचे त्याचीं नावें वातज १ पित्तज २ कफज ३ दंतोद्भेद ४ दंतघात ५ दंतशब्द ६ अकालदंत ७ अहिपूतनरोग ८ मुखपाक ९ मुखस्राव १० गुदपाक ११ उपशीर्षक १२ पार्श्वारुण १३ तालुकंठ १४ विछिन्न १५ पारिगर्भिक १६ दौर्बल्य १७ गात्रशोष १८ शय्यामूत्र १९ कुकूणक २० रोदन २१ अजगल्ली २२ याप्रकारें बावीस प्रकारचे बालरोग जाणावे.

## बालग्रह,

तथाबालग्रहाःख्याताद्वादशैवमुनीश्वरैः ॥ २५ ॥ स्कंदग्रहोविशाखःस्यात्स्वमद्दश्चपितृग्रहः ॥ नैगमेयग्रहस्तद्वत्शकुनीःशीतपूतना ॥ २६ ॥ मुखमंडिनिगातद्वत्पूतना चांधपूतना ॥ २७ ॥ रेवतीचैवसंख्यातातथास्याच्छुष्करेवती ॥ २८ ॥

बालग्रह बारा प्रकारचे त्यांची नांवें, स्कंदग्रह १ विशाखाग्रह २ स्वग्रह ३ पितृग्रह ४ नैगमेय ५ शकुनि ६ शीतपूतना ७ मुखमंडिनिका ८ पूतना ९ अंधपतना १० रेवती ११ शुष्करेवती १२ याप्रकारें बालग्रह जाणावे.

## अनुक्तरोगांचा संग्रह,

तथारणभेदास्तुवातरक्तादिकाश्चये॥द्विचत्वारिंशदुक्तास्तेरोगेष्वेवमुनीश्वरैः १

जे वातरक्तपादः सुप्तिपाद, स्तंभपाक, स्फुरण इत्यादि पायाचे रोग ऋषींनीं बेचाळीस प्रकाराचे सांगितले ते रोग त्या श्लीपदादिक रोगाचे ठायीं संगृहीत केले असें जाणावें.

## दुसरा प्रकार-

द्विषष्टिर्दोषभेदाःस्युः सन्निपातादिकाश्चये ॥ तेपिरोगेषुगणिताः पृथक्प्रोक्ताव तेकचित् ॥ ३० ॥

सान्निपातादिक जे बासष्ट प्रकारचे वातादि दोषांचे भेद ते कोठेंही वेगळे वेगळे सांगितले नाहींत. परंतु त्या रोगांचे ठायीं कथिजेलें असें जाणावें.

## पंचकर्मांचे जे मिथ्यादि योग यांपासून रोग होतात,

हीनमिथ्यातियोगानांभेदैःपंचदशोदिताः ॥ पंचकर्मभवारोगारोगेष्वेवप्रकीर्तिताः ॥ ३१ ॥

वमन १ विरेचन २ निरूपणबस्ति ३ अनुवासनबस्ति ४ नस्य ५ हीं पांच कर्में उत्तरखंडाचे ठायीं सांगितलीं आहेत. ह्या पांच कर्मांचा एकेकाचा हीनयोग, मिथ्यायोग, अतियोग ह्या तीन भेदेंकरून पंधरा प्रकारचे भेद होतात आणि त्यांपासून जे रोग उत्पन्न होतात ते रोग उक्तरोगाचे ठायीं संगृहीत केले असें जाणावे, वमन म्हणजे औषधादिकेंकरून ओकारी करविण्याचा प्रयोग, विरेचन म्हणजे औषधादिकेंकरून ढाळ करविण्याचा प्रयोग, निरूहणबस्ति आणि अनुवासनबस्ति म्हणजे औषधादिकेंकरून गुदादिकांचे ठायीं पिचकाऱ्या भरावयाचा प्रयोग आहे. नस्य म्हणजे नाकांत औषध घालावयाचा प्रयोग आहे. याप्रकारें पांच कर्में जाणावीं. यांचा हीनयोग व मिथ्यायोग व अतियोग झाला असता यापासून शरीरास नानाप्रकारचे उपद्रव होतात असें जाणावें.

## स्नेहादिकांपासून जे रोग होतात त्याचा उक्तरोगांमध्यें संग्रह.

स्नेहस्वेदौतथाधूमोगंडूषोंजनतर्पणे ॥ अष्टादशैतज्जाःपीडास्ताश्चरोगेषुलक्षिताः॥ ३२ ॥

स्नेहपान १, स्वेद २. धूम्रपान ३, गंडूष ४, अंजन ५, तर्पण ६ या सहांचा एके-

क्ताचा हीनयोग, मिथ्यायोग, अतियोग या तीन भेदेंकरून अठरा प्रकारचे भेद उत्पन्न होतात आणि त्यांपासून जे रोग उत्पन्न होतात तेही रक्तरोगामध्यें संगृहीत केले असें जाणावें; स्नेहपान, स्वेद, धूमपान, गंडूष व अंजन यांचे अर्थ प्रथम परिभाषेचे अध्यायीं टिपेमध्यें सुमारें ४ थे पृष्ठांत लिहिले आहेत त्यावरून जाणावे. औषधादिकेंकरून धातूची वृद्धि करण्याविषयीं प्रयोग आहे त्याला तर्पण म्हणतात अथवा नेत्राची तृप्ति करण्याविषयीं प्रयोग आहे त्यालाही तर्पण म्हणतात.

## शीतादिकांपासून चार प्रकारचे उपद्रव.

शीतोपद्रवएकःस्यादेकश्चोष्णोपतापकः ॥ शल्योपद्रवएकश्चक्षाराश्चकैःस्मृतस्तथा॥३३॥

बहुत थंडीचे योगेंकरून मनुष्यास फार थंडीचा उपद्रव होतो; फार उष्णेंकरून मनुष्यास फार उष्णाचा उपद्रव होतो; शल्य म्हणजे नख, केश, खडा, कांटा, हाड, शिंग इत्यादिक पदार्थ यांतून एकदा पदार्थ पोटात गेला असतां त्यापासून जो रोग होतो तो शल्योपद्रव जाणावा; व मूढ वैद्यांनीं सोमलखाराचा प्रयोग केला परंतु तो कच्चा राहून तसाच मनुष्यास दिला असतां त्यापासून रोग होतो अथवा तो सोमलखार मनुष्यास विष, अग्नि, शस्त्र, व वज्र यांचेसारिखें मारितो याप्रकारें चार प्रकारचे उपद्रव जाणावे.

## विषरोग.

स्थावरंजंगमंचैवकृत्रिमंचत्रिधाविषं ॥ तेषांचकालकूटाद्यैर्नवधास्थावरंविषं ।३४।
जंगमंबहुधाप्रोक्तंतत्रलूताभुजंगमाः ॥ वृश्चिकामूषिकाःकीटाःप्रत्येकंतेचतुर्विधाः ॥३५॥
दंष्ट्राविषनखविषवालशृंगास्थिभिस्तथा ॥ मूत्रात्पुरीषाच्छुक्राच्चदृष्टेर्निश्वासतस्तथा ।३६।
लालायाः स्पर्शतस्तद्वत्तथाशंकाविषंमत ॥ कृत्रिमंद्विविधंप्रोक्तंगरदूषीविभेदतः ॥३७॥

स्थावर, जंगम, व कृत्रिम या भेदेंकरून तीन प्रकारचीं विषें जाणावीं. त्यामध्यें स्थावर विष कालकूटादि विषाचे भेदेंकरून नऊ प्रकारचें जाणावें. जंगमविष बहुत प्रकारचें आहे त्यामध्यें लूता, सर्प, विंचु, उंदीर, कीटक यांचें वात, पित्त, कफ, सन्निपात या भेदेंकरून एकेकाचे चार चार भेद जाणावें. व कोणाचें दाढेचे ठायीं विष असतें, कोणाचें नखाचे ठायीं असतें, व कोणाचें शिंग, अस्थि, मूत्र, मळ, शुक्रधातु, दृष्टि, श्वास, लाळ, स्पर्श इतक्यांचे ठायीं जातिभेदेंकरून वेगळें वेगळें विष असतें असें जाणावें. मनामध्यें कांहींएक विषाची शंका येऊन त्यापासून वायु कुपित होऊन सर्वांगाला सूज व ज्वरादिक उपद्रव होतात त्याला शंकाविष म्हणतात. बचनागादिक विष व दूषिविष या भेदेंकरून कृत्रिमविष दोन प्रकारचें. त्यांमध्यें बचनागादिक विषाचा प्रकार सांगतों. संतती व संपत्ती प्राप्त व्हावी या हेतूकरून स्त्रिया नानाप्रकारचे विषारी प्राणी त्याचे अंगाचा स्वेद, रज, मळ, मूत्र यांतें अन्नामध्यें घालून मनुष्यास देतात, व जे शत्रु बचनागादिक विष घालितात तेणेंकरून मनुष्य पांडुरवर्ण होऊन ज्वरादिक उपद्रव होतात हा एक कृत्रिम विषाचा प्रकार. विष कांहींएक कालेंकरून शरीरामध्यें जीर्ण होऊन मुरून राहतें व त्या विषाचें अल्प वीर्य असतें यास्तव प्राणनाश करीत

श्रीः 19695

# अथद्वितीयखंडप्रारंभः

## पंचकषायरूप औषधकथन.

श्रीगणेशायनम ॥ अयात ःस्वरसःकल्कःक्वाथश्चहिमफांटकौ ॥
ज्ञेयाःकषायःपंचैतेलघवःस्युर्यथोत्तरम् ॥ १ ॥

आगरस १ कल्क २ क्वाथ ३ हिम ४ फाट ५ या पाचाना काढे ह्मणतात व हे एका-ल्लीं एक हलके जाणावे. उदाहरण, आगरसापेक्षा कल्क हल्का, कल्कापेक्षा काढा हल्का, याप्रमाणें जाणावें. रोग गणने नंतर, कापायादिकाचे कथन युक्त ह्मणून अर्थात असे श्लोकात पद घातलें आहे

### त्या पांचांमध्यें प्रथम अंगरसलक्षण.

अहताात्तत्क्षणाकृष्टातद्रव्यात्क्षुण्णात्समुद्धरेत् ॥
वस्त्रनिष्पीडितोयःसरसःस्वरसउच्यते ॥ २ ॥

कीड, अग्नि इत्यादिकें करून दूषित नव्हे अशी वनस्पती आणून त्याच वेळेस कुटून, फडक्यात गाळून जो रस निघतो तो अगरस जाणावा

### अंगरसाचा दुसरा प्रकार.

कुडवंचूर्णितंद्रव्यंक्षिप्तंचद्विगुणेजले ॥
अहोरात्रंस्थितंतस्मात्भवेद्वारसउत्तमः ॥ ३ ॥

कुडव प्रमाण सुकें औषध आणून, चूर्ण करून त्याचे दुप्पट मडक्यात पाणी घालून त्यात तें चूर्ण दिवसरात्र भिजत घालावें, नतर दुसऱ्या दिवशीं पाणी गाळून घ्यावें हाही एक प्रकार अगरसाचा आहे

### तिसरा प्रकार.

आदायशुष्कद्रव्यंवास्वरसानामसंभवे ॥ जलेऽष्टगुणितेसाध्येपादशिष्टंच गृह्यते ॥ ४ ॥ स्वरसस्यगुरुत्वाचपलमर्धंप्रयुज्यते ॥ निशोपितंचाग्नि सिद्धंपलमात्रंरसंपिवेत् ॥ ५ ॥

ओली वनस्पती मिळाली नाहीं तर, शुष्क वनस्पती आणून त्यात अष्टगुण म्हणजे आठपट पाणी घालून चतुर्था हिस्सा पाणी राही तोंपर्यंत काढा करून घ्यावा, व अगरस जड

19695

नाहीं, परंतु ज्वरादिक उपद्रव करीतें; देश काल, अन्न व दिवा निद्रा इहींकरून दूषित होत्सातें रसादि सात धातूंला दूषित करितें यास्तव याला दूषीविष म्हणतात. याप्रकारें दोन प्रकारचें कृत्रिमविष जाणावें.

## विषाचे भेद.

सप्तधातुविषंज्ञेयंतथासप्तोपधातुजम् ॥ तथैवोपविषेभ्यश्चजातंसप्तविधंततः

सुवर्णादिक सप्तधातूंची शुद्धि केलेली नव्हत अशीं भस्में भक्षण केलीं असतां व तालादिक सात उपधातूंचीं भस्में व अर्कादिक अशुद्ध उपविषें हीं भक्षण केलीं असता सारिखी पीडा करितात म्हणून विषसंज्ञा त्यांना आहे असें जाणावें.

## दुसरा प्रकार.

दुष्टनीरविषंचैकंतथैकंदिग्धजविषम् ॥

ज्या पाण्यामध्यें चिखल, शेवाळ, पानें, गवत, लूतादिक जंतूंचे मळ, मूत्र, मासे बेडूक मेलेले इतकीं पडून पाणी खराब होतें त्या पाण्याला दुष्टनीर म्हणतात. त्यांत स्नान असतां अथवा प्यालें असतां त्यापासून विषासारखी पीडा होते असें जाणावें. विषाचा लेप करून वार केला असतां त्यापासून पाड पडल्ये ती लवकर बरी होत न आणि विषासारखे ज्वरादिक उपद्रव होतात तें दिग्धज विष जाणावें.

## आगंतुक चार प्रकारचे उपद्रव.

कपिकच्छूभवाकण्डूर्दुष्टनीरभवातथा ।३९। तथासूरणकण्ड्वशोथोभल्लातजस्त

खाजकुइली, दुष्टपाणी, कटवा सुरण या तिहींचा अंगाला स्पर्श जाहला असतां फार कंडू सुटल्ये आणि आग होल्ये व भिलाव्याचा स्पर्श झाला असतां अंगाला सूज आणि कंड सुटे याप्रकारें चार प्रकारचे उपद्रव जाणावें.

## आगंतुक चार प्रकारचे मद.

मदश्चतुर्विधश्चान्यःपूगभंगास्तकोद्रवैः ४४० चतु[illegible]

सुपारी, भांग, धेदल्याचे फळाची आंतली बी, कोद्रुधान्य ( म्हणजे हरीक ) हे पदार्थ भक्षण केले असतां यांपासून चार प्रकारचे मद उत्पन्न होतात त्यांना माज ते, मदरोग सांगितला आहे त्याहून अन्य जाणावे. आणखी ओषधी, वनस्पति यांचीं साल, मुळें, व पानें या चहूंचें भक्षण केलें असतां चार प्रकारचे मद उत्पन्न होतात असें

इतिप्रसिद्धागणितायेकिलोपद्रवाभुवि ।४१। असंख्याश्चपरेधातुमूलजीवादिसंभवाः

याप्रकारें पृथ्वीचे ठायीं प्रसिद्ध रोगान्तर उपद्रव त्यांची संख्या निश्चयेंकरून आचार्यांनीं सांगितली, याशिवाय दुसरे स्वर्णादिक धातु, हरितालादिक धातु, उपधातु, प्रकारच्या वनस्पति, ओषधी, व जीवादिक यापासून उत्पन्न होतात ते उपद्रव असंख्य त्यांची संख्या होत नाहीं हे अनुमानेंकरून जाणावें.

प्रथमखंड समाप्त.

जांभूळ, आंबा व आंवळी, या तिहींच्या पानाचे अंगरसांत मध, तूप व दूध मेळवून घालें असतां महान् रक्तातीसार दूर होतो.

## स्थूलवब्बूल्यादि आंगरस सर्वातिसारावर.

स्थूलवब्बूलिकापत्ररसःपानाद्व्यपोहति ॥
सर्वातिसारान्श्योनाककुटकजत्वक्रसोऽथवा ॥ १२ ॥

निःकंटक थोर बाभुळीचे पानांचा अंगरस प्याला असतां सारे अतिसार दूर होतात; किंवा टेटूचे सालीचा अंगरस, अथवा कुड्याचे सालीचा अंगरस यातील कोणताही अंगरस प्याला असतां सारे अतिसार दूर होतात.

## आल्याचा आंगरसवृषणवातावर व श्वासादिकांवर.

आर्द्रकस्वरसःक्षौद्रयुक्तोवृषणवातजित् ॥
श्वासकासारुचिंहंति प्रतिश्यायंव्यपोहति ॥ १३ ॥

आल्याचे रसांत, मध मेळवून प्यालें असतां वृषणाचा वायु दूर होतो; व श्वास म्हणजे दमा व खोकला व अरोचक व प्रतिश्याय म्हणजे पडसें हेही रोग दूर होतात.

## महाळुंगीचा आंगरस पार्श्वादिशूलांवर.

बीजपूररसःपानान्मधुक्षारयुतोजयेत् ॥
पार्श्वहृद्बस्तिशूलानिकोष्ठवायुंचदारुणम् ॥ १४ ॥

महाळुंगीचे फळाचा अथवा मूळांचा अंगरस मध, जवखार मेळवून प्याला असतां कुक्षिशूळ, हृदयशूळ, बस्तिशूळ व दारुण असा कोठ्यांत वायु होतो, तो हे सारे रोग दूर करितो.

## शतावरीचा आंगरस पित्तशूळावर व कन्यारस प्लीहापचीवर.

शतावर्याश्चमधुनापित्तशूलहरोमतः ॥ निशाचूर्णयुतःकन्यारसःप्लीहापचीहरः ॥१५॥

शतावरीचा अंगरस, मध मेळवून प्याला असतां पित्तशूळ दूर करितो, कोरफडीचा रस हळद मेळवून प्याला असता कवळ म्हणजे पांथरी रोग व गंडमाळेचा भेद अपची रोग यातें दूर करितो.

## अलंबुषादिरस गंडमाळादिकांवर.

अलंबुषायाःस्वरसःपीतोद्विपलमात्रया ॥
अपचींगंडमालांनांकामलायाश्चनाशनः ॥१६॥

मुंडीचा अंगरस दोन पळप्रमाण प्याला असतां, अपची रोग व गंडमाळा व काविळ रोग यांतें दूर करितो.

## शशमुंडरस सूर्यावर्तादिरोगांवर.

शशमुंडरसःकोष्णोमरिचैरवधूलितः॥ जयेत्सप्तदिनाभ्यासात्सूर्यावर्तार्धभेदकौ ॥१७॥

सशाचे मस्तकाचा रस, थोडा गरम करून मिऱ्यांचें चूर्ण मेळवून प्याला असतां सूर्यावर्त रोग व अर्ध भेदक ह्मणजे अर्धाशिशी रोग यांतें दूर करितो.

## ब्राम्ह्यादिस्वरस उन्मादरोगावर.

ब्राम्हीकूष्मांडषड्ग्रंथाशंखिनीस्वरसाःपृथक् ॥
मधुकुष्ठयुताःपीताःसर्वोन्मादापहारिणः ॥ १८ ॥

ब्राह्मी, कोहळा, वेखंड व शंखिनी, यांचे अंगरस वेगळे वेगळे काढून त्यांत मध व कोष्टकाचें चूर्ण मेळवून प्यालें असतां सारे उन्माद रोग दूर होतात.

## कूष्मांडकरस मदरोगावर.

कूष्मांडकस्यस्वरसोगुडेनसहयोजितः ॥ दुष्टकोद्रवसंजातंमदंपानाद्व्यपोहति ॥ १९ ॥

कोहळ्याचा रस गुळ मेळवून घेतला असतां दुष्ट असें कोद्र्यान्य ह्मणजे हरीक, त्यापासून जाहाला जो मद त्यातें दूर करितो.

## गांगेरुकीस्वरस व्रणावर.

खड्गादिच्छिन्नगात्रस्यतत्कालंपूरितोव्रणः॥गांगेरुकीमूलरसैर्जायतेगतवेदनः॥२०॥

खड्गादिकेंकरून मनुष्याचे शरीरावर घाय पडला असतां, तो घाय त्याच वेळेस गांगेरुकीच्या मूळाचे रसानें भरला असता तो मनुष्य वेदनारहित होतो.

## अथ पुटपाक कथन.

पुटपाकस्यकल्कस्यस्वरसोगृह्यतेयतः ॥ अतस्तुपुटपाकानांयुक्तिरत्रोच्यतेमया॥२१॥

पुटपाक व कल्क या दोहोंचेही अंगरस घेतात, यास्तव पुटपाकाची युक्ति सांगतों.

## पुटपाकाची कृती.

पुटपाकस्यमात्रेयंलेपस्यांगारवर्णता॥लेपंचद्व्यंगुलंस्थूलंकुर्याद्वांगुष्ठमात्रया॥२२॥
काश्मरीवटजंम्वादिपत्रैर्वेष्टनमुत्तमम् ॥ पलमात्ररसोग्राह्यःकर्षमात्रं मधुक्षिपेत् ॥
॥ २३ ॥ कल्कचूर्णद्रवाद्यास्तुदेयाःस्वरसवद्बुधैः ॥

ओली वनस्पती आणून कुटून गोळा बांधून नंतर शिवणीचे अथवा वडाचे अथवा जांभुळीचे पानानीं तो गोळा गुंडाळून मग दोन अंगुळ अथवा अंगुष्ठप्रमाण त्याजवर

ातीचा लेप करून नंतर त्या गोळ्याचे खालवर गोंवऱ्या घालून लेपाची अंगार वर्णता म्हणजे या गोळ्याचे लेपाची माती तांबडी होईतोंपर्यंत अग्नि द्यावा, नंतर तो गोळा बाहेर काढून ानें व माती दूर करून तो गोळा पिळून रस काढावा, जर कोरडी वनस्पती आहे, तर ती ाण्यात अथवा जें द्रवद्रव्य सांगेल त्यात वाटून याच रीतीनें कृती करून रस काढावा, याचे घ्यावयाचें मान एक पळप्रमाण जाणावें व त्या रसात मध घालणें ती अर्धपळ प्रमाण ालावी. कल्क, चूर्ण, दूध आदिकरून जीं द्रवद्रव्यें, यांचें मान जसें अंगरसात घालावयाचें ांगितलें आहे, त्या मानानें या रसात घालावीं या प्रकारें पुटपाकाची कृती जाणावी.

## कुटजपुटपाक सर्वातीसारांवर.

तत्कालाकृष्टकुटजत्वचंतंडुलवारिणा ॥ २४ ॥ पिष्टांचतुःपलमितांजंबूपल्लव वेष्टितां ॥ सूत्रेणबद्धांगोधूमपिष्टेनोपरिवेष्टिताम् ॥ २५ ॥ लिप्ताचघनपंकेन गोमयैर्वन्हिनादहेत् ॥ अंगारवर्णांचमृदंदृष्ट्वान्हेःसमुद्धरेत् ॥२६॥ ततोरसं गृहीत्वाचशीतंक्षौद्रयुतंपिबेत्॥जयेत्सर्वानतीसारान्दुस्तरान्सुचिरोत्थितान्॥२७॥

चार पळ प्रमाण कुड्याची साल आणून त्याच वेळेस तांदुळाचे धुणात वाटून गोळा करून जांभुळीचे पानानीं तो गोळा गुंडाळून सुतानें बांधून वरती गव्हाचे पिठाचा लेप करून त्याजवर घणरस मातीचा लेप करावा, नंतर त्या गोळ्याचे खालवर गाईचे शेणाच्या गोंवऱ्या घालून गोळ्याची माती तांबडी होईतोंपर्यंत अग्नि द्यावा. नंतर गोळा बाहेर काढून पानें व माती दूर करून पिळून रस काढून तो थंड झाल्यावर त्यात मध मेळवून घ्यावा, तेणें करून बहुत काळचे दुर्घट असे जे अतिसार ते दूर होतात.

## तांदुळांचे धुणाची क्रिया.

कांडितंतंडुलपलंजलेष्टगुणितेक्षिपेत् ॥ भावयित्वाजलंग्राह्यंदेयंसर्वत्रकर्मसु ॥ २८ ॥

एक पळ प्रमाण सडीक तांदूळ घेऊन त्यात आठगुण पाणीघालून हातानें धुवावे, नंतर तें पाणी सर्व कर्मांचें ठायीं योजावें

## दुसरा अलूर पुटपाक.

अलरत्वक्कृतश्चैवपुटपाकोग्निदीपनः॥मधुमोचरसाभ्यांचयुक्तःसर्वातिसारजित्॥२९॥

टेंटूची साल ओली आणून त्याच वेळेस कुट्टन गोळा करून पूर्वी पुटपाकाची कृती सांगितली आहे, त्या रीतीनें कृती करून अग्नि द्यावा, नंतर तो गोळा बाहेर काढून

पिळून रस काढून त्यांत मध व मोचरसाचें चूर्ण घालून घ्यावा. तेणें करून सर्व प्रकारचे अतिसार दूर होतात.

## तिसरा न्यग्रोधादि पुटपाक.

न्यग्रोधादेश्चकल्केनपूरयेद्गौरतित्तिरेः ॥ निरंत्रमुदरंसम्यक्पुटपाकेन ।
तत्पचेत् ॥ ३० ॥ तत्कल्कःस्वरसः क्षौद्रयुक्तःसर्वातिसारनुत् ॥

वड १ उंबर २ पिंपळ ३ पायरी ४ जुलवेतस ५ यांच्या सालींचें चूर्ण करून पाण्यात वाटून कल्क करून,तो कल्क पांढरे तित्तिरपक्षी याचे पोटामध्यें भरून, पूर्वी पुटपाकाची कृती सांगितली आहे, त्या रीतीनें कृती करून अग्नि द्यावा; नंतर तो तित्तिर बाहेर काढून त्याचे उदरात कल्क असतो, त्याचा रस काढून त्यांत मध मेळवून प्यालें असतां सारे अतिसार दूर होतात.

## चवथा दाडिमपुटपाक सर्वातीसारांवर.

पुटपाकेनविपचेत्सुपक्वंदाडिमीफलं ॥ ३१ ॥ तद्रसोमधुसंयुक्तःसर्वातीसारनाशनः ॥

पिकलेलें डाळिंब आणून, पूर्वी सांगितली जी पुटकापाची कृती त्या रीतीनें कृती करून अग्नि द्यावा, नंतर तें डाळिंब बाहेर काढून पिळून रस काढून त्यांत मध मेळवून प्यालें असतां सारे अतीसार दूर होतात.

## बीजपूरादि पुटपाक ओकारीवर.

बीजपूराम्रजंबूनांपल्लवानिजटाःपृथक् ॥ ३२ ॥ विपचेत्पुटपाकेनक्षौद्र
युक्तश्चतद्रसः ॥छर्दिंनिवारयेद्घोरांसर्वदोषसमुद्भवाम् ॥ ३३॥

महाळुंग व आंबा व जामूळ, यांचीं ओलीं पानें व मुळें आणून, त्याच वेळेस कुटून गोळा करून पूर्वरीतीनें अग्नि द्यावा; नंतर तो गोळा बाहेर काढून पिळून रस काढून त्यांत मध मेळवून प्यालें असतां साऱ्या दोषांपासून उत्पन्न जाहली जी दुर्घट ओकारी ती दूर होते.

## वासापुटपाक रक्तपित्तज्वरावर.

विष्टानांवृषपत्राणांपुटपाकरसोहिमः ॥ मधुयुक्तोजयेद्रक्तपित्तकासज्वरक्षयान् ॥३४॥

अडूळशाचीं ओलीं पानें आणून त्याच वेळेस कुटून गोळा करून पूर्वरीतीनें अग्नि देऊन नंतर तो गोळा बाहेर काढून त्यात मध मेळवून प्यावा. तेणें करून रक्त, पित्त व श्वास व ज्वर व क्षयरोग हे दूर होतात.

## कंटकारीपुटपाक कासश्वासावर.

पचेत्क्षुद्रांसपंचांगांपुटपाकेनतद्रसः॥ पिप्पलीचूर्णसंयुक्तःकासश्वासकफापहः॥३५॥

लहान रिंगणीचें सगळें झाड फळासुद्धा आणून त्याच वेळेस कुटून गोळा करावा; मग पूर्वं रीतीनें अग्नि देऊन नंतर तो गोळा बाहेर काढून पिळून रस काढून त्यात पिंपळीचें चूर्ण मेळवून प्यालें असता श्वास, कास व कफ हे दूर होतात.

## बिभीतकपुटपाक श्वासकासावर.

बिभीतकफलंकिंचित्घृतेनाभ्यज्यलेपयेत् ॥ गोधूमपिष्टेनागारैर्विपचे
त्पुटपाकवत् ॥ ३६॥ ततःपक्कंसमुद्धृत्यत्वचंतस्यमुखेक्षिपेत् कास
श्वासप्रतिश्यायस्वरभंगाञ्जयेत्ततः ॥ ३७ ॥

ब्याहडयाचें फळ आणून त्याला थोडें तूप लावून तें फळ गव्हाचे पिठानें लेपून पुटपाका सारिखें निखाऱ्यावर भाजावें; चांगलें भाजलें ह्मणजे बाहेर काढून त्याची साल तोंडात धरावी तेणेंकरून श्वास, कास व पडसें व स्वरभंग इतकीं दूर होतात.

## शुंठीपुटपाक आमातीसारावर.

चूर्णंकिंचित्घृताभ्यक्तंशुंठ्याएरंडजैर्दलैः वेष्टितंपुटपाकेनविपचेन्मंद
वह्निना ॥ ३८ ॥ ततउद्धृत्यतच्चूर्णंग्राह्यंप्रातःसितासमम् ॥ तेनयांति
शमंपीडाआमातीसारसंभवाः ॥ ३९ ॥

सुंठीचें चूर्ण करून त्यात थोडें तूप मेळवून गोळा करून एरंडाचे पानानीं तो गोळा बांधून त्यावर मातीचा लेप करून पूर्वरीतीनें हलका अग्नि द्यावा, नंतर तो गोळा बाहेर काढून तें चूर्ण साखरे बराबर मोठ्या प्रात:काळीं घ्यावें, तेणेंकरून आमातीसारा पासून उत्पन्न जाहल्या ज्या पीडा त्या दूर होतात.

## दुसरा शुंठीपुटपाक आमवातावर.

शुंठीकल्कंविनिक्षिप्यरसैरेरंडमूलजैः ॥ विपचेत्पुटपाकेनतद्रसःक्षौ
द्रसंयुतः ॥ ४० ॥ आमवातसमुद्भूतांपीडांजयतिदुस्तरां ॥

एरंडाच्या मुळाचे रसात, सुंठीचें चूर्ण कालवून गोळा करून पूर्वी पुटपाकाची कृती सांगितली आहे, त्याप्रमाणें कृती करून अग्नि देऊन नंतर तो गोळा बाहेर काढून पिळून रस काढून त्यात मध मेळवून प्याले असता, आमवायूपासून अगास ज्या पीडा उत्पन्न होतात त्या दूर होतात.

### सुरणपुटपाक अर्शरोगावर.

सौरणंकंदमादायपुटपाकेनपाचयेत् ॥ ४१ ॥ सतैलवणस्तस्यरसश्चार्शोविकारनुत्

सुरणाचा कंद आणून कुटून त्यात तिळाचें तेल व सैंधवचूर्ण मेळवून गोळा करून पूर्वी पुटपाकाची कृती सांगितली आहे, त्या रीतीनें कृती करून अग्नि द्यावा; नंतर तो गोळा बाहेर काढून पिळून रस काढून प्यालें असतां अर्शरोग दूर होतो, अर्श रोगास मुळव्याध असें ह्मणतात.

### मृगशृंगपुटपाक हृच्छूलावर.

शरावसंपुटेदग्धंशृंगंहरिणजंपिबेत् ॥ ४२ ॥ गव्येनसर्पिषायुक्तंतच्छूलंनश्यतिध्रुवम्॥

इति श्रीदामोदरसूनुशार्ङ्गधरेण विरचितायां संहितायां सूत्रस्थाने द्वितीयखंडे स्वरसादि कल्पना प्रथमोध्यायः ॥ १ ॥

मातीचे पणती मध्यें हरिणाच्या शिंगाचे तुकडे करून घालावे; त्याजवर दुसरी पणती उपडी घालून गोंवऱ्याचा अग्नि देऊन भस्म करावें तें भस्म गाईचें तुपांत घेतलें असतां हृदयशूल दूर होतो पुटपाकात व स्वरसांत भेद आहे, तो असा दर्ळी, चूर्ण, भस्म, रस इत्यादिकें करून पुटपाक होतो व स्वरस तो अंगरसाचा मात्र जाणावा. इति प्रथमोध्यायः

---

# अथ द्वितीयाध्यायप्रारंभः

### काढ्याची कल्पना.

पानीयंषोडशगुणंक्षुण्णेद्रव्येपलेक्षिपेत् ॥ ४३ ॥ मृत्पात्रेक्वाथयेद्ग्राह्यमष्टमांशावशेषितं ॥ तज्जलंपाययेद्धीमान्कोष्णंमृद्वग्निसाधितं ॥ ४४ ॥ शृतः क्वाथः कषायश्चनिर्यूहःसनिगद्यते ॥ आहाररसपाकेचसंजातेद्विपलोन्मितम् ॥ ४५ ॥ वृद्धवैद्योपदेशेनपिबेत्क्वाथंसुपाचितम् ॥

एकपल प्रमाण औषध आणून थोडें थोडें कुटून त्या औषधाचे सोळापट पाणी घेऊन औषध व पाणी दोन्ही मडक्यात घालून आठवा हिस्सा पाणी राहीं तोंपर्यंत हलका हलका अग्नि देऊन काढा करावा; नंतर तो काढा खालीं उतरून गाळू थोडा थोडा गरम आहे तोंच रोग्यास द्यावा व रोगी यानें चागलें अन्नाचें पचन जाह ल्या नंतर, वृद्धवैद्यास विचारून काढा घ्यावा व शृत १ क्वाथ २ कषाय ३ निर्यूह हे च्यार काढ्याचे पर्यायशब्द जाणावे.

## काढ्यांत साखर व मध घालावयाचें प्रमाण.

काथेक्षिपेत्सितामंशैश्चतुर्थाष्टमषोडशैः ॥ ४६ ॥ वातपित्तकफातंकेविपरीतंमधुस्मृतम् ॥

काढ्यामध्यें साखर घालावयाची ती, वात रोग असतां काढ्याचे चवथाई घालावी; पित्तरोग असतां आठवा हिस्सा घालावी; कफ रोग असतां सोळावा हिस्सा घालावी; व मध पित्तरोग असतां काढ्याचे सोळावा हिस्सा घालावी; वातरोग असतां आठवा हिस्सा घालावी; कफरोग असतां चवथाई घालावी.

## काढ्यांत जिरें आदिकरून पदार्थ व दूध आदिकरून पातळपदार्थ घालावयाचें प्रमाण.

जीरकंगुग्गुलंक्षारंलवणंचशिलाजतु ॥ ४७ ॥ हिंगुत्रिकटुकंचैवकाथे
शाणोन्मितेक्षिपेत् ॥ क्षीरंघृतंगुडंतैलंमूत्रंचान्यद्रवंतथा ॥ ४८ ॥
कल्कंचूर्णादिकंकाथेनिक्षिपेत्कर्षसंमितम् ॥

जिरें, गुग्गुळ, जवखार, सैंधव, शिलाजीत, हिंग, त्रिकटु, ह्मणजे सुंठ मिऱ्यें पिंपळी, पदार्थ काढ्यांत घालावयाचे असतां शाण प्रमाण घालावे व दूध, तूप, गूळ, तेल, [illegible]त्र आणि पातळ पदार्थ कल्क, चूर्णादिक हे पदार्थ कर्ष प्रमाण घालावे.

अपिधानमुखेपात्रेजलंदुर्जलतांव्रजेत् ॥ ४९ ॥
तस्मादावरणंत्यक्त्वाकाथादीनांविनिश्चयः ॥

काढा होते वेळेस मडक्यावर झांकण ठेविलें असतां, काढा गुण करीत नाहीं; या-[illegible]व काढ्याचे मडक्यावर झांकण ठेवूं नये, असा निश्चय सर्वत्र जाणावा.

## गुडूच्यादि काढा सर्वज्वरांवर.

गुडूचीधान्यकारिष्टपद्मकारक्तचंदनैः ॥ ५० ॥ गुडूच्यादिगणकाथः
सर्वज्वरहरः स्मृतः ॥ दीपनोदाहहृल्लासतृष्णाछर्घरुचीर्जयेत् ॥ ५१ ॥

गुळवेल १ धणे २ कडुनिंबाची साल ३ पद्मकाष्ठ ४ रक्तचंदन ५ या पांच औषधांचा काढा प्याला असतां जठराग्नीचें दीपन करून सर्व ज्वर दूर करितो व दाह, लाळ, पडणें, [illegible] व प्यास, ओकारी, अरोचक इतकीं दूर होतात.

## नागरादि पाचन सर्वज्वरांवर.

नागरंदेवकाष्ठंचधान्यंकंवृहतीद्वयम् ॥
दद्यात्पाचनकंपूर्वंज्वरितानांज्वरापहम् ॥ ५२ ॥

सुंठ १ देवदार २ धणे ३ रिंगणी ४ मोतरिंगणी ५ या पांच औषधांचा काढ प्रथम ज्वरास पाचन ह्मणोन द्यावा; तेणेंकरून ज्वर दूर होतो.

### क्षुद्रादि काढा अष्टविधज्वरांवर.

क्षुद्राकिराततिक्तंचशुंठीछिन्नाचपौष्करम् ॥
कषायएपांशमयेत्पीतश्चाष्टविधंज्वरम् ॥ ५३ ॥

रिंगणी १ किराईत २ कुटकी ३ सुंठ ४ गरूळ ५ एरंडमूळ ६ या साहा औषधांचा काढा प्याला असतां आठ प्रकारचे ज्वर दूर होतात.

### गुडूच्यादिपाचन वातज्वरावर.

गडूचीपिप्पलीमूलनागरैःपाचनंस्मृतमद्याद्वातज्वेरपूर्णलिंगेसप्तमवासरे ॥ ५४ ॥

गरूळ १ पिंपळमूळ २ सुंठ ३ या तीन औषधाचा काढा, वातज्वर पूर्णलिंग जाहला असतां, सातां दिवसां नंतर पाचन ह्मणोन द्यावा; तेणेंकरून वातज्वर जातो.

### शालिपर्ण्यादि काढा वातज्वरावर.

शालिपर्णीबलाद्राक्षागुडूचीसारिवातथा ॥
आसांक्वाथंपिबेत्कोष्णंतीव्रवातज्वराच्छिदम् ॥ ५५ ॥

रानगांजा १ चिकणामूळ २ द्राक्ष ३ गरूळ ४ उपलसरी ५ या पांच औषधांचा काढा, थोडा गरम असतां प्यावा; तेणेंकरून तीव्र वातज्वर नाश पावतो.

### दुसरा काश्मर्यादि काढा.

काश्मरीसारिवाद्राक्षात्रायमाणामृताभवः ॥
कषायःसगुडःपीतोवातज्वरविनाशनः ॥ ५६ ॥

शिवणीची साल १ उपलसरी २ द्राक्ष ३ त्रायमाण ४ गरूळ ५ या पांच औषधांचा काढा गूळ मेळवून घेतला असतां वातज्वर नाशातें पावतो.

### कट्फलादिपाचन पित्तज्वरावर.

कट्फलेंद्रयवांचपाठातिक्तामुस्तैःशृतंजलम् ॥
पाचनंदशमेह्निस्यात्तीव्रपित्तज्वरेनृणाम् ॥ ५७ ॥

कट्फळ १ इंद्रजव २ पाहाडमूळ ३ कटुकी ४ नागरमोथे ५ या पाच औषधाचा काढा, तीव्र पित्तज्वरास दहा दिवसां नंतर पाचन ह्मणोन द्यावा; तेणेंकरून पित्तज्वर जातो.

### पर्पटादिकाढा पित्तज्वरावर.

पर्पटोवासकस्तिक्ताकिरातोधन्वयासकः ॥ प्रियंगुश्चकृतः

काथएषांशर्करयायुतः ॥ ५८ ॥ पिपासादाहपित्तास्रयुतं
पित्तज्वरंजयेत् ॥

पित्तपापडा १ अडूळसा २ कटुकी ३ किराईत ४ धमासा ५ वाघांटीचें मूळ ६
या सहा औषधांचा काढा, साखर मेळवून प्यावा; तेणेंकरून प्यास दाह व पित्तरक्त
यांसहवर्तमान जो पित्तज्वर तो दूर होतो.

## दुसरा द्राक्षादि काढा.

द्राक्षाहरीतकीमुस्तंकटुकाकृतमालकः ॥ ५९ ॥ पर्पटश्चकृतःक्वाथएषां
पित्तज्वरापहः ॥ तृण्मूर्छादाहपित्तासृक्शमनोभेदनःस्मृतः ॥ ६० ॥

द्राक्ष १ बाळहिरडे २ नागरमोथे ३ कटुकी ४ बाहव्याचे शेंगेंतला मगज ५ पित्तपापडा ६ या सहा औषधांचा काढा पित्तज्वर दूर करितो व तृषा, मूर्छा, दाह, रक्तपित्त यांचें शमन करितो व मलादिकांचा भेद करितो.

## बीजपुरादिपाचन कफज्वरावर.

बीजपूरशिवापथ्यानागरग्रंथिकैःश्रृतम् ॥
सक्षारंपाचनंश्लेष्मज्वरेद्वादशवासरे ॥ ६१ ॥

महाळुंगीचें मूळ १ बाळहिरडे २ सुंठ ३ पिंपळमूळ ४ या चार औषधांचा काढा करून त्यात जवखार मेळवून, बारा दिवसा नंतर कफज्वरावर पाचन म्हणोन द्यावा; तेणें-करून कफज्वर दूर होतो.

## भूनिंबादिकाढा कफज्वरावर.

भूनिंबनिंबपिप्पल्यःसठीशुंठीशतावरी ॥
गुडूचीबृहतीचेतिक्वाथोहन्यात्कफज्वरम् ॥ ६२ ॥

किराईत १ कडुलिंब २ पिंपळी ३ कचोरा ४ सुंठ ५ शतावरी ६ गुळवेल ७ रिंगणी या आठ औषधांचा काढा, कफज्वर दूर करितो.

## दुसरा पाटोलादि काढा.

पटोलत्रिफलातिक्तसठीवासामृतोभवः॥
क्वाथोमधुयुतःपीतोहन्यात्कफकृतंज्वरम्॥६३॥

पडवळ १ हिरडा२ब्याहडा३आवळकाठी४कटुकी५कचोरा६अडूळसा७गुळवेल८ या आठ औषधांचा काढा, मध मेळवून प्यावा;तेणेंकरून कफज्वर दूर होतो.

वाहव्याचे शेंगेंतला मगज ७ अडुळसा ८ या आठ औषधांचा काढा, मध व साखर घालून प्यालें असतां प्रतिदिवशीं जो ज्वर येतो तो दूर होतो.

पटोलेंद्रयवादारुत्रिफलामुस्तगोस्तनैः ॥ मधुकामृतवासानांकाथंक्षौद्रयुतंपिबेत् ॥ ९२ ॥ संततेसततेचैवद्वितीयकतृतीयके ॥ ऐकाहिकेवाविषमेदाहपूर्वेनवज्वरे ॥ ९३ ॥

पटोल १ इंद्रजव २ देवदार ३ हिरडा ४ व्याहडा ५ आंवळकाठी ६ नागरमोथे ७ द्राक्ष ८ ज्येष्ठीमध ९ गुळवेल १० अडुळसा ११ या अकरा औषधांचा काढा करून मध मेळवून प्यालें असतां संततज्वर, सततज्वर, द्वितीयकज्वर, तृतीयकज्वर, ऐकाहिकज्वर, विषमज्वर, दाहपूर्वकज्वर, नवज्वर, इतक्या रोगातें दूर करितो.

## गुडूच्यादिकाढा तृतीयकज्वरावर.

गुडूचीधान्यमुस्ताभिश्चंदनोशीरनागरैः ॥ कृतंकाथंपिबेत्क्षौद्रसितायुक्तंज्वरातुरः ॥ ९४ ॥ तृतीयज्वरनाशायतृष्णादाहनिवारणं ॥

गरूळ १ धणे २ नागरमोथे ३ रक्तचंदन ४ वाळा ५ सुंठ ६ या सहा औषधांचा काढा मध, साखर घालून घेतला असतां तिसऱ्या दिवशीं जो ज्वर येतो, तो दूर होतो.

## देवदार्वादिकाढा चातुर्थिकज्वरावर.

देवदारुशिवावासाशालिपर्णीमहौषधैः ॥ ९५ ॥ धात्रीयुतंशृतंशीतं दद्यान्मधुसितायुतं ॥ चातुर्थिकज्वरेश्वासेकासेमंदानलेतथा ॥ ९६ ॥

देवदार १ बाळहिरडे १ अडूळसा २ रानगाजा ४ सुंठ ५ आंवळकाठी ६ या सहा औषधांचा काढा, थंड झाल्यावर त्यांत मध व साखर घालून प्यालें असतां, चवथे रोजीं जो ज्वर येतो तो दूर होतो व श्वास, कास दूर होतात व अग्नि प्रदीप्त होतो.

## दुसरा गुडूच्यादिकाढा ज्वरातिसारावर.

गुडूचीधान्यकोशीरग्रंथीवालकपर्पटैः ॥ बिल्वप्रतिविषापाठारक्तचंदनवत्सकैः ॥ ९७ ॥ किरातमुस्तेंद्रयवैःक्वथितंशिशिरंपिबेत् ॥ सक्षौद्रंरक्तपित्तघ्नंज्वरातिसारनाशनम् ॥ ९८ ॥

गरूळ १ धणे २ वाळा ३ सुंठ ४ कृष्णवाळा ५ पित्तपापडा ६ कोंवळेंबेलफळ ७ अतिविष ८ पाहाडमूळ ९ रक्तचंदन १० कुड्याचे मूळ ११ किराईत १२ नागरमोथे १३ इंद्रजव १४ या चौदा औषधांचा काढा करून थंड झाल्यावर त्यांत मध घालून प्यावा, तेणें करून रक्तपित्त व ज्वरातिसार हे दूर होतात.

## दुसरा नागरादिकाढा.

नागरंकुटजंमुस्तममृतातिविषातथा ॥
एभिःकृतंपिबेत्क्काथंज्वरातीसारनाशनम् ॥ ९९ ॥

सुंठ १ कुडयाचें मूळ २ नागरमोथे ३ गुळवेल ४ अतिवीष ५ या पाच औषधाचा काढा घ्याला असता ज्वरातीसार नाशातें पावतो.

## धान्यपंचक आमशूलावर.

धान्यवालकबिल्वाब्दनागरैःसाधितंजलं ॥
आमशूलहरंग्राहिदीपनंपाचनंपरम् ॥ १०० ॥

धणे १ वाळा २ कोंवळे बेलफळ ३ नागरमोथे ४ सुंठ ५ या पाच औषधांचा काढा घ्याला असता आमशूळ दूर करितो व मळाचा अवष्टंभ करितो, आणि दीपन करितो असें जाणावें.

## धान्यकादिकाढा पाचनदीपनावर.

धान्यनागरजःक्काथःपाचनोदीपनस्तथा ॥
एरंडमूलयुक्तश्चजयेद्वामानिलव्यथाम् ॥ १०१ ॥

धणे १ सुंठ २ या दोन औषधाचा काढा घ्याला असता, दीपन पाचन करितो व त्या काढ्यात एरंडमूळ मेळवून घेतला असता आमवायूतें दूर करितो.

## वत्सकादिकाढा आमातिसारावर व रक्तातिसारावर.

वत्सकादिविषाबिल्वमुस्तवालकजःभृतः ॥
अतिसारंजयेत्सामंचिरजंरक्तशूलजित् ॥ २ ॥

कुडयाचें मूळ १ अतिवीष २ कोंवळें बेलफळ ३ नागरमोथे ४ वाळा ५ या पांच औषधाचा काढा आम आहे ज्या मध्यें असा जो बहुत दिवसाचा अतिसार व शूळसहित रक्तातिसार यातें दूर करितो.

## दुसरा कुटजाष्टकसंज्ञक काढा.

कुटजातिविषापाठाधातकीलोध्रमुस्तकैः ॥ र्‍हीवेरदाडिमयुतैःकृतःक्काथः
समाक्षिकः ॥ ३ ॥ पेयोमोचरसेनैवकुटजाष्टकसंज्ञकः ॥
अतिसारान्जयेदाहरक्तशूलामदुस्तरान् ॥ ४ ॥

कुडयाचें मूळ १ अतिवीष २ पहाडमूळ ३ धायटीफुल ४ लोध ५ नागरमोथे ६ सुगंधवाळा ७ डाळिंबाची साल ८ या आठ औषधाचा काढा, मध व मोचरस मेळवून

प्याले असतां ज्या अतिसारामध्यें दाह व रक्तशूल, व आम हे असतात, तसले अतिसार दूर होतात.

### ऱ्हीबेरादिकाढा अतिसारावर.

ऱ्हीबेरधातकीलोध्रपाठालज्जालुवत्सकैः ॥ धान्यकातिविषामुस्तगुडूचीबिल्वनागरैः ॥ ५ ॥ कृतःकषायःशमयेदतिसारंचिरोत्थितम् ॥ अरोचकामशूलास्रज्वरघ्नःपाचनः स्मृतः ॥ ६ ॥

वाळा १ धायटीफुल २ लोध ३ पाहाडमूळ ४ लाजरी ५ कुड्याचें मूळ ६ धणे ७ अतिवीष ८ नागरमोथे ९ गरूळ १० कोंवळें बेलफळ ११ सुंठ १२ या बारा औषधांचा काढा प्याला असतां बहुत दिवसांचा अतिसार व अवढणें व आमशूल व ज्वर यांतें दूर करितो व पाचन करितो व बेलाची साल व मोठ्या आंब्याची साल यांचा काढा करून, त्यांत मध व साखर घालून घेतला असतां सर्व अतिसार दूर होतात, असें ग्रंथांतरीं सांगितलें आहे.

### धातक्यादिकाढा बालकाचे सर्वातिसारांवर.

धातकीबिल्वलोध्राणिवालकंगजपिप्पली ॥ एभिःकृतंशृतंशीतंशिशुभ्यः क्षौद्रसंयुतम् ॥ ७ ॥ प्रदद्यादवलेहंवासर्वातिसारशांतये ॥

धायटीफुल १ कोंवळें बेलफल २ लोध्र ३ वाळा ४ गजपिंपळी ५ या पांच औषधांचा काढा करून थंड झाल्यावर, त्यात मध मिळवून द्यावा; अथवा चाटण करून द्यावें तेणें करून बालकाचा अतिसार दूर होतो.

### शालिपर्ण्यादिकाढा संग्रहणीवर.

शालिपर्णीबलाबिल्वधान्यशुंठीकृतः शृतः ॥ ८ ॥
आध्मानशूलसहितांवातजांग्रहणींजयेत् ॥

रानगांजा १ चिकणामूळ २ कोंवळें बेलफळ ३ धणे ४ सुंठ ५ या पांच औषधांचा काढा करून प्याल असतां पोटफुगी व शूळ यांशीं सहवर्तमान जाहली जी संग्रहणी तीतें दूर करितो.

### दुसरा चतुर्भद्रादिकाढा.

गुडूच्यतिविषाशुंठीमुस्तैःकाथःकृतोजयेत् ॥ ९ ॥
आमानुपक्कांग्रहणींग्राहीपाचनदीपनः ॥

गुळवेल १ अतिविष २ सुंठ ३ नागरमोथे ४ या च्यार औषधाचा काढा, प्याला असतां आमयुक्त जी संग्रहणी तीतें दूर करितो. व ग्राही म्हणजे मळाचा अवष्टंभ करणारा असून पाचन व दीपन करितो.

## इंद्रयवादिकाढा सर्वातिसारांवर.

यवधान्यपटोलानांकाथःसक्षौद्रशर्करः ॥ ११० ॥
योज्यःसर्वातिसारेषुबिल्वाम्रास्थिभवस्तथा ॥

इंद्रजव १ धणे २ पटोल ३ या तीन औषधांचा काढा, साखर व मध मेळवून प्यावा, तेणें करून सारे अतिसार दूर होतात. तसाच, कोवळें बेलफळ व अंब्याची कोय या दोन औषधांचा काढा साखर व मध मेळवून प्यालें असतां सारे अतिसार दूर होतात.

## त्रिफलादिकाढा कृमिरोगावर.

त्रिफलादेवदारुघ्रमुस्तामूषककर्णिका ॥ ११॥ शिग्रुरेतैःकृतःकाथः
पिप्पलीचूर्णसंयुतः ॥ विडंगचूर्णयुक्तश्चकृमिघ्नःकृमिरोगहा ॥ १२ ॥

हिरडे १ बेहेडे २ आवळकठी ३ देवदार ४ नागरमोथे ५ उंदिरकानी ६ शेगल्याची साल ७ या सात औषधांचा काढा पिंपळीचें चूर्ण मेळवून प्यालें असता अंत व ज्वर आणि विवर्णतादिक अंतविकार हे दूर होतात.

## त्रिफलादिकाढा कामलादिकांवर.

फलत्रिकामृतातिक्तानिंबकैरातवासकैः ॥
जयेन्मधुयुतःकाथःकमलांपांडुतांतथा ॥ १३ ॥

हिरडे १ बेहेडे २ आवळकठी ३ गरूळ ४ कटुकी ५ कडुनिंबाची साल ६ किराईत ७ आडुळसा ८ या आठ औषधाचा काढा मध मेळवून प्यावा; तेणें करून डोळ्यांत कावीळ रोग होतो, तो व पांडुरोग हे दूर होतात.

## पुनर्नवादिकाढा पांडुशोफादिकांवर.

पुनर्नवाभयानिंबदार्वीतिक्तापटोलकैः ॥ गुडूचीनागरयुतैःकाथोगोमूत्र
संयुतः ॥ १४ ॥ पांडुकासोदरश्वासशूलसर्वांगशोथहा ॥

पुनर्नवा १ बाळहिरडे २ कडुनिंब ३ दारुहळद ४ कटुकी ५ पटोल ६ गरूळ ७ सुंठ ८ या आठ औषधाचा काढा, गाईचें मूत्र मेळवून घेतला असतां पंडुरोग व कामला, उदररोग, श्वास, शूळ व साऱ्या अंगास सूज येते ती इतकीं दूर होतात.

## वासादिकाढा रक्तपित्तादिकांवर.

वासाद्राक्षाभयाक्वाथःपीतःसक्षौद्रशर्करः ॥ १५ ॥
निहंतिरक्तपित्तार्तिश्वासकासान्सुदारुणान् ॥

आडुळसा १ द्राक्ष २ बाळहिरडे ३ या तीन औषधांचा काढा, मध व साखर मेळवून प्यालें असतां रक्तपित्त दूर होतें व दुर्घट असे श्वास व कास दूर होतात.

## दुसरा केवळवासककाढा.

रक्तपित्तक्षयंकासंश्लेष्मपित्तज्वरंतथा ॥ १६ ॥
केवलोवासकक्वाथःपीतःक्षौद्रेणनाशयेत् ॥

नुसत्या आडुळशाचा काढा मध मेळवून प्याला असतां रक्तपित्त, क्षय, कास, कफ व पित्तजन्य ज्वर हे दूर होतात.

## वासादिककाढा कासज्वरावर.

वासाक्षुद्रामृताक्वाथःक्षौद्रेणज्वरकासहा ॥ १७ ॥

आडुळसा १ रिंगणी २ गरूळ ३ या तीन औषधांचा काढा प्याला असतां ज्वर व कास हे दूर होतात.

## रिंगण्यादिकाढा कासश्वासांवर.

क्षुद्राकुलित्थवासाभिर्नागरेणचसाधितः ॥ १८ ॥
क्वाथःपौष्करचूर्णाढ्यःश्वासकासौनिवारयेत् ॥

रिंगणी १ कुळीथ २ आडुळसा ३ सुंठ ४ या च्यार औषधाचा काढा करून पोखरणीच्या मुळाचें चूर्ण मेळवून प्याला असतां श्वास व कास दूर होतात.

## रेणुकादिकाढा उचकीवर.

रेणुकापिप्पलीक्वाथेहिंगुकल्केनसंयुतः ॥ १९ ॥
पानादेवहिपंचापिहिक्कानाशयतिक्षणात् ॥

रेणुकाबीज १ पिंपळी २ या दोन औषधांचा काढा करून त्यांत हिंग भाजलेला मेळवून प्याल्याबरोबर पाचा प्रकारची उचकी दूर होते.

## दशमूळादिकाढा गृध्रसी वायूवर.

हिंगुपुष्करचूर्णाढ्योदशमूलशृतोजयेत् ॥ १२० ॥
गृध्रसींकेवलःक्वाथःशेफालीपत्रजस्तथा ॥

रानगांजामूळ १ रानमालमूळ २ रिंगणीमूळ ३ मोर्तींगणीमूळ ४ बेलमूळ ५ गोखरूमूळ ६ पेरणमूळ ७ टेंटूमूळ ८ शिवणमूळ ९ पाडळमूळ १० या दशमुळांचा काढा, भाजलेला हिंग व पोखरमूळ यांचें चूर्ण मेळवून प्याला असतां गृध्रसी संज्ञक वायु दूर होतो. तसाच एकट्या निर्गुंडीच्या पानांचे काढ्यांत भाजला हिंग व पोखरणीच्या मुळांचें चूर्ण मेळवून प्यालें असतां तेणें करूनही गृध्रसी वायु दूर होतो.

## बिल्वादिकाढा ओकारीवर.

बिल्वत्वचोगुडूच्यावाक्वाथःक्षौद्रेणसंयुतः ॥ २१ ॥
जयेत्त्रिदोषजांछर्दिपर्पटःपित्तजांतथा ॥

बेलाचे सालीचा काढा, अथवा गरुळीचा काढा, मध मेळवून, यांतून कोणचाही एक काढा प्याला असतां त्रिदोषा पासून उत्पन्न आहली जी ओकारी, ती दूर होते. तसाच पित्तपापड्याचा काढा मध मेळवून प्याला असतां, पित्त संबंधी ओकारी दूर होते.

## रास्नापंचक वायूवर.

रास्नामृतामहादारुनागरैरंडजंशृतम् ॥ २२ ॥
सप्तधातुगतेवातेसामेसर्वांगजेपिबेत् ॥

रास्ना १ गरूळ २ देवदार ३ सुंठ ४ एरंडमूळ ५ या पांच औषधांचा काढा प्याला असतां सप्तधातुगत वायु व आमवायु व सर्वांगवायु हे दूर होतात,

## रास्नासप्तक.

रास्नागोक्षुरकैरंडदेवदारुपुनर्नवा ॥ २३ ॥गुडूच्यारग्वधश्चैवक्वाथए
पांविपाचयेत् ॥ शुंठीचूर्णेनसंयुक्तं पिबेज्जंघाकटिग्रहे ॥२४ ॥ पार्श्व
पृष्ठोरुपीडायामामवातेसुदुस्तरे ॥

रास्ना १ गोखरू २ एरंडमूळ ३ देवदार ४ पुनर्नवा ५ गुळवेल ६ बाहव्याचे शेंगेंतला मगज ७ या सात औषधांचा काढा करून. सुंठीचें चूर्ण मेळवून प्यालें असतां, पोटऱ्यांमध्यें, कंबरेंत, कुशींत, पाठीत, माड्यांत इतक्या स्थानीं वायूचा प्रकोप होतो तो व आमवायु तोही दूर होतो

## महारास्नादिकाढा संपूर्णवायूवर.

रास्नाद्विगुणभागास्यादेकभागास्ततःपरे ॥ २५ ॥ धन्वयासबलैरंडदेव
दारुसठीवचाः॥ वासकोनागरंपथ्याचव्यामुस्तापुनर्नवाः ॥ २६ ॥
गुडूचीवृद्धदारुश्चशतपुष्पाचगोक्षुरः ॥ अश्वगंधाप्रतिविषाकृतमालः

शतावरी ॥ २७ ॥ कृष्णासहचरश्चैवधान्यकंबृहतीद्वयम् ॥ एभिःकृतं पिबेत्क्वाथंशुंठीचूर्णेनसंयुतम् ॥ २८ ॥ कृष्णाचूर्णेनवायोगराजगुग्गुलुनाऽथवा ॥ अजमोदादिनावापितैलेनैरंडजेनवा ॥२९॥ सर्वांगकंपेकुब्जत्वेपक्षाघातेऽपवाहुके॥गृध्रस्यामामवातेचश्लीपदेचापतानके ॥३०॥ अंत्रवृद्धौतथाध्मानेजंघाजानुगतेर्दिते ॥ शुक्रामयेमेंढ्ररोगेवंध्यायोन्यामयेषुच ॥ ३१ ॥ महारास्नादिराख्यातोब्रम्हणागर्भकारणम् ॥

रास्ना १ सान्या औषधाचे दुप्पट घ्यावा व धमासा २ चिकणामूळ ३ एरंडमूळ ४ देवदार ५ कचोरा ६ वेखंड ७ आडूळसा ८ सुंठ ९ वाळहिरडे १० चवक ११ नागरमोथे १२ पुनर्नवा १३ गुळवेल १४ विधारा १५ बडिशोप १६ गोखरू १७ आसंघ १८ अतिवीष १९ बाहव्याचे शेंगेंतला मगज २० शतावरी २१ पिंपळी २२ कोलिस्ता २३ धणे २४ रिंगणी २५ मोतरिंगणी २६ या सव्वीस औषधांचा काढा करून, सुंठीचें चूर्ण, अथवा पिंपळीचें चूर्ण, किंवा योगराज गुग्गूळ अथवा अजमोदा अथवा एरंडेल तेल यांतून जें अनुपान ज्याचे प्रकृतीला उपयोगीं पडेल तसें योजून तें त्या काढ्यांत घालून घ्यावा; तेणेंकरून साऱ्या शरीराचे ठायीं कंपवायु होतो व कुबडा वायू व अर्धांगवायू व बाहूच्या शिरांचें आकर्षण करून स्तंभ करितो तो अपबाहुक वायू व कंबरे पासून पायांपर्यंत पीडा करितो, तो गृध्रसी वायु व आमवायु व श्लीपदरोग व उदरामध्यें राहून दृष्टीचें स्तंभन करून संज्ञेचा नाश करितो तो आपतानक वायु व अंत्रवृद्धी व पोट फुगवितो तो वायु व पोटऱ्यांत व ढोपरात वायु होतो तो व तोंड वाकडें करितो तो व अर्दितवायु व धातुविकार व शिश्नरोग व वांझोटी स्त्रीचे विकार व योनीचे विकार हे दूर होतात. व हा काढा गर्भ होण्याविषयीं कारण आहे असें ब्रह्मदेवानें सांगितलें आहे.

## एरंडसप्तक स्तनादिगतवायूंवर.

एरंडोबीजपूरश्चगोक्षुरोबृहतीद्वयम् ॥ ३२ ॥ अश्मभेदस्तथाबिल्वएतन्मूलैःकृतःशृतः एरंडतैलहिंग्वाढ्यःसयवक्षारसैंधवः ॥ ३३ ॥ स्तनस्कंधकटीमेंढ्रहृदयोत्थव्यथांजयेत् ॥

एरंडमूळ १ महाळुंगीचें मूळ २ गोखरू ३ रिंगणी ४ मोरींगणी ५ लकड्यापाषाणभेद ६ बेलमूळ ७ या सात औषधांचें मुळांचा काढा करून एरंडेल तेल व हिंग भाजलेला व सैंधव व जवखार यांचें चूर्ण त्या काढ्यांत मेळवून घ्यावा; तेणेंकरून स्तन व खांदे व कंबर शिश्न व छाती यांचे ठायीं वातसंबंधी ज्या पीडा होतात त्या दूर होतात.

## नागरादिकाढा वातशूलावर.

नागरैरंडयोःक्काथःक्काथइंद्रवस्यवा ॥ ३४ ॥
हिंगुसौवर्चलोपेतोवातशूलनिवारणः ॥

सुंठ १ एरंडमूळ २ या दोन औषधांचा काढाकरून त्यांत भाजलेला हिंग व पादेलोण मेळवून घ्यावा; तसाच इंद्रजवाचा काढा करून त्यात पादेलोण व हिंगभाजला मेळवून घ्यावा; तणेंकरून वायुसंबंधी शूळ दूर होतो.

## त्रिफलादिकाढा पित्तशूळावर.

त्रिफलारग्वधक्काथःशर्कराक्षौद्रसंयुतः ॥ ३५ ॥
रक्तपित्तहरोदाहपित्तशूलनिवारणः ॥

हिरडा १ बेहडा २ आंवळकाठी ३ बाहव्याचे शेंगेंतला मगज ४ या च्यार औषधांचा काढा करून त्यांत साखर व मध घालून घ्यावा; तेणेंकरून रक्तपित्त व दाह पित्तशूळ हे दूर होतात.

## एरंडमूलादिकाढा कफशूलावर.

एरंडमूलंद्विपलंजलेष्टगुणितेपचेत् ॥ ३६ ॥
तत्क्काथोयावशूकाढ्यःपार्श्वहृत्कफशूलहा ॥

एरंडमूळ १ दोन पळें घेऊन त्यांत पाणी आठगुण घालून आठवा हिस्सा पाणी राही पर्यंत काढा करून त्यांत जवखार मेळवून घ्यावा; तेणेंकरून उरामध्यें व पाठींत कफापासून शूळ होतो तो दूर होतो.

## दशमुलादिकाढा हृद्रोगादिकांवर.

दशमूलकृतःक्काथःसयवक्षारसैंधवाः ॥ ३७ ॥
हृद्रोगगुल्मशूलार्तिकासश्वासचनाशयेत् ॥

रानगांजाचें मूळ १ रानमालमूळ २ रिंगणीमूळ ३ रानवांगी किंवा मोतरिंगणीमूळ ४ गोखरूमूळ ५ बेलमूळ ६ ऐरणमूळ ७ टेंटुमूळ ८ शिवणमूळ ९ पाडळमूळ १० या दशमुळाचा काढा करून त्यात जवखार व सैंधव मेळवून घ्यावा, तेणेंकरून उरांत रोग होतो तो व श्वास, कास यांचा नाश होतो.

## हरितक्यादिकाढा मूत्रकृच्छ्रावर.

हरीतकीदुरालंभाकृतमालकगोक्षुरैः ॥ ३८ ॥ पाषाणभेदसहितैःक्काथो माक्षिकसंयुतः ॥ विबंधेमूत्रकृच्छ्रेचसदाहेसरुजेहितः ॥ ३९ ॥

वाळाहिरडे १ धमासा २ वाळ्याचे शेंगांचा मगज ३ गोखरू ३ लकडया पाषाणभेद ५ या पांच औषधांचा काढा करून त्यांत मध मेळवून प्यावा; तेणेंकरून दाह व तिडीक व वायूचा अवरोध हे उपद्रव आहेत ज्या मूत्रच्छ्रामध्यें तें दूर होतें.

## वीरतर्वादिकाढा मूत्राघातादिकांवर.

वीरतरुर्वृक्षवंदाकाशःसहचरत्रयम् ॥ कुशद्वयनलोगुंद्रावकपुष्पोभिमं थकः ॥ ४९ ॥ मूर्वापाषाणभेदश्वश्योनाकोगोक्षुरस्तथा ॥ अपामार्गश्चकपलंब्राह्मीचेतिगणोवरः ॥ ४१ ॥ वीरतर्वादिरित्युक्तः शर्कराश्मरिकृच्छ्रहा ॥ मूत्राघातंवायुरोगान्नाशयेन्निखिलानपि ॥ ४२ ॥

अर्जुनवृक्षाची साल १ बाधांगूळ २ कसई ह्मणजे कसाडव ३ पांढरा कोन्हांटा ५ पिंवळा कोन्हांटा ५ काळा कोन्हांटा ६ मोठादर्भ ७ ल्हानदर्भ ८ देवनळ ९ गोवर्णीगवत १० शिवलिंग ११ ऐरणीमूळ १२ मोरवेल १३ लकड्यापाषाणभेद १४ टेंटूमूळ १५ गोखरू १६ आघाडा १७ कमळ १८ ब्राह्मीचा पाला १९ या एकुणीस औषधांचा काढा करून प्याला असतां मूतखडा व मूत्रकृच्छ्र व मूत्राघात आणि वायूचे रोग हे दूर होतात.

## एलादिकाढा अश्मरीशर्करादिकांवर.

एलामधुकगोकंटरेणुकैरंडवासकाः ॥ कृष्णाश्मभेदसहिताःक्वाथएषा सुसाधितः ॥ ४३ ॥ शिलाजतुयुतःपेयः शर्कराश्मरिकृच्छ्रहा ॥

इलायची १ ज्येष्टमध २ गोखरू ३ रेणुकबीज ४ एरंडमूळ ६ आडुळसा ६ पिंपळी ७ पाषाणभेद ८ या आठ औषधांचा काढा करून त्यांत शिलाजीत मेळवून प्यावा, तेणेंकरून मूतखडा व मूत्रकृच्छ्र हे दूर होतात.

## गोक्षुरादिकाढा मूत्रकृच्छ्रावर.

समूलगोक्षुरक्काथःसितामाक्षिकसंयुतः ॥ ४४ ॥
नाशयेन्मूत्रकृच्छ्राणितथाचोष्णसमीरणम् ॥

मुळांसुद्धा गोखरूचे झाडाचा काढा करून त्यात साखर व मध मेळवून प्यावा, तेणेंकरून मूत्रकृच्छ्र व उष्णवायु हे दूर होतात.

## त्रिफलादिकाढा परम्यावर.

वरादार्व्यब्दरारूणःक्वाथःक्षौद्रेणमेहहा ॥ ४५ ॥
वत्सकत्रिफलादार्वीमुस्तकोबीजकस्तथा ॥

हिरडा १ बेहडा २ आंवळकाठी ३ दारुहळद ४ नागरमोथे ५ देवदार ६ या सहा औषधांचा काढा, मध मेळवून प्यालें असतां परमा दूर होतो. कुडेसाल १ हिरडे २ बेहडे ३ आंवळकाठी ४ दारुहळद ५ नागरमोथे ६ विवळा ७ या सात औषधांचा काढा, मध मेळवून प्यावा; तेणेंकरूनही परमा जातो.

## दुसरा फलत्रिकादिकाढा परम्यावर.

फलत्रिकाब्ददार्वीणांविशालायाःशृतंपिबेत् ॥ ४६ ॥
निशाकल्कयुतंसर्वप्रमेहविनिवृत्तये ॥

हिरडा १ बेहडा २ आंवळकाठी ३ दारुहळद ४ नागरमोथे ५ कंवडळमूळ ६ या सहा औषधांचा काढा करून त्यांत हळद मेळवून प्यावा; तेणेंकरून अवघे परमे दूर होतात.

## दार्व्यादिकाढा धुपणीवर.

दार्वीरसांजनमुस्तंभल्लातःश्रीफलंवृषः ॥ ४७ ॥ कैरातश्चपिबेदेषां
क्वाथंशीतंसमाक्षिकम् ॥ जयेत्सशूलंप्रदरंपीतःश्वेतासितारुणम् ॥ ४८ ॥

दारुहळद १ रसांजन २ नागरमोथे ३ बिबवा ४ लहानबेलफळ ५ अडूळसा ६ किराईत ७ या सात औषधांचा काढा करून थंड झाल्यावर, त्यांत मध मेळवून प्यालें असतां, शूळ सहित पिंवळा, पांढरा, काळा व तांबडा हे रंग आहेत ज्या मध्यें अशा प्रकारची स्त्रियांस जी धुपणी लागते ती दूर होते.

## न्यग्रोधादिकाढा योनिरोग व व्रणादिरोगांवर.

न्यग्रोधप्लक्षकोशाम्रवेतसोवदरीतुणिः ॥ मधुयष्टीप्रियालुश्चलोध्रद्वयमु
दुंबरः ॥ ४९ ॥ पिप्पलश्चमधूकश्चतथापारिसपिप्पलः ॥ सल्लकी
तिंदुकीजंबूद्वयमाम्रतरुःशिवः ॥१५०॥ कदंबककुभौचैवभल्लातकफला
निच ॥ न्यग्रोधादिगणक्वाथंयथालाभंचकारयेत् ॥ ५१ ॥ अयंक्वाथो
महाग्राहीव्रणयोभग्नंचसाधयेत् ॥ योनिदोषहरोदाहमेदोमेहविषापहः ॥ ५२ ॥

वडाची साल १ पायरी २ आंबाडा ३ वेनस ४ बोरीची साल ५ नंदीवृक्ष ६ ज्येष्ठमध ७ चारोळ्या ८ तांबडालोध्र ९ पांढरालोध्र १० उंबर ११ पिंपळाची साल १२ मोहाची साल १३ पारोसापिंपळ १४ सालई १५ टेंटू १६ लहानजांभूळ १७ थोरजांभूळ १८ आंबा १९ बाळहिरडे २० कळंबाची साल २१ अर्जुनवृक्ष २२ बिबवा २३ या तेवीस औषधांतून जीं मिळतील तीं मेळवून त्याचा काढा करून प्यालें असता हा मलाचा

अवष्टंभ करणारा असून व्रणरोग व अस्थिभंग हे दूर करितो. व योनिदोष व दाह मेदोरोग व विषदोष हे दूर होतात.

### बिल्वादिकाढा मेदोरोगावर.

बिल्वोऽग्निमंथःश्योनाकःकाश्मरीपाटलातथा ॥
क्वाथएपांजयेन्मेदोदोषंक्षौद्रेणसंयुतः ॥ ५३ ॥

लहान बेलफळ १ ऐरणमूळ २ टेटुमूळ ३ शिवणमूळ ४ पाडळमूळ ५ या पांच औषधांचा काढा करून, त्यांत मध मेळवून प्याले असतां साऱ्या शरिरांत मेद वाढून जी फुगवटी येते ती दूर होते; तिला मेदोरोग असें ह्मणतात.

### दुसरा त्रिफलादिकाढा.

क्षौद्रेणत्रिफलाक्वाथःपीतोमेदहरःस्मृतः ॥
शीतीभूतंतथोष्णांबुमेदोहृत्क्षौद्रसंयुतम् ॥ ५४ ॥

हिरडे १ बेहडे २ आंवळकाठी ३ या तीन औषधांचा काढा करून त्यांत मध मेळवून प्यावा; तेणेंकरून मेदोरोग दूर होतो; तसेंच कढत पाणी थंड करून त्यांत मध मेळवून प्यालें असतां तेणेंकरूनही मेदोरोग दूर होतो.

### चव्यादिकाढा उदररोगावर.

चव्यचित्रकविश्वानांसाधितोदेवदारुणा ॥
क्वाथस्त्रिवृच्चूर्णयुतोगोमूत्रेणोदराञ्जयेत् ॥ ५५ ॥

चवक १ चित्रक २ सुंठ ३ देवदार ४ या च्यार औषधाचा काढा करून त्यांत निशोत्तराचें चूर्ण व गोमूत्र मेळवून प्यावा; तेणेंकरून सारे उदररोग दूर होतात.

### पुनर्नवादिकाढा शोथोदरावर.

पुनर्नवामृतादारुपथ्यानागरसाधितः ॥
गोमूत्रगुग्गुलयुतःक्वाथःशोथोदरापहः ॥ ५६ ॥

पुनर्नवा १ गुळवेल २ देवदार ३ बाळहिरडे ४ सुंठ ५ या पाच औषधांचा काढा करून त्यांत गुग्गुळ व गोमूत्र मेळवून प्यावा, तेणेंकरून सूज आहे ज्या उदरास तें उदर दूर होतें.

### पथ्यादिकाढा यकृत्प्लीहादिकांवर.

पथ्यारोहीतकक्वाथंयवक्षारकणायुतम् ॥
प्रातःपिबेद्यकृत्प्लीहगुल्मोदरनिवृत्तये ॥ ५७ ॥

बाळहर्तकी १ रोहिडा २ या दोन औषधाचा काढा करून, त्यात पिंपळीचें चूर्ण व अवसार मेळवून प्यावा, तेणेंकरून पोटांत डाव्या बाजूस कलू होते ती, - आणि उजव्या बाजूस यकृत् होतें तें व गुल्मोदर हे रोग दूर होतात.

### पुनर्नवादिकाढा सुजेवर.

पुनर्नवादारुनिशानिशाशुंठीहरीतकी ॥ गुडूचीचित्रकोभार्गीदेवदारु
चतै शृतः ॥ ५८ ॥ पाणिपादोदरमुखंप्राप्तशोफंनिवारयेत् ॥

पुनर्नवा १ दारुहळद २ हळद ३ सुठ ४ बाळहरीतकी ५ गुळवेल ६ चित्रक ७ भारगसाळ ८ देवदार ९ या नऊ औषधाचा काढा करून प्यालें असता सार्‍या अंगाची सूज दूर होते.

### त्रिफलादिकाढा वृषणशोथावर.

फलत्रिकोद्भवंकाथंगोमूत्रेणवपाययेत् ॥ ५९ ॥
वातश्लेष्मकृतंहंतिशोथंवृषणसंभवम् ॥

हिरडा १ बेहडा २ आवळकाठी ३ या तीन ओषधाचा काढा करून त्यात गोमूत्र ळवून प्यालें असता, वातकफापासून जी वृषणास सूज येते ती दूर होते.

### रास्नादिकाढा अंत्रवृद्धीवर.

रास्नामृताबलायष्टीगोकंटैरंडजः शृतः ॥ १६० ॥
एरंडतैलसंयुक्तोवृद्धिमंत्रोद्भवांजयेत् ॥

रास्ना १ गुळवेल २ चिकणामूळ ३ ज्येष्ठमध ४ गोखरू ५ एरंडमूळ ६ या सहा औषधाचा काढा करून, त्यात एरंडेल तेल मेळवून प्यालें असता अंत्रवृद्धि ह्मणजे अंत्र- गळवायू जेणें करून वृषण मोठा होतो, तो रोग दूर होतो

### कांचनारादिकाढा गंडमालांवर.

कांचनारत्वच काथःशुंठीचूर्णेननाशयेत् ॥ ६१ ॥
गंडमाल।तथाकाथः क्षौद्रेणवरुणत्वचः ॥

कांचनवृक्षाचे सालीचा काढा करून त्यात सुंठीचें चूर्ण मेळवून प्यालें असता, तसाच वायवर्णाचे सालीचा काढा करून त्यात मध मेळवून प्यालें असता गंडमाळा दूर होतात.

### शाखोटककाढा श्लीपद व मेदोरोग यांवर.

शाखोटवल्कलक्काथगोमूत्रेणयुतंपिबेत् ॥ ६२ ॥
श्लीपदानांविनाशायमेदोदोषनिवृत्तये ॥

सागाचे सालीचा काढा करून त्यांत गोमूत्र मेळवून प्यालें असतां श्लीपदरोग विशेषें करून पायांस होतो, त्यास वारुळरोग असें म्हणतात. तो व मेदोरोग हे दूर होतात.

## पुनर्नवादिकाढा अंतर्विद्रधीवर.

पुनर्नवावरुणयोःक्वाथोंतर्विद्रधिन्नजयेत् ॥ ६३ ॥
तथाशिग्रुभवक्काथोहिंगुकल्केनसंयुतः ॥

पुनर्नवा १ वायवर्णा २ या दोन औषधांचा काढा प्याला असतां व शेवग्याचे सालीचा काढा करून त्यांत हिंगाचा कल्क घालून प्यालें असतां अंतर्विद्रधिरोग दूर होतो.

## वरुणादिकाढा मध्यविद्रधीवर.

वरुणादिगणक्वाथमपक्वेमध्यविद्रधौ ॥ ६४ ॥
ऊषकादिरसोयुक्तंपिबेच्छमनेहतवे ॥

वरुणादिक औषधांचा गण पुढें सांगावयाचा आहे त्याचा काढा करून व . . . औषधांचें चूर्ण पुढें सांगावयाचें आहे, त्याचें चूर्ण करून त्या काढ्यांत घालून प्यालें असतां पक्व जाहला नाहीं जो विद्रधिरोग तो दूर होतो.

## वायवर्णादिकाढा कफमेदादिकांवर.

वरुणावकपुष्पश्चाविल्वापमार्गाचित्रकाः ॥ ६५ ॥ अग्निमंथद्वयंशि
ग्रुद्वयंचबृहतीद्वयम् ॥ सैरेयकत्रयंमूर्वामेषशृंगीकिरातकः ॥ ६६ ॥
अजशृंगीचार्बिंचकरंजश्चशतावरी ॥ वरुणादिगणक्वाथःकफमेदोहरः
स्मृतः ॥ ६७ ॥ हंतिगुल्मंशिरःशूलंतथाभ्यंतरविद्रधीन् ॥

## ऊषकादिगण.

ऊषकस्तुत्थकंहिंगूकाशीसद्वयसैंधवम् ॥ ६८ ॥
सशिलाजतुकृच्छ्राश्मगुल्ममेदःकफापहम् ॥

खारीमाती १ मोरचूत शुद्ध करून २ व भाजला हिंग ३ पांढरा हिराकशी ४ पिंवळा हिराकशी ५ ते शुद्ध करून घ्यावे व सैंधव ६ शिलाजीत ७ या सात औषधांचें चूर्ण घेतलें असतां मूत्रकृच्छ्र व मूतखडा व गुल्म व मेदोरोग हे दूर होतात. हें ऊषकादि चूर्ण होय

## खदिरादिकाढा भगंदररोगावर.

खदिरत्रिफलाक्काथोमहिषीघृतसंयुतः ॥ ६९ ॥
विडंगचूर्णयुक्तश्चभगंदरविनाशनः ॥

खैरसाल १ हिरडा २ बेहडा ३ आंवळकाठी ४ या च्यार औषधांचा काढा करून त्यांत म्हशीचें तूप व वावडिंगांचें चूर्ण मेळवून प्यालें असतां भगंदर रोग दूर होतो.

## पटोलादिकाढा उपदंशावर.

पटोलत्रिफलानिंबकिरातखदिरासनैः ॥ १७० ॥
क्काथःपीतोजयेत्सर्वानुपदंशान्सगुग्गुलुः ॥

पटोल १ हिरडा २ बेहडा ३ आवळकाठी ४ कडूनिंब ५ किराईत ६ खैरसाल ७ बिबळा ८ या आठ औषधांचा काढा करून त्यांत गुग्गुळ मेळवून प्यालें असतां सारे गरमीचे रोग नाश पावतात. गरमीला उपदंश असें ह्मणतात.

## अमृतादिकाढा वातरक्तावर.

अमृतैरंडवासानक्काथएरंडतैलयुक् ॥ ७१ ॥
पीतः सर्वांगसंचारिवातरक्तंजयेध्रुवम् ॥

गुळवेल १ एरंडमूळ २ अडूळसा ३ या तीन औषधांचा काढा करून त्यांत एरंडेल तेल मेळवून प्यालें असतां साऱ्या अंगांत संचार करणारें असें जें वातरक्त तें दूर होतें.

## दुसरा पटोलादिकाढा.

पटोलंत्रिफलातिक्तागुडूचीचशतावरी ॥ ७२ ॥
एतत्क्काथोजयेत्पीतोवातासंदाहसंयुतम् ॥

पटोल १ हिरडा २ बेहडा ३ आंवळकाठी ४ कटुकी ५ गुळवेल ६ शतावरी ७ या सात औषधांचा काढा करून प्यालें असतां दाहयुक्त असें जें वातरक्त तें दूर होतें.

सागाचे सालीचा काढा करून त्यात गोमूत्र मेळवून प्यालें असतां श्लीपदरोग । करून पायांस होतो, त्यास वारुळरोग असें म्हणतात. तो व मेदोरोग हे दूर होतात.

## पुनर्नवादिकाढा अंतर्विद्रधीवर.

पुनर्नवावरुणयोःक्वाथोंतर्विद्रधीन्जयेत् ॥ ६३ ॥
तथाशिग्रुभवक्वाथोहिंगुकल्केनसंयुतः ॥

पुनर्नवा १ वायवर्णा २ या दोन औषधांचा काढा प्याला असतां व शेवग्याचे सालीचा काढा करून त्यांत हिंगाचा कल्क घालून प्यालें असतां अंतर्विद्रधिरोग दूर होतो.

## वरुणादिकाढा मध्यविद्रधीवर.

वरुणादिगणक्वाथमपक्वेमध्यविद्रधौ ॥ ६४ ॥
ऊषकादिरसोयुक्तंपिबेच्छमनेहतत्र ॥

वरुणादिक औषधाचा गण पुढें सांगावयाचा आहे त्याचा काढा करून व ऊ. ि. औषधानें चूर्ण पुढें सांगावयाचें आहे, त्यानें चूर्ण करून त्या काढ्यांत घालून प्यालें असतां पक्व जाहला नाहीं जो विद्रधिरोग तो दूर होतो.

## वायवर्णादिकाढा कफमेदादिकांवर.

वरुणाबकपुष्पश्चाबिल्वापमार्गाचित्रकाः ॥ ६५ ॥ अग्निमंथद्वयंशि
ग्रुद्वयंचबृहतीद्वयम् ॥ सैरेयकत्रयंमूर्वामेषशृंगीकिरातकः ॥ ६६ ॥
अजशृंगनिार्धिकाचिरबिल्वजशगनावरी ॥ वरुणादिगणक्वाथःकफमेदोहरः
[illegible] ७ ॥ हंतिगुल्मंशिरःशूलंतथाभ्यंतरविद्रधीन् ॥

## ऊषकादिगण.

ऊषकस्तुत्थकांहिंगूकाशीसद्वयसैंधवम् ॥ ६८ ॥
सशिलाजतुकृच्छ्राश्मगुल्ममेदःकफापहम् ॥

खारीमाती १ मोरचूत शुद्ध करून २ व भाजला हिंग ३ पांढरा हिराकशी ४ पिंवळा हिराकशी ५ ते शुद्ध करून घ्यावे व सैंधव ६ शिलाजीत ७ या सात औषधांचें चूर्ण घेतलें असतां मूत्रकृच्छ्र व मूतखडा व गुल्म व मेदोरोग हे दूर होतात. हें ऊषकादि चूर्ण होय

## खदिरादिकाढा भगंदररोगावर.

खदिरत्रिफलाक्वाथोमहिषीघृतसंयुतः ॥ ६९ ॥
विडंगचूर्णयुक्तश्चभगंदरविनाशनः ॥

खैरसाल १ हिरडा २ बेहडा ३ आंवळकाठी ४ या चयार औषधाचा काढा करून त्यात म्हशीचें तूप व वावडिंगांचें चूर्ण मेळवून प्यालें असता भगंदर रोग दूर होतो.

## पटोलादिकाढा उपदंशावर.

पटोलत्रिफलानिंबकिरातखदिरासनैः ॥ १७० ॥
क्वाथःपीतोजयेत्सर्वानुपदंशान्सगुग्गुलुः ॥

पटोल १ हिरडा २ बेहडा ३ आवळकाठी ४ कडूनिंब ५ किराईत ६ खैरसाल ७ बिबळा ८ या आठ औषधांचा काढा करून त्यात गुग्गुळ मेळवून प्यालें असतां सारे गरमीचे रोग नाश पावतात. गरमीला उपदंश असें ह्मणतात.

## अमृतादिकाढा वातरक्तावर.

अमृतैरंडवासानक्वाथएरंडतैलयुक् ॥ ७१ ॥
पीतः सर्वांगसंचारिवातरक्तंजयेद्ध्रुवम् ॥

गुळवेल १ एरंडमूळ २ अडूळसा ३ या तीन औषधाचा काढा करुन त्यांत एरंडेल तेल मेळवून प्यालें असता साऱ्या अंगात संचार करणारें असें जें वातरक्त तें दूर होतें.

## दुसरा पटोलादिकाढा.

पटोलंत्रिफलातिक्तागुडूचीचशतावरी ॥ ७२ ॥
एतत्क्वाथोजयेत्पीतोवातास्रंदाहसंयुतम् ॥

पटोल १ हिरडा २ बेहडा ३ आवळकाठी ४ कटुकी ५ गुळवेल ६ शतावरी ७ या सात औषधांचा काढा करून प्यालें असता दाहयुक्त असें जें वातरक्त तें दूर होतें.

## अवल्गुजादिकाढा श्वेतकुष्ठावर.

**क्काथोवल्गुजचूर्णाढ्योधात्रीखदिरसारयोः ॥ ७३ ॥**
**जयेत्सुशीलितोनित्यंश्वित्रंपथ्याशिनांनृणाम् ॥**

आंवळकाठी १ खेराचे आंतला नार २ या दोन औषधांचा काढा करून त्यांत बांवचांचें चूर्ण मेळवून प्यालें असतां पथ्य करणाऱ्या मनुष्याचें पांढरें कोड दूर होतें.

## लघुमंजिष्ठादिकाढा वातरक्तकुष्ठादिकांवर.

**मंजिष्ठात्रिफलातिक्तावचादारुनिशामृता ॥ ७४ ॥ निंबश्चैषांकृतः क्काथोवातरक्तविनाशनः ॥ पामाकपालिकाकुष्ठरक्तमंडलजिन्मतः ॥ ७५ ॥**

मंजिष्ठ १ हिरडा २ बेहडा ३ आवळकाठी ४ कटुकी ५ वेखंड ६ दारुहळद ७ गुळवेल ८ कडूनिंब ९ या नऊ औषधांचा काढा करून प्याला असतां, वातरक्त व खरूज व कपालिकारोग कुष्ठाचा भेद आहे तो व कुष्ठ व रक्तविकार हे दूर होतात.

## बृहन्मंजिष्ठादिकाढा सर्व कुष्ठादिकांवर.

**मंजिष्ठामुस्तकुटजोगुडूचीकुष्ठनागरैः ॥ भार्गीक्षुद्रावचानिंबनिशाद्वय फलत्रिकैः ॥ ७६ ॥ पटोलकटुकीमूर्वाविडंगासनचित्रकैः ॥ शतावरीत्रायमाणाकृष्णेंद्रयववासकैः ॥ ७७ ॥ भृंगराजमहादारुपाठाखदिरचंदनैः ॥ त्रिवृद्वारुणकैरातवाकुचीकृतमालकैः ॥ ७८ ॥ शाखोटकमहानिंबकरंजातिविषाजलैः ॥ इंद्रवारुणिकानंतासारिवापर्पटैः समैः ॥ ७९ ॥ एभिःकृतंपिबेत्क्काथंकणागुग्गुलुसंयुतं ॥ अष्टादशे पुकुष्ठेपुवातरक्तार्दितेतथा ॥ १८० ॥ उपदंशेश्लीपदेचप्रसुप्तौपक्षघातके ॥ मेदोदोपेनेत्ररोगेमंजिष्ठादिःप्रशस्यते ॥ ८१ ॥**

मंजिष्ठ १ नागरमोथे २ कुड्याचें मूळ ३ गुळवेल ४ कोष्ठ ५ सुंठ ६ भारंगमूळ ७ रिंगणी ८ वेखंड ९ कडूनिंब १० हळद ११ दारुहळद १२ हिरडा १३ बेहडा १४ आंवळकाठी १५ पटोल १६ कुटकी १७ मोरवेल १८ वावडिंग १९ निवळा अथवा असाणा २० चित्रक २१ शतावरी २२ त्रायमाण २३ पिंपळी २४ इंद्रजव २५ अडूळसा २६ माका २७ देवदार २८ पहाडमूळ २९ खेरसाल ३० रक्तचंदन ३१ निशोत्तर ३२ वायवर्णा ३३ किराईत ३४ बांवच्या ३५ बाहव्याचे शेंगतला मगज ३६ सागाची साल ३७ बकाणनिंब ३८ करंज ३९ अतिविष ४० वाळा ४१ कंवटळमूळ ४२ धमासा ४३ उपलसरी ४४ पित्तपापडा ४५ या पंचेचाळीस औषधांचा काढा करून

त्यांत पिंपळीचें चूर्ण व गुग्गुळ मेळवून प्यालें असतां अठरा प्रकारचे कुष्ठ, वातरक्त व उपदंश ह्मणजे गर्मीचा रोग, श्लीपद्रोग, अंग शून्य होते तो रोग, पक्षघात वायु, मेदोरोग व नेत्ररोग हे दूर होतात.

## पथ्यादिकाढा नेत्ररोगावर.

पथ्याक्षधात्रीभूनिंबनिशानिंबामृतायुतैः ॥ कृतःक्वाथःषडंगोयंसगुडः शीर्षशूलहा ॥ ८२ ॥ भ्रूशंखकर्णशूलानितथार्धशिरसोरुजम् ॥ सूर्यावर्तंशंखकंचदंतपातंचतद्रुजम् ॥ ८३ ॥ नक्तांध्यंपटलंशुक्रंचक्षुःपीडांव्यपोहति ॥

हिरडा १ बेहडा २ आंवळकाठी ३ किराईत ४ हळद ५ कडूनिंब ६ गुळवेल ७ या सात औषधांचा काढा करून त्यांत गुळ मेळवून प्यावा; तेणें करून मस्तकशूळ व भिवया व शंखकर्ण याचे ठायीं शूळ, अर्धशिशी व सूर्यावर्त ह्मणजे सूर्योदयापासून दोन प्रहर पर्यंत जो शूळ मस्तकाचे ठायीं चढत जातो व शंखकशूळ व दांत हालत असतां जो शूळ होते तो व साधारण दंतशूळ व रातांधळें व डोळ्यांचे पटलगत रोग होतात ते व डोळ्यांत फूल पडतें तें व डोळे दुखतात ते इतके उपद्रव दूर होतात.

## वासादिकाढा नेत्ररोगावर.

वासाविश्वामृतादार्वीरक्तचंदनचित्रकैः ॥ ८४ ॥ भूनिंबनिंबकटुकीपटोलत्रिफलांबुदैः ॥ यवकालिंगकुटजैःक्वाथःसर्वाक्षिरोगहा ॥ ८५ ॥ वैस्वर्यपीनसंश्वासंनाशयेदुरसःक्षतम् ॥

अडूळसा १ सुंठ २ गुळवेल ३ दारुहळद ४ रक्तचंदन ५ चित्रक ६ किराईत ७ कडुनिंब ८ कुटकी ९ पटोळ १० हिरडा ११ बेहडा १२ आंवळकाठी १३ नागरमोथे १४ जव १५ इंद्रजव १६ कुडेसाल १७ या सत्रा औषधांचा काढा करून प्यालें असतां सारे नेत्ररोग, व स्वरभंग, पीनसरोग, श्वास व उरःक्षत रोग हे नाश पावतात.

## दुसरा अमृतादिकाढा.

अमृतात्रिफलाक्वाथः पिप्पलीचूर्णसंयुतः ॥ ८६ ॥
सक्षौद्रःशीलितोनित्यंसर्वनेत्ररुजापहः ॥

गुळवेल १ हिरडा २ बेहडा ३ आंवळकाठी ४ या च्यार औषधांचा काढा करून त्यांत पिंपळीचें चूर्ण व मध मेळवून प्यावा; तेणेंकरून सारे नेत्ररोग दूर होतात.

## व्रणादिप्रक्षालन करण्याचा काढा.

अश्वत्थोदुंबरप्लक्षवटवेतसजःशृतः ॥ ८७ ॥
व्रणशोथोपदंशानांनाशनःक्षालनात्स्मृतः ॥

पिंपळ १ उंबर २ पायरी ३ वड ४ वेतस ५ या पाच औषधांचे सालींचा करून मग व्रण व सूज व गर्मीचा रोग शिश्नास होतो तो हे तीन रोग त्या काढ्यानें धुतले असतां दूर होतात; या प्रकारें करून काढ्याचें प्रकरण सांगितलें आहे. या नंतर प्रमथ्या व यवागू इत्यादिक सांगतों.

## प्रमथ्याचें विधान.

प्रमथ्याप्रोच्यतेद्रव्यपलात्कल्कीकृताच्छृतात् ॥ ८८ ॥
तोयेऽष्टगुणितेतस्याःपानमाहुःपलद्वयम् ॥

एक पळप्रमाण औषध आणून वाटून कल्क करावा, सुकें औषध असल्यास पाण्यांत वाटून कल्क करावा; त्यांत आठपट पाणी घालून दोन पळ प्रमाण पाणी राही तों पर्यंत कढवावें; याला प्रमथ्या ह्मणतात; हिचें प्यावयाचें प्रमाण दोनपळ जाणावें.

## मुस्तादि प्रमथ्यारक्तातिसारावर.

मुस्तकेंद्रयवैःसिद्धा प्रमथ्याद्विपलोन्मिता ॥ ८९ ॥
सुशीतामधुसंयुक्तारक्तातीसारनाशिनी ॥

नागरमोथे १ इंद्रजव २ हीं दोन औषधें पळप्रमाण आणून वाटून कल्क करून त्यांत अठपट पाणी घालून दोनपळ पाणी राही तों पर्यंत कढवून थंड करून त्यांत मध मेळवून प्यावा; तेणें करून रक्तातीसार दूर होतो.

## यवागूचें विधान.

साध्यंचतुःपलंद्रव्यंचतुःषष्टिपलेजले ॥ १९० ॥
तत्काथेनार्धशिष्टेनयवागूंसाधयेत्घनाम् ॥

च्यारपळ प्रमाण औषध घेऊन थोडें कुटून त्यांत ६४ पळें पाणी घालून अर्धे पाणी राही तों पर्यंत कढवून गाळून त्यांत दुसरें द्रव्य तंदुलादिक जे सांगेल ते मेळवून फिरून कढवून घणसर करावें याला यवागू ह्मणतात.

## आम्रादियवागू संग्रहणीवर.

आम्राम्रातकजंबूत्वक्कषायेविपचेद्बुधः ॥ ९१ ॥
यवागूंशालिभिर्युक्तांतांभुक्त्वाग्रहणींजयेत् ॥

आंबा १ आम्राडा २ जांबूळ ३ या तिहींची साल च्यारपळ प्रमाण घेऊन त्यात ६४ पळें पाणी घालून अर्वे पाणी राही तो पर्यंत काढा करून गाळून त्यात च्यार पळ प्रमाण तांदूळ घालून फिरून कढवून घणसर करावें, त्याला आम्रादि यवागू ह्मणतात, ती यवागू भक्षण केली असता संग्रहणी रोग दूर होतो.

## यूषाचें विधान.

कल्कद्रव्यपलंशुंठीपिप्पलीचार्धकार्पिकी ॥ ९२ ॥
वारिप्रस्थेनविपचेत्सद्रवोयूषउच्यते ॥

कल्काचें औषध सामान्य एक पल प्रमाण घ्यावें व ज्या प्रयोगीं सुंठ व पिंपळी आहेत त्या प्रयोगीं तीं तिखट आहेत ह्मणोन अर्धा अर्धा कर्ष प्रमाण घ्यावीं, अथवा दोन्ही मिळोन अर्धा कर्ष घ्यावीं, नंतर त्यात पाणी एक प्रस्थ घालून कढवून किंचित् घणसर पेजे सारखें करावें त्याला यूप असें म्हणतात.

## सप्तमुष्टिकयूष सन्निपातादिकांवर.

कुलित्थयवकोलैश्चमुद्गैर्मूलकग्रंथिकैः ॥ ९३ ॥ शुंठीधान्यकयुक्तैश्चयू
पःश्लेष्मानिलापहः ॥ सप्तमुष्टिकइत्येपःसन्निपातज्वरंजयेत् ॥ ९४ ॥
आमवातहरःकंठहृद्रक्त्राणांविशोधनः ॥

कुळीथ १ जव २ बोरींचें फळ ३ मूग ४ ल्हान मुळ्याचे देंठाच्या गाठी ५ सुंठ ६ धणे ७ हीं सात औषधें एकेक पळ घेऊन, त्यात सोळा गुण पाणी घालून घणसर पेजे सारिखें होई तों पर्यंत कढवावें, याला सप्तमुष्टिकयूष ह्मणतात. हा यूप प्याले असता, कफवायु, सन्निपातज्वर व आमवायु हे दूर होतात. व कंठ हृदय व मुख, याचें शोधन होतें.

## पानादिकल्पना.

क्षुण्णद्रव्यपलंसाध्यंचतुःषष्टिपलैर्जले ॥ ९५ ॥
अर्धशिष्टंचतद्देयंपानेभक्तादिसंविधौ ॥

एक पळ प्रमाण औषध आणून थोडें कुटून त्यात ६४ पळें पाणी घालून अर्धे पाणी राही तों पर्यंत कढवून, नंतर गाळून ल्हान लागली असता थोडें थोडें द्यावें व भोजन समयीं द्यावें तो प्रकार रहांरी सांगतात.

## उशीरादिपानक पिपासाज्वरावर.

उशीरपर्पटोदीच्यमुस्तनागरचंदनैः ॥ ९६ ॥
जलंशृतंहिमंपेयंपिपासाज्वरनाशनम् ॥

वाळा १ पित्तपापडा २ नेत्रवाळा ३ नागरमोथे ४ सुंठ ५ रक्तचंदन ६ हीं सहा औषधें मिळून एक पळ प्रमाण वजन घेऊन, थोडीं कुटून त्यांत पाणी ६४ पळें घालून अर्धे पाणी राही तों पर्यंत कढवून नंतर गाळून थंड करून ज्या ज्वरामध्यें तहान फार, असते, त्या ज्वरास थोडें थोडें द्यावें तेणेंकरून तहान व ज्वर हे दूर होतात.

## उष्णपाण्याचें विधान ज्वरादिकांवर.

अष्टमेनांशशेषेणचतुर्थेनार्धकेनवा ॥ ९७ ॥
अथवाक्वथनेनैवसिद्धमुष्णोदकंवदेत् ॥

पाणी कढवून आठवा हिस्सा, अथवा चवथा हिस्सा, किंवा अर्धा हिस्सा शेष राखावें अथवा चांगलें कढवावें; त्याला उष्णोदक असें ह्मणतात.

## उष्णोदकपानविधि कासादिकांवर.

श्लेष्मामवातमेदोघ्नंबस्तिशोधनदीपनम् ॥ ९८ ॥
कासश्वासज्वरहरंपीतमुष्णोदकांनिशि ॥

रात्रीस ऊन पाणी प्यालें असता कफवायु व मेदोरोग हे दूर होतात व बस्तीचें शोधन व अग्नीचें दीपन होतें व कास, श्वास व ज्वर हे दूर होतात व ग्रंथांतरीं असें आहे की, ( कफवातज्वरेदेयंजलमुष्णंपिपासवे, पित्तमद्यविशेषोत्थेषडंगैःशृतशीतलं ) या श्लोकावरून सहा पदार्थांचीं अंगें पाण्यांत घालून कढवून तें पाणी पित्त आणि मद्य यां पासून उत्पन्न जाहला जो ज्वर, त्याजवर द्यावें, ह्मणजे तहान दूर होते व कफज्वरावर व वातज्वरावर व कफवातज्वरावर, किंवा वातकफज्वरावरही षडंगशृत पाणी द्यावें. नागरमोथे १ पित्तपापडा २ वाळा ३ चंदन ४ कृष्णवाळा ५ सुंठ ६ हीं षडंगें जाणावीं.

## दुधाचे पाकाचा विधि आमशूलावर.

क्षीरमष्टगुणंद्रव्यात्क्षीरान्नीरंचतुर्गुणम् ॥ ९९ ॥
क्षीरावशेषंतत्पीतंशूलमामोद्भवंजयेत् ॥

औषधाचे आठगुण गाईचें दूध व दुधाचे चौपट पाणी घेऊन सारीं एका जागीं करून, दूध राही तों पर्यंत कढवून, नंतर तें दूध प्यावें; तेणेंकरून आमशूल दूर होतें.

## पंचमूलक्षीरपाक सर्व जीर्णज्वरांवर.

सर्वज्वराणांजीर्णानांक्षीरंभैषज्यमुत्तमम् ॥ २०० ॥ श्वासात्कासा-
च्छिरःशूलात्पार्श्वशूलात्सपीनसात् ॥ मुच्यतेज्वरितःपीत्वापंचमूलीशृतंपयः ॥ १ ॥

ानगाजा १ रानमाल २ रिंगणी ३ मोतारिंगणी ४ गोखरू ५ या पाच औषधांच्या । आणून थोड्या कुटून, त्यात त्या मुळ्याचे आठपट दूध व दुधाचे चारपट पाणी घेऊन एका जागीं करून दूध राही तोंपर्यंत कढवून तें दूध प्यावें, तेणेंकरून श्वास, कास, मस्तकशूळ, पाठीचा शूळ, पडसें, जीर्णज्वर हे दूर होतात व संपूर्ण जीर्णज्वरास दुधाचें औषध उत्तम आहे असें जाणावें.

## त्रिकंटकादि क्षीरपाक कफज्वरावर.

त्रिकंटकबलाव्याघ्रीगुडनागरसाधितम् ॥
वर्चोमूत्रविबंधघ्नंकफज्वरहरंपयः ॥ २ ॥

गोखरू १ चिकणामूळ २ रिंगणीमूळ ३ गूळ ४ सुठ ५ या पाच औषधाचे आठपट दूध व दुधाचे चौपट पाणी घेऊन, सारीं एके जागीं करून दूध राही तोंपर्यंत कढवून तें दूध प्यावें, तेणेंकरून मळ व मूत्र हे साफ होतात व कफज्वर दूर होतो।

## अन्नस्वरूप यवागू

अथान्नप्रक्रियानैवप्रोच्यतेनातिविस्तरा ॥ यवागूःषड्गुणजलेसिद्धास्यात् कृसराघना ॥ ३ ॥ तंडुलैर्मुद्गमुद्गैश्चतिलैर्वासाधिताहिता ॥ यवागूर्ब्रंहणीबल्यातर्पणीवातनाशिनी ॥ ४ ॥

अन्नप्रक्रिया ह्मणजे अन्नस्वरूप यवागू व विलेपी आणि पेया याची क्रिया संक्षेपें करून सागतों. तांदूळ अथवा मूग किंवा उडीद नाहींतर तीळ यातून ज्या द्रव्याची यवागू करावयाची तें द्रव्य घेऊन त्यात सहा गुण पाणी घालून घण होई तों पर्यंत कढवावें, त्याला अन्नयवागू असें ह्मणतात त्या यवागूचीं नामें दोन,—कृसरा व घना जाणावीं व ती यवागू मलादिकांचें स्तंभन करणारी व बल देणारी व शरीरास पुष्ट करणारी व वायूचा नाश करणारी अशी जाणावी

## विलेपीलक्षण.

विलेपीचघनासिक्थासिद्धानीरेचतुर्गुणे ॥
बृंहणीतार्पणीहृद्यामधुरापित्तनाशिनी ॥ ५ ॥

द्रव्याचे चतुर्गुणित पाणी घालून कढवून त्याचा गोळासारखा घण व चिकट असी करावी, तिला विलेपी असें ह्मणतात,—ती विलेपी धातूंची वृद्धि करणारी व शरीर पुष्ट करणारी व यास हितकारक व मधुर होऊन पित्ताचा नाश करणारी अशी जाणावी

## पेयालक्षण.

द्रवाधिकास्वल्पसिक्थाचतुर्दशगुणेजले ॥ सिद्धापेयाबुधैर्ज्ञेयायूषःकिं

चित्घनःस्मृतः ॥ ६ ॥ पेयालघुतराज्ञेयाग्राहिणीधातुपुष्टिदा ॥ यूषो
बल्यस्ततःकंठ्योलघुपाक.कफापहः ॥ ७ ॥

द्रव्याचे चतुर्गुण पाणी घालून पातळ पेजे सारखें व थोडें चिकट होई तों पर्यंत कढवावें, त्याला पेया असें ह्मणतात. पेयेपेक्षां किंचित् जें घण असतें त्याला यूप ह्मणतात व ती पेया बहुत हलकी असून मलादिकांचें स्तंभन करणारी व धातु पुष्ट करणारी अशी जाणावी. व तो यूप बल देणारा, कंठास हितकारक, हलका व कफाला दूर करणारा असा जाणावा.

## भात करावयाचा प्रकार.

जलेचतुर्दशगुणेतंदुलानांचतुःपलम् ॥
विपचेत्स्रावयेन्मंडंसभक्तोमधुरोलघुः ॥ ८ ॥

चार पळ प्रमाण तांदूळ घेऊन त्यांत चवदा गुण पाणी घालून शिजवून पेज काढावी, तो भात मधुर व हलका होतो.

## शुद्धमंड.

नीरेचतुर्दशगुणेसिद्धोमंडस्त्वसिक्थकः ॥
शुंठीसैंधवसंयुक्तः पाचनोदीपनः परः ॥ ९ ॥

तांदुळाचे चवदा गुण पाणी घालून शिजवून शितें न येतां पेज काढावी, त्या पेजेला शुद्धमंड ह्मणतात; त्यांत सुंठ व सैंधव मेळवून प्यालें असतां अन्नाचें पचन व अग्नीचें दीपन होतें.

## अष्टगुणमंड.

धान्यत्रिकट्टसिंधूत्थमुद्गतंडुलयोजित.॥भृष्टश्चहिंगुतैलाभ्यांसमंडोऽष्टगुणः
स्मृतः ॥ २१० ॥ दीपनःप्राणदोवस्तिशोधनोरक्तवर्धनः ॥ ज्वरजि
त्सर्वदोपघ्नोमंडोऽष्टगुणउच्यते ॥ ११ ॥

धणे १ सुंठ २ मिर्‍यें ३ पिंपळी ४ सैंधव ५ मूग ६ तांदूळ ७ हिंग ८ तेल ९ या नऊ औषधामध्यें प्रथम तेलांत हिंग मेळवून त्यान मूग एक पळ व तांदूळ दोन पळें घेऊन दोन्हीं भाजावे. मग दुसरी औषधें राहिलीं तीं थोडीं थोडीं खारट व तिखट न होतां त्या मुगांतांदुळांत मेळवून त्यांत चवदा गुण पाणी घालून शिजवून नंतर तें पाणी गाळून प्यावें तेणेंकरून अग्नि प्रदीप्त होऊन प्राणास तेज येतें बस्तीचें शोधन होऊन रक्ताची वृद्धि होते व ज्वर व वातादिक तीन दोष हे दूर होतात. या प्रकारें हा मंड अष्टगुणें करून युक्त आहे म्हणोन याला अष्टगुणमंड असें ह्मणतात.

### यवमंड कफपित्तावर.

सुकंडितैस्तथाभृष्टैर्यवमंडोयवैर्भवेत ॥
कफपित्तहरःकंठ्योरक्तपित्तप्रसादनः ॥ १२ ॥

जव चागले कुटून कोंडा काढून त्यात चवदागुण पाणी घालून शिजवून नंतर तें पाणी गाळून घ्यावें; याला यवमंड ह्मणतात. हा मंड प्यालें असतां कफपित्ताचा प्रकोप दूर होऊन कंठास हितकारक होतो, व रक्तपित्ताचा प्रकोप दूर होतो.

### लाजामंड कफपित्तज्वरादिकांवर.

लाजैर्वातंडुलैर्भृष्टैर्लाजमंडःप्रकीर्तितः ॥
श्लेष्मपित्तहरोग्राहीपिपासाज्वरजिन्मतः ॥ १३ ॥

साळीच्या लाह्या अथवा तांदूळ भाजून त्याच्या लाह्या घेऊन त्यात चवदा गुण पाणी घालून कढवून मग गाळून घ्यावें, याला लाजमंड ह्मणतात. हा लाजमंड प्यालें असता कफपित्ताचा प्रकोप दूर होऊन संग्रहणी व अतिसार यांचें स्तंभन होतें, व ज्या ज्वरामध्यें ताहान आहे तो ज्वर दूर होतो. इति श्रीदामोदर सूनु शार्ङ्गधरेण विरचितायां चिकित्सास्थाने क्वाथादि कल्पना द्वितीयोऽध्यायः २

---

## तृतीयोध्यायः ।

### फांटकल्पना.

क्षुण्णेद्रव्यपलेसम्यक्जलमुष्णंविनिक्षिपेत् ॥ मृत्पात्रेकुडवोन्मानंततस्तु स्रावयेत्पटात् ॥ १४ ॥ सस्याच्चूर्णद्रवःफांटस्तन्मानंद्विपलोन्मितम् ॥ मधुश्वेतागुडादींश्चक्वाथवत्तत्रनिक्षिपेत् ॥ १५ ॥

एक पळ प्रमाण औषध आणून चागलें कुटून एक कुडवप्रमाण पाणी मडक्यात घालून चागलें उष्ण झाल्यावर त्यात तें औषध टाकून चागले ढवळून नंतर तें पाणी वस्त्रानें गाळून प्यावें याला फांट व चूर्णद्रव असें ह्मणतात. त्या फांटाचें प्यावयाचें मान दोन पळ प्रमाण जाणावें व त्या फांटात मध व साखर व गूळ आदिकरून आणखी पदार्थ घालवयाचे असता ज्या प्रमाणें काढ्यांत घालावयास सांगितले आहेत त्या मानानें घालावे.

### मधुकादिफांट वातपित्तज्वरावर.

मधुपुष्पंमधूकंचचंदनंसपरूषकं ॥ मृणालंकमलंद्राक्षंगंभारींनागकेश

चित्त्वनःस्मृतः ॥ ६ ॥ पेयालघुतराज्ञेयाग्राहिणीधातुपुष्टिदा ॥ यूषो
बल्यस्ततःकंठ्योलघुपाकः कफापहः ॥ ७ ॥

द्रव्याचे चतुर्गुण पाणी घालून पातळ पेजे सारखें व थोडें चिकट होई तों पर्यंत कढवावें, त्याला पेया असें ह्मणतात. पेयेपेक्षा किंचित् जें घण असतें त्याला यूष ह्मणतात व ती पेया बहुत हलकी असून मलादिकांचें स्तंभन करणारी व धातु पुष्ट करणारी अशी जाणावी व तो यूष बल देणारा, कंठास हितकारक, हलका व कफाला दूर करणारा असा जाणावा.

## भात करावयाचा प्रकार.

जलेचतुर्दशगुणेतंदुलानांचतुःपलम् ॥
विपचेत्स्रावयेन्मंडंसभक्तोमधुरोलघुः ॥ ८ ॥

चार पळ प्रमाण तांदूळ घेऊन त्यांत चवदा गुण पाणी घालून शिजवून पेज काढावी, तो भात मधुर व हलका होतो.

## शुद्धमंड.

नीरेचतुर्दशगुणेसिद्धोमंडस्त्वसिक्थकः ॥
शुंठीसैंधवसंयुक्तः पाचनोदीपनः परः ॥ ९ ॥

तांदुळाचे चवदा गुण पाणी घालून शिजवून शितें न येता पेज काढावी, त्या पेजेला शुद्धमंड ह्मणतात, त्यात सुंठ व सैंधव मेळवून प्यालें असता अन्नाचें पचन व अग्नीचें दीपन होतें

## अष्टगुणमंड

धान्यनिंबद्रुसिंधूत्थमुद्गतंडुलयोजित ॥भृष्टहिंगुतेलाभ्यांसमंडोऽष्टगुणः
स्मृतः ॥ २१० ॥ दीपनःप्राणदोबस्तिशोधनोरक्तवर्धनः ॥ ज्वरजि
त्सर्वदोषघ्नोमंडोऽष्टगुणउच्यते ॥ ११ ॥

धणे १ सुंठ २ मिऱ्यें ३ पिंपळी ४ सैंधव ५ मूग ६ तांदूळ ७ हिंग ८ तेल ९ या नऊ औषधामध्यें प्रथम तेलात हिंग मेळवून त्यात मूग एक पळ व तांदूळ दोन पळें घेऊन दोन्हीं भाजावे. मग दुसरी औषधें रात्रिंची तीं थोडीं थोडीं खारट व तिखट न होता त्या मुगातांदुळात मेळवून त्यात चवदा गुण पाणी घालून शिजवून नंतर तें पाणी गाळून प्यावें तेणेंकरून अग्नि प्रदीप्त होऊन प्राणास तेज येतें बस्तीचें शोधन होऊन रक्ताची वृद्धि होते व ज्वर व वातादिक तीन दोष हे दूर होतात. या प्रकारें हा मंड अष्टगुणें करून युक्त आहे ह्मणोन याला अष्टगुणमंड असें ह्मणतात.

### वायमंड कफपित्तावर.

सुकंडितैस्तथाभृष्टैर्वायमंडोयवैर्भवेत ॥
कफपित्तहरःकंठयोरक्तपित्तप्रसादनः ॥ १२ ॥

जव चांगले कुटून कोंडा काढून त्यांत चवदागुण पाणी घालून शिजवून नंतर तें पाणी गाळून घ्यावें; याला वायमंड ह्मणतात. हा मंड प्यालें असतां कफपित्ताचा प्रकोप दूर होऊन कंठास हितकारक होतो; व रक्तपित्ताचा प्रकोप दूर होतो.

### लाजामंड कफपित्तज्वरादिकांवर.

लाजैर्वातंडुलैर्भृष्टैर्लाजमंडःप्रकीर्तितः ॥
श्लेष्मपित्तहरोग्राहीपिपासाज्वरजिन्मतः ॥ १३ ॥

साळीच्या लाह्या अथवा तांदूळ भाजून त्यांच्या लाह्या घेऊन त्यांत चवदा गुण पाणी घालून कढवून मग गाळून घ्यावें; याला लाजमंड ह्मणतात. हा लाजमंड प्यालें असतां कफपित्ताचा प्रकोप दूर होऊन संग्रहणी व अतिसार यांचें स्तंभन होतें, व ज्या ज्वरामध्यें ताहान आहे तो ज्वर दूर होतो. इति श्रीदामोदर सूनु शार्ङ्गधरेण विरचितायां चिकित्सास्थाने काथादि कल्पना द्वितीयोध्यायः २

---

## तृतीयोऽध्यायः ।

### फांटकल्पना.

क्षुण्णेद्रव्यपलेसम्यक्जलमुष्णंविनिक्षिपेत् ॥ मृत्पात्रेकुडवोन्मानंततस्तु स्त्रावयेत्पटात् ॥ १४ ॥ सस्याच्चूर्णद्रवःफांटस्तन्मानंद्विपलोन्मितम् ॥
मधुश्वेतागुडादींश्चक्काथवत्तत्रनिक्षिपेत् ॥ १५ ॥

एक पळ प्रमाण औषध आणून चांगलें कुटून एक कुडवप्रमाण पाणी मडक्यांत घालून चांगलें उष्ण झाल्यावर त्यांत तें औषध टाकून चांगलें ढवळून नंतर तें पाणी वस्त्रानें गाळून प्यावें याला फांट व चूर्णद्रव असें ह्मणतात. त्या फांटाचें प्यावयाचें मान दोन पळ प्रमाण जाणावें व त्या फांटांत मध व साखर व गूळ आदिकरून आणखी पदार्थ घालावयाचे असतां ज्या प्रमाणें काढ्यांत घालावयास सांगितले आहेत त्या मानानें घालावे.

### मधुकादिफांट वातपित्तज्वरावर.

मधुपुष्पंमधूकंचचंदनंसपरूषकं ॥ मृणालंकमलंलोध्रंगंभारींनागकेश

रम् ॥१६॥ त्रिफलांसारिवांद्राक्षांलाजान्कोष्णेजलेक्षिपेत् ॥ सिता मधुयुतःपेयःफांटोवाऽसौहिमोथवा ॥ १७ ॥ वातपित्तज्वरंदाहंतृष्णामूर्छारतिभ्रमान् ॥ रक्तपित्तमदंहन्यान्नात्रकार्याविचारणा ॥ १८ ॥

मोहाचीं फुलें १ ज्येष्टमध २ रक्तचंदन ३ फालसा ४ कमळाचा देंठ ५ कमळ ६ लोध ७ शिवण ८ नागकेशर ९ हिरडा १० बेहडा ११ आंवळकाठी १२ उपलसरी १३ द्राक्षें १४ साळीच्या लाह्या १५ ह्या पंधरा औषधाचे एक पळ मान घेऊन चांगलें कुटून चार पळें पाणी मडक्यांत घालून चांगलें उष्ण झाल्यावर त्यांत तीं औषधें टाकून चांगलीं ढवळून. नंतर तें पाणी गाळून घ्यावें; याला मधुकादिफांट असें ह्मणतात. हा फांट साखर व मध मेळवून प्यालें असतां वातपित्तज्वर व दाह, तहान, पदार्थावर प्रीती नसते तो रोग, व भ्रम व रक्तपित्त व मदरोग हे दूर होतात या विषयीं संशय नाहीं. व हीं पंधरा औषधें रात्रीस पाण्यांत भिजत घालून प्रातःकाळीं तें पाणी गाळून घ्यावें; ह्याला हिम असें म्हणतात, तो हिम प्यालें असतां या फांटाचे गुणा प्रमाणें गुण होतात.

## आम्रादिफांट पित्तज्वरादिकांवर.

आम्रजंबूकिसलयैर्वटशृंगप्ररोहकैः ॥ उशीरेणकृतःफांटःसक्षौद्रोज्वरनाशनः ॥ १९ ॥ पिपासाच्छर्यतीसारान्मूर्च्छांजयतिदुस्तराम् ॥

आंबा व जांभूळ यांचीं कोंवळीं पानें व वडाचे कोंवळ्या पानाच्या कळ्या व त्यांच्या कोंवळ्या पारंब्या व वाळा या औषधांचा पूर्वीं प्रमाणें फांट करून प्यालें असतां ज्वर, तहान व ओकारी व अतिसार व दुस्साध्य अशी मूर्छा हीं दूर होतात.

## मधुकादिफांट पित्ततृष्णादिकांवर.

मधुकपुष्पगंभारीचंदनोशीरधान्यकैः ॥ २२० ॥ द्राक्षयाचकृतःफांटः शीतःशर्करयायुतः ॥ तृष्णापित्तहरःप्रोक्तोदाहमूर्च्छाभ्रमापहः ॥ २१ ॥

मोहाचीं फुलें १ शिवण २ रक्तचंदन ३ वाळा ४ धणे ५ द्राक्ष ६ या सहा औषधांचा फांट करून प्यालें असतां तहान, पित्त, दाह, मूर्छा व भ्रम हे दूर होतात या प्रकारें फांट जाणावे.

## मंथ.

मंथोपिफांटभेदःस्यात्तेनतच्चात्रकल्प्यते ॥

मंथ हा फांटाचाच भेद आहे; म्हणून तो येथें सांगतों.

## मंथाचा विधि.

जलेचतुःपलेशीतेक्षुण्णंद्रव्यपलंक्षिपेत् ॥ २२ ॥
मृत्पात्रेमंथयेत्सम्यक्तस्याच्चद्विपलंपिबेत् ॥

एक पळ प्रमाण औषध आणून, चांगलें कुटून मग च्यार पळें थंड पाणी मडक्यात घालून त्यात तें औषध टाकून चांगलें मथन करावें नतर तें पाणी गाळून घ्यावें, त्याला मथ असें ह्मणतात. त्या मथाचें प्यावयाचें मान दोन पळ प्रमाण जाणावें.

## खर्जूरादिमंथ सर्व मद्यविकारांवर.

खर्जूरदाडिमंद्राक्षातिंतिडीकाम्लिकामलैः ॥ २३ ॥
सपरूपैः कृतोमंथःसर्वमद्यविकारनुत् ॥

खजूर १ डाळिंबाचे दाणे २ द्राक्ष ३ कोकमसाल ४ चिंच ५ आवळे ६ फालसा ७ हीं सात औषधें एक पळ प्रमाण आणून चांगलीं कुटून मग चार पळें थंड पाणी मडक्यात घालून त्यात तीं औषधें टाकून चांगलें मथन करून तें पाणी गाळून प्यालें असता सारे मद्यविकार दूर होतात व सुपारीचा मद व कोद्रूधान्याचा मद व आसवाचा मद हेही दूर होतात.

## मसूरादिमंथ ओकारीवर.

क्षौद्रयुक्तामसूराणांसक्तवोदाडिमांभसा ॥ २२४ ॥
मथितावारयंत्याशुछर्दिंदोषत्रयोद्भवाम् ॥

मसुरा भाजून पीठ करून मग पिकल्या डाळिंबाचे दाण्याचें पाणी करून त्यात तें पीठ कालवून प्यालें असता वातपित्त कफा पासून उत्पन्न जाहली जी ओकारी ती दूर होते.

## यवांचा मंथ तृष्णादिकांवर.

प्लावितैःशीतनीरेणसघृतैर्यवसक्तुभिः ॥ २५ ॥
नातिसांद्रद्रवैर्मंथस्तृष्णादाहास्रपित्तहा॥

जव भाजून पीठ करून थंड पाण्यात न्हुन पातळ न होता व धाण न होता तें पीठ कालवून त्यात तूप मेळवून प्यालें असता तहान दाह व रक्तपित्तविकार हे दूर होतात.

इति श्री दामोदर सुनु शार्ङ्गधरेण विरचितायां संहितायां चिकित्सास्थाने
फांटादिकल्पनाध्यायस्तृतीय ॥ ३ ॥

---

# चतुर्थोध्यायः ।

## हिमकल्पना.

क्षुण्णंद्रव्यपलंसम्यक्षड्भिर्नीरपलैःश्रुतं ॥ २६ ॥ निशोषितंहिमःस स्यात्तथाशीतकषायकः ॥ तन्मानंफांटवज्ज्ञेयंसर्वत्रैषविनिश्चयः ॥ २७ ॥

एक पळ प्रमाण औषध आणून चागलें कुटून मग सहा पळें पाणी मडक्यात घालून त्यात तें औषध मेळवून, रात्रीस भिजत ठेवून, प्रात काळीं तें पाणी गाळून घ्यावें, त्याला हिम व शीतकाढा असें ह्मणतात, त्याचे प्यावयाचें मान फाटा सारिखें दोन पळ प्रमाण जाणावें.

## आम्रादिहिम रक्तपित्तावर.

आम्रजंबृश्चककुभंचूर्णीकृत्यजलेक्षिपेत् ॥
हिमंतस्यापिबेत्प्रातःसक्षौद्रंरक्तपित्तजित् ॥ २८ ॥

आंब्याची साल १ जामळीची साल २ अर्जुन वृक्षाची साल ३ या तीन साली एक पळ प्रमाण घेऊन चूर्ण करून मग सहा पळे पाणी मडक्यात घालून त्यात तें चूर्ण टाकून, रात्रीस भिजत घालून प्रात काळीं तें पाणी गाळून त्यात मध मेळवून प्यालें असता रक्तपित्त दूर होतें.

## मरीच्यादिहिम तृष्णादिकांवर.

मरीचंमधुयष्टिंचनाकोडुंबरपल्लवैः ॥
नलोत्पलंहिमस्तज्जस्तृष्णाच्छर्दिनिवारणः ॥ २९ ॥

मिर्यें १ ज्येष्टमध २ काळ्या उंबराचीं पानें ३ निळें कमळ ४ या चार औषधाचें एक पळ मान घेऊन चागलीं कुटून मग सहा पळें पाणी मडक्यात घालून त्यात तीं रात्रीस भिजत घालून प्रात काळीं तें पाणी गाळून प्यालें असता तहान व ओकारी हे रोग दूर होतात.

## नीलोत्पलादिहिम वातपित्तज्वरावर.

नीलोत्पलंचलाद्राक्षामधूकंमधुकंतथा ॥ उशीरंपद्मकंचैवकाश्मरीचपरूपकं ॥ २३० ॥ एतच्छीतकषायश्चवातपित्तज्वरंजयेत् ॥ सप्रलापभ्रमच्छर्दिमोहतृष्णानिवारणः ॥ ३१ ॥

निळें कमळ १ चिकणामूळ २ द्राक्ष ३ मोहा ४ ज्येष्टमध ५ वाळा ६ पद्मकाष्ट ७ शिवण ८ फाल्सा ९ या नऊ औषधाचा पूर्वरीतानें हिम करून प्यालें असता वात पित्तज्वर, बडबड, भ्रम, ओकारी, मूर्छा व तहान हे रोग दूर होतात.

### अमृताहिम जीर्णज्वरावर.

अमृतायाहिमःपेयोजीर्णज्वरहरःस्मृतः ॥

पूर्वी सांगितल्या प्रमाणें गुळवेलीचा हिम करून प्यालें असता जीर्णज्वर दूर होतो.

### वासाहिम रक्तपित्तज्वरावर.

वासायाश्चहिमःकासरक्तपित्तज्वराञ्जयेत् ॥ ३२ ॥

अडुळशाचा हिम करून प्यालें असता कास व रक्तपित्तज्वर हे दूर होतात.

### धान्याकहिम अंतर्दाहावर.

प्रातःसशर्करःपेयोहिमोधान्याकसंभवः ॥
अंतर्दाहंतथातृष्णांजयेत्स्रोतोविशोधनः ॥ ३३ ॥

रात्रीस पाण्यात धणे भिजत घालून प्रातःकाळीं तें पाणी साखर मेळवून प्यालें असता शरीरातला दाह व तहान हीं दूर होतात व मूत्रादि मार्गाचें शोधन होतें.

### धान्यकादिहिम रक्तपित्तादिकांवर.

धान्याकधात्रीवासानांद्राक्षापर्पटयोर्हिमः ॥
रक्तपित्तंज्वरंदाहंतृष्णांशोषंचनाशयेत् ॥ ३४ ॥

धणे १ आवळकाठी २ अडुळसा ३ द्राक्ष ४ पित्तपापडा ५ या पाच औषधाचा हिम करून प्यालें असता रक्तपित्त व ज्वर. दाह, तहान व शोष हे दूर होतात या प्रकारें करून हिमकल्पना जाणावी.

इति श्रीदामोदरसूनुशार्ङ्गधरेणविरचितायाहिमकल्पनाध्यायश्चतुर्थ ॥ ४ ॥

---

## अथ पंचमोध्यायः ।

### कल्काची कल्पना.

द्रव्यमार्द्रंशिलापिष्टंशुष्कंवासजलंभवेत् ॥ प्रक्षेपावापकल्कास्तेतन्मानंकर्षसंमितम् ॥ ३५ ॥ कल्केमधुघृततैलंदेयंद्विगुणमात्रया ॥ सितागुडौ समौदद्यात्द्रवादेयाश्चतुर्गुणाः ॥ ३६ ॥

ओलें औषध आणून चटणी सारिखें बारीक वाटावें व सुकें औषध असल्यास पाणी घालून बारीक वाटावें, त्याला कल्क असें म्हणतात, त्याचें घ्यावयाचें मान कर्ष प्रमाण जाणावें व त्याचीं नामें कोण-प्रक्षेप आणि आवाप अशीं जाणावीं, कल्कात मध व तूप

व तेल हीं घालावयाचीं असतां, कल्काचे दुप्पट घालावीं व साखर आणि गूळ हे पदार्थ घालावयाचे असतां कल्काचे समान घालावे व दूध पाणी आदिकरून पातळ पदार्थ घालावयाचे असतां कल्काचे चतुर्गुणित घालावे.

## वर्धमानपिंपळी पांडुरोगावर.

त्रिवृद्ध्यापंचवृद्ध्यावासप्तवृद्ध्याथवाकणाः ॥ पिबेत्पिष्टादशदिनंता स्तथैवापकर्षयेत् ॥ ३७ ॥ एवंविंशद्दिनैःसिद्धंपिप्पलीवर्धमानकम् ॥ अनेनपांडुवातास्रकासश्वासारुचिज्वराः ॥ ३८ ॥ उदरार्शःक्षयः श्लेष्मवातानश्यंत्युरोग्रहाः ॥

आज तीन, उद्यां सहा, परवां नऊ, अशी तिहींची वृद्धि करून, अथवा पांचाची वृद्धि अथवा सातांची वृद्धि करून, पिंपळ्या बारीक वाटून कल्क करावा; त्यांत कल्काचे चतुर्गुणित दूध, अथवा पाणी घालून दहा दिवस पर्यंत घ्यावा, मग ज्या क्रमानें वाढविल्या त्याच क्रमें करून दहा दिवस पर्यंत उतराव्या, या प्रमाणें वीस दिवस पिंपळ्या घ्याव्या; तेणेंकरून पांडुरोग, वातरक्त, कास, श्वास, अवदर्णें, ज्वर, उदररोग, मूळव्याध, क्षय, कफ, वायु, उरोग्रह हे रोग दूर होतात व या पिंपळीच्या औषधास वर्धमानपिंपळी असें ह्मणतात.

## निंबकल्क व्रणादिकांवर.

लेपान्निंबदलैःकल्कोव्रणशोधनरोपणः ॥ ३९ ॥
भक्षणाच्छर्दिकुष्ठानिपित्तश्लेष्मकृमीञ्जयेत् ॥

कडुनिंबाचीं पानें पाण्यांत वाटून कल्क करून त्या कल्काचा लेप व्रणास व त्यांवर केला असतां, त्या व्रणाचें शोधन होऊन व्रणें भरतात व हा कल्क प्यालें असतां ओकारी व कुष्ठ व पित्तकफ संबंधीं जंत हे दूर होतात.

## महानिंबकल्क गृध्रसीवायूवर.

महानिंबजटाकल्कोगृध्रसीनाशनःस्मृतः ॥ २४० ॥

वकाणा निंबाच्या मुळ्या आणून पाण्यांत वाटून कल्क करून प्यालें असतां गृध्रसीवायु वातरोगामध्यें आहे तो दूर होतो.

## रसोनकल्क वायु व विषमज्वर यांजवर.

शुद्धकल्कोरसोनस्यतिलतैलेनमिश्रितः ॥
वातरोगाञ्जयेन्नित्यंविषमज्वरनाशनः ॥ ४१ ॥

लसुणीचा कल्क करून, त्यात तिळाचें तेल मेळवून घ्यावा, तेणें करून वायूचे रोग विषमज्वर हे दूर होतात.

## दुसरा रसोनल्कक वातरोगावर.

पक्वकंदरसोनस्यगुलिकानिस्तुपीकृता ॥ पाटयित्वाचमध्यस्थंदूरिकुर्यात्तदंकुरम् ॥ ४२ ॥ तदुग्रगंधनाशायरात्रौतक्रेविनिक्षिपेत् ॥ अपनीयचतन्मध्याच्छिलायांपेषयेत्ततः ॥ ४३ ॥ तन्मध्येपंचमांशेनचूर्णमेषांविनिक्षिपेत् ॥ सौवर्चलंयवानीचभर्जितंहिंगुसैंधवम् ॥ ४४ ॥ कटुत्रिकंजीरकंचसमभागानिचूर्णयेत् ॥ एकीकृत्यततःसर्वकल्कंकर्षप्रमाणतः ॥ ४५ ॥ खादेदग्निबलापेक्षीऋतुदोषाद्यपेक्षया ॥ अनुपानंततःकुर्यादेरंडशृतमन्वहम् ॥ ४६ ॥ सर्वांगैकांगजंवातमर्दितंचापतंत्रकम् ॥ अपस्मारमथोन्मादमुरुस्तंभंचगृध्रसीम् ॥ ४७ ॥ उरः पृष्ठकटीपार्श्वकुक्षिपीडांकृमीञ्जयेत् ॥ अजीर्णमातपंरोषमतिनीरंपयोगुडम् ॥ ४८ ॥ रसोनमश्नन्पुरुषस्त्यजेदेतन्निरंतरम्॥मद्यंमांसंतथाम्लंचरसंसेवेतनित्यशः ॥४९॥

चागली पक्की लसूण घेऊन वरचीं सालपटें काढून त्या बियांतील अंकूर काढून मग त्या सुणीचा वास येतो ह्मणोन रात्रीस ताकात भिजत घालून प्रातःकाळीं ती लसूण काढून त्यावर बारीक वाटून कल्क करावा; मग पादेलोण १ अजमोदा २ भाजला हिंग ३ सैंधव ४ सुंठ ५ मिरें ६ पिंपळी ७ जिरें ८ या आठ औषधाचें चूर्ण त्या लसुणीचे कल्काचा पांचवा हिस्सा घेऊन त्या कल्कात मेळवून एकत्र करून मग एरंडाचे मुळ्यांचा काढा करून त्यांत तो कल्क एक कर्ष प्रमाण टाकून घ्यावा; व आपली शक्ति पाहून, ऋतु कोण आहे ! तें पाहून, जसा सोसेल तसा घ्यावा; तेणें करून सर्वांगवायु व एकांगवायु, तोंड वांकडें होतें जेणें करून तो अर्दित वायु, धनुर्वायु, फेंपरें, उन्माद, रोग, मांड्यांचा स्तंभ करितो तो उरुस्तंभवायु, गृध्रसीवायु, ऊर व पाठ व कंबर व कुशी यांचा शूळ व जंतविकार हे दूर होतात. हा कल्क सेवन करणाऱ्यानें अतिभोजन, अतिउन्ह सोसणें, क्रोध, पाणी, दूध व गुळ हीं अतिसेवन करूं नये. आणि मद्य, मांस व आंबट पदार्थ नित्य शक्त्यनुसार सेवन करावे.

## पिप्पल्यादिकल्क ऊरुस्तंभावर.

पिप्पलीपिप्पलीमूलंभल्लातकफलानिच ॥
एतत्कल्कश्चसक्षौद्रऊरुस्तंभनिवारणः ॥ २५० ॥

पिंपळी १ पिंपळमुळ २ विवंगे ३ हीं तीन औषधें पाण्यांत वाटून कल्क करून मध मेळवून प्यालें असता ऊरुस्तंभ वायु दूर होतो.

## विष्णुक्रांताकल्क परिणामशूळावर.

विष्णुक्रांताजटाकल्कः सिताक्षौद्रघृतैर्युतः ॥
परिणामभवंशूलंनाशयेत्सप्तभिर्दिनैः ॥ ५१ ॥

विष्णुकाता प्रसिद्ध आहे तिचे मुळ्यांचा कल्क करून त्यांत साखर, मध व मेळवून प्यालें असता पोटांत सारावेळ शूळ राहतो तो दूर होतो. त्याला परिणाम असें ह्मणतात.

## दुसरा शुंठीकल्क.

शुंठीतिलगुडैःकल्कंदुग्धेनसहयोजयेत् ॥
परिणामभवंशूलमामवातंचनाशयेत् ॥ ५२ ॥

सुंठ १ तिळ २ गुळ ३ या तीन औषधाचा कल्क करून गाईचे दुधांत प्यालें असता परिणामशूळ सारावेळ पोटात होतो तो व आमवायु हे दूर होतात.

## अपामार्गकल्क रक्तार्शावर.

अपामार्गस्यबीजानांकल्कस्तंडुलवारिणा ॥
पीतोरक्तार्शसांनाशंकुरुतेनात्रसंशयः ॥ ५३ ॥

आघाड्याचे बियांचा कल्क करून तांदुळाचे धुणात प्यालें असतां ज्या व्याधीला रक्त पडतें ती मूळव्याध दूर होते.

## बदरीमूलकल्क रक्तमूळव्याधिवर.

बदरीमूलकल्केनतिलकल्कश्चयोजितः ॥
मधुक्षीरयुतःकुर्याद्रक्तातीसारनाशनः ॥ ५५ ॥

ल्हान बोरीच्या मुळ्या व तीळ याचे कल्क वेगळे वेगळे एके ठिकाणीं समभागानें घेऊन त्यात मध मेळवून गाईचें दुधात अथवा शेळीचें दुधात प्यालें असता ज्या पासून रक्त पडतें तो अतिसार दूर होतो.

## लाक्षाकल्क रक्तक्षयावर.

कुष्मांडकरसोपेतांलाक्षांकर्षद्वयंपिबेत् ॥
रक्तक्षयमुरोघातंक्षयरोगंचनाशयेत् ॥ ५५ ॥

बोरीची अथवा पिंपळाची कर्षप्रमाण लाख पाण्यात वाटून कल्काचे चतुर्गुणित

ल्याचे रसांत प्यावी तेणेंकरून रक्तक्षय व जेणेंकरून उरांत दुखतें तो रोग व क्षयरोग हे रोग दूर होतात.

### तंदुलीयकल्क रक्तप्रदरावर.

तंडुलायाजटाकल्कःसक्षौद्रःसरसांजनः ॥
तंडुलोदकसंपीतोरक्तप्रदरनाशनः ॥ ५६ ॥

तांदुळजाच्या मुळ्या वाटून कल्क करून त्यांत मध व रसांजन मेळवून तांदुळाचे धुणात प्यालें असतां स्त्रियांस जी रक्ताची धुपणी लागते ती दूर होते.

### अंकोलकल्क अतिसारावर.

अंकोलमूलकल्कश्चसक्षौद्रस्तंदुलांबुना ॥
अतिसारहरःप्रोक्तस्तथाविषहरःस्मृतः ॥ ५७ ॥

अंकोल वृक्षाच्या मुळ्या वाटून कल्क करून त्यांत मध मेळवून तांदुळांचे धुणात प्यालें असतां अतिसार दूर होतो व बचनागादि विष व सर्पादिकांचीं विषें दूर होतात.

### कर्कोटीकल्क विषावर.

वंध्याकर्कोटिकामूलंपाटलायाजटातथा ॥
घृतेनबिल्वमूलंवाद्विविधंनाशयेद्विषम् ॥ ५८ ॥

वांझ कटोलीचें मूळ १ पाहाडमूळ २ बेलाचेंमूळ ३ या तीनमुळ्यांतून जी मिळेल ती आणून वाटून कल्क करून तुपात घालून प्यावा तेणें करून बचनागादि विष व सर्पादिकांचीं विषें हीं दूर होतात.

### अभयादिकल्क दीपनपाचनावर.

अभयासैंधवकणाशुंठीकल्कस्त्रिदोषहा ॥
पथ्यासैंधवशुंठीभिःकल्कोदीपनपाचनः ॥ ५९ ॥

बाळहीरतकी १ सैंधव २ पिंपळी ३ सुंठ ४ या चार औषधांचें चूर्ण करून पाण्यात घालून कल्क करून प्यावें. तेणें करून वात, पित्त, कफ, याचा प्रकोप दूर होतो तसाच बाळहिरडे १ सैंधव २ सुंठ ३ या तीन औषधांचा कल्क करून प्यालें असतां अन्नाचें पचन होतें व अग्नि प्रदीप्त होतो.

### त्रिवृतादिकल्क जंतावर

त्रिवृत्पलाशबीजानिपारसीययवानिका ॥ कंपिल्लकंविडंगंचगुडश्चसम भागकः ॥ २६० ॥ तक्रेणकल्कमेतेषांपिबेत्कृमिगणापहम् ॥

निसोत्तर १ पळसबीज २ किरमाणीओंवा ३ कापिला ४ वावडिंग ५ या पाच औषधांचें चूर्ण करून त्याचे बराबर गुळ घालून एका जागीं कालवून कल्क करून ताकामध्यें घ्यावा तेणेंकरून जंतविकार दूर होतो. ग्रंथांतरीं असें आहे कीं, किर्माणी ओंवा प्रातःकाळीं शिळ्या पाण्यांत घेतला असतां कृमिरोग दूर होतात.

नवनीतकल्क रक्तार्शावर.

नवनीततिलैःकल्कोजेतारक्तार्शसांस्मृतः ॥ ६१ ॥
नवनीतसितानागकेशरैश्चापितद्विधः ॥

तीळ वाटून लोण्यांत कल्क करून घ्यावा अथवा नागकेशर वाटून लोणी व खडीसाखर यांत कल्क करून ह्मणजे कालवून घ्यावें तेणेंकरून ज्या मूळव्याधीपासून रक्त पडतें ती मूळव्याध दूर होते.

मसूरकल्क संग्रहणीवर.

पीतोमसूरयूषेणकल्कःशुंठीशलाटुजः ॥ ६२ ॥
जयेत्संग्रहणींतद्वत्तक्रेणबृहतीभवः ॥

सुंठ १ व लहान कच्चें बेलफळ २ या औषधांचा कल्क करून मग मसुरांचा यूष पूर्वी सांगितल्याप्रमाणें करून त्यांत कल्क टाकून घ्यावा. याप्रमाणें रिंगणीचे फळांचा कल्क करून मसुराचे यूषांत घ्यावा तेणेंकरून संग्रहणी दूर होते.

इति श्रीदामोदरसूनु शार्ङ्गधरेण विरचितायां संहितायां
चिकित्सास्थाने कल्ककल्पनाध्यायःपंचमः ॥ ५ ॥

---

## षष्ठोऽध्यायः ।

### चूर्णकल्पना.

अत्यंतशुष्कंयद्द्रव्यंसुपिष्टंवस्त्रगालितम् ॥ ६३ ॥ तत्स्याच्चूर्णरजःक्षोद
स्तन्मात्राकर्षसंमिता ॥ चूर्णगुडःसमोदेयःशर्कराद्विगुणाभवेत् ॥६४॥
चूर्णंपुभर्जितंहिंगुदेयंनोत्क्लेदकृद्भवेत् ॥ लिहेच्चूर्णंद्रवैःसर्वैर्घृताद्यैर्द्विगुणो
न्मितैः ॥ ६५ ॥ पिबेच्चतुर्गुणेरेवचूर्णमालोडितंद्रवैः ॥ चूर्णावलेहगु
टिकाकल्कानामनुपानकम् ॥ ६६ ॥ पित्तवातकफातंकेत्रिद्व्येकपलमा
हरेत् ॥ यथातैलंजलेमाशुक्षणेनैवमसर्पति ॥ ६७ ॥ अनुपानबलादंग
तथासर्पतिभेषजम् ॥ द्रवेणयावतासम्यक्चूर्णसर्वप्लुतंभवेत् ॥ ६८ ॥
भावनायाःप्रमाणंतुचूर्णप्रोक्तंभिषग्वरैः ॥ ६९ ॥

चांगलें सुकें औषध आणून कुटून बारीक वस्त्रगाळ करावें. त्याला चूर्ण असें ह्मणतात व त्या चूर्णाचीं नांमें दोन रज व क्षोद हीं जाणावी. त्या चूर्णाचें भक्षणाचें मान कर्षप्रमाण जाणावें. चूर्णामध्यें गुळ घालावयाचा असतां चूर्णाचें समान घालावा, साखर दुप्पट घालावी, हिंग भाजला घालावा, तूप व मध व आणखी चिकण पदार्थ यांमध्यें चूर्ण घ्यावयाचें असतां ते पदार्थ चूर्णाचे दुप्पट घ्यावे व दूध, गोमूत्र, पाणी व आणखी पातळपदार्थ हे चूर्णाचे चतुर्गुणित घेऊन त्यांत चूर्ण टाकून घ्यावें. चूर्ण व अवलेह व गुटिका व कल्क यांचें अनुपान जें सांगेल तें पित्तरोग असतां तीन पळ प्रमाण घ्यावें, वातरोग असतां दोनपळ प्रमाण घ्यावें, व कफरोग असतां एक पळ घ्यावें तेणेंकरून औषध चांगलें पसरतें. याविषयीं दृष्टांत जसा पाण्यांत तेलाचा बिंदु टाकतांच तो पसरतो, तसें औषध अनुपानाचें बळें करून शरीरांत पसरतें असें जाणावें. चूर्णास निंबूचे रसाचें अथवा दुसऱ्या वनस्पतीचे रसाचें पुट द्यावयाचें असतां चूर्ण रसांत बुडे तों पावेतों पुट द्यावें या प्रकारें चूर्णाची कल्पना जाणावी.

## आमलक्यादिचूर्ण सर्वज्वरांवर.

आमलंचित्रकःपथ्यापिप्पलीसैंधवंतथा ॥ २७० ॥ चूर्णितोयंगणोज्ञेयः सर्वज्वरविनाशनः ॥ भेदीरुचिकरःश्लेष्मजेतादीपनपाचनः ॥ ७१ ॥

आंवळकाठी १ चित्रक २ बाळहिरडे ३ पिंपळी ४ सैंधव ५ हीं पांच औषधें सम-समान घेऊन चूर्ण करून घेतलें असतां सारे ज्वर दूर होतात व मलादिकांचा भेद होतो । रुचि येते व कफ दूर होतो व अग्नी प्रदीप्त होतो आणि अन्नाचें पचन होतें.

## पिप्पलीचूर्ण ज्वरावर.

मधुनापिप्पलीचूर्णंलिहेत्कासज्वरापहम्॥
हिक्काश्वासहरंकंठ्यंप्लीहघ्नंबालकोचितम् ॥ ७२ ॥

एक मासा पिंपळीचें चूर्ण करून मधांत चाटावें तेणेंकरून कासज्वर व उचकी व श्वास हे दूर होतात व हें चूर्ण कंठास हितकारक होतें व कवळरोग दूर होतो व बालकांस उपयोगीं पडतें.

## त्रिफलाचूर्ण मेहादिकांवर.

एकाहरीतकीयोज्याद्वौचयोज्यौबिभीतकौ ॥ चत्वार्यामलकान्येवत्रिफलैषाप्रकीर्तिता ॥ ७३ ॥ त्रिफलाशोथमेहघ्नीनाशयेद्विषमज्वरान् ॥ दीपनीश्लेष्मपित्तघ्नीकुष्ठहंत्रीरसायनी ॥ ७४ ॥ सर्पिर्मधुभ्यांसंयुक्तासवैनेत्रामयाञ्जयेत् ॥

हिरडा एक बेहडे दोन आंवळे ४ या तीन औषधांचें चूर्ण करावें याला त्रिफला असें ह्मणतात. ही त्रिफला घेतली असतां परमा, सूज, विषमज्वर, कफ, पित्त व कुष्ट हे दूर होतात व अग्नि प्रदीप्त होतो व ही त्रिफला रसायनी आहे. असें जाणावें व तूप आणि मध हीं एकत्र करून त्यांत त्रिफला मेळवून घेतली असतां सारे नेत्ररोग दूर होतात.

## त्र्यूषणचूर्ण कफादिकांवर.

पिप्पलीमरिचंशुंठीत्रिभिस्त्र्यूषणमुच्यते ॥ ७५ ॥ दीपनंश्लेष्ममेदोघ्नं कुष्टपीनसनाशनम् ॥ जयेदरोचकंसाममेहगुल्मगलामयान ॥ ७६॥

पिंपळी, मिऱ्यें, सुंठ या तीन औषधांस त्र्युषण असें ह्मणतात. यांचें चूर्ण करून घेतलें असतां अग्नि प्रदीप्त होतो व कफ, मेद, कुष्ट, पीनस, अवदर्णे, आंव परमा, गुल्मरोग आणि कंठरोग हे दूर होतात.

## पंचकोलचूर्ण रुच्यादिकांवर.

पिप्पलीचव्यविश्वाव्हपिप्पलीमूलचित्रकैः ॥ पंचकोलमितिख्यातंरुच्यं पाचनदीपनम् ॥ ७७ ॥ आनाहप्लिहगुल्मघ्नंशूलश्लेष्मोदरापहम् ॥

पिंपळी, चवक, सुंठ, पिंपळमूळ आणि चित्रक या पांच औषधास पंचकोल असें ह्मणतात यांचें चूर्ण करून घेतलें असता तोंडास रुचि येते व अग्नि प्रदीप्त होतो, अन्नाचे पाचन होतें, मलबद्ध, फवळ, गुल्म, शूळ, कफोदरादिक हे दूर होतात.

## त्रिगंध व चतुर्जातचूर्ण.

त्रिगंधमेलात्वक्पत्रैश्चतुर्जातंसकेसरैः ॥ ७८ ॥ त्रिगंधंसचतुर्जातंरुक्षोष्णंलघुपित्तकृत् ॥ वर्ण्यंरुचिकरंतीक्ष्णंपित्तश्लेष्मामयाञ्जयेत् ॥ ७९ ॥

विलायची, दालचिनी, तमालपत्र या तीन औषधांस त्रिगंध असें ह्मणतात. त्यांत चवथें नागकेशर मिळविलें असतां त्यालाच चतुर्जात असें ह्मणतात. तें त्रिगंध व चतुर्जात यांचीं चूर्णे वीर्यकरून रुक्ष व उष्ण असून पाककालीं हलकीं, पित्ताला वाढविणारीं कांति करणारीं, रुचि करणारीं आहेत. आणि तीक्ष्ण असून पित्तकफसंबंधी रोग दूर करणारीं आहेत, असें जाणावें.

## कृष्णादिचूर्ण बालकांचे ज्वरातिसारावर.

कृष्णारुणामुस्तकशृंगिकाणांतुल्येनचूर्णेनसमाक्षिकेण ॥ ज्वरातिसारःप्रशमंप्रयातिसश्वासकासैःसवमिःशिशूनाम् ॥ ८० ॥

पिंपळी, अतिविष, नागरमोथे, काकडशिंगी या चार औषधाचें चूर्ण मधांत बालकास द्यावें तेणेंकरून ज्वरातिसार, कास व ओकारी हीं दूर होतात.

## जीवनीयगण व अष्टवर्गगण गर्भाधानादिकांवर.

काकोलीक्षीरकाकोलीजीवकर्षभकौतथा ॥ मेदाचान्यामहामेदाजीवंति मधुकंतथा ॥ ८१ ॥ मुद्गपर्णीमाषपर्णीजीवनीयोगणस्त्वयम् ॥ जीवनी योगणःस्वादुगर्भसंधानकृत्गुरुः ॥ ८२ ॥ स्तन्यकृद्बृंहणोवृष्यःस्निग्धः शीततृपापहः ॥ रक्तपित्तक्षतंशोषंज्वरदाहानिलाञ्जयेत् ॥ ८३ ॥ द्वेमदे द्वेचकाकोल्यौजीवकर्षभकौतथा ॥ ऋद्धिवृद्धिश्चतैःमर्वैरष्टवर्गउदाहृतः ॥ ८४ ॥ अष्टवर्गोबुधैःप्रोक्तोजीवनीयसमोगुणैः ॥

काकोली, क्षीरकाकोली, जीवक, ऋषभक, मेदा, महामेदा, हरणवेल, ज्येष्ठमध, रानमूग, रानउडदी, या दहा औषधांचे समुदायाला जीवनीयगण असें ह्मणतात, मेदा १ महामेदा २ काकोली ३ क्षीरकाकोली ४ जीवक ५ ऋषभक ६ ऋद्धि ७ वृद्धि ८ या आठ औषधांचे समुदायाला अष्टवर्ग ह्मणतात. हीं आठ औषधें जवळपास मिळत नाहींत. कांहीं काश्मीर देशांत कांहीं हिमाद्रिपर्वतावर प्रसिद्ध आहेत याम्लव यांचे अभावीं औषधें सांगतो. मेदा व महामेदा या दोहोंचे अभावीं ज्येष्ठमध घ्यावी व काकोली, क्षीरकाकोली या दोहोंचे अभावीं आसंध घ्यावा. व जीवक, ऋषभक या दोहोंचे अभावीं विदारीकंद घ्यावा आणि ऋद्धि व वृद्धि या दोहोंचे अभावीं वाराहीकंद घ्यावा. यांचे गुण सांगतो. जीवनीयगण मधुर आहे व गर्भाला उत्पन्न करितो. जड आहे, स्तनाचे ठायीं दूध देतो. शरीरास पुष्टि, स्त्रीगमनाविषयीं हर्ष देतो व स्निग्ध, थंड आहे. तहान, रक्तपित्त, क्षत, शोष, ज्वर, दाह. वायु हे यापासून दूर होतात याप्रकारें अष्टवर्गाचे गुण जाणावे.

## लवणपंचकचूर्ण सृष्टविण्मूत्रादिकांवर.

सिंधुसौवर्चलंचैवविडंसामुद्रिकांगडम् ॥ ८५ ॥ एकाद्वित्रिचतुःपंचलवणा निक्रमाद्विदुः ॥ तेषुमुख्यंसैंधवंस्यादनुक्तेतत्प्रयोजयेत् ॥ ८६ ॥ सैंधवा धंरोमकांतज्ञेयंलवणपंचकम् ॥ मधुरंसृष्टविण्मूत्रंस्निग्धंसूक्ष्मंबलापहम् ॥ ८७ ॥ वीर्योष्णंदीपनंतीक्ष्णंकफपित्ताविवर्धनम् ॥

सैंधव, पादेलोण, बिडलोण, समुद्रमीठ, सांवरमीठ, या पांच क्षारास लवण असें ह्मणतात, या पांचांमध्यें सैंधव मुख्य आहे ह्मणून जेथें लवण असें बोलेल तेथें सैंधव घ्यावें, हे लवणपंचक मधुर आहे. यापासून मूत्र व मळ चांगले होतात. हें लवणपंचक स्निग्ध व सूक्ष्म असून बलहीन करितें, ऊष्णवीर्य आहे. ह्मणून अग्नि प्रदीप्त करितें व तीक्ष्ण आहे ह्मणून कफपित्ताला वाढवितें.

## क्षारकथन गुल्मादिकांवर.

स्वर्जिकायावशूकश्च क्षारयुग्ममुदाहृतम् ॥ ८८ ॥ ज्ञेयौवन्हिसमौक्षारौस्व र्जिकायावशूककौ ॥ क्षाराश्चान्येपिगुल्मार्शोग्रहणीरुक्छिदःसराः ॥ ॥ ८९ ॥ पाचनाःकृमिपुंस्त्वघ्नाःशर्कराऽश्मरिनाशनाः ॥

साजीखार, जवखार हे दोनखार अग्निसारखे देदीप्यमान आहेत असें जाणावें व रुई, चिंच, आघाडा, निवडुंग, केळी, शेवगा इत्यादि जे दुसऱ्या औषधांचे क्षार ते गुल्म व मूळव्याध व संग्रहणीरोग हे दूर करितात व सारक असून अग्नि प्रदीप्त करितात. जंतविकार, पुरुषत्व व मूतखडा यांचा नाश करितात.

## सुदर्शनचूर्ण सर्व ज्वरांवर.

त्रिफलारजनीयुग्मंकंटकारीयुगंसटी ॥ २९ ॥ त्रिकटुग्रंथिकंमूर्वा गुडूचीधन्वयासकः ॥ कटुकापर्पटोमस्तंत्रायमाणाचवालकम् ॥ ९१ ॥ निंबःपुष्करमूलंचमधुयष्टीचवत्सकम् ॥ यवानींद्रयवोभार्गीशिग्रुबीजंसुरा ष्ट्रजा ॥ ९२ ॥ वचात्वक्पद्मकोशीरचंदनातीविषाबला ॥ शालिपर्णी पृश्निपर्णीविडंगंतगरंतथा॥९३॥चित्रकोदेवकाष्ठंचचव्यंपत्रंपटोलजम् ॥ जीवकर्षभकौचैवलवंगंवंशलोचना ॥ ९४ ॥ पुंडरीकंचकाकोलीपत्र कंजातिपत्रकम् ॥ तालीसपत्रंचतथासमभागानिचूर्णयेत् ॥ ९५ ॥ सर्व चूर्णस्यचार्धांशंकैरातंप्रक्षिपेत्सुधीः॥एतत्सुदर्शनंनामचूर्णंदोषत्रयापहम् ॥ ९६ ॥ ज्वरांश्चनिखिलान्हन्यात्नात्रकार्याविचारणा ॥ पृथग्द्वंद्वा गंतुजांश्चधातुस्थानविषमज्वरान् ॥ ९७ ॥ सन्निपातोद्भवांश्चापि मानसानपिनाशयेत् ॥ शीतज्वरैकाहिकादीन्मोहंतंद्रांभ्रमंतृषाम् ॥९८॥ श्वासंकासंपांडुतांचहृद्रोगंहंतिकामलाम् ॥ त्रिकपृष्ठकटीजानुपार्श्वशूल निवारणम् ॥ ९९ ॥ शीतांबुनापिबन्धीमान्सर्वज्वरनिवृत्तये ॥ सुदर्श नंयथाचक्रंदानवानांविनाशनम् ॥ ३०० ॥ तद्वज्ज्वराणांसर्वेषामिदं चूर्णंविनाशनम् ॥

हिरडा, बेहडा, आवळकाठी, हळद, दारुहळद. रिंगणी. कचोरा, मोठीरिंगणी, सुंठ, मिर्यें, पिंपळी, पिंपळमूळ, मोरवेल. गुळवेल, धमासा, कुटकी, पित्तपापडा, नागरमोथे, त्रायमाण, नेत्रवाळा, कडुनिंब, पुष्करमूळ, ज्येष्ठमध, कुड्याचें मूळ, अजमोदा. इंद्रजव, [illegible] बीज, सोरटीमाती अथवा तुरटी केळी तुरटी, वेखंड, दालचिनी,

पद्मकाष्ठ, वाळा; पांढराचंदन, अतिविष, चिकणामूळ, रानगांजा, रानभाल, वावडिंग, तगर, चित्रक, देवदार, चवक, पटोलपत्र, जीवक, ऋषभक हे दोन मिळत नाहींत म्हणून यांचे अभावीं विदारीकंद, लवंग, वंशलोचन, पांढरें कमळ, काकोली मिळत नाहीं तिचे अभावीं ज्येष्ठमध, तमालपत्र, जायपत्री, तालीसपत्र हीं बावन्न औषधें समसमान घ्यावीं व सान्या औषधांचे निमे किराईत घेऊन सान्याचें चूर्ण करावें. यास सुदर्शन चूर्ण म्हणतात. हें चूर्ण थंड पाण्यात घ्यावें. येणेंकरून वातापित्त, कफ व सारे पुराणज्वर हे दूर होतात. याविषयीं संशय नाहीं व वातज्वर, पित्तज्वर, कफज्वर, वातापित्तज्वर, वातकफज्वर, पित्तकफज्वर, आगंतुकज्वर, धातुगतज्वर, विषमज्वर, सन्निपातज्वर, मानसज्वर, शीतज्वर, एकाहिकादिकज्वर हे दूर होतात. मोंट् व डोळ्यांवर झांपड पडते ती व भ्रम, तृषा, श्वास, कास, पांडुरोग, हृद्रोग व कावीळ हे दूर होतात. पाठीचा माज व पाठ, कंबर, गुडघे, कुशी यांचा शूळ दूर होतो याविषयीं दृष्टांत जसें, दानवांचा नाश करणारें सुदर्शनचक्र आहे तसा सान्या ज्वरांचा नाश करणारें हें चूर्ण आहे असें जाणावें.

## त्रिफला पिप्पलीचूर्ण कास, श्वास ज्वरांवर.

कासश्वासज्वरहरात्रिफलापिप्पलीयुता ॥ १ ॥
चूर्णितामधुनालीढाभेदिनीचाग्निबोधिनी ॥

हिरडा, बेहडा, आंवळकठी, आणि पिंपळी या चार औषधाचें चूर्ण करून मधींत चाटावें तेणेंकरून मळाचा भेद होऊन अग्नि प्रदीप्त होतो. श्वास, कास व ज्वर हे दूर होतात.

## कट्फलादिचूर्ण ज्वरादिकांवर.

कट्फलंमुस्तकंतिक्ताशुंठीशृंगीचपौष्करम् ॥ २ ॥ चूर्णमेषांचमधुनाशृंग
वेररसेनवा ॥ लिहेत्ज्वरहरंकंठ्यंकासश्वासारुचिर्जयेत् ॥ ३ ॥ वायुंछ-
र्दितथाशूलंक्षयंचैवव्यपोहति ॥

कट्फळ, नागरमोथे, कटुकी, सुंठ, काकडशिंगी, पोखरणीमूळ या ६ औषधाचें चूर्ण करून मधांत अथवा आल्याचे रसांत घेतलें असतां ज्वर दूर होतो व कंठास हितकारक, श्वास, कास, अरुचि, वायु ओकारी, शूल व क्षयरोग हे दूर होतात.

## दुसरें कट्फलादिचूर्ण कफशूलादिकांवर.

कट्फलंपौष्करंशृंगीमुस्तकंकटुकंशटी ॥ ४ ॥ समस्तानेकशोवापीस्
क्ष्मचूर्णानिकारयेत् ॥ आर्द्रकस्वरसक्षौद्रैर्लिह्यात्कफविनाशनम् ॥५॥
शूलानिलारुचिछर्दिकासश्वासक्षयापहम् ॥

पद्मकाष्ठ, वाळा; पांढरा चंदन, अतिविष, चिकणामूळ, रानगाजा, रानभाल, वावाडिंग, तगर, चित्रक, देवदार, चवक, पटोलपत्र, जीवक, ऋषभक हे दोन मिळत नाहींत म्हणून यांचे अभावीं विदारीकंद, लवंग, वंशलोचन, पांढरें कमळ, काकोली मिळत नाहीं तिचे अभावीं ज्येष्ठमध, तमालपत्र, जायपत्री, तालीसपत्र हीं बावन्न औषधें समसमान घ्यावीं व साऱ्या औषधाचे निमे किराईत घेऊन साऱ्याचे चूर्ण करावें. याला सुदर्शन चूर्ण म्हणतात. हें चूर्ण थंड पाण्यात घ्यावें. तेणेंकरून वातपित्त, कफ व सारे पुराणज्वर हे दूर होतात. याविषयीं संशय नाहीं व वातज्वर, पित्तज्वर, कफज्वर, वातपित्तज्वर, वातकफज्वर, पित्तकफज्वर, आगंतुकज्वर, धातुगतज्वर, विषमज्वर, सन्निपातज्वर, मानसज्वर, शीतज्वर, एकाहिकादिकज्वर हे दूर होतात. मोहं व डोळ्यांवर झापड पडते ती व भ्रम, तृषा, श्वास, कास, पांडुरोग, हृद्रोग व कावीळ हे दूर होतात. पाठीचा माज व पाठ, कंबर, गुडघे, कुशी यांचा शूळ दूर होतो याविषयीं दृष्टांत जसें, दानवाचा नाश करणारें सुदर्शनचक्र आहे तसा साऱ्या ज्वरांचा नाश करणारें हें चूर्ण आहे असें जाणावें.

### त्रिफला पिप्पलीचूर्ण कास, श्वास ज्वरांवर.

कासश्वासज्वरहरात्रिफलापिप्पलीयुता ॥ १ ॥
चूर्णितामधुनालीढाभेदिनीचाग्निबोधिनी ॥

हिरडा, बेहडा, आवळकठी, आणि पिंपळी या चार औषधाचें चूर्ण करून मधांत चाटावें तेणेंकरून मळाचा भेद होऊन अग्नि प्रदीप्त होतो. श्वास, कास व ज्वर हे दूर होतात.

### कट्फलादिचूर्ण ज्वरादिकांवर.

कट्फलंमुस्तकंतिक्ताशुंठीभृंगीचपौष्करम् ॥ २ ॥ चूर्णमेषांचमधुनाभृंगबेररसेनवा ॥ लिहेत्ज्वरहरंकंठ्यंकासश्वासारुचिर्जयेत् ॥ ३ ॥ वायुंछर्दितथाशूलंक्षयंचैवव्यपोहति ॥

कट्फळ, नागरमोथे, कुटकी, सुंठ, काकडशिंगी, पोखरणीमूळ या ६ औषधाचें चूर्ण करून मधांत अथवा आल्याचे रसात घेतलें असतां ज्वर दूर होतो व कंठास हितकारक, श्वास, कास, अवढणें, वायु ओकारी, शूल व क्षयरोग हे दूर होतात.

### दुसरें कट्फलादिचूर्ण कफशूलादिकांवर.

कटफलंपौष्करंभृंगीमुस्तकंकटुकंशटी ॥ ४ ॥ समस्तानेकशोवापीम्
क्ष्मचूर्णानिकारयेत् ॥ आर्द्रकस्वरसक्षौद्रैर्लिह्यात्कफविनाशनम् ॥५॥
शूलानिलारुचिच्छर्दिकासश्वासक्षयापहम् ॥

बाळहिरडे, अतिविष सैंधव, पादेलोण, वेखंड, भाजलाहिंग. या सहा औषधांचें चूर्ण करून ऊनपाण्यांत घेतलें असतां आमातिसार दूर होतो व मळाचा अवष्टंभ होऊन अग्नि प्रदिप्त होतो.

## लघुगंगाधरचूर्ण सर्वातिसारावर.

मुस्तमिंद्रयवंबिल्वंलोध्रंमोचरसंतथा ॥ धातकींचूर्णयेत्तक्रगुडाभ्यांपाय येत्सुधीः ॥ १२ ॥ सर्वातिसारशमनंन्यरुणद्धिप्रवाहिकाम् ॥ लघुगंगा धरंनामचूर्णंसंग्राहकंपरम् ॥ १३ ॥

नागरमोथे, इंद्रजव, कोंवळें बेलफळ, लोध्र, मोचरस, धायटी फूल. या सहा औषधांचें चूर्ण करून ताकांत गुळ मेळवून त्यांत तें चूर्ण टाकून घ्यावें तेणें करून सारे अतिसार दूर होतात, व प्रवाहिका ह्मणजे पातळ मळ्या हगतो ते बंद होते या चूर्णाला लघुगंगाधर चूर्ण असें म्हणावें व हें चूर्ण मळाचा अवष्टंभ करणारें चांगलें आहे असें जाणावें.

## वृद्धगंगाधरचूर्ण सर्वातिसारांवर.

मुस्तारलुकशुंठीभिर्धातकीलोध्रवालकैः॥बिल्वमोचरभ्यांचपाठेंद्रयवव त्सकैः ॥ १४ ॥ आम्रबीजंप्रतिविषालज्जालुरितिचूर्णितं ॥ क्षौद्रतंदु लपानीयैःपीतैर्यातिप्रवाहिका ॥ १५ ॥ सर्वातिसारग्रहणीप्रशमंयातिवे गतः ॥ वृद्धगंगाधरंचुर्णंसरिद्वेगविबंधकम् ॥ १६ ॥

नागरमोथे, टेंटू, सुंठ, धायटीफुलें, लोध्र, वाळा, कोंवळें बेलफळ, मोचरस, पहाडमूळ, इंद्रजव, कुडेमाल, आंब्याची कोय, अतिविष, लाजेरी या १४ औषधांचें चूर्ण तांदुळाचे धुवणांत मध मेळवून घ्यावें तेणेंकरून प्रवाहिका ह्मणजे पातळ हगवण लागते ती दूर होते, सारे अतिसार व संग्रहणी ही लवकर दूर होतात या चूर्णाला वृद्धगंगाधर चूर्ण असें ह्मणतात. हें चूर्ण अतिसाराचा वेग नदीचे वेगासारखा असला तरी त्याला थांबवितें.

## अजमोदादिचूर्ण अतिसारावर.

अजमोदामोचरसंसशृंगबेरंसधातकीकुसुमम् ॥
गोदधिमथितयुक्तंगंगामपिवाहिनींरुंध्यात् ॥ १७ ॥

अजमोदा, मोचरस, आलें, धायटीफुलें या चार औषधांचें चूर्ण पाण्यावांचून घुसळलेल्या गाईच्या दह्यांत घोळून प्यावें तेणेंकरून गंगेचे प्रवाह सारिखा प्रवाह ज्या अतिसाराचा आहे तोही बंद होतो.

कट्फळ, पोखरामूळ, काकडशिंगी, नागरमोथे, सुंठ मिर्ये, पिंपळी, कचोरा, हीं ८ औषधें वेगळीं वेगळीं कुटावीं अ त्या सारीं एकजागीं करून कुटून चूर्ण करुन आल्याचे रसात अथवा मधात घ्यावें तेणेंकरून कफ दूर होतो. शूळ व वायु, अरुचि, ओकारी, कास श्वास, क्षयरोग हे दूर होतात.

## तिसरें बृहत् कट्फलादिचूर्ण कफशूलादिकांवर.

कट्फलंपौष्करंकृष्णाशृंगीचमधुनासह ॥ ६ ॥
श्वासकासज्वरहरःश्रेष्ठोलेहःकफांतकृत् ॥

कट्फळ, पोखरामूळ, पिंपळी, काकडशिंगी ह्या चार औषधाचें चूर्ण करून मधात घ्यावें तेणेंकरून श्वास, कास व ज्वर हे दूर होतात कफ दूर होण्याविषयीं हें चूर्ण बहुत उत्तम आहे

## शृंग्यादिचूर्ण बालकांचे कासज्वरावर.

शृंगीप्रतिविषाकृष्णाचूर्णितामधुनालिहेत् ॥ ७ ॥
शिशोःकासज्वरछर्दिशांत्यैवाकेवलाविषा ॥

काकडशिंगी, अतिविष, पिंपळी, या तीन औषध चें चूर्ण करून मधात बालकास द्यावें अथवा एकलें अतिविष मधात द्यावें तेणेंकरून कास, ज्वर व ओकारी हीं दूर होतात.

## यवक्षारादिचूर्ण बालकाचे पंचकासावर

यवक्षारविषाशृंगीमागधीपौष्करोद्भवम् ॥ ८ ॥
चूर्णक्षौद्रयुतंलीढंपंचकासाञ्जयेच्छिशोः ॥

जवखार, अतिविष, काकडशिंगी पिंपळी व पोखरामूळ या पाच औषधींचें चूर्ण बाल कास मधात द्यावें तेणेंकरून पाच प्रकारचे कासरोग दूर होतात

## शुंठ्यादिचूर्ण आमातिसारावर.

शुंठीप्रतिविषाहिंगुमुस्ताकुटजचित्रकैः ॥ ९ ॥
चुर्णमुष्णांबुनापीतमामातीसारनाशनम् ॥

सुंठ, अतिविष, हिंगभाजून, नागरमोथे, इंद्रजव व चित्रक या ६ औषधाचें चूर्ण करून चूर्णाचे चौपट ऊनपाण्यात घेतलें असता आमातिसार दूर होतो.

## दुसरें हरीतक्यादि चूर्ण.

हरीतकीप्रतिविषासिंधुसौवर्चलंवचा ॥ ३१० ॥ हिंगुचेतिकृतंचूर्णपिबे
दुष्णेनवारिणा ॥ आमातिसारशमनंग्राहिचाग्निप्रबोधनम् ॥ ११ ॥

वाळहिरडे, अतिविष सैंधव, पादेलोण, वेखंड, भाजलाहिंग. या सहा औषधांचें चूर्ण करून ऊनपाण्यांत घेतलें असतां आमातिसार दूर होतो व मळाचा अवष्टंभ होऊन अग्नि प्रदिप्त होतो.

## लघुगंगाधरचूर्ण सर्वातिसारावर.

मुस्तमिंद्रयवंबिल्वंलोध्रंमोचरसंतथा ॥ धातकींचूर्णयेत्तक्रगुडाभ्यांपाययेत्सुधीः ॥ १२ ॥ सर्वातिसारशमनंन्यरुणद्धिप्रवाहिकाम् ॥ लघुगंगाधरंनामचूर्णसंग्राहकंपरम् ॥ १३ ॥

नागरमोथे, इंद्रजव, कोंवळें वेलफळ, लोध्र, मोचरस, धायटी फूल. या सहा औषधांचें चूर्ण करून ताकांत गुळ मेळवून त्यांत तें चूर्ण टाकून प्यावें तेणें करून सारे अतिसार दूर होतात, व प्रवाहिका ह्मणजे पातळ मळ इगतो तें मंद होते या चूर्णाला लघुगंगाधर चूर्ण असें म्हणावें व हें चूर्ण मळाचा अवष्टंभ करणारे चांगलें आहे असें जाणावें.

## वृद्धगंगाधरचूर्ण सर्वातिसारांवर.

मुस्तारलुकशुंठीभिर्धातकीलोध्रवालकैः॥बिल्वमोचरभ्यांचपाठेंद्रयववरसकैः ॥ १४ ॥ आम्रबीजंप्रतिविषालज्जालुरितिचूर्णितं ॥ क्षौद्रतंदुलपानीयैःपीतैर्यातिप्रवाहिका ॥ १५ ॥ सर्वातिसारग्रहणीप्रशमंयातिवेगतः ॥ वृद्धगंगाधरंचूर्णसरिद्वेगविबंधकम् ॥ १६ ॥

नागरमोथे, टेंटू, सुंठ, धायटीफुलें, लोध्र, वाळा, कोंवळें वेलफळ, मोचरस, पहाडमूळ, इंद्रजव, कुडेमाल, आंब्याची कोय, अतिविष, लाजेरी या १४ औषधांचें चूर्ण तांदुळाचे धुणांत मध मेळवून प्यावें तेणेंकरून प्रवाहिका ह्मणजे पातळ हगवण लागते ती दूर होते, सारे अतिसार व संग्रहणी हीं लवकर दूर होतात या चूर्णाला वृद्धगंगाधर चूर्ण असें ह्मणतात. हें चूर्ण अतिसाराचा वेग नदीचे वेगासारखा असला तरी त्याला थांबवितें.

## अजमोदादिचूर्ण अतिसारावर.

अजमोदामोचरसंसशृंगबेरंसधातकीकुसुमम् ॥
गोदधिमंथितयुक्तंगंगामपिवाहिनींरुध्यात् ॥ १७ ॥

अजमोदा, मोचरस, आलें, धायटीफुलें या चार औषधांचें चूर्ण पण्यावांचून घुसळलेल्या गाईच्या दह्यांत घोळून प्यावें तेणेंकरून गंगेचे प्रवाहा सारिखा प्रवाह ज्या अतिसाराचा आहे तोही बंद होतो.

## मरीच्यादिचूर्ण संग्रहणीवर.

तक्रेणयःपिबेन्नित्यंचूर्णमरिचसंभवं ॥ चित्रसौवर्चलोपेतंग्रहणीतस्यनश्य ति ॥ १८ ॥ उदरप्लीहमंदाग्निगुल्मार्शोनाशनंभवेत् ॥

मिऱ्यें, चित्रक, पादेलोण या तीन औषधाचें चूर्ण ताकांत नित्य प्यालें असतां संग्रहणी रोग दूर होतो व उदर रोग, कवळ, मंदाग्नि, गुल्म, मुळव्याध हींही दूर होतात.

## कपित्थाष्टकचूर्ण संग्रहणीवर.

अष्टौभागाःकपित्थस्यषड्भागाशर्करामता ॥ १९ ॥ दाडिमंतिंतिडी कंचश्रीफलंधातकीतथा ॥ अजमोदाचपिप्पल्यःप्रत्येकंस्युस्त्रिभागिकाः ॥ २२० ॥ मरिचंजीरकंधान्यंग्रंथिकंवालकंतथा ॥ सौवर्चलंय वानीचचातुर्जातंसचित्रकम् ॥ २१ ॥ नागरंचकभागाःस्युःप्रत्येकंसूक्ष्म चूर्णितम् ॥ कपित्थाष्टकसंज्ञंस्याच्चूर्णमेतद्गलामयात् ॥२२॥ अतिसारं क्षयगुल्मंग्रहणींचव्यपोहति ॥

कंवठ आठ भाग व साखर सहा भाग, डाळिंबाची साल, चिंचेची साल; कोंवळें बेलफळ, धायटी फुलें, अजमोदा, पिंपळी हीं सहा औषधें तीन तीन भाग व मिऱ्यें, जिरें, धणे, पिंपळमूळ, वाळा, संचळ, अजमोदा, दालचिनी, विलायची, तमालपत्र, नागकेशर, चित्रक, सुंठ, हीं १३ औषधें एक एक भाग घ्यावीं. मग साऱ्या औषधाचें बारीक चूर्ण करावें या चूर्णाला कपित्थाष्टक चूर्ण असें ह्मणतात. हें कपित्थाष्टक चूर्ण घेतलें असतां कंठाचे रोग, अतिसार, क्षय, गुल्म व संग्रहणी हे दूर होतात.

## दाडिमाष्टक ग्रहण्यादिकांवर.

दाडिमाद्विपलाग्राह्याखंडाचाष्टपलापिच ॥ २३ ॥ त्रिगंधस्यपलंचै कंत्रिकटुस्यात्पलत्रयम्॥एतदेकीकृतंसर्वं चूर्णंस्याद्दाडिमाष्टकम् ॥२४॥ रुचिकृद्दीपनंकंठ्यंग्राहिकासज्वरापहम् ॥

डाळिंबसाल दोन पळें, साखर ८ पळें दालचिनी व विलायची आणि तमालपत्र या तिन्हीं मिळून एक पळ. सुंठ, मिऱ्यें, पिंपळी हीं तीन औषधें एक एक पळ घ्यावीं. मग सारीं औषधें कुटून चूर्ण करावें. यास दाडिमाष्टक ह्मणतात. हें चूर्ण घेतलें असतां तोंडास रुचि येते अग्नि प्रदिप्त होतो व कंठास हितकारक होतें व मळाचा अवष्टंभ करणारें असून कासज्वर दूर करितें.

## बृहद्दाडिमाष्टक अतिसारादिकांवर.

दाडिमस्यफलान्यष्टौशर्करायाःपलाष्टकम् ॥ २५ ॥ पिप्पलीपिप्पली मूलंयवानीमरिचंतथा ॥ धान्यकंजीरकंशुंठीप्रत्येकंपलसंमितम् ॥२६॥ कर्पमात्रातुगोक्षीरीत्वक्पत्रैलाश्चकेसरम् ॥ प्रत्येकंकोलमात्रास्युस्तच्चूर्णंदाडिमाष्टकम् ॥ २७ ॥ अतिसारंक्षयंगुल्मंग्रहणींचगलग्रहम् ॥मंदाग्निंपीनसंकासंचूर्णमेतद्व्यपोहति ॥

डाळिंबसाल आठ पळें, साखर आठ पळें, पिंपळी, पिंपळमूळ, अजमोदा, मिर्‍यें, धणें, जिरें, सुंठ हीं सात औषधें एक एक पळ व वंशलोचन एक कर्ष, दालचिनी, तमालपत्र, विलायची, नागकेशर हीं चार औषधें कोल कोल प्रमाण घ्यावीं. मग सारीं औषधें कुटून चूर्ण करावें याला मोठें दाडिमाष्टक असें म्हणतात. हें चूर्ण घेतलें असतां अतिसार, क्षय, गुल्म, संग्रहणी, कंठरोग अग्निमांद्य, पडसें व कास हे दूर होतात.

## तालिसादि चूर्ण अरोचकादिकांवर.

तालीसंमरिचंशुंठीपिप्पलीवंशरोचना ॥ एकद्वित्रिचतुःपंचकर्षैर्भागान्प्रकल्पयेत् ॥ २८ ॥ एलात्वचोस्तुकर्षार्धंप्रत्येकंभागमावहेत् ॥ मृतंवंगंमृतंताम्रंसमभागानिकारयेत् ॥ २९ ॥ द्वात्रिंशत्कर्षतुलितांप्रदेयाशर्करात्रुधैः ॥ तालीसाद्यमिदंचूर्णंरोचनंपाचनंस्मृतम् ॥३३० ॥ कासश्वासज्वरहरंछर्द्यतीसारनाशनम्॥शोषाध्मानहरंप्लीहग्रहणीपांडुरोगजित्॥ ३१ ॥

तालीसपत्र एक कर्ष, मिर्‍यें २ कर्ष, सुंठ ३ कर्ष, पिंपळी ४ कर्ष, वंशलोचन ५ कर्ष, विलायची व दालचिनी अर्धा अर्धा कर्ष, वंगभस्म व ताम्रभस्म हीं दोन्हीं आठ आठ कर्ष व साखर ३२ कर्ष घ्यावी. मग सारीं औषधें कुटून चूर्ण करून त्यात ती साखर मेळवून घेतलें असता तोंडास रुचि येते व अन्नपचन होतें व कास, श्वास, ज्वर, ओकारी, अतिसार, शोष, पोटफुगी, फफ्फुस, संग्रहणी व पाण्डुरोग हे दूर होतात.

## लवंगादिचूर्ण क्षयादिकांवर.

लवंगशुद्धकर्पूरमेलात्वक्नागकेसरम् ॥ जातीफलमुशीरंचनागरंकृष्णजीरकम् ॥ ३२ ॥ कृष्णागरुस्तुगोक्षीरीमांसीनीलोत्पलंकणा ॥ चंदनंतगरंवालंकंकोलंचेतिचूर्णयेत् ॥ ३३ ॥ समभागानिसर्वाणिसर्वेभ्योर्धासिताभवेत् ॥ लवंगाद्यमिदंचूर्णंराजार्हवन्हिदीपनम्॥३४॥ रोचनंतर्पणंवृष्यंत्रिदोषघ्नंबलप्रदम् ॥ हृद्रोगकंठरोगंचकासंहिक्कापचपीनसम्

॥ ३५ ॥ यक्ष्माणंतमकश्वासमतीसारगुरःक्षतम् ॥ प्रमेहारुचिगुल्मादी न्ग्रहणीमपिनाशयेत् ॥ ३६ ॥

लवंगा, शुद्धकापूर, विलायची, दालचिनी, नागकेशर, जायफळ, वाळा, सुंठ, शहाजिरें, कृष्णागर, वंशलोचन, जटामांसी, निळें कमळ, पिंपळी, पांढरा चंदन, तगर, नेत्रवाळा व कंकोळ हीं अठरा औषधें समभाग घेऊन चूर्ण करून त्याचे अर्धी साखर घेऊन एका जागीं मिळवावी या चूर्णाला लवंगादि चूर्ण असें ह्मणतात. हें चूर्ण राजास देण्याविषयीं योग्य आहे व या चूर्णेंकरून अग्नि प्रदीप्त होतो, तोंडास रुचि येते, शरीर पुष्ट होतें. स्त्रीविषयीं इच्छा होते. वात, पित्त, कफ, यांचा प्रकोप दूर होतो, शक्ति येते. हृद्रोग, कंठरोग, श्वास, उचकी, पडसें, क्षय, तमकश्वास, अतिसार, उरांत क्षतरोग होतो तो. परमा, अरुचि, गुल्म व संग्रहणी हे रोग दूर होतात.

## जातिफलादिचूर्ण ग्रहण्यादिकांवर.

जातीफललवंगैलापत्रत्वक्नागकेसरैः ॥ कर्पूरचंदनतिलैस्त्वक्क्षीरीनागरामलैः ॥ ३७ ॥ तालीसपिप्पलीपथ्यास्थूलजीरकचित्रकैः ॥ शुंठीविडंगमरिचैःसमभागेनचर्णितैः ॥३८॥ यावंत्येतानिसर्वाणिकुर्याद्भंगांचतावतीम् ॥ सर्वचूर्णसमादेयाशर्कराचभिपग्वरैः ॥ ३९ ॥ कर्पमात्रं ततःखादेन्मधुनाप्लाविंतंसुधीः ॥ अस्यप्रभावाद्ग्रहणीकासश्वासरुचिक्षयाः ॥ ३४० ॥ वातश्लेष्मप्रतिश्यायाःप्रशमंयांतिवेगतः ॥

जायफळ, लवंगा, विलायची, तमालपत्र, दालचिनी, नागकेशर, कापूर, श्वेतचंदन, काळेतीळ, वंशलोचन, तगर, आवळकाटी, तालीसपत्र, पिंपळी, हिरडे, काळें जिरें. चित्रक, सुंठ, वावडिंग, मिरें ही वीस औषधें समभाग घ्यावी व या औषधाचे समभाग भाग शोधून घ्यावी. मग सान्यांचें चूर्ण करून त्या चूर्णाचे समभाग साखर घेऊन त्यांत मेळवावी मग तें चूर्ण एक कर्ष प्रमाण मधांत घेतलें असतां संग्रहणी, कास. श्वास, अरुचि, क्षय, वातकफाचा विकार व पडसें हे रोग लवकर दूर होतात.

## महाखांडवचूर्ण अरुच्यादिकांवर.

मरिचंनागपुष्पाणितालीसलवणानिच ॥ ४१ ॥ प्रत्येकमेकभागाःस्युः पिप्पलीमूलचित्रकैः ॥ त्वक्क्षणानितिंर्डींकंचजीरकंचद्विभागिकाः ॥ ४२ ॥ धान्याम्लवेतसौविश्वंभद्रैलाचदराणिच ॥ अजमोदाजलधरःप्रत्येकंतु त्रिभागिकाः ॥ ४३ ॥ सर्वौषधचतुर्थांशंदाडिमस्यफलंभवेत् ॥ द्व्

भ्योनिखिलेभ्यश्चसितादेयार्धमात्रया ॥ ४४ ॥ महारखांडवसंज्ञस्या
चूर्णमेतत्सुरोचनम् ॥ अग्निदीप्तिकरंहृद्यंकासातीसारनाशनम् ॥
॥ ४६ ॥ हृद्रोगकंठजठरमुखरोगप्रणाशनम् ॥ विषूचिकांतथाध्मान
मर्शोगुल्मकृमीनपि ॥ ४७ ॥ छर्दिंचविविधांश्वासंचूर्णमेतद्व्यपोहति ॥

मिर्‍यें, नागकेशर, तालीसपत्र, सैंधव, संचळ, बिडलोण, समुद्रमीठ, वांगडखार हीं आठ औषधें एकएक भाग व पिंपळमूळ, चित्रक, दालचिनी, पिंपळी, चिंचेची साल, जिरें ही सहा औषधें दोन दोन भाग व धणे, आम्लवेतस, सुंठ, वेलदोड्याचे दाणे, लहान बोरें, अजमोदा, नागरमोथे हीं ७ औषधें तीन तीन भाग व साऱ्या औषधाचे चवथा भाग डाळिंबाचें फळ घ्यावें. मग साऱ्या औषधाचें चूर्ण करून त्या चूर्णाचे अर्धी साखर घेऊन एका जागीं मिळवावीं या चूर्णाला महाखाडवचूर्ण असें ह्मणतात. हें चूर्ण घेतलें असतां तोंडास रुचि येते व अग्नि प्रदीप्त होतो. हृदयास हितकारक, कास, अतिसार, हृद्रोग, कंठरोग, उदररोग, मुखरोग, मोडशी, पोटफुगी, मूळव्याध, गुल्म, जंतविकार या पांच प्रकारची ओकारी व श्वास हे दूर होतात.

## नारायणचूर्ण उदररोगावर.

चित्रकस्त्रिफलाव्योपंजीरकंहपुषावचा ॥ ४८ ॥ यवानीपिप्पलीमूल
शतपुष्पाजगंधिका ॥ अजमोदाशठीधान्यंविडंगंस्थूलजीरकम् ॥४९॥
हेमाव्हापौष्करंमूलंक्षारौलवणपंचकम्॥कुष्टंचेतिसमांशानिविशालास्या
द्द्विभागिका ॥ ३५० ॥ त्रिवृत्त्रिभागाविज्ञेयादंत्याभागत्रयंभवेत् ॥
चतुर्भागासातलास्यात्सर्वाण्येकत्रचूर्णयेत् ॥ ५१ ॥ पाचनस्नेहनाद्यैश्व
स्निग्धकोष्ठस्यरोगिणः ॥दद्याच्चूर्णविरेकायसर्वरोगप्रणाशनम्॥ ५२॥
हृद्रोगेपांडुरोगेचकासेश्वासेभगंदरे ॥ मंदेऽग्नौचज्वरेकुष्ठेग्रहण्यांचगलग्र
हे ॥ ५३ ॥ दद्याद्युक्तानुपानेनतथाध्मानेसुरादिभिः ॥ गुल्मेचबदरनी
रेणविट्संगेदधिमस्तुना ॥ ५४ ॥ उष्णांबुभिरजीर्णेचवृक्षाम्लैःपरिक
र्तिषु ॥ उष्ट्रीदुग्धेनोदरेषुतथातक्रेणवागवाम् ॥ ५५ ॥ प्रसन्नयावात
रोगेद्राडिमांभोभिरर्शसि॥द्विविधेचविषेदद्यात्घृतेनाचिपनाशनम्॥५६॥
चूर्णनारायणंनामदुष्टरोगगणापहम् ॥

चित्रकमूळ, त्रिफळा, सुंठ, मिर्‍यें, पिंपळी, जिरें, शेरणी, वेखंड, अजमोदा. पिंपळमूळ, बडीशोफ, रानतुळस, ओंवा, कचोरा, धणे, वावडिंग, काळीं जिरें, चोक, पोखरा-

मूळ, साजीखार, जवखार, सैंधव, मेंचळ, बिडखार, समुद्रमीठ, बागडखार, कोष्ठ हीं सत्तावीस औषधें एक एक भाग. पहिले ओषधाचे दोन भाग, कावडळीमूळ त्याप्रमाणें ३ भाग, निशोत्तर तसेंच ३ भाग दातींचें मूळ व चार भाग पिंवळ्या निवडुंगाचें मूळ अथवा पाला तें न मिळेल तर त्याचे अभावीं निवडुंग घ्यावें आणि हीं सारीं औषधें कुटून चूर्ण करावें. मग तें चूर्ण पाचनें करून व स्नेहादिकें करून ज्या मनुष्याचा कोठा स्निग्ध झाला आहे त्या मनुष्यास ढाळ होण्याविषयीं द्यावें तेणें करून सारे रोग दूर होतात हृद्रोग, पांडुरोग, श्वास, कास, भगंदर व अग्निमांद्य इतक्या रोगाचे ठायीं हें चूर्ण अनुपानाची योजना करून द्यावें. पोटफुगीवर मद्यात कालवून द्यावें. गुल्म रोगास बोरीचे काढ्या बरोबर द्यावें मळबद्धास दह्याचे पाण्याबरोबर द्यावें अजीर्णास ऊन पाण्यात द्यावें. गुदाचेठायीं कातरल्यासारखी इजा होते तीस चिंचेच्या काढ्यात द्यावें उदररोगास उंटणीचें दुधान द्यावें अथवा गाईचे ताकात द्यावें. वातरोगास प्रसन्ने बरोबर द्यावें. मूळव्याधीस डाळिंबीचे पाण्याबरोबर द्यावें, तेणेंकरून हे सारे रोग दूर होतात. हें चूर्ण तुपात घेतलें असता स्थावर विष व जंगम विष हीं दोन प्रकारचीं विषें दूर होतात या चूर्णाला नारायणचूर्ण असें ह्मणतात या चूर्णापासून सारे दुष्ट रोग दूर होतात

## हपुषादिचूर्ण अजीर्णज्वरादिकांवर.

हपुषात्रिफलाचैवत्रायमाणाचपिप्पली ॥५७॥ हेमक्षीरीतिवृच्चैवसात
लाकटुकावचा ॥ नीलिनींसैंधवंकृष्णलवणंचेतिचूर्णयेत् ॥ ५८ ॥
उष्णोदकेनमूत्रेणदाडिमत्रिफलारसैः ॥ तथामांसरसेनापियथायोग्य
पिबेन्नरः ॥ ५९ ॥ अजीर्णप्लीहिगुल्मेषुशोफार्शोविषमाग्निषु ॥
हलीमकामलापांडुकुष्ठाध्मानोदरेष्वपि ॥ ३६० ॥

हरणी, वेखंडा, आवळकाठी, त्रायमाण, पिंपळी, चोक, निशोत्तर, पिंवळें निवडुंग (न मिळेल तर निवडुंग) कटुकी, वेखंड, नीळ, सैंधव, मेंचळ या १४ औषधाचें चूर्ण करून ऊन पाण्यात अथवा गोमूत्रात अथवा डाळिंबाचे रसात अथवा त्रिफळेचे काढ्यात अथवा रानातील हरिणादिकाचे मांसाचे रसात घ्यावें मागाल त्या रोगास अनुपानाचा उपयोग पडेल तसें घ्यावें तेणेंकरून अजीर्ण व कावड गुल्म, सूज मूळव्याध, अग्निमांद्य, हलीमकरोग, कावीळ पांडुरोग, कुष्ठ, पोटफुगी, उदररोग हे सारे रोग दूर होतात

## पंचसमचूर्ण शूलादिकांवर.

शुंठीहरीतकीकृष्णात्रिवृत्सौवर्चलंतथा ॥ समभागानिसर्वाणिसूक्ष्मचू

र्णानिकारयेत् ॥ ६१ ॥ ज्ञेयंपंचसमंचूर्णमेतच्छूलहरंपरम् ॥ आध्मानज
ठरार्शोघ्नमामवातेहरंस्मृतम् ॥ ६२ ॥

सुंठ, बाळहिरडे, पिंपळी, निशोत्तर, संचळ ही पाच औषधें समभाग घेऊन बारीक चूर्ण करावें, याला पंचसम चूर्ण ह्मणतात. हें चूर्ण घेतलें असता शूळ, पोटफुगी, अग्निमांद्य मूळव्याध, आमवायु हे रोग दूर होतात.

## पिप्पल्यादिचूर्ण आध्मानादिकांवर.

कर्षमात्राभवत्कृष्णात्रिवृतास्यात्पलोन्मिता ॥ खंडापलंचविज्ञेयंचूर्ण
मेकत्रकारयेत् ॥ ६३ ॥ कर्षोन्मितंलिहेदेतत्क्षौद्रेणाध्माननाशनम् ॥
गाढविट्कोदरकफान्पित्तशुलंचनाशयेत् ॥ ६४ ॥

पिंपळी एक कर्ष, निशोत्तर एक पळ व साखर एक पळ यांचें चूर्ण एकाजागीं करून मधात घेतलें असतां पोटफुगी दूर होते व मलबद्ध, उदररोग, कफ, पित्त, शूळ हे दूर होतात.

## लवणत्रितयादिचूर्ण यकृत्प्लीहादिकांवर.

लवणत्रितयंक्षारौशतपुष्पाद्वयंवचा ॥ अजमोदाचगंधाचहपुपाजीरकद्वयम्
॥६५॥ मरिचंपिप्पलीमूलंपिप्पलीगजपिप्पली ॥ हिंगुश्चहिंगुपत्रीच
सार्ठीपाठोपकुंचिका॥६६॥शुंठीचित्रकचव्यानिविडंगंचाम्लवेतसम् ॥
दाडिमंतिंतिडीकंचत्रियदंतीशतावरी ॥ ६७ ॥ इंद्रवारुणिकाभार्गीदे
वदारुर्यवानिका ॥ कुस्तुंबुरुस्तंवुरुणीपौष्करंबदराणिच ॥ ६८ ॥
शिवाचेतिसमांशानिचूर्णमेकत्रकारयेत् ॥ भावयेदार्द्रकरसैर्बीजपुररसै
स्तथा ॥ ६९ ॥ तत्पिबेत्सर्पिषाजीर्णमद्येनोष्णोदकेनवा ॥ कोलांभ
सावातक्रेणदुग्धेनौष्ट्रेणमस्तुना ॥ ३७० ॥ यकृत्प्लीहकटीशूलगुदकुक्षि
हृदामयान् ॥ अर्शोविष्टंभमंदाग्निगुल्माष्ठीलोदराणिच ॥ ७१ ॥
हिकाध्मानश्वासकासाञ्जयेदेतान्नसंशयः ॥ एतैरेवौषधैःसम्यक्घृतंवा
साधयेद्भिषक् ॥ ७२ ॥

सैंधव, संचळ, बिडलोण; साजीखार, जवखार, बडीशोफ, बाळंतशोफ, वेखंड, अजमोदा, रानतुळस, शेरणी, जिरें, शाहाजिरें, मिऱ्यें, पिंपळमूळ, पिंपळी, गजपिंपळी, हिंग भाजलेला, बाफळ्या, कचोरा, पाहाडमूळ, काळीजिरें, सुंठ, चित्रक, चवक, वावडिंग, आम्लवेतस, डाळिंबसाल. चिंचेचीसाल, निशोत्तर, दांतीचें मूळ, शतावरी, कडूवृंदावन, भारंगमूळ, देवदारू, अजमोदा, धणे, चिरफळ, पोखरामूळ, बोर, बाळहिरडे हीं एकेता-

ळीस औषधें समभाग घेऊन चूर्ण करावें. मग त्या चूर्णास आल्याच्या रसाचे पुट व महाळूंगाच्या रसाचें पुट अशीं दोन प्रकारची पुटें देऊन वाळवावें. मग हें चूर्ण तुपांत अथवा जुन्या मद्यांत अथवा ऊन पाण्यांत अथवा बोरीचे काढ्यांत अथवा गाईचे ताकांत अथवा उंटिणीचे दुधांत अथवा दह्याचे निवळींत घालून प्यावें. या प्रमाणें ज्या अनुपानाचा ज्या रोगास उपयोग पडेल तसें अनुपान योजून द्यावें. तेणेंकरून पोटांत उजवेकडेस यकृत्‌रोग होतो तो व डावेकडे फवलरोग होतो तो व कंबरेचा शूळ, गुदरोग, कुशीचा शूळ हृद्रोग, मूळव्याध, मळाचा अवरोध, अग्निमांद्य, गुल्म, अष्ठीला या नांवेंकरून, वायूचा रोग होतो तो व उदररोग, उचकी, पोटफुगी, श्वास, कास, हे रोग दूर होतात अथवा त्याच औषधाचा काढा करून त्यांत तूप घालून फिरून तूप राही तो पर्यंत कढवून गाळून तें तूप घेतलें असतां वर सांगितलें जे रोग ते येणेंकरूनही दूर होतात.

## तुंबरुण्यादिचूर्ण शूळादिकांवर.

तुंबरुणीत्रिलवणंयवानीपुष्कराव्हयम्॥यवक्षाराभयाहिंगुविडंगानिसमानिच ॥ ७३ ॥ त्रिवृत्त्रिभागाविज्ञेयासूक्ष्मचूर्णानिकारयेत् ॥ पिबेदुष्णेनतोयेनयवक्वाथेनवापिबेत्॥७४॥जयेत्सर्वाणिशूलानिगुल्माध्मानोदराणिच॥

तुंबरु किंवा चिरफळ, सैंधव, संचळ, बिडलोण, अजमोदा, पोखरामूळ, जवखार, बाळहिरडा, भाजलेला हिंग, वावडिंग हीं दहा औषधें समभाग घ्यावीं व निशोत्तर तीन भाग घ्यावें. मग साऱ्या औषधांचें बारीक चूर्ण करून ऊन पाण्यांत अथवा जवाचे काढ्यांत घ्यावें. तेणेंकरून सारे शूळ व गुल्म, पोटफुगी, उदररोग हे दूर होतात,

## चित्रकादिचूर्ण गुल्मादिकांवर.

चित्रकोनागरंहिंगुपिप्पलीपिप्पलीजटा ॥ ७५ ॥ चव्याजमोदामरिचंप्रत्येकंकर्षसंमितम् ॥ स्वर्जिकाचयवक्षारःसिंधुसौवर्चलंविडम् ॥ ७६ ॥ सामुद्रकंरोमकंचकोलमात्राणिकारयेत् ॥ एकीकृत्याखिलंचूर्णभावयेन्मातुलिंगजे. ॥ ७७ ॥ रसैर्दाडिमजैर्वापिशोषयेदातपेनच ॥ एतच्चूर्णंजयेद्गुल्मंग्रहणीमामजांरुजम् ॥ ७८ ॥ अग्निंचकुरुतेदीप्तंकफवातकफनाशनम् ॥

चित्रक, सुंठ, हिंग भाजून, पिंपळी, पिंपळमूळ, चवक, अजमोदा, मिऱ्यें, हीं आठ औषधें एक एक कर्ष प्रमाण घ्यावीं व साजीखार, जवखार, सैंधव, संचळ, बिडलोण, समुद्रमीठ, वांगडखार हे सात खार एक एक कोल प्रमाण घ्यावे. मग साऱ्या औषधांचें

चूर्ण करून महाळुंगीच्या फळाच्या रसाचें एक पुट द्यावें अथवा डाळिंबीच्या फळाच्या रसाचें एक पुट देऊन मग उन्हात वाळवून हें चूर्ण घेतलें असता गुल्म सग्रहणी, आंव हीं दूर होतात व अग्नि प्रदीप्त होतो. तोंडाला रुचि येते व कफ दूर होतो.

### वडवानलचूर्ण मंदाग्न्यादिकांवर.

सैंधवंपिप्पलीमुलंपिप्पलीचव्यचित्रकम् ॥ ७९ ॥ शुंठीहरीतकीचेतिक्रम
वृद्धानिचूर्णयेत् ॥ वडवानलनामैतच्चूर्णस्यादग्निदीपनम् ॥ ३८० ॥

सैंधव १ भाग, पिंपळमूळ २ भाग, पिंपळी ३ भाग, चवक ४ भाग, चित्रक ५ भाग, सुंठ ६ भाग, बाळहिरडे ७ भाग. या अनुक्रमें भाग घेऊन चूर्ण करावें. या चूर्णाला वडवानल चूर्ण असे ह्मणतात. हें चूर्ण घेतलें असता अग्नि प्रदिप्त होतो.

### अजमोदादिचूर्ण आमवातादिकांवर.

अजमोदाविडंगानिसैंधवंदेवदारुच ॥ चित्रकःपिप्पलीमूलंशतपुष्पाच
पिप्पली ॥ ८१ ॥ मरिचंचेतिकर्षांशंप्रत्येकंकारयेद्बुधः ॥ कर्षास्तुपं
चपथ्यायादशस्युर्वृद्धदारुकात् ॥८२॥ नागराच्चदशैवस्युःसर्वाण्येक
त्रकारयेत् ॥ पिबेत्कोष्णजलेनैवचूर्णश्वयथुनाशनम् ॥ ८३ ॥ आम
वातरुजंहंतिसंधिपिंडांचगृध्रसीम् ॥ कटीपृष्ठगुदस्थांचजंघयोश्चरुजंजयेत्
॥८४॥तुणीप्रतूणीविश्वाचींकफवातामयाञ्जयेत् ॥ समेनवागुडेनास्यवट
कान्कारयेत्सुधीः ॥ ८५ ॥

अजमोदा, वावाडिंग, सैंधव, देवदारु, चित्रकमूळ, पिंपळमूळ बडीशेफ पिंपळी, मिर्यें हीं नऊ औषधें एक एक कर्ष प्रमाण घ्यावीं व पांच कर्ष बाळहिरडे, वरधारा दहा कर्ष, सुंठ दहा कर्ष घ्यावी. या सर्वा औषधांचें चूर्ण करून ऊन पाण्यांत घेतलें असतां सूज, आमवायु, संधि दुखतात त्या व गृध्रसी वायु ( कमरेपासून पायापर्यंत होतो तो ) व कंबर, पाठ, गुद व पोटऱ्या यांचे ठायीं शूळ होतो तो व तूणीवायु, प्रतूणीवायु, विश्वाची वायु कफवायुचे विकार हे सारे रोग दूर होतात. अथवा या चूर्णाचे सममाग गुळ घालून गोळ्या करून घेतल्या असता चूर्णापासून जे रोग दूर होतात ते या गोळ्यापासून ही दूर होतात असें जाणावें.

### हिंग्वादिचूर्ण शूळादिकांवर.

हिंगुपाठाभयाधान्यंदाडिमंचित्रकःसटी ॥ अजमोदात्रिकटुकंहपुषाचा
म्लवेतसम् ॥ ८६ ॥ अजगंधातिंतिडीकंजीरकंपौष्करंवचा ॥ चव्यं

क्षारद्वयंपंचलवणानीतिचूर्णयेत् ॥ ८७ ॥ प्राग्भोजनस्यमध्येवाचूर्णमेतत्प्रयोजयेत् ॥ पिबेद्वाजीर्णमद्येनतक्रेणोष्णोदकेनवा ॥ ८८ ॥ गुल्मंवातकफोद्भूतंहृद्रोगेऽष्ठीलिकासुच ॥ हृद्बस्तिपार्श्वशूलेषुशूलेषुगुदयोनिजे ॥ ८९ ॥ मूत्रकृच्छ्रेतथाऽऽनाहेपांडुरोगेऽरुचौतथा॥हिक्कायांचयकृत्प्लीन्हिकासेश्वासेगलग्रहे ॥ ३९० ॥ ग्रहण्यर्शोविकारेषुचूर्णमेतत्प्रशस्यते॥ भावितंमातुलिंगस्यबहुशःस्वरसेवना ॥ ९१ ॥कुर्याच्चगुटिकाचंऽ वातश्लेष्मामयापहाः ॥ ९२ ॥

भाजलेला हिंग, पहाडमूळ, वाळाहिरडे, धणे डाळिंबाची साल, चित्रक, क.., अजमोदा, सुंठ, मिर्‍यें, पिंपळी, शेरणी, आम्लवेतस, रानतुळस, चिंचेची साल, जिरें, पोखरणीमूळ, वेखंड, चवक साजीखार, जवखार, सैंधव, संचळ, बिडलोण, बांगडखार, समुद्रमीठ हीं सव्वीस औषधें कुटून चूर्ण करून भोजनाचे आधीं अथवा मध्यें घ्यावें. अथवा बहुत दिवसाचें मद्य असेल त्यांत घ्यावें अथवा गाईचे ताकांत अथवा ऊन पाण्यांत घ्यावें तेणेंकरून वातकफापासून उत्पन्न झालें जें गुल्म तें व हृद्रोग व अष्ठीला या नामेंकरून पोटांत वायुचा रोग होतो व हृदय, बस्ति, कुशी यांचें शूळ व गुदशूळ, योनिशूळ, मूत्रकृच्छ्र, मलबद्ध, पांडुरोग अवदर्णें, उचकी. उजवेकडे पोटांत यकृत् रोग होतो तो व डावेकडे कवल रोग होतो तो, श्वास, कास, कंठरोग, संग्रहणी, मुळव्या‍ध हे सारे रोग दूर होतात, अथवा या चूर्णाला महाळुंगीचे फळाचे रसाचें पुट देऊन गोळ्या करून घेतल्या असतां वातकफापासून उत्पन्न झाले जे रोग ते दूर होतात.

## यवानीखांडवचूर्ण अरोचकादिकांवर.

यवानीदाडिमंशुंठीतिंतिडीकाम्लवेतसौ ॥ ९३ ॥ वदराम्लंचकुर्वीतचतुःशाणमितानिच ॥ सार्धद्विशाणंमरिचंपिप्पलीदशशाणिका ॥ ९४ ॥ त्वक्सौवर्चलधान्याकंजीरकंद्विद्विशाणकम् ॥ चतुःषष्टिमितैःशाणैः शर्करामत्रयोजयेत्॥ ९५ ॥ चूर्णितंसर्वमेकत्रयवानीखांडवाभिधम् ॥ चूर्णंजयेत्पांडुरोगंहृद्रोगंग्रहणींज्वरम् ॥ ९६ ॥ छर्दिशोषातिसारांश्च प्लीहानाहविबंधनाम् ॥ अरुचिंशूलमंदाग्निमर्शोजिव्हागलामयान् ॥९७॥

अजमोदा, डाळिंबसाल, सुंठ, चिंचेचीसाल. आम्लवेतस, आंवटबोर हीं सहा औषधें चार चार शाण घ्यावीं, अडीच शाण मिर्‍यें, पिंपळी १० शाण घ्यावीं, दालचिनी, संचळखार. धणे, जिरें हीं चार औषधें दोन दोन शाण घ्यावीं, साखर ६४ शाण घ्यावी, मग सारीं औषधें कुटून चूर्ण करावें या चूर्णाला यवानीखांडव चूर्ण असें म्हण-

तात, हें चूर्ण घेतलें असतां पंडुरोग, हृद्रोग, संग्रहणी, ज्वर, ओकारी, शोष, अतिसार, पोटांत डावीकडे कवलरोग होतो तो व मलबद्ध, अवदर्णे, शूळ, मंदाग्नि, मूळव्याध, जिभेचे रोग, कंठाचे रोग हे सारे रोग दूर होतात.

## तालीसादिचूर्ण अरोचकादिकांवर.

तालीसंमरिचंशुंठीपिप्पलीवंशरोचना ॥ एकद्वित्रिचतुःपंचकर्षैर्भागान्प्रकल्पयेत् ॥ ९८ ॥ एलात्वचोस्तुकर्षार्द्धंमत्येकंभागमावहेत् ॥ द्वात्रिंशत्कर्षतुलितामदेयाशर्कराबुधैः ॥ ९९ ॥ तालीसाद्यमिदंचूर्णंरोचनंपाचनंस्मृतम् ॥ कासश्वासज्वरहरंछर्द्यतीसारनाशनम् ॥ ४०० ॥ शोपाध्मानहरंप्लीहग्रहणीपांडुरोगजित् ॥ पक्त्वावाशर्करांचूर्णंक्षिपेत्स्यात्तुगुटिकाततः ॥ १ ॥

तालीसपत्र १ कर्ष, मिऱ्यें २ कर्ष, सुंठ ३ कर्ष, पिंपळी ४ कर्ष व वंशलोचन ५ कर्ष, विलायची व दालचिनी अर्धा कर्ष, साखर ३२ कर्ष घ्यावी. मग सारीं औषधें कुटून चूर्ण करून तें घेतलें असता तोंडास रुचि येते व अन्न पचन होतें. कास, श्वास, ज्वर, ओकारी, अतिसार, शोष, पोटफुगी, कवळ, संग्रहणी पंडुरोग हे सारे रोग दूर होतात. अथवा साखरेचा पाक करून त्यांत हें चूर्ण टाकून गोळ्या करून घेतल्या असतां चूर्णासारखेच गुण होतात,

## सितोपलादिचूर्ण कासक्षयपित्तादिकांवर.

सितोपलाषोडशस्यादष्टौस्याद्वंशलोचना॥ पिप्पलीस्याच्चतुःकर्षास्यादेलाचद्विकार्षिकी ॥ २ ॥ एककर्षस्त्वचःकार्यंचूर्णयेत्सर्वमेकतः ॥ सितोपलादिकंचूर्णंमधुसर्पियुतंलिहेत् ॥ ३ ॥ श्वासकासक्षयहरंहस्तपादांगदाहजित् ॥ मंदाग्निंसुप्तजिव्हत्वंपार्श्वशूलमरोचकम् ॥ ४ ॥ ज्वरमूर्ध्वगतंरक्तंपित्तमाशुव्यपोहति ॥

खडीसाखर १६ कर्ष वंशलोचन ८ कर्ष, पिंपळी ४ कर्ष, विलायची २ कर्ष, दालचिनी एक कर्ष हीं सारीं औषधें कुटून चूर्ण करावे, या चूर्णाला सितोपलादि चूर्ण असें म्हणतात. हें चूर्ण मध व तूप एके जागीं करून त्यांत घेतलें असतां, कास, श्वास, क्षय, हातपायाचा दाह होतो तो व अग्निमांद्य व जीभ शून्य पडते ती, पाठीचा शूळ, अवदर्णे, ज्वर, मस्तकांत रक्तविकार होतो तो व पित्तविकार हे रोग दूर होतात.

## भास्करलवणचूर्ण ग्रहणीगुल्मादिकांवर.

सामुद्रलवणंकार्यमष्टकर्षमितंबुधैः ॥५॥ पंचसौवर्चलंग्राह्यंविडसंभव

धान्यकम्॥पिप्पलीपिप्पलीमूलंकृष्णजीरकपत्रकम्॥६॥नागकेशरता लीसमम्लवेतसकतथा ॥ द्विकर्षमात्राण्येतानिप्रत्येकंकारयेद्बुधः ॥७॥ मरिचंजीरकंविश्वमेकैकंकर्षमात्रकम् ॥ दाडिमंस्याच्चतुःकर्षंत्वगेलाचार्द्ध कर्षिकी ॥८॥ एतच्चूर्णीकृतंसर्वंलवणंभास्कराभिधम् ॥ शाणप्रमाणंदे यंतुमस्तुतक्रसुरासवैः ॥ ९ ॥ वातश्लेष्मभवंगुल्मंप्लीहानमुदरक्षयम् ॥ अर्शांसिग्रहणींकुष्ठंविबंधंचभगंदरम् ॥ ४१० ॥ शोफंशूलंश्वासकासमा मदोपचहृद्रुजम्॥मंदाग्निंनाशयेदेतद्दीपनंपाचनपरम् ॥११ ॥सर्वलोकहि तार्थायभास्करेणोदितंपुरा ॥

समुद्रमीठ आठ कर्ष, सचळ पाच कर्ष, बिडखार, सैंधव, धणे, पिंपळी पिंपळमूळ, कृष्णजिरें, तमालपत्र, नागकेशर, तालीसपत्र आम्लवेतस हीं दहा औषधें दोन दोन कर्ष व मिरें, जिरें, सुंठ हीं तीन औषधें एक एक कर्ष व डाळिंबाचे फळाची साल चार कर्ष, दालचिनी व विलायची अर्धा अर्धा कर्ष हीं सारीं औषधें कुटून चूर्ण करून द- ह्याचे निवळींत, ताकांत, मद्यांत किंवा आसवाचे अनुपानांत एक शाण प्रमाण द्यावें तेणेंकरून वातकफापासून उत्पन्न झालें जें गुल्म तें व पोटांत डावेकडे क- वळ रोग होतो तो व उदररोग, क्षय, मूळव्याध, संग्रहणी, कुष्ठ, मळबद्ध, भगंदर, शूळ, सूज आणि श्वास, कास आमवायु, हृद्रोग, अग्निमांद्य हे रोग दूर होतात व अग्नि प्रदीप्त होतो व अन्नाचें पचन होतें व हें चूर्ण लोकांच्या हिताकारणें सूर्यानें सांगितलें आहे. यास्तव याचें नांव भास्करलवणचूर्ण असे जाणावें

## एलादिचूर्ण ओकारीवर.

एलाप्रियंगुमुस्तानिकोलमज्जाचपिप्पली ॥१२॥ श्रीचंदनंतथालाजा लवंगंनागकेशरम् ॥ एतच्चूर्णीकृतंसर्वंसिताक्षौद्रयुतंलिहेत् ॥ १३ ॥ वा तपित्तकफोद्भुतांछर्दिंहंत्यतिवेगतः ॥

विलायची, वाघाटीचें मूळ, अथवा राळे, नागरमोथे, बोराचे आंतला मगज, पिं- पळी, पांढरा चंदन, साळीच्या लाह्या, लवंग, नागकेशर, हीं नऊ औषधें कुटून चूर्ण करून मधसाखरेंत घेतलें असता, वातपित्त कफ यापासून उत्पन्न झाली जी ओकारी ती लवकर दूर होते.

## पंचनिंबचूर्ण कुष्टादिकांवर.

मूलंपत्रंफलंपुष्पंत्वचंनिंबात्समाहरेत् ॥ १४ ॥ सूक्ष्मचूर्णमिदंकुर्यात्

वकुलत्वक्चूर्ण दंतदृढीकरणावर.

वकुलत्वग्भवंचूर्णंघर्षयेद्दंतपंक्तिषु ॥
वज्रादपिदृढीभूतादंतास्युश्चपलाग्रुवम् ॥

वकुळीच्या सालीच्या चूर्णानें दात घासावे म्हणजे हालणारे दात वज्रासारखे बळकट होतात.

इति श्रीदामोदरसूनु शार्ङ्गधरेण विरचिताया संहिताया चिकित्सास्थाने चूर्णकल्पनाध्याय षष्ठ ॥ ६ ॥

---

# सप्तमोध्यायः

## वटककल्पना.

वटकाश्चाथकथ्यंतेतन्नामगुटिकावटी ॥ मोदकोवटिकापिंडीगुडोवर्तिस्त थोच्यते ॥ ३२ ॥ लेहवत्साध्यतेवन्हौगुडोवाशर्करायथवा ॥ गुग्गुलुर्वा क्षिपेत्तत्रचूर्णतन्निर्मितावटी ॥ ३३ ॥ कुर्यादवह्निसिद्धेनक्वचितगुग्गु लुनावटी ॥ द्रवेणमधुनावापिगुटिकांकारयेद्बुधः ॥ ३४ ॥ सिता चतुर्गुणादेयावटापुद्विगुणोगुडः ॥ चूर्णाच्चूर्णसमःकार्योगुग्गुलुर्मधुत त्समम् ॥३५॥ द्रवंचद्विगुणंदेयंमोदकेपुभिषग्वरैः ॥ कर्षप्रमाणातन्मा त्रावलंदृष्ट्वाप्रयुज्यते ॥ ३६ ॥

गुटिका, वटी, मोदक, वटिका, पिंडी, गुड, वर्ति हे सात वटकाचे पर्यायशब्द जाणावे याची कृती गुळाचा अथवा साखरेचा किंवा गुग्गुळाचा पाक करून त्यात चुर्ण टाकून गोळ्या कराव्या व पाक केल्यावाचून गोळ्या करावयाच्या असता गुग्गुळ शोधून वाटून त्यात चूर्ण मेळवून गोळ्या कराव्या, अथवा पाणी मध, दूध इत्यादिक द्रवद्रव्य जीं त्यात चूर्ण टाकून गोळ्या कराव्या व साखरेत गोळ्या करावयाच्या असल्या तर तो चूर्णाचे चौपट साखर घालून कराव्या व गुळात गोळ्या करावयाच्या असल्या तर तो चूर्णाचे दुप्पट घेऊन गोळ्या कराव्या व गुग्गुळ किंवा मध या दोहोंत गोळ्या करावया च्या असल्या तर तें चूर्णाचे समभाग घेऊन गोळ्या कराव्या व पाणी, दूध इत्यादिक द्रव पदार्थात गोळ्या करावयाच्या असल्या तर तें चूर्णाचे दुप्पट घेऊन त्यात गोळ्या कराव्या गोळ्या कर्षप्रमाण जाणाव्या अथवा रोग्याचे शक्तितारतम्य पाहून योजना करावी

वाहुशालगुड अर्शादिकांवर

इन्द्रवारुणिकामुस्तंशुंठीदंतीहरीतकी ॥ त्रिवृतसटीविडंगानिगोक्षुरश्चि त्रकस्तथा ॥ ३७ ॥ तेजोव्हाचद्विकर्षाणिपृथक्द्रव्याणिकारयेत् ॥

मूरणस्यपलान्यष्टौवृद्धदारुचतुष्पलम् ॥ ३८ ॥ चतुःपलंस्यात्भल्लातः क्वाथयेत्सर्वमेकतः ॥ जलद्रोणेचतुर्थांशंग्रृण्हीयात्क्वाथमुत्तमम् ॥३९॥ क्वाथद्रव्यात्रिगुणितंगुडंक्षिप्त्वापुनःपचेत् ॥ सम्यक्पक्वंचविज्ञात्वाचूर्णमेतत्प्रदापयेत् ॥ ४४० ॥ चित्रकस्त्रिवृतादंतीतेजोव्हापलिकापृथक् ॥ पृथक्त्रिपलिकाःकार्याव्योषैलामरिचत्वचः ॥ ४१ ॥ निक्षिपेन्मधुशीतेचतस्मिन्प्रस्थप्रमाणितम्॥एवंसिद्धोभवेत्श्रीमत्नवबाहुशालगुडःशुभः ॥ ४२ ॥ जयेदर्शांसिसर्वाणिगुल्मंवातोदरंतथा ॥ आमवातंप्रतिश्यायंग्रहणीक्षयपीनसान् ॥ ४३ ॥ हलीमकंपांडुरोगंप्रमेहंचरसायनम् ॥

कडूवृंदावन, नागरमोथे, सुंठ, दांतीमूळ, वाळहर्तकी, निशोत्तर, कचोरा. वावडिंग, गोखरू, चित्रक, तेजबळ हीं अकरा औषधें दोनकर्ष घ्यावीं व सुरण आठ पळें व वरधारा चार पळें व बिबवे चार पळें घ्यावें मग हीं सारीं औषधें कुटून त्यात दोन द्रोनप्रमाण पाणी घालून चवथाई पाणी राही तोंपर्यंत काढा करून साऱ्या औषधांचे तिप्पट गूळ घालून फिरून कढवून पाक करावा. त्यांत चूर्ण टाकावयाचें तें येणें प्रमाणे. चित्रक, निशोत्तर, दांतीमूळ, तेजबळ ही चार औषधें एक एक पळ प्रमाण घ्यावीं. व सुंठ, मिऱ्यें, पिपळी, आंवळे, दालचिनी, हीं पाच औषधें तीन तीन पळ प्रमाण घ्यावीं. मग साऱ्या औषधांचें चूर्ण करून त्या पाकांत टाकावें व मध एक प्रस्थ प्रमाणे घालून पाकाला मेळवावी. त्याला बाहुशालगुड असें म्हणतात. हा गुड घेतला असतां साऱ्या मूळव्याधी दूर होतात. गुल्म, वातोदर, वायूनें अंग जखडून रहातें तें व पडसे, संग्रहणी, क्षय, पीनस, हलीमक, पांडुरोग, परमा हे रोग दूर होतात. व हा बाहुशालगुड रसायन आहे असें जाणावें.

## मरीचादिगुटिका कासादिकांवर.

मरिचंकर्षमात्रंस्यात्पिप्पलीकर्षसंमिता ॥ ४४ ॥ अर्धकर्षोयवक्षारः कर्षयुग्मंचदाडिमम् ॥ एतच्चूर्णीकृतंयुंज्यादष्टकर्षगुडेनहि ॥ ४५ ॥ शाणप्रमाणांगुटिकांकृत्वावक्त्रेनिधारयेत् ॥ अस्याःप्रभावात्सर्वेपिकासायांत्येवसंक्षयम् ॥ ४६ ॥

मिऱ्यें एक कर्ष, पिपळी एक कर्ष, जवखार अर्धा कर्ष, दाळिंबसाल ■ कर्ष या चार औषधांचें चूर्ण करून आठ कर्ष गुळ घेऊन त्यांत तें चूर्ण टाकून गोळ्या शाणप्रमाण कराव्या. आणि गोळी मुखात धरावी तेणेंकरून सारे काम दूर होतात. याविषयीं संशय नाहीं

## व्याघ्रीजीरकादिगुटिका. ऊर्ध्ववातादिकांवर.

व्याघ्रीजीरकधात्रीणांचूर्णमधुयुतंलिहेत् ॥
ऊर्ध्ववातमहाश्वासतमकैर्मुच्यतेक्षणात् ॥ ४७ ॥

रिंगणी, जिरें, आंवळकाटी या तीन औषधाचें चूर्ण करून मधांत घेतलें असता ऊर्ध्ववायु, महाश्वास व तमकश्वास हे रोग क्षणांत दूर होतात.

## गुडादिगुटिका श्वासकासावर.

गुडशुंठीशिवामुस्तैर्गुटिकांधारयेन्मुखे ॥
श्वासकासेपुसर्वेषुकेवलंवाविभीतकम् ॥ ४८ ॥

सुंठ, बाळहर्तकी, नागरमोथे हीं तीन औषधें कुटून मग त्यात दुप्पट गुळ घालून गोळ्या करा-या मग एक गोळी तोंडांत धरली असतां सारे कास व श्वास हे दूर होतात. अथवा एकल्या बेहड्याची साल तोंडांत धरली असतांही श्वास व कास दूर होतात.

## आमलक्यादिगुटिका तृष्णादिकांवर.

आमलंकमलंकुष्ठंलाजाश्ववटरोहकम् ॥ एतच्चूर्णस्यमधुनागुटिकांधारये न्मुखे ॥ ४९ ॥ तृष्णांप्रवृद्धांहंत्येपामुखशोषंचदारुणम् ॥

आंवळकटी, कमळ, कोष्ठ, साळीच्या लाह्या व वडाच्या कोंवळ्या पारंब्यांच्या डिन्या या पाच औषधाचें चूर्ण मधात मेळवून गोळी करून तोंडांत धरली असता तहान फार लागते ती व तोंडास कोरड फार पडते ती हीं दोन्हीं दूर होतात.

## संजीवनीगुटिका सन्निपातादिकांवर.

विडंगंनागरंकृष्णापथ्यामलविभीतकौ॥ ४५० ॥वचागुडूचीभल्लातंस विषाचात्रयोजयेत् ॥ एतानिसमभागानिगोमूत्रेणैवपेषयेत् ॥ ५१ ॥ गुंजाभागुटिकाकार्यादद्यादार्द्रकजैरसैः॥एकामजीर्णगुल्मेपुद्वेविषूच्यां चदापयेत् ॥ ५२ ॥ तिस्रश्चसर्पदष्टेतुचतस्रःसंनिपातिके ॥ वटीसंजी वनीनाम्नीसंजीवयतिमानवम् ॥ ५३ ॥

वावडिंग, सुंठ, पिंपळी, बाळहिरडे, आंवळकटी, बेहडा, वेखंड, गुळवेल, भिलावा व वचनाग चांगला शुद्धकरून हीं दाहा औषधें समभाग घेऊन गाईचे मूत्रांत वाटून गोळ्या गुंजप्रमाण करून मग आल्याचे रसात अजीर्णास व गुल्मरोगास एक गोळी द्यावी. मोडशीस दोन, सर्पाचे विषास तीन, सन्निपातास चार गोळ्या द्याव्या व ही गोळी मनुष्यास संजीवन करिते ह्मणून हिला संजीवनी गुटिका ह्मणतात.

## व्योषादिगुटिका पीनसादिकांवर.

व्योषाम्लवेतसंचव्यंतालीसंचित्रकस्तथा ॥ जीरकंतिंतिडीकंचप्रत्येकं कर्षभागिकम् ॥ ५४ ॥ त्रिसुगंधंत्रिशाणंस्यात्गुडःस्यात्कर्षविंशतिः ॥ व्योषादिगुटिकाभामपीनसश्वासकासजित् ॥ ५५ ॥ रुचिस्वरकराग्न्यातप्रतिश्यायप्रणाशिनी ॥

सुंठ, मिर्चे, पिपळी, आम्लवेतस, चवक, तालीसपत्र, चित्रक, जिरें, चिंचेची साल हीं नऊ औषधें एक एक कर्ष प्रमाण घ्यावीं व दालचिनी, विलायची, तमालपत्र हीं तीन औषधें तीन तीन शाण प्रमाण घ्यावीं. मग सारीं औषधें कुटून एकत्र करून वीस कर्ष प्रमाण गुळ घेऊन त्यात तें चूर्ण मेळवून गोळ्या करून घ्याव्या. तेणें करून आम, पीनसरोग, श्वास, कास हे रोग दूर होतात व तोंडास रुचि येते, स्वर चांगला होतो व पडसें दूर होतें.

## गुडचतुष्टयवटिका आमादिकांवर.

आमेषुसगुडांशुंठीमजीर्णेगुडपिप्पलीम् ॥ ५६ ॥
कृच्छ्रेजीरगुडंदद्यादर्शःसुचगुडाभयाम् ॥

सुंठीचें चूर्ण करून त्यात गुळ मेळवून गोळी करून घ्यावी तेणेंकरून आम दूर होते व अजीर्ण झालें असता गुळ व पिंपळी एकाजागीं करून घ्यावी तेणेंकरून अजीर्ण दूर होतें, गुळ व जिरें एकाजागी करून घेतलें असता मूत्रकृच्छ्र दूर होतें, गुळ व बाळहिरडे एका जागीं करून घेतले असता मूळव्याध दूर होते

## वृद्धदारुकमोदक अर्शांवर.

वृद्धदारुकभल्लातशुंठीचूर्णेनयोजितः ॥ ५७ ॥
मोदकःसगुडोहन्यात्पद्विधार्गःकृतांजम् ॥

वरधारा, बिब्बा, सुंठ हीं तीन औषधें समान घेऊन चूर्ण करून त्यात त्याचें दुप्पट गुळ घालून गोळ्याकरून घ्याव्या तेणेंकरून साहा प्रकारची मुळव्याध दूर होते.

## सूरणवटक अर्शांवर.

शुष्कसूरणचूर्णस्यभागान्द्वात्रिंशदाहरेत ॥ ५८ ॥ भागान्षोडशचित्रस्यशुंठ्याभागचतुष्टयम् ॥ द्वौभागौमरिचस्यापिसर्वाण्येकत्रकारयेत् ॥ ५९ ॥ गुडेनपिंडिकांकुर्यादर्शसांनाशिनीपराम् ॥

सूरणवाळवून चूर्ण करून तें बत्तीस भाग, चित्रक १६ भाग. सुंठ चारभाग, मिर्चे

दोन भाग घ्यावीं. मग सारीं औषधें चूर्ण करून त्यांत गुळ सार्‍या औषधाचे दुप्पट घालून गोळ्या करून घ्याव्या तेणेंकरून सहाप्रकारची मूळव्याध दूर होते.

## बृहत्सूरणवटक अर्शावर.

सूरणोवृद्धदारुश्चभागैःषोडशभिःपृथक् ॥ ४६० ॥ मुसलीचित्रकौज्ञेयावष्टभागमितौपृथक् ॥ शिवाविभीतकौधात्रीविडंगंनागरंकणा ॥ ६१ ॥ भल्लातःपिप्पलीमूलंतालीसंचपृथक्पृथक् ॥ चतुर्भागप्रमाणानित्वगेलामरिचंतथा॥६२॥द्विभागमात्राणिपृथक्ततस्त्वेकत्रचूर्णयेत् ॥ द्विगुणेनगुडेनाथवटकान्कारयेद्बुधः ॥६३॥ प्रबलाग्निकराएतेतथार्शोनाशनाःपराः ॥ ग्रहणींवातकफजांश्वासंकासंक्षयामयम् ॥ ६४ ॥ प्लीहानंश्लीपदंशोफंहिक्कांमेहंभगंदरम् ॥ ॥ निहन्युःपलितंवृष्यास्तथामेध्यारसायनाः ॥ ६५ ॥

सुरण १६ भाग, वरधारा १६ भाग, मुसळी ८ भाग, चित्रक ८ भाग, हिरडे, हेटे, आंवळकटी, वावडिंग, सुंठ, पिंपळी, भिलावा, पिंपळमूळ, तालीसपत्र, हीं नऊ औषधें चार चार भाग व दालचिनी, विलायची, मिर्‍यें हीं तीन औषधें दोन दोन भाग घ्यावीं. मग सारीं औषधें कुटून चूर्ण करून त्याचे दुप्पट त्यांत गुळ घालून गोळ्या करून घ्यावा. तेणेंकरून अग्नि प्रदीप्त होतो. मूळव्याध व वातकफापासून उत्पन्न झाली जी संग्रहणी ती व श्वास, कास, क्षय, पोटांत टावेकडे कवळ रोग होतो तो, श्लीपद रोग, सूज, उचकी, परमा, भगंदर व जेणेंकरून पांढरे केस होतात तो व पलितरोग हे सारे रोग दूर होतात व ह्या गोळ्या स्त्रीगमनाविषयीं इच्छा देतात व बुद्धि देतात, शरीराची जरा दूर करितात.

## मंडूरवटक कामलादिकांवर.

त्रिफलात्र्यूषणंचव्यंपिप्पलीमूलचित्रकौ ॥ दारुमाक्षिकधातुस्त्वक्दार्वीमुस्तंविडंगकम् ॥ ६६ ॥ प्रत्येकंकर्षमात्राणिसर्वद्विगुणितंतथा॥मंडूरंचूर्णयेत्सर्वंगोमूत्रेष्टगुणेक्षिपेत् ॥६७॥ पक्त्वाचवटकान्कृत्वादद्यात्तक्रानुपानतः ॥ कामलापांडुमेहार्शःशोथकुष्टकफामयान् ॥ ६८ ॥ ऊरुस्तंभमजीर्णंचप्लीहानंनाशयंतिच ॥

हिरडा, बेहडा, आंवळकटी, सुंठ, मिर्‍यें, पिंपळी, चवक, देवदार, सोनामुखीचें भस्म दालचिनी, दारुहळद, नागरमोथे, वावडिंग हीं तेरा औषधें एक एक कर्ष प्रमाण घे-

ऊन चूर्ण करून त्याचे दुप्पट मंडूर घ्यावा आणि सर्व्यांचे आठ गुण गोमूत्र घेऊन त्यांत तें चूर्ण व मंडूर टाकून कढवून गोळ्या करून ताकांत घ्यावा. नेणेकरून डोळ्यात कावीळरोग होतो तो, पांडुरोग, परमा, मळव्याध, सूज, कुष्ट, कफविकार व जेणेकरून मांसांचा स्तंभ होतो तो व वायु, अजीर्ण कफरू हे सारे रोग दूर होतात.

## चंद्रप्रभागुटिका प्रमेहादिकांवर.

चंद्रप्रभावचामुस्तंभूनिंबामृतदारुकम् ॥६९॥ हरिद्रातिविषादार्वीपिप्पलीमूलचित्रकौ ॥ धान्याकंत्रिफलाचव्यंविडंगंजपिप्पली॥४७०॥ व्योषंमाक्षिकधातुश्चद्वौक्षारौलवणत्रयम् ॥एतानिशाणमात्राणिप्रत्येकंकारयेद्बुधः ॥ ७१ ॥ त्रिवृद्दंतीपत्रकंचत्वगेलावंशरोचना ॥ प्रत्येकंकर्षमात्रंचकुर्यादेतानिबुद्धिमान् ॥ ७२ ॥ द्विकर्षहतलोहःस्याच्चतुःकर्षासिताभवेत् ॥ शिलाजित्त्वष्टकर्षस्यादष्टौयर्षास्तुगुग्गुलोः ॥ ७३॥ एभिरेकत्रसंक्षुण्णैःकर्तव्यागुटिकाशुभा ॥ चंद्रप्रभेतिविख्यातासर्वरोगप्रणाशिनी ॥ ७४॥ प्रमेहविंशतिंकृच्छ्रंमूत्राघातंतथाश्मरीम्॥विबंधानाहशूलानिमेहनंग्रंथिमर्बुदम् ॥ ७५ ॥ अंडवृद्धिंतथापांडुकामलांचहलीमकम् ॥ अंत्रवृद्धिंकटीशूलंश्वासंकासंविचर्चिकाम् ॥ ७६ ॥ कुष्ठान्यर्शांसिकंडूंचप्लीहोदरभगंदरम् ॥ दंतरोगंनेत्ररोगंस्त्रीणामार्तवजांरुजम् ॥ ७७ ॥ पुंसांशुक्रगतान्दोषान्मंदाग्निमरुचिंतथा ॥ वायुंपित्तंकफंहन्यात्बल्यावृष्यारसायनी ॥ ७८ ॥ चंद्रप्रभायांकर्षस्तुचतुःशाणोविधीयते ॥

कचोरा, वेखंड, नागरमोथे, किराईत, गुळवेल, देवदार, हळद, अतिविष, दारुहळद, पिंपळमूळ, चित्रक, धणे, हिरडा, बेहडा, आंवळकटी, चवक, वावडिंग, गजपिंपळी, सुंठ, मिरें, पिंपळी, सोनामुखीचें भस्म, जवखार, साजीखार, सैंधव, संचळखार, बिडखार हीं सतावीस औषधें शाण शाण प्रमाण व निशोत्तर, दांतीमूळ, तमालपत्र, दालचिनी, विलायची, वंशलोचन हीं सहा औषधें एक एक कर्ष घेऊन सर्व्यांचें चूर्ण करावें व लोहभस्म दोन कर्ष व खडीसाखर चार कर्ष, शिळाजित आठ कर्ष, गुग्गुळ ८ कर्ष घ्यावा. मग हीं सारीं औषधें एका जागीं वाटून त्यांत तें चूर्ण वाटून कर्षप्रमाण म्हणजे ४ शाण प्रमाण गोळ्या बांधाव्या. कारण या रसायनाचे ठायीं कर्ष शब्द चोरीं शाणांचा बोधक जाणावा. या मात्रेला चंद्रप्रभा असें म्हणतात. ही चंद्रप्रभा सारे रोग नष्ट करण्याविषयीं विख्यात आहे. इजपासून वीस प्रकारचे परमे व मूत्रकृच्छ्र, मूत्राघात.

मूतखडा, मळबद्ध, पोटफुगी, शूळ, प्रमेहपिटिका, अर्बुद ( जेणेंकरून वृषण मोठा होतो तो रोग ) पाडुरोग, कावीळ, हलीमकरोग, अंतगलवायु, कंबरेचाशूळ, श्वास, कास, पाय फुटतात तो विचर्चिकारोग, कुष्ट, मूळव्याध, कवळू, कड्, भगंदर, दंतरोग, नेत्ररोग, स्त्रियांस धुपणी लागते ती व पुरुषाचे धातुगतविकार व अग्निमांद्य व आवढणें व वांत, पित्त, कफ यांचा प्रकोप हे सारे रोग दूर होतात. ही चंद्रप्रभा बल देणारी व स्त्रीगमनाविषयीं इच्छा देणारी रसायनी आहे असें जाणावें.

## कांकायनगुटिका गुल्मादिरोगांवर.

यवानीजीरकंधान्यंमरीचंगिरिकर्णिका ॥७९॥ अजमोदोपकुंचीचच
तुःशाणाःपृथक्पृथक्॥ हिंगुपट्शाणिकंकार्यंक्षारौलवणपंचकौ ॥४८०॥
त्रिवृच्चाष्टमितैःशाणैः प्रत्येकंकल्पयेत्सुधीः ॥ दंतीसठीपौष्करंचविडं
गंदाडिमंशिवा ॥ ८१ ॥चित्रोम्लवेतसःशुंठीशाणैःषोडशभिःपृथक् ॥
बीजपूररसेनैषांगुटिकांकारयेद्बुधः ॥ ८२ ॥ घृतेनपयासामद्यैरम्लैउ
ष्णोदकेनवा ॥ पिबेत्कांकायनप्रोक्तांगुटिकांगुल्मनाशिनीम् ॥ ८३ ॥
मद्येनवातिकंगुल्मगोक्षीरेणचपैत्तिकम् ॥ मूत्रेणकफगुल्मंचदशमूलैस्त्रिदो
षजम् ॥ ८४ ॥ उष्ट्रीदुग्धेननारीणांरक्तगुल्मंतिवारयेत् ॥ हृद्रोगंग्रह
णीशूलक्रमीनर्शांसिनाशयेत् ॥ ८५॥

ओंवा, जिरें, धणे, मिऱ्यें, विष्णुक्रांता, अजमोदा, कलोजी हीं सात औषधें चार चार शाण प्रमाण व हिंग भाजून सहा शाण प्रमाण, जवखार, साजीखार, सैंधव, संचळखार, बिडलोण, समुद्रमीठ, वांगडखार, निशोत्तर हीं आठ औषधें आठ आठ शाण व दांतिमूळ, कचोरा, पोखरामूळ, वावडिंग, डाळिंबसाल, बाळहिरडे, चित्रकमूळ, आम्लवेतस, सुंठ हीं नऊ औषधें सोळा सोळा शाण प्रमाण घ्यावीं. मग हीं सारीं औषधें कुट्न चूर्ण करून महाळुंगाच्या रसांत गोळ्या कराव्या. याला कांकायनगुटिका असें ह्मणतात. ही गुटिका तुपांत अथवा गाईचे दुधात अथवा आंबट मद्यात अथवा ऊन पाण्यात गुल्म रोग दूर होण्याविषयीं घ्यावी. ही गोळी मद्यात घेतली असता वातगुल्म दूर होतें. गाईचे दुधांत घेतली असता पित्तगुल्म दूर होतें व गोमूत्रांत घेतली असतां कफगुल्म दूर होतें व दशमूळाचे काढ्यांत घेतली असता त्रिदोषगुल्म दूर होतें व उंटिणीचे दुधान घेतली असता स्त्रियांस क्तगुल्म होते तें दूर होतें व हृद्रोग, संग्रहणी, शूळ, जंतविकार, मूळव्याध हे रोग र होतात.

## योगराजगुग्गुळ वातादिरोगांवर.

नागरंपिप्पलीचव्यंपिप्पलीमूलचित्रकैः ॥ भृष्टंहिंग्वजमोदंचसर्षपाजीर कद्वयम् ॥ ८६ ॥ रेणुकेंद्रयवाःपाठाविडंगंगजपिप्पली ॥ कटुकातिवि पाभार्गीवचामूर्वेतिभागतः ॥ ८७ ॥ प्रत्येकंशाणिकानिस्युर्द्रव्याणीमा निविंशतिः ॥ द्रव्येभ्यःसकलेभ्यश्चत्रिफलाद्विगुणाभवेत् ॥ ८८ ॥ एभिश्चूर्णीकृतैःसर्वैःसमोदेयस्तुगुग्गुलुः ॥ वंगंरौप्यंचनागंचलोहसारं तथाऽभ्रकम् ॥८९॥ मंडूरंरससिंदूरंप्रत्येकंपलसंमितम्॥गुडपाकसमंकृ त्वाइमंदद्याद्यथोचितम्॥९०॥एकपिंडंततःकृत्वाधारयेत्घृतभाजने ॥ गुटिकाःशाणमात्रास्तुकृत्वाग्राह्यायथोचिताः ॥ ९१ ॥ गुग्गुलुर्यो गराजोयंत्रिदोषघ्नोरसायनः ॥ मैथुनाहारपानानांत्यागोनैवात्रविद्यते ॥ ९२ ॥ सर्वान्वातामयान्कुष्ठानिर्शांसिग्रहणीगदम् ॥ प्रमेहंवातरक्तं चनाभिशूलंभगंदरम्॥९३॥उदावर्तंक्षयंगुल्ममपस्मारमुरोग्रहम्॥मंदाग्नि श्वासकासांश्चनाशयेदरुचिंतथा ॥ ९४ ॥ रेतोदोषहरःपुंसांरजोदोषह रःस्त्रियां ॥ पुंसामपत्यजनकोवंध्यानांगर्भदस्तथा ॥ ९५ ॥ रास्नादि क्वाथसंयुक्तोविविधहंतिमारुतम्॥काकोल्यादिशृतात्पित्तंकफमारग्वधा दिना ॥ ९६ ॥ दार्वीशृतेनमेहांश्चगोमूत्रेणैवपांडुताम् ॥ मेदोवृद्धिंचम धुनाकुष्ठंनिंबशृतनवा ॥ ९७ ॥ छिन्नक्वाथेनवातास्रंशोथशूलंकणा शृतात् ॥ पाटलाक्वाथसहितोविषंमूतजंजयेत् ॥ ९८ ॥ त्रिफला क्वाथसहितोनेत्रार्तिंहंदारुणाम् ॥ पुनर्नवादिक्वाथेनहन्यात्सर्वो दराण्यपि ॥ ९९ ॥

सुंठ, पिंपळी, चवक, पिंपळमूळ, चित्रक, भाजलेला हिंग, अजमोदा, शिरस, जिरें शहाजिरें, रेणुकबीज, इंद्रजव, पहाडमूळ, वावडिंग, गजपिंपळी, कटुकी, अतिविष, भारंगमूळ वेखंड, मोरवेल हीं विस औषधें शाण शाण प्रमाण घ्यावीं व या औषधांचे दुप्पट त्रिफळा घ्यावी. मग हीं सारीं औषधें कुटून चूर्ण करून त्याचे समभाग शुद्ध केलेला गुग्गुळ घेऊन बारीक वाटून गुळाचे पाकाप्रमाणें पातळ करून त्यांत हें चूर्ण घालावें मग वंगभस्म व रौप्यभस्म, नागभस्म, लोहभस्म, अभ्रकभस्म, मंडूरभस्म व रससिंदूर हीं सातभस्में पळपळ प्रमाण त्या गुग्गुळांत घालून सान्यास एक पिंड करून त्याच्या गोळ्या शाणशाण प्रमाण बांधून तुपाचे भरलेल्या मडक्यांत ठेवाव्या याला योग

राजगुग्गुळ असें ह्मणतात. हा गुग्गुळ घेतला असतां त्रिदोष दूर करितो. व हें रसायन आहे याला मैथुन व खाणें, पिणें यांचा निषेध नाहीं. पथ्य केल्यावांचून गुण होतो. या पासून सारे वायूचे रोग, कुष्ट, मूळव्याध, संग्रहणी, परमा, वातरक्त, नाभीचा शूळ, भगंदर, उदावर्तवायु, क्षयरोग, गुल्म फेंपरें, उरोग्रहरोग, अग्निमांद्य, कास, श्वास, आवदर्णे हे रोग दूर होतात. हा योगराजगुग्गुळ पुरुषाचे धातूचा विकार दूर करितो. स्त्रियांच्या विटाळाचा रोग दूर करितो. पुरुषाची धातु वाढवून पुत्र देणारा होतो. वांझोट्या स्त्रियांना गर्भ देतो. रास्नादिकाढ्यांत घेतला असतां नानाप्रकारचे वायु दूर होतात. कांकोल्यादि काढ्यात घेतला असतां पित्तरोग दूर होतो. आरग्वधादिकाढ्यांत घेतला असतां कफ दूर होतो. दारुहळदीचे काढ्यांत परमे दूर होतात. गोमूत्रांत घेतला असतां पांडुरोग जातो. शरीरात मेदा दुष्ट होऊन शरीर वाढलें असतां मधांत घ्यावा. कुष्टरोगास कडुनिंबाचे काढ्यांत घ्यावा. रक्तवायूवर गुळवेलीचे काढ्यांत. शूळ व सूज यांजवर पिंपळीचे काढ्यांत. उंदिराचे विषावर पाडळीचे काढ्यांत. डोळ्याचे रोगांवर त्रिफळेचे काढ्यांत. पुनर्नवादिकांचे काढ्यांत साऱ्या उदर रोगांवर घ्यावा. याप्रमाणें अनुपानें जाणावीं.

## कैशोरगुग्गुळ वातरक्तादिकांवर.

त्रिफलायास्त्रयःप्रस्थाःप्रस्थैकाचामृताभवेत् ॥ संकुट्यलोहपात्रेतुसार्धे द्रोणांबुनापचेत् ॥ ५०० ॥ जलमर्धशृतंज्ञात्वागृह्णीयाद्वस्त्रगालितम् ॥ कायेक्षिपेत्तुशुद्धंचगुग्गुलुंप्रस्थसंमितम् ॥ १ ॥ पुनःपचेदयःपात्रेदर्व्यासं घट्टयेन्मुहुः ॥सांद्रीभूतंचतंज्ञात्वागुडपाकसमाकृतिम् ॥२॥ चूर्णीकृत्य ततस्तत्रद्रव्याणीमानिनिक्षिपेत् ॥ त्रिफलार्धपलाज्ञेयागुडूचीपलिकाम ता ॥ ३ ॥ षडक्षंत्र्यूषणंप्रोक्तंविडंगानांपलार्धकम् ॥ दंतीकर्षमिताका र्यात्रिवृत्कर्षमितास्मृता ॥ ४ ॥ ततःपिंडीकृतंसर्वघृतपात्रे विनिक्षि पेत् ॥ गुटिकाःशाणिकाःकार्यायुंज्याद्दोषाद्यपेक्षया ॥ ५ ॥ अनुपाने भिषक्कुर्यात्कोष्णनीरंपयोथवा ॥ मंजिष्ठादिशृतंवापियुक्तियुक्तमतः परम् ॥६ ॥ जयेत्सर्वाणिकुष्ठानिवातरक्तंत्रिदोषजम् ॥ सर्वव्रणाश्चगु ल्मांश्चप्रमेहपिटिकास्तथा ॥ ७ ॥ प्रमेहोदरमंदाग्निकासश्वयथुपांडु जान् ॥ हंतिसर्वामयान्नित्यमुपयुक्तरसायनः ॥ ८ ॥ कैशोरकाभि धानोयंगुग्गुलुःकांतिकारकः ॥ वासादिनानेत्रगदान्गुल्मादीन्वरुणा दिना ॥ ९ ॥ क्वाथेनखदिरस्यापिव्रणकुष्ठानिनाशयेत् ॥ आम्लंती

क्षणमजीर्णंचव्यवायंश्रममातपम् ॥ ५१० ॥ मद्यंरोषंत्यजेत्सम्यक्गुणार्थीपुरसेवकः ॥

हिरडे, बेहेडे, आवळकटी, गुळवेल हीं चार औषधें एक प्रस्थ घेऊन थोडीं कुटून लोखंडाचे कढयीत दीड द्रोण पाणी घालून त्यात तीं औषधें टाकून अर्धे पाणी राही तों पर्यंत काढा कढवून गाळून घ्यावा. मग शुद्ध केलेला गुग्गुळ एक प्रस्थ प्रमाण घेऊन बारीक वाटून त्या काढयात मेळवून फिरून लोहाचे कढयींत घालून लोहाचे पळीनें वारंवार घाटून गुळाचे पाकासारखा घण होई तोंपर्यंत पाक करावा. त्यात दुसरे चूर्ण टाकावयाचीं औषधें येणेप्रमाणें. हिरडा, बेहडा, आवळकटी, गुळवेल हीं चार औषधें अर्धे अर्धे पळ प्रमाण. सुंठ, मिर्यें, पिंपळी हीं तीन औषधें दोन दोन अक्ष प्रमाण, वावडिंग अर्धेंपळ, दातीचें मूळ एक कर्ष निशोत्तर एक कर्ष या साऱ्या औषधाचें चूर्ण करून त्या पाकांत टाकून मेळवून गोळा करून शाण शाण प्रमाण गोळ्या बांधून तुपाचे रावल्या मडक्यात ठेवाव्या. याला कैशोरगुग्गुळ म्हणतात हा गुग्गुळ कोमट पाण्यात अथवा दुधात अथवा मंजिष्ठादिकाढयात घ्यावा या गोळ्या रोग्याचे शक्तीचें तारतम्य व रोग तारतम्य पाहून अनुपान योजून घाव्या तेणेंकरून सारीं कुष्टें व त्रिदोषापासून जाहालें जें वातरक्त तें व सारे व्रण, गुल्म, प्रमेह, पिटिका, परमा, उदर, अग्निमांद्य, कास, पांडुरोग हे रोग दूर होतात हा कैशोर गुग्गुळ कांति करणारा आहे. वासकादि काढयात घेतला असता डोळ्याचे रोग दूर होतात. वरुणादिकाढयात घेतला असता गुल्मादिक रोग दूर होतात खदिरादिकाढयात घेतला असता व्रणरोग, कुष्टरोग हे दूर होतात आंबट, तिखट, अजीर्ण, स्त्रीजवळ जाणें, मेहनत करणें, ऊन घेणं, मद्य पिणें, रागें भरणें हीं सारीं ज्याला गुणाची इच्छा आहे त्याणें वर्जकरून चागलें पथ्य करावें म्हणजे मनाजोगा गुण येतो.

## त्रिफळागुग्गुळ भगंदररोगादिकांवर.

त्रिपलंत्रिफलाचूर्णंकृष्णाचूर्णपलोन्मितम् ॥ ११ ॥ गुग्गुलुःपंचपलिकः क्षोदयेत्सर्वमेकतः ॥ ततस्तुगुटिकांकृत्वाप्रयुज्याद्वह्न्यपेक्षया ॥ १२ ॥ भगंदरगुल्मशोथार्शांसिचविनाशयेत् ॥

हिरडा, बेहडा, आवळकटी व पिंपळी हीं चार औषधें एकेक पळ प्रमाण घेऊन चूर्ण करावें मग शुद्ध केलेला गुग्गुळ पाच पळ प्रमाण घेउन चागला वाटून त्यात तें चूर्ण मेळवून गोळ्या करून रोगियाचें शक्तितारतम्य पाहून घाव्या तेणेंकरून भगंदर, गुल्म, सूज, मूळव्याध हे रोग दूर होतात.

## गोक्षुरादिगुग्गुळ प्रमेहादिकांवर.

अष्टाविंशतिसंख्यानिपलान्यानीयगोक्षुरात् ॥ १३ ॥ विपचेतूषड्गुणे नीरेक्काथोग्राह्योर्द्धशेषितः ॥ ततःपुनःपचेत्तत्रपुरंसप्तपलंक्षिपेत्॥१४॥ गुडपाकसमाकारंज्ञात्वातत्रविनिक्षिपेत् ॥ त्रिकटुत्रिफलामुस्तंचूर्णितंप लसप्तकम् ॥ १५ ॥ ततःपिंडीकृतंचास्यगुटिकामुपयोजयेत् ॥ हन्यात्प्रमेहंकृच्छ्रंचप्रदरंमूत्रघातकम् ॥ १६ ॥ वातास्रंवातरोगांश्च शुक्रदोषंतथाश्मरीम् ॥

अठ्ठावीस पळें गोखरू आणून थोडें कुटून त्यांत पाणी सहा गुण घालून अर्धें पाणी राही तें पावेतों काढा कढवावा. मग शुद्ध केलेला गुग्गुळ सात पळ प्रमाण घेऊन चां-गला वाटून त्या काढ्यांत घालून फिरून गुळाचे पाकासारखा घण होई तोंपर्यंत पाक करावा. त्यांत चूर्ण टाकावयाचीं औषधें येणेंप्रमाणें. सुंठ, मिऱ्यें, पिंपळ हिरडा, बेहेडा, आंवळकटी, नागरमोथे हीं सात औषधें पळ पळ प्रमाण घेऊन चूर्ण करून त्या पाकात मेळवून एक पिंड करून मग त्याच्या गोळ्या बांधून घ्याव्या. तेणेंकरून परमा, मूत्र-कृच्छ्र, स्त्रियांस धुपणी लागते ती व मूत्रघात, वातरक्त, वातरोग, धातूचा विकार, मूतखडा हे रोग दूर होतात.

## त्रिफलामोदक कुष्टादिकांवर.

त्रिफलाऽष्टपलाकार्याभल्लातानांचतुःपलम् ॥१७॥ वाकुचीपंचपलिका विडंगानांचतुःपलम् ॥ हतलोहंत्रिवृच्चैवगुग्गुलुश्चशिलाजतु ॥ १८ ॥ एकैकंपलमात्रंस्यात्पलार्धंपौष्करंभवेत् ॥ चित्रकस्यपलार्धंस्याद्द्विपाणं मरिचंभवेत् ॥ १९ ॥ नागरंपिप्पलीमस्तत्वगेलापत्रकुंकुमम् ॥ श.णोन्मितंस्यादेकैकंचूर्णयेत्सर्वमेकतः ॥ ५२० ॥ ततस्त त्प्रक्षिपेच्चूर्णंपक्वखंडेचमत्सते ॥ मोदकान्पलिकान्कृत्वाप्रयुंजीतयथो चितान् ॥ २१ हन्युःसर्वाणिकुष्ठानित्रिदोषप्रभवामयान् ॥ भगंदर प्लीहगुल्मानजिव्हातालुगलामयान् ॥ २२ ॥ शिरोक्षिभ्रूगतान्रोगान्म न्यापृष्ठगतानपि ॥ प्राग्भोजनस्यदेयंस्यादधःकायस्थितेगदे ॥ २३ ॥ भेषजंभक्तमध्येचरोगेजठरसंस्थिते॥भोजनस्योपरिग्राह्यमूर्ध्वंचत्रुगदेपुज२४॥

हिरडा, बेहडा, आंवळकटी हीं तीन औषधें आठ पळ प्रमाण व भिलावे चार पळ प्रमाण, बांवच्या पाच पळ प्रमाण, वावडिंगें चार पळ प्रमाण व लोहभस्म, निशोत्तर,

गुग्गुळ, शिलाजित हीं चार औषधें पळ पळ प्रमाण. पोखरमूळ अर्धपळ, चित्रक अर्धपळ, मिरें दोन शाण प्रमाणें व सुंठ, पिंपळी, नागरमोथे, , दालचिनी, विलायची, तमालपत्र, नागकेशर हीं सात औषधें एक एक शाण घ्यावीं. मग सारीं औषधें कुटून चूर्ण करून त्याचे समभाग राख घेऊन पाक करून त्यात तें चूर्ण टाकून त्याचे मोदक एक पळ प्रमाण करून घ्यावे. तेणेंकरून सारीं कुष्टें दूर होतात व त्रिदोषांपासून उत्पन्न झाला जो भगंदर रोग, कौढ, गुल्म जिभेचा रोग, टाळूचे व माथ्याचे रोग, डोळ्याचे रोग, भिवयांचे रोग, मानेचे रोग, पाठीचे रोग हे रोग दूर होतात, कंबरेपासून पायापावेतों रोग आहे तर प्रातःकाळीं औषध घ्यावें व पोटांत रोग आहे तर जेवते वेळेस भाताबरोबर घ्यावें व छातीपासून माथ्यापावेतों रोग आहे तर भोजन झाल्यावर घ्यावें.

## कांचनारगुग्गुळ गंडमाळादिकांवर.

काञ्चनारत्वचोग्राह्यंपलानांदशकंबुधैः ॥ त्रिफलाषट्पलाकार्यात्रिकटु स्यात्पलत्रयम् ॥ २५ ॥ पलैकंवरणंकुर्यादेलात्वक्पत्रकंतथा ॥ एकैकं कर्षमानंस्यात्सर्वाण्येकत्रचूर्णयेत् ॥ २६ ॥ यावच्चूर्णमिदंसर्वंतावन्मात्रस्तुगुग्गुलुः ॥ संकुट्यसर्वमेकत्रपिंडंकृत्वाचधारयेत् ॥ २७ ॥ गुटिकाःशाणिकाःकार्याप्रातर्ग्राह्यायथोचिताः ॥ गंडमालांजयत्युग्रामपचीमर्बुदानिच ॥ २८ ॥ ग्रंथीन्व्रणांश्चगुल्मांश्चकुष्ठांश्चसृष्टानिचभगंदरम् ॥ प्रदेयश्चानुपानार्थंक्वाथोमुंडितिकाभवः ॥ २९ ॥ क्वाथःखदिरसारस्यपथ्याक्वाथोष्णकंजलम् ॥

कांचनाराची साल दाहापळें प्रमाण व हिरडा, बेहडा, आवळकाठी, हीं तीन औषधें दोन दोन पळ प्रमाण म्हणून सहा पळें. सुंठ, मिरें, पिंपळी हीं तीन औषधें पळ पळ प्रमाण व वायवर्णा एक पळ व विलायची, दालचिनी, तमालपत्र हीं तीन एकेक कर्ष प्रमाण घ्यावीं. मग सारीं औषधें कुटून चूर्ण करून त्याचें समभाग गुग्गुळ घालून त्यात हें चूर्ण मिळवून एक गोळा करून मग त्याच्या गोळ्या शाण शाण प्रमाण करून प्रातःकाळीं मुंडीचे काढ्यानें अथवा खैराच्या काष्ठाचा सार त्याचे काढ्यानें अथवा हिरड्याचे काढ्यानें अथवा ऊन पाण्यानें गोळी घेत जावी. तेणेंकरून मोठ्या दुर्धर उग्र गंडमाळा व गंडमाळेचा भेद अपची रोग, अर्बुद, ग्रंथी, व्रण, गुल्म, कुष्ठ, भगंदर हे रोग दूर होतात.

## माषादिमोदक धातुपुष्टीवर.

निस्तुषंमाषचूर्णंस्यात्तथागोधूमसंभवम् ॥ ५३० ॥ निस्तुषंयवचूर्णंचना

लितंदुलजंतथा ॥ सूक्ष्मंचपिप्पलीचूर्णपलिकान्युपलल्पयेत् ॥ ३१ ॥
एतदेकी कृतंसर्वंभर्जयेत्गोघृतेनच ॥ धर्ममात्रेणसर्वेभ्यस्ततःखंडंस
मंक्षिपेत् ॥३२॥ जठंचद्विगुणंदत्वापाचयेच्चशनैःशनैः ॥ ततःपक्कंस
मुद्धृत्यवृत्तानकुर्वीतमोदकान ॥ ३३ ॥ भुत्कासायंपलेकंचपिबेत्क्षीरंच
तुर्गुणम् ॥ वर्जनीयोविशेषणक्षाराम्लौद्वौरसावपि ॥ ३४ ॥ कृत्वैवंरम
येन्नारीर्वव्हीर्नक्षीयतेनरः ॥
उडदांच्या डाळीचें चूर्ण व गव्हाचें चूर्ण व जवांचा कोंडा काढून त्याचें चूर्ण व तांदु-
ळाचें चूर्ण व पिंपळीचें चूर्ण हीं सारी चूर्णें एक एक पळ प्रमाण घेऊन एकाजागीं करून
त्यांचे अर्धे तूप त्यांत घालून चांगली भाजून मग साऱ्यांचे समभाग साखर व साखरेचे दु-
प्पट पाणी त्यांत घालून पाक करून त्याचे लाडू एकपळ प्रमाण वांधून मग रात्रीस तो
लाडु एक खाऊन त्यावर चार पळ प्रमाण दुध प्यावें. आंबट, खारट हे पदार्थ वर्ज
करावे. याप्रमाणें केलें असतां मनुष्य बहुत स्त्रिया भोगीत असतांही क्षिणबळ होत नाहीं.

इति श्रीदामोदरसूनु शार्ङ्गधरेण विरचितायां संहितायां चिकित्सास्थाने वटककल्पनानाम
सप्तमोध्यायः ॥ ७ ॥

---

# अष्टमोध्यायः

## अवलेहकल्पना

क्काथादीनांपुनःपाकात् घनत्वंसारसक्रिया ॥ ३५ ॥ सोपलेहचलेहः
स्यात्तन्मात्रास्यात्पलोन्मिता॥सिताचतुर्गुणाकार्याचुर्णाच्चद्विगुणोगु
डः ॥ ३६ ॥ द्रवंचतुर्गुंदद्यादितिसर्वत्रनिश्चयः ॥ सुपक्केतंतुमत्वंस्याद
वलेहोप्सुमज्जति ॥ ३७ ॥ खरत्वंपीडितेमुद्रागंधवर्णरसोद्भवः ॥ दुग्ध
मिक्षुरसंयूषंचपमूलकषायजम् ॥ ३८ ॥ वानाकार्यंयथायोग्यमनु
पानंप्रशस्यते ॥
औषधाचे काढे आदिशब्देंकरून फाटादिक हे फिरून आटवून साखरेचे पाकासारिखा
घण करितात त्याला रसक्रिया असे म्हणतात. त्या रसक्रियेचे पर्यायशब्द अवलेह व लेह
असे जाणावे व त्या अवलेहाचें मान एक पळ प्रमाण जाणावें. त्या अवलेहात साखर घाला
वयाची असतां चूर्णाचे चौपट घालावी. गूळ घालावयाचा असतां चूर्णाचे दुप्पट घालावा
पाणी, दूध, मूत्र व दुसरे पातळ पदार्थ हे चूर्णाचे चौपट घालावे असा अवलेहाविषयीं
सर्वत्र निश्चय जाणावा. त्या अवलेहाचा पाक चांगला आल्याची

परीक्षा पाक झाला ह्मणजे अवलेहाला तार येते व पाण्यांत टाकला असतां बुडतो व तो अवलेह बोटांनें चेंपला असतां कठीण व चिकट लागतो. त्या पाकाचे अपूर्व गंध व वर्ण व रस होतात. या प्रकारें चांगला पाक झाल्याचीं लक्षणें जाणावीं. त्या अवलेहाचीं अनुपानें दूध व उंसाचा रस व पंचमूळकाढ्यांचा युष व अडुळशाचा काढा इत्यादिक आहेत. तीं रोगतारतम्य पाहून योजावीं-

## कंटकार्यावलेह उचकीश्वासकासावर.

कंटकारीतुलांनीरद्रोणेपक्त्वाकषायकम् ॥ ३९ ॥ पादशेषंगृहीत्वाचत स्मिन्चुर्णानिक्षापयेत ॥ पृथक्पलानिचैतानि गुडूचीचव्यचित्रकाः॥ ॥५४०॥ मुस्तकर्कटशृंगीचत्र्यूपणंधन्वयासकः॥भार्गीरास्नासटीचैवशर्क रापलविंशतिः॥४१॥प्रत्यकंचपलान्यष्टौप्रदद्यातघृततैलयोः ।।पक्त्वाले ·हत्वमानीयशीतेमधुपलाष्टकम् ।।४२।। जतुःपलंतुगाक्षीर्याःपिप्पलीनां चतुःपलम ॥ क्षित्वानिदध्यात्सुदृढेमून्मयेभाजनेशुभे ॥ ४३ ॥ लेहोयं हंतिहिक्कार्तिश्वासकासानपेतः ॥

रिंगणी एक तुळा प्रमाण वजन घेऊन थोडी कुटून त्यांत पाणी एक द्रोण प्रमाण घालून चवथाई पाणी राही तापर्यंत काढा करून गाळून घ्यावा. मग त्यांत चूर्ण टाकायाची औषधें तीं येणेंप्रमाणें. गुळवेल, चवक, चित्रक, नागरमोथे, काकडशिंगी, सुंठ, मिर्‍यें, पिंपळी, धमसा, भारंगसाल, रास्ना, कचोरा हीं बारा औषधें पळपळ प्रमाण घेऊन चूर्ण करून त्या काढ्यांत घालावें. साखर वीसपळें, तूप आठपळें व शिरसेल तेल आठपळें हीं सारीं काढ्यांत घालून फिरून कढवून लेह करून थंड झाल्यावर त्यांत मध आठपळें घालून मग वंशलोचन ४ पळें व पिंपळी चारपळें यांचें चूर्ण त्या अवलेहांत मिळवून चांगलें बळकट मडकें घेऊन त्यांत तो अवलेह ठेवून मग तो अवलेह नित्य घेत जावा. तेणेंकरून उचकी, सारे श्वास व कासरोग दूर होतात.

## च्यवनप्राश्यावलेह क्षयादिकांवर.

पाटलारणिकाश्मर्यविल्वारलुकगोक्षुराः ॥ ४४ ॥ पर्ण्यौबृहत्यौपिप्प ल्यु शृंगीद्राक्षामृताभयाः ॥ बलाभूम्यालीवासाऋद्धिर्जीवंतिकासटी ॥ ४५ ॥ जीवकर्षभकौमुस्तंपौष्करंकाकनासिका ॥ मुद्गपर्णीमाषपर्णी विदारीचपूनर्नवा ॥ ५६ ॥ कांकोल्यौकमलंमेदेऋध्येलागरुचंदनम् ॥ एकैकंपलसंमानंस्थूलचूर्णितंपचम् ॥ ४७॥ एकीकृत्यबृहत्पात्रेपंचा

मलशनानिच ॥ पचेद्द्रोणजलेक्षिप्त्वाग्राह्ममष्टांशशेषितम् ॥ ४८ ॥ ततस्तुतान्यामलानिनिष्कुलीकृत्यवाससा ॥ दृढहस्तेनसंमर्द्यक्षिपवाता त्रततांवृतम् ॥ ४९ ॥ पलसप्तमितंतानिकिंचित्भृष्ट्वाल्पवन्हिना ॥ ततस्तत्रक्षिपेत्क्वाथंखंडंचार्धतुलोन्मितम् ॥५५०॥ लेहवत्साधयित्वाच चूर्णानीमानिदापयेत् ॥ पिप्पलीद्विपलाज्ञेयातुगाक्षीरिचतुःपला ॥५१॥ प्रत्येकंचत्रिशाणाःस्युस्त्वगेलापत्रकेशराः॥ ततस्त्वेकीकृतेतस्मिन्क्षिपे तक्षौद्रंचषट्पलम् ॥५२॥ इत्येवंच्यवनप्रोक्तंच्यवनप्राशसंज्ञिकम्॥लेहं वन्हिबलंदृष्ट्वाखादेत्क्षीणोरसायनम् ॥ ५३ ॥ बालवृद्धक्षतक्षीणानारी क्षीणाश्चशोषिणः ॥ हृद्रोगिणःस्वरक्षीणायेनरास्तेपुयुज्यंत ॥ ५४ ॥ कासंश्वासंपिपासांचवातास्त्रमुरसोग्रहम् ॥ वातपित्तंशुक्रदोषंमूत्रदोषंच नाशयेत् ॥५५॥ मेधांस्मृतिंस्त्रीषुहर्षंकांतिंवर्णप्रसन्नताम् ॥ अस्मात्प्र योगादाप्नोतिनरोरोगविवर्जितः ॥ ५६ ॥

पाडळ, एरण, शिवण, बेलमूळ, टेटू, गोखरू, रानगाजा, रानभाल, रिंगणी, मोताग गणी, पिंपळी, काकडशिंगी, द्राक्ष, गुळवेल, हर्तकी, चिकणामूळ, भूयआवळी, अड्ळसा, ऋद्धि वृद्धि या दोन मिळत नाहींत याचे अभावीं वाराहीकंद व हरणवेल, कचोरा, जीवक, ऋषभक या दोहांचे अभावीं विदारीकंद. नागरमोथे, पोखरणीचें मूळ कावळीमूळ, रानमुगी, रानउडदी, विदारीकंद पुनर्नवा, काकोली क्षीरकाकोली या दोहोंचे अभावीं आसध, कमळ, मेदा, महा मेदा या दोहोंचे अभावीं-ज्येष्ठमध, विलायची कृष्णागर हीं सारी औषधें एकएक पळ प्रमाण घेऊन थोडीं थोडीं कुटून एका जागी करून मग मोठे माठे आवळे पांचशें मोजून घेऊन मोठ्या मडक्यात ते आवळे व नीं सारीं औषधें घालून त्यात पाणी एक द्रोण प्रमाण टाकून आठवा हिस्सा पाणी राही तों पावेतों काढा करवून गाळून ठेवावा मग त्या औषधातील आवळे काढून ध्यावे व आ- ल्यौ टाकावीं मग चागलें वळकट फडकें धरून तें कल्हेच्या भांड्याचे तोंडाला बांधून त्या वर ते आवळे ठेवून हातानें वळकट मर्दन करून खालीं चिखलासारखा आवळ्याचा मगज पडेल तो घ्यावा मग सातपळ प्रमाण तूप घेऊन त्यात तो आवळ्याचा मगज हलक्या मीवर थोडा थोडा परतवून पहिला काढा ठेविला आहे त्यात तो मगज व साखर अ तुलाप्रमाण टाकून घण होई तोंपर्यंत पाक करावा त्यात चूर्ण टाकावयाचीं औषधें येणें माणें पिंपळी दोन पळें वंशलोचन चार पळें. दालचिनी. विलायची तमालपत्र. नाग- केशर हीं चार औषधें तीन तीन माण च्यारी. मग या सर्वांचें चूर्ण करून त्या पाकांत

घालून व मध सहा पळ प्रमाण घेऊन पाकाला मेळवावी. या प्रकारचा हा अवलेह च्यवन नामक ऋषीनीं सांगितला ह्मणून याला च्यवनप्राश असें ह्मणतात. हा च्यवनप्राश क्षीण मनुष्यांनीं आपली शक्ति व अग्नीचें बळ पाहून घ्यावा. तेणेंकरून क्षणित्व दूर होतें व बाल, वृद्ध व क्षतें करून जे क्षीण मनुष्य ते व स्त्रीसंग फार करून करून ज्यांची धातु नष्ट होते ते मनुष्य व ज्या मनुष्यांना शोष आहे ते मनुष्य व ज्यांना छातीचा रोग आहे ते व ज्यांच्या कंठाचा स्वर क्षीण आहे ते इतक्या मनुष्यांस हा अवलेह योजावा. श्वास, कास, तहान, वातरक्त, उरोग्रह, वातपित्त विकार, धातुदोष, मूत्रदोष, हे रोग दूर होतात व या अवलेहें करून बुद्धि वाढते, स्मरण चांगलें राहतें व स्त्रीसंगाविषयीं इच्छा होते. शरीराची कांति व वर्णही चांगले होतात. मन प्रसन्न राहातें व मनुष्य सार्‍या रोगापासून दूर होतो.

## कूष्मांडकावलेह रक्तपित्तादिकांवर.

निष्कुलीकृत्यकूष्मांडखंडान्पलशतंपचेत्॥निक्षिप्यद्वितुलंनीरमर्धशिष्टं चगृह्यते ॥ ५७ ॥ तानिकूष्मांडखंडानि पीडयेत्दृढवाससा ॥ आतपेशोषयेत्किंचित्शूलाग्रैर्बहुशोव्यधेत् ॥ ५८ ॥ क्षिप्त्वाताम्रकटाहेच दद्यादष्टपलंघृतम् ॥ तेनाकिंचित्भर्जयित्वापूर्वोक्तंतज्जलांक्षिपेत् ॥५९॥ खंडापलशतंदत्वासर्वमेकत्रपाचयेत् ॥ सुपक्केपिंपलीशुंठीजीरकंद्विपलं पृथक् ॥ ५६० ॥ पृथक्पलार्धधान्याकंपत्रैलामरिचत्वचम् ॥ चूर्णीकृत्यक्षिपेत्तत्रघृतार्धक्षौद्रमावहेत् ॥ ६१ ॥ खादेदग्निबलंदृष्ट्वारक्तपित्तीक्षयीज्वरी॥शोषतृपातमच्छर्दिकासश्वासक्षतातुरः॥६२॥ कूष्मांडकावलेहोयंबालवृद्धेपुयुज्यते ॥ उरःसंधानकृद्घृष्योबृंहणोबलकृन्मतः ॥६३॥

चांगला कोंहळा जून आणून वरची साल काढून त्याचे बारीक बारीक तुकडे ते शंभर पळें प्रमाणें वजन घेऊन त्यांत पाणी दोन तुला प्रमाण घालून अर्धे पाणी तों पावेतों काढा करून गाळून ठेवावा मग त्या कोंहळ्याचे तुकडे घट्ट फडक्यांत पिळून त्यांतील पाणी काढून मग त्या तुकड्यानां किंचित् ऊष्ण देऊन सुयांनीं बहुत छिद्रें पडत असें टोंचून मग तांब्याचे भांड्यांत आठ पळ प्रमाण तूप घालून ते तुकडे थोडे थोडे परतून मग पहिल्यानें कोंहळ्याचा काढा ठेविला आहे तो टाकून व साखर १०० पळ प्रमाण वजन घेऊन त्या काढ्यांत घालून घण होई पर्यंत पाक करावा. त्यांत चूर्ण टाकावयाचीं औषधें येणेंप्रमाणें. पिंपळी, सुंठ, जिरें तीन औषधें दोन दोन पळ व धणें, तमालपत्र, विलायची, मिरें, दालचिनी हीं

औषधें अर्ध अर्ध पळ प्रमाण घ्यावीं. मग साऱ्यांचें चूर्ण करून पाकांत टाकावें व मध चार पळ प्रमाण त्यांत मेळवावी. याला कुष्मांडकावलेह म्हणतात. हा लेह रोग्यांनीं आ- ो शक्ति व अग्नीचें बळ पाहून घ्यावा. तेणेंकरून रक्त, पित्त, क्षय, ज्वर, शोष, ान, डोळ्यांपुढें अंधारी येते ती, ओकारी, श्वास, कास, उरःक्षत हे रोग दूर होतात हा अवलेह बाळकांस व वृद्धांस उपयोगीं पडतो व उरांत अन्नाचा रस येतो त्याला ाधक होतो व स्त्रीसंगाविषयीं इच्छा देतो, धातूची वृद्धि करितो व बळ देतो.

## कूष्मांडखंडावलेह अर्शरोगावर.

युक्त्याकुष्मांडखंडस्यमृण्णंविपचेत्सुधीः ॥
अर्शसांमूढवातानांखंडाग्नीनांचशम्यते ॥ ६४ ॥

कोंहळ्याचे बारीक बारीक तुकडे व सुरणाचा कीस हे दोन्हीं एकत्र करून तुपांत परतवून त्याचे दुप्पट साखर घेऊन पाक करून त्यांत तो कीस मेळवून लेह करून घ्यावा. तेणेंकरून मूळव्याध व सर्वांग जखडून राहतें तो मूढवायु हे दूर होतात व जठराग्नी प्रदीप्त होतो.

## अगस्त्यहरीतकी क्षयादिकांवर.

हरीतकीशतंभद्रयवानामाढकंतथा ॥पलानिदशमूलस्यविंशतिश्चनियो जयेत् ॥६५॥ चित्रकःपिप्पलीमूलमपामार्गःसटीतथा ॥ कपिकच्छुः शंखपुष्पीभार्गीचगजपिप्पलि ॥ ६६ ॥ बलापुष्करमूलंचपृथग्द्वि लमात्रया ॥ पचेत्पंचाढकेनीरेयवैःस्विन्नैःमृतंनयेत् ॥ ६७ ॥ तच्चा भयाशतंदद्यात्कायेनास्मिन्विचक्षणः ॥ सर्पिस्तैलाष्टपलकंक्षिप्त्वागुडतु लांतथा ॥ ६८ ॥ पक्त्वालेहत्वमानीयसिद्धेगतिपृथक्पृथक् ॥ क्षौद्रं चपिप्पलीचूर्णंदद्यात्कुडवमात्रया ॥६९ ॥ हरीतकीद्वयंखादेत्तेनलेहेन नित्यशः ॥ क्षयंकासंज्वरंश्वासहिक्कार्शोरुचिपीनसान ॥५७०॥ग्रहणीं नाशयेदेषवलीपलितनाशनः ॥ बलवर्णकरःपुंसामवलेहोरसायनः ॥ ॥ ७१ विहितोगस्त्यमुनिनासर्वरोगप्रणाशनः ॥

जव एक आढक प्रमाण वजन घेऊन थोडे कुटून त्यांत पाणी चौपट घालून नरयाई ची शंभर ... ती गही तोंपर्यंत काढा करून गाळून ठेवावा व जव टाकून द्यावे. मग दशमुळांचीं ... तीं वीस पळ प्रमाण. चित्रक, पिंपळमूळ, आघाडा, कचोरा, कवचबीज, , भारंगमाळ, गजपिंपळी. चिरणामूळ. पोखरमूळ हीं दहा औषधें दोन

दोन पळ प्रमाण एकंदर वीस औषधें या प्रमाणें घेऊन थोडीं थोडीं कुटून त्यांत पा पांच आढक प्रमाण घालून चवथाई पाणी राही तों पर्यंत काढा करून गाळून त्या जवा काढ्यांत मिळवून त्यांत थोर थोर हिरडे शंभर घालून तूप व तिळांचें तेल आठ आ पळ प्रमाण व एक तुळा प्रमाण गुळ त्या काढ्यात टाकून घण होई तोंपावेतों पा करून थंड जाहल्यावर पिंपळीचें चूर्ण व मध हीं कुडव कुडव प्रमाण घेऊन पात्र मेळवावीं. या प्रकारे हा अवलेह अगस्त्यऋषींनीं सांगितला ह्मणोन याला अगस्त्यह रीतकी ह्मणतात. यांतून रोग्यांनीं दोन हिरडे लेहाबरोबर खावे. तेणेंकरून क्षय, श्वास ज्वर, श्वास. उचकी, मूळव्याध, आवढणें, पीनसरोग ( नाकात होतो तो ) व संग्रहणी हे रोग दूर होतात. अंगाला वळकुट्या पडतात त्या मोडोन केश पांढरे असतात ते काळे होतात, बळ व कांति येते हा अवलेह रसायन आहे या पासून सारे रोग दूर होतात.

## कुटजकावलेह अर्शादिकांवर.

कुटजत्वक्तुलांद्रोणेजलस्यविपचेत्सुधीः ॥ ७२ ॥ कषायेंपादशेषेच गृह्णीयाद्वस्त्रगालितम् ॥ त्रिंशत्पलंगुडस्यात्रदत्वाचविपचेत्पुनः ॥७३॥ सांद्रत्वमागतंज्ञात्वाचूर्णानीमानिदापयेत् ॥ रसांजनंमोचरसंत्रिकटुंत्रि फलांतथा ॥७४॥ लज्जालुंचित्रकंपाठांविल्वमिंद्रयवान्वचां ॥ भल्ला तकंप्रतिविषांविडंगानिचवालकम् ॥ ७५ ॥ प्रत्येकंपलसंमानंघृतस्य कुडवंतथा ॥ सिद्धशीतेततोदद्यान्मधुनःकुडवंतथा ॥ ७६ ॥ जयेद पावलेहस्तुसर्वाण्यर्शांसिवेगतः ॥दुर्नामप्रभवान्रोगानतीसारमरोचक म् ॥ ७७ ॥ ग्रहणींपांडुरोगंचरक्तपित्तंचकामलाम् ॥आम्लपित्तंतथा शोफंकार्श्यंचैवप्रवाहिकाम् ॥ ७८ ॥ अनुपानेप्रवक्तव्यमांतक्रंपयोद धि ॥ घृतंजलंवार्जीणेचपथ्यभोजीभवेन्नरः ॥ ७९ ॥

कुड्याची साल एक तुळा प्रमाण घेऊन थोडी कुटून त्यात पाणी एक द्रोण प्रमाण घालव चवथाई पाणी राही तोंपर्यंत काढा करून फडक्यात गाळून त्यात गुळ तीस पळ प्रमाण टाकून फिरून घण होई तोंपर्यंत पाक करून नतर त्यात चूर्ण करून टाकावयाची औषधें येणेंप्रमाणें. रसांजन. मोचरस, सुंठ, मिरें. पिंपळी, हिरडा, बेहडा, आंवळकठी, लाजाळू, चित्रक, पाहाडमूळ. स्हान बेलफळ. इंद्रजव, वेखंड. भिलावा. अतिविष. वावडिंग, वाळा हीं १८ औषधें पळ पळ प्रमाण घेउन चूर्ण करून यांतान टाकावीं व तूप एक कुडवप्रमाण टाकून पाक थंड झाल्यावर त्यात मग एक कुडव प्रमाण मेळवून भग हा

अवलेह शेळीचे दुधांत अथवा ताकांत किंवा दह्यांत, तुपांत अथवा पाण्यांत घ्यावा व अन्न जिर्णी पडनें असतां घ्यावा व चांगलें पथ्य करावें तेणेंकरून संपूर्ण मूळव्याधी लयकर दूर होतात व दुष्टनाम आहे ज्यांना असे भगंदरादिक रोग, अतिसार, अवढणें, संग्रहणी, पांडुरोग, रक्तपित्त, डोळ्यांत कावीळ होते ती, अम्लपित्त, सूज, कृशता प्रवाहिका-रोग, अतिसाराचा भेद आहे तो व हे रोग दूर होतात.

### आर्द्रकुटजावलेह सर्वातिसारादिकांवर.

कुटजत्वक्तुलामार्द्रांद्रोणेनीरेविपाचयेत् ॥ पादशेषंश्रृतंनीत्वाचूर्णान्ये तानिदापयेत् ॥ ५८० ॥ लज्जालुर्धातकीबिल्वंपाठामोचरसस्तथा ॥ मुस्तंप्रतिविषाचैवप्रत्येकस्यात्पलम् ॥ ८१ ॥ ततस्तुविपचेद्भूयोया वदर्वीप्रलेपनम् ॥ जलेनछागदुग्धेनपीतोमंडेनवाजयेत् ॥ ८२ ॥ सर्वातिसारानघोरांस्तुनानावर्णान्सवेदनान् ॥ असृक्दरंसमस्तंचसर्वा र्शांसिप्रवाहिकाम् ॥ ८३ ॥

कुडयाची साल ओली एक तुलाप्रमाण आणून थोडी कुटून त्यांत पाणी एक द्रोण प्रमाण घालून चवथाई पाणी राही तोंपर्यंत काढा करून गाळून घ्यावा. त्यांत चूर्ण टाकावयाची औषधें ती येणें प्रमाणें. लाजेरी, धायटीफूल, कोंवळें बेलफळ. पाहाडमूळ, मोचरस, नागरमोथे, अतिविष हीं सात औषधें पळ पळ प्रमाण घेऊन चूर्ण करून त्या काढ्यांत टाकून फिरून लोखंडाचे पळीला लेप लागे असा कढवून घण करावा. मग हा लेह पाण्यांत अथवा शेळीचे दुधांत किंवा मंडांत घ्यावा तेणेंकरून वेदनायुक्त व नीलपी तादिक नानाप्रकारचे वर्ण ज्या अतिसारामध्यें आहेत व घोररूप असे संपूर्ण अतिसार ते दूर होतात व स्त्रियांस संपूर्ण प्रकारची धुपणी लागते ती व संपूर्ण मूळव्याधी व प्रवाहि-कारोग अतिसाराचा भेद आहे तो हे सारे रोग दूर होतात.

इति श्रीदामोदरसूनु शार्ङ्गधरेण विरचितायां संहितायां चिकित्सा-स्थाने अवलेहकल्पनानामाष्टमोध्यायः ॥८॥

---

## नवमोध्यायः ।

### घृत व अवलेह इत्यादिस्नेहांचा साधनप्रकार.

कल्काच्चतुर्गुणीकृत्यघृतंवातैलमेववा ॥ चतुर्गुणेद्रवेसाध्यंतस्यमात्राप

लोन्मिता ॥८४॥ निक्षिप्यक्राथयेत्तोयंक्राथद्रव्याच्चतुर्गुणम् ॥ पादाशिष्टंगृहीत्वाचस्नेहंतेनैवसाधयेत् ॥ ८५ ॥ चतुर्गुणंमृदुद्रव्येकठिनेष्टगुणंजलम् ॥ तथाचमध्यमद्रव्येदद्यादष्टगुणंपयः ॥ ८६ ॥ अत्यंतेकठिनेद्रव्येनीरंषोडशिकंमतम् ॥ कर्षादितःपलंयावत्क्षिपेत्षोडशिकंजलम् ॥ ८७ ॥ तदूर्ध्वंकुडवंयावत्क्षिपेदष्टगुणंपयः ॥ प्रस्थादितःक्षिपेन्नीरंखारीयावच्चतुर्गुणम् ॥८८॥ अंबुक्राथरसैर्यत्रपृथक्स्नेहस्यसाधनम् ॥ कल्कस्यांशंतत्रदद्यात्चतुर्थंषष्ठमष्टमम् ॥८९॥दुग्धेदध्निरसेतक्रेकल्कोदेयोष्टमांशकः ॥ कल्कस्यसम्यक्पाकार्थंतोयमत्रचतुर्गुणम् ॥ ५९० ॥ द्रव्याणियत्रस्नेहेषुपंचादीनिभवंतिहि ॥ तत्रस्नेहसमान्याहुर्यथापूर्वंचतुर्गुणम् ॥९१॥क्राथेनकेवलेनैवपाकोयत्रेरितःक्वचित् ॥ क्राथद्रव्यस्यकल्कोपितत्रस्नेहेप्रयुज्यते ॥९२॥ कल्कहीनस्तुयःस्नेहःससाध्यःकेवलद्रवे ॥ पुष्पकल्कस्तुयःस्नेहस्तत्रतोयंचतुर्गुणम् ॥९३॥ स्नेहेस्नेहाष्टमांशश्चपुष्पकल्कःप्रयुज्यते ॥ वर्तिवत्कल्कस्नेहःस्याद्यदांगुल्याविमर्दितः ॥ ९४ ॥ शब्दहीनोग्निनिक्षिप्तःस्नेहःसिद्धोभवेत्तदा ॥ यदास्नेहोभवेत्तैलेफेनशांतिश्चसर्पिषि ॥ ९५ ॥ गंधवर्णरसोत्पत्तिःस्नेहसिद्धिस्तदाभवेत् ॥ स्नेहपाकस्त्रिधाप्रोक्तोमृदुमध्यःखरस्तथा ॥ ९६ ॥ ईषत्सरसकल्कस्तुस्नेहपाकोमृदुर्भवेत् ॥ मध्यपाकस्यसिद्धिश्चकल्केनीरसकोमले ॥ ९७ ॥ ईषत्कठिनकल्कश्चस्नेहपाकोभवेत्खरः ॥ तदूर्ध्वंदग्धपाकःस्याद्दाहकृन्निष्प्रयोजकः ॥ ९८ ॥ आमपाकश्चनिर्वीर्योवन्हिमांद्यकरोगुरुः ॥ नस्यार्थंस्यान्मृदुःपाकोमध्यमःसर्वकर्मसु ॥९९॥ अभ्यंगार्थेखरःप्रोक्तोयुंज्यादेवंयथोचितम् ॥ घृततैलगुडादींश्चसाधयेन्नैकवासरे ॥ ६०० ॥ प्रकुर्वंत्युषितास्त्वेतेविशेषाद्गुणसंचयम् ॥

कल्काचीं जीं औषधें त्याचे चौपट तूप अथवा तेल घ्यावें व त्या तुपा तलाचे चौपट दूध, गवादिमूत्र इत्यादिक द्रवपदार्थ घेऊन सर्वांना एकत्र करून अग्निसंयोगानें ते द्रवपदार्थ आटवून तूप व तेल शेष राखावें. तमस्या सिद्ध जाहलेल्या तुपाची व तेलाची पोटांत घ्यावयाची मात्रा वातादिरोगांवर एक पळ प्रमाण जाणावी. व काढ्याचीं जीं औषधें त्यांचे चौपट पाणी घालून चवथाई पाणी राही तोंपावेतों काढा करून त्यांत तूप अथवा तेल घालून कढवून तूप व तेल शेष राखावें व नरम जीं गुडूच्यादि औषधें तीं असल्यास त्यांत पाणी चौपट घालावें व वाहवा आदिकरून कठीण जीं औषधें तीं व ह्यास-

लादि मध्यम औषधें असल्यास पाणी आठगुण घालावें व पद्मकाष्ठादि अत्यंत कठिण
औषधें आहेत तर त्यांत पाणी १६ गुण घालावें व कर्षा पासून पळमानपर्यंत औष-
धांचा काढा करावयाचा असतां पाणी १६ गुण घालावें व पळापासून कुडवमानपर्यंत
औषधांचा काढा करावयाचा असतां पाणी आठगुण घालावें व प्रस्थमानापासून खारी-
मानपर्यंत औषधांचा काढा करावयाचा असतां पाणी चौपट घालावें. केवळ पाण्यांत
स्नेह सिद्ध करावयाचा असतां त्यांत स्नेहाचे चतुर्थांश कल्क घालावा व काढ्यांत स्नेह
सिद्ध करावयाचा असतां त्यांत स्नेहाचे षष्ठांश कल्क योजावा व मांसाचे रसांत स्नेह
सिद्ध करावयाचा असतां त्यात स्नेहाचे अष्टमांश कल्क योजावा व दुधांत अथवा दह्यांत
अथवा धत्तूरादिकाचे रसांत स्नेह सिद्ध करावयाचा असतां त्यांत स्नेहाचें अष्टमांश कल्क
घालावा व कल्काचा पाक चांगला होण्याविषयीं पाणी स्नेहाचे चौपट घालावें व स्नेहाचे
ठायीं दूध, गोमूत्र इत्यादिक पांच द्रवपदार्थांपासून अधिक द्रव पदार्थ असतां स्नेहाचे सम-
भाग घ्यावें. पांचांहून उणे द्रवपदार्थ असतां स्नेहाचे चौपट घ्यावे व काढ्यांत स्नेह
करावयाचा असतां कल्क द्रव पाण्यांत वाटून कल्क करून स्नेहांत घालून त्यांत स्नेहाचे
चौपट पाणी घालावें व क्वचित् प्रयोगाचेठायीं काढ्यांत स्नेह सिद्ध करावयाचा असतां
ज्याच्या औषधांचा कल्क करून स्नेहांत मेळवून त्यांत पाणी चौपट घालावें व ज्या
स्नेहांत कल्क नाहीं तो स्नेह द्रवपदार्थांत घालून कढवून द्रवपदार्थ जाळून स्नेह शेप रा-
खावा, ज्या स्नेहांत फुलांचा कल्क आहे त्यांत पाणी स्नेहाचे चौपट घालावें व फुलाचा
कल्क स्नेहाचे अष्टमांश घालावा. या नंतर स्नेह चांगला सिद्ध झाल्याची लक्षणें स्नेहांत
कल्क असतो तो बोटांनी चेंपला असतां त्याची वात होते व तो कल्क अग्नीवर टाकला
असतां फुरफुर शब्द करीत नाहीं व तेलाचे पाकावर फेण आला असतां व तुपाचे
पाकावर फेण येऊन गेला असतां व तो पाक सुगंधेकरून व रक्तादिवर्णेकरुन व मधु-
रादि रसेंकरुन युक्त जाहला असतां तो स्नेह चांगला सिद्ध जाहला, असें जाणावें. व
त्या स्नेहाचे पाक तीन प्रकारचे आहेत. ते नरम, मध्यम, कठीण त्यांचीं लक्षणें—स्नेहांत
कल्क असतो त्याला पाण्याचा ओलावा राहिला असतां तो पाक नरम जाणावा; क-
ल्काला मृदुपणा असून पाण्याचा अंश राहिला नाहीं. तो पाक मध्यम जाणावा व
किंचित् तीव्र कल्क जाहला असतां तो पाक जळका दाह करणारा निष्प्रयोजक जा-
णावा व कच्चा पाक राहिला असतां त्यामध्यें पराक्रम राहत नाहीं, अग्नि मंद करितो,
जड होतो. स्नेहाचा पाक नरम जाहला असतां तो स्नेह नाकांत नस्य देण्याविषयीं
योजावा व मध्यम पाक जाहला असतां तो स्नेह सर्व कर्मांचे ठायीं योजावा. कठिण

पाक झाहला असता तो स्नेह अगाला लेप करण्याविषयीं योजावा. तूप, तेल, गुडादिक हे १ दिवसात सिद्ध करू नयेत. तर सर्व द्रव्ये एकत्र करून एकरात्र भिजत ठेवून दुसरे दिवशीं सिद्ध करावें. या प्रकारें स्नेहाची साधनक्रिया जाणावी त्यामध्यें प्रथम तूप सांगून नंतर तेल सांगेल.

### घृताचा साधनप्रकार त्यामध्यें प्रथम क्षीरघृत.

पिप्पलीपिप्पलीमूलचव्यचित्रकनागरैः ॥ १ ॥ ससैंधवैश्चपलिकैर्घृत प्रस्थंविपाचयेत् ॥ क्षीरंचतुर्गुणंदत्वातत्सिद्धंप्लीहनाशनम् ॥ २ ॥ विष मज्वरमंदाग्निहरंरुचिकरंपरम् ॥

पिंपळी, पिंपळमूळ, चवक, चित्रक, सुंठ, सैंधव ही साहा औषधें, पळ प्रमाण घेऊन कल्क करून एक प्रस्थ प्रमाण गाईचें तूप घेऊन त्यात तो कल्क घालून, तुपाने चौपट गाईचे दूध त्यात मेळवावें. कल्काचा पाक चांगला होण्याविषयीं तुपाचे चौपट पाणी घालून तूप शेष राही तोंपर्यंत पाक करून नंतर तें तूप गाळून पोटांत ध्यावें तेणेंकरून पोटात डावेकडे कवळ, रोग होतो तो, व विषमज्वर व अग्निमांद्य हे रोग दूर होतात, व तोंडाला रुचि चांगली येते.

### चांगेरीघृत अतिसारसंग्रहणीवर.

पिप्पलीपिप्पलीमूलंचित्रकोहस्तिपिप्पली ॥ ३ ॥ श्वदंष्ट्रानागरंधान्यं पाठाबिल्वयवानिकाः ॥ द्रव्यैश्चपलिकैरेतैश्चतुःषष्टिपलंघृतम् ॥ ४ ॥ घृतात्चतुर्गुणंदद्यात्चांगेरीस्वरसंबुधः॥ तथाचतुर्गुणंदत्वादधिसर्पिर्विपाचयेत् ॥५॥ शनैःशनैर्विपक्कंचचांगेरीघृतमुत्तमम्॥तत्पतंकफवातघ्नं ग्रहण्यर्शोविकारनुत् ॥६॥ हंत्यानाहंगुदभ्रंशंमूत्रकृच्छ्रंप्रवाहिकाम्॥

पिंपळी, पिंपळमूळ, चित्रक. गजपिंपळी, गोखरू, सुंठ, धणे, पाहाडमूळ. बेलफळ, अजमोदा हीं दाहा औषधें पळपळ प्रमाण घेऊन कल्क करून चौसष्ट तूप घेऊन त्यात तो कल्क टाकून व तुपाचे चौपट चुक्याचा रस व दह्याचीं निवळ घालुन हलक्या अग्नीनें तूप शेष राही तोंपर्यंत पाक करून तूप गाळून ध्यावें. चांगेरी घृत ह्मणतात. हे तुप पोटात घेतलें असता कफ, वायु, संग्रहणी, मूळव्याध, मलबद्ध, आगेरू आपनद्वारीं येतें तें, मूत्रकृच्छ्र, प्रवाहिका रोग, अतिसाराचा आहे तो हे रोग दूर होतात

### मसुरघृत अतिसारादिकांवर.

मसूरणापलशतंनीरद्रोणेविपाचयेत ॥ ७ ॥ पादशेषंश्रतंनीत्वाद्गुणा

बिल्वफलाष्टकम् ॥ घृतप्रस्थंपचेत्तेनसर्वातीसारनाशनम् ॥ ८ ॥ ग्रह
र्णीभिन्नविट्कंचनाशयेच्चप्रवाहिकाम् ॥
मसुरा शंभर पळें घेऊन त्यांत एक द्रोण पाणी घालून चवथाई पाणी राही तों
र्यंत काढा करून गाळून त्यांत लहान बेलफळें आठपळ प्रमाण घेऊन बारीक वाटून
ालावीं व तूप एकप्रस्थ प्रमाण घालून तूप शेषराही तोपर्यंत पाक करून नंतर तें तूप
ाळून पोटांत घ्यावें, तेणेंकरून सारे अतिसार, संग्रहणी, मळाचे चिथडे पडतात ते,
। प्रवाहिका रोग आहे तो हे सारे रोग दूर होतात.

## कामदेवघृत रक्तपित्तादिकांवर.

अश्वगंधातुलैकास्यात्तदर्धोगोक्षुरःस्मृतः ॥ ९ ॥ वलामृताशालिपर्णी
विदारीचशतावरी॥पुनर्नवाश्वत्थशुंठीकाश्मर्यास्तुफलान्यपि॥१०॥
पद्मबीजंमाषबीजंदद्याद्दशपलंपृथक्॥ चतुर्द्रोणेऽम्भसापक्त्वापादशेषंघृतं
नयेत् ॥ ११ ॥ जीवनीयगणःकुष्ठंपद्मकंरक्तचंदनम् ॥ पत्रकंपिप्पली
द्राक्षाकपिकच्छुफलंतथा ॥ १२ ॥ नीलोत्पलंनागपुष्पंसारिवेद्वेबले
तथा ॥ पृथक्कर्षसमाभागाःशर्करायाःपलद्वयम् ॥१३॥ रसश्चपौंड्रके
क्षूणामाढकैकंसमाहरेत्॥घृतस्यचाढकंदत्वापाचयेन्मृदुनाऽग्निना॥१४॥
घृतमेतन्निहन्त्याशुरक्तपित्तक्षुरक्षतम्॥हलीमकंपांडुरोगंवर्णभेदंस्वरक्षयम्
॥१५॥ वातरक्तंमूत्रकृच्छ्रंपार्श्वशूलंचकामलाम् ॥ शुक्रक्षयमुरोदाहंका
र्श्यमोजक्षयंतथा ॥१६॥ स्त्रीणांचैवाप्रजातानांगर्भदंशुक्रदंनृणाम् ॥
कामदेवघृतंनामत्स्वृष्यंवल्यंरसायनम् १७ ॥
आसंध एक तुळा प्रमाण व त्याचे अर्धे गोखरू घ्यावें. चिकणामूळ, गुळवेल, रान-
ा, विदारीकंद, शतावरी, पुनर्नवा, पिंपळमूळ, सुंठ, शिवणीचें फळ, कमळबीज,
ी हीं अकरा औषधें दहा दहा पळ प्रमाण घेऊन थोडीं थोडीं कुटून सारीं एका
गीं करून त्यांत पाणी चार द्रोण घालून चवथाई पाणी राही तोपर्यंत काढा करून गाळून
ांत कल्क करून टाकावयाचीं औषधें येणेंप्रमाणें. ज्येष्टमध, विदारीकंद, आसंध, हर-
वेल, ज्येष्ठीमध, रानमुंगी, रानउडीद हीं जीवनीयगणाचीं औषधें जाणावीं. कोष्ठ, पद्म-
ाष्ट, रक्तचंदन, तमालपत्र, पिंपळी द्राक्षें, कवचबीज, निळेंकमळ, रानकेशर. काळी
सरी, पांढरी उपळसरी, चक्रमेंड नागबला हीं वीस औषधें कर्ष कर्ष प्रमाण घेऊन
करून काढ्यांत घालावा व साखर दोनपळें घालावी, पांढऱ्या उंसाचा रस, तूप हीं
ंनी एकेक आढक प्रमाण त्या काढ्यांत घालून हलक्या अग्नीनें तूप शेष राही तोंपर्यंत

पाक करून नंतर ते तूप गाळून पोटांत घ्यावें तेणेंकरून रक्तपित्त, उरःक्षतरोग, पांडुरोगाचाभेद हलीमक रोग, स्वरक्षय. वातरक्त, मूत्रकृच्छ्र, पाठीचाशूळ. डोळ्यांत कावीळ होते ती, धातुक्षय, उरांत रोग होतो तो, शरीराची कृशता, शरीराचे तेजाचा क्षय हे सारे रोग दूर होतात. हें तूप ज्या स्त्रियास मुलें होत नाहींत त्यास मुलें देतें, व पुरुषांस धातु उत्पन्न करितें. हृदयास प्रियकर होतें व बळ देत व हें तूप रसायन आहे याला कामदेवघृत असें ह्मणतात.

## पानीयकल्याणघृत अपस्मारादिकांवर.

त्रिफलादेनिशेकौंतीसारिवेद्वेप्रियंगुका ॥ शालिपर्णीपृष्णिपर्णीदेवदार्व्यं लवालुकम् ॥ १८ ॥ नतंविशालादंतीचदाडिमंनागकेशरम् ॥ नीलोत्पलैलामंजिष्ठाविडंगंकुष्ठपद्मकम् ॥१९॥ जातिपुष्पंचंदनंचतालीसंबृहतीतथा ॥ एतैःकर्षसमैःकल्कैर्जलंदत्वाचतुर्गुणम् ॥६२०॥ घृतप्रस्थंपचेद्धीमानपस्मारेज्वरेक्षये ॥ उन्मादेवातरक्तेचकासेमंदानलेतथा ॥२१॥ प्रतिश्यायकटीशूलेतृतीयकचतुर्थके ॥ मूत्रकृच्छ्रविसर्पेचकंडुपांडुमयेतथा ॥२२॥ विषद्वयेप्रमेहेपुसर्वथैवोपयुज्यते ॥ वंध्यानांपुत्रदंभूतयक्षरक्षोहरंस्मृतम् ॥२३॥

हिरडा, बेहडा, आंवळकटी. हळद, दारुहळद, रेणुकबीज, काळी उपलसरी, पांढरी-उपलसरी, वाघांटीचें मूळ अथवा राळे, रानगाजा. रानभाल. देवदार, एलवालुक, तगर, कायडळमूळ. डाळिंबाची साल, दांतीमूळ, नागकेशर, निळेंकमळ, विलायची, मंजिष्ठ, वावडिंग, कोष्ठ, पद्मकाष्ठ, जाईचीं फुलें, चंदन तालीसपत्र, रिंगणी हीं अठावीस औषधें कर्ष प्रमाण घेऊन कल्क करुन त्याचे चौपट पाणी व एक प्रस्थ तूप घालुन तूप शेष राही तोंपर्यंत पाक करुन नंतर तें तूप गाळून पोटात घ्यावें तेणेंकरुन फेंफरे. ज्वर क्षयरोग, उन्मादरोग, वातरक्त खोकला, अग्निमांद्य, पडसें, कंबरेचा शूळ, तृतीयकज्वर, चातुर्थीक ज्वर, मूत्रकृच्छ, इसब, पायाना होतो तो, कंडू, पांडुरोग, सर्पादिकाचे विषविकार बचनागादिक विषविकार, परमा हे रोग दूर होतात व हें तूप वांझेच्या बायकांस पुत्र देतें व या तुपापासून भूतबाधा दूर होते.

## अमृताघृत वातरक्तावर.

अमृताक्वथकल्काभ्यांसक्षीरंविपचेद्घृतम् ॥
वातरक्तंजयत्याशुकुष्ठंजयतिदुस्तरम् ॥२४॥

गुळवेल आणून थोडी कुटून त्यांत तिचे चौपट पाणी घालून चवथाई पाणी राही तोंप-
काढा करून त्यांत काढ्याचे चतुर्थांश तूप घालावें व तुपाचे चतुर्थांश गुळवेलीचा
क करून व दूध तुपाचे चौपट त्यांत घालून तूप शेष राही तोंपर्यंत पाक करून नंतर
तूप गाळून पोटांत घ्यावें तेणेंकरून वातरक्त व कुष्ट हे रोग लवकर दूर होतात.

## महातिक्तकघृत वातरक्तकुष्ठादिकांवर.

सप्तछदःप्रतिविषाशम्याकःकटुरोहिणी ॥ पाठामुस्तमुशीरंचत्रिफला
पर्पटस्तथा ॥ २५ ॥ पटोलनिंबमंजिष्ठापिप्पलीपद्मकंसठी ॥ चंदनं
धन्वयासश्चविशालाद्वेनिशेतथा ॥ २६ ॥ गुडूचीसारिवेद्वेचमूर्वावासा
शतावरी ॥ त्रायंतींद्रयवायष्टीभूनिंबाश्चाक्षभागिकाः ॥ २७ ॥ घृतं
चतुर्गुणंदद्यात्घृतादामलकीरसः ॥ द्विगुणःसर्पिषश्चात्रजलमष्टगुणंभ
वेत् ॥ २८ ॥ तत्सिद्धंपाययेत्सर्पिर्वातरक्तेपुसर्वथा ॥ कुष्टानिरक्तपित्तं
चरक्तार्शांसिचपांडुताम् ॥ २९ ॥ हृद्रोगगुल्मवीसर्पप्रदरान्गंडमालि
काम् ॥ क्षुद्ररोगान्ज्वरांश्चैवमहातिक्तमिदंजयेत् ॥ ६३० ॥

सातवण, अतिविष, बाहवा, कटुकी, पाहाडमूळ, नागरमोथे, वाळा, हिरडा, बेहडा,
आंवळकाठी, पित्तपापडा, पडवळ, कडूनिंब, मंजिष्ठ, पिंपळी, पद्मकाष्ठ, कचोरा, पांढरा-
चंदन, धमासा, कांवडमूळ, हळद, दारुहळद, गुळवेल, काळी उपलसरी, पांढरी उपल-
सरी, मोरवेल, अडूळसा, शतावरी, त्रायमाण, इंद्रजव, ज्येष्ठमध, किराईत हीं ३२
औषधें एक एक अक्ष ह्मणजे कर्ष प्रमाण घेऊन कल्क करून त्याचे चौपट तूप घेऊन
त्यांत तो कल्क घालून व तुपाचे दुप्पट आवळ्याचा रस व आठपट पाणी घालून तूप
शेष राही तों पावेतों पाक करून तूप गाळून पोटांत घ्यावें तेणेंकरून वातरक्त निश्चयें
करून दूर होतें व कुष्टें, रक्तपित्त, रक्तमूळव्याध, पांडुरोग, हृद्रोग, गुल्म, विसर्प रोग.
शिरांना धुपणी लागते ती, गंडमाळा, क्षुद्ररोग, ज्वर हे रोग दूर होतात.

## सूर्यपाकसिद्ध कासीसादिघृत कुष्टदद्रुपामा इत्यादिकांवर.

कासीसंद्वेनिशेमुस्तंहरितालंमनःशिलाम् ॥ कंपिल्लकंगंधकंचविडंगंगुग्गु
लुंतथा ॥ ३१ ॥ सिक्थकंमरिचंकुष्ठंतुत्थकंगौरसर्षपान् ॥ रसांजनं
चसिंदूरंश्रीवासारक्तचंदनम् ॥ ३२ ॥ अरिमेदंनिंबपत्रंकरंजंसारिवाव
चाम् ॥ मंजिष्ठांमधुकंमांसीशिरीषंलोध्रपद्मकम् ॥ ३३ ॥ हरीतकंप्रपुन्ना
टंचूर्णयेत्कार्षिकान्पृथक् ॥ ततस्तच्चूर्णमालोड्यत्रिंशत्पलमितेघृते
॥ ३४ ॥ स्थापयेत्ताम्रपात्रेचघर्मेसमर्दनानिच ॥ अस्याभ्यंगेनकुष्टा

निदह्रुपामावि चका ॥ ३५ ॥ शूकदोषाविसर्पाश्चविस्फोटावातर
क्तजा ॥ शिरस्फोटोपदंशाश्चनाडीदुष्टव्रणानिच ॥ ३६ ॥ शोथोभ
गंदरश्चैवलताःशाम्यंतिदेहिनाम् ॥ शोधनंरोपणंचेवसवर्णकरणंघृतम् ॥३७

हिराकशी, हळद, दारुहळद, नागरमोथे, हरताळ, मनशीळ, रपिला, गंधक, वाव डिंग, गुग्गुळ, मेण, मिर्यें, कुष्ठ, पांढरे शिरस, रसांजन, शेंदूर, गधाबिरोज, रक्तचंदन, खेराची साल, कडुनिंबाची पानें, करंजबीज, उपल्सरी वेखंड, मंजिष्ट, ज्येष्ठमध, जटा-मांशी, शिरस, लोध्र, पद्मकाष्ट, बाळहिरडे, टाकळ्याचें बीज, हीं बत्तीस औषधे कर्ष कर्ष प्रमाण घेऊन चूर्ण करून तीसपळें प्रमाण तूप ताम्याचे भांड्यात घालून त्यात तें चूर्ण मेळवून सात दिवस उन्हात ठेऊन नंतर तें तूप अंगास लावावें तेणेंकरून सर्व कुष्टें, दाह, खरूज, पायफुटतात तो विचर्चिकारोग, शिश्नास शूक संज्ञक रोग होतो तो व विसर्परोग, वातरक्तापासून विस्फोटरोग होतो तो, मस्तकाचे फोड, उपदंशरोग त्याल, गर्मी ह्मणतात व नाडीचेठायीं जें दुष्ट व्रण होतात ते, सूज, भगेंद्र, लूता हे रोग दूर होतात व हें तूप व्रणादिकाचें शोधन करितें व व्रणादिक भरून आणितें

## जात्यादिघृत व्रणांवर.

जातीनिंबपटोलश्चद्वेनिशेगडुकीतथा ॥ मंजिष्ठामधुकंसिक्थःकरंजोशी
रसारिवाः ॥ ३८ ॥ तुत्थंचाविपचेत्सम्यक्‌कल्कैरेभिर्घृतंबुधः ॥ अस्य
लेपात्प्ररोहंतिसूक्ष्मनाडीव्रणाअपि ॥ ३९ ॥ मर्माश्रिताःक्लेदिनश्चगं
भीराःसरजोव्रणाः ॥

जाईचीं पानें, कडूनिंबाचीं पानें, पटोलीचीं पानें, हळद, दारुहळद, कुटकी, मंजिष्ठ, ज्येष्ठमध, मेण, करंजबीज, वाळा उपल्सरी, मोरचूत हीं तेरा औषधें कर्ष कर्ष घेऊन कल्क करून त्याचे चोपट तूप घेऊन त्यात तो कल्क मेळवून उन्हात एक दिवस ठेवून पचवून नंतर त्या तुपाचा सूक्ष्म जे नाडीव्रण त्यास लेप करावा व मर्मस्थळीं असून पुवादिकें करून ओले व खोल पीडायुक्त असे जे व्रण त्यास लेप करावा, तेणेंकरून ते व्रण भरून येऊन बरे होतात

## बिंदुघृत उदरादिकांवर.

चित्रकःशंखिनीपथ्याकंपिल्लस्त्रिवृतायुगम् ॥ ४० ॥ वृद्धदारुश्च
म्यारोदंतीदंतीफलंतथा ॥ कोशातकीचदाळीनीलीगिरिकर्णिका ॥
॥४१॥सातलापिप्पलीमूलंगेडकरडुनीधा ॥ हेमक्षीरीचपिंचतरल्वै

रेतैःपिचून्मितै ॥४२॥ घृतप्रस्थंस्नुहीक्षीरेपट्पलेतुपलद्वये ॥ अर्कक्षीर
स्यमतिमान्ततत्सिद्धंगुल्मकुष्ठनुत् ॥ ४३ ॥ हंतिशूलमुदावर्तशोथाध्मा
नंभगंदरम् ॥ शमयत्युदराण्यष्टौनिपीतंबिंदुसंख्यया ॥ ४४॥ गोदुग्धे
नोष्ट्रदुग्धेनकौलत्थेतशृतेनवा ॥ उष्णोदकेनवापीत्वाबिंदुवेगैर्विरिच्यते
॥ ४५ ॥ एततु्बिंदुघृतंनामनाभिलेपाद्विरेचयेत् ॥

चित्रक, शंखपुष्पी, हिरडे, कपिला, पांढरें निशोत्तर, काळें निशोत्तर, वरधारा, नीळें, त्याचे शेंगेंतला मगज, दांतीमूळ, तिर्चें फळ, जेपाळ, कडुदोडके, देडवंगरी, ज्योतिष्मती, पिंवळें निवडुंग, पिंपळमूळ, वावडिंग, कटुकी, चोक हीं एकुणीस औषधें, कर्ष प्रमाण घेऊन कल्क करून एक प्रस्थ प्रमाण तूप घेऊन त्यांत तो कल्क मे-न व निवडुंगाचें दूध सहापळें त्यांत टाकून व कल्काचा पाक चांगला होण्या-र्थी त्यांत तुपाचे चौपट पाणी घालून तूप शेष राही तोंपर्यंत पाक करून तूप गाळून वें याला बिंदुघृत ह्मणतात. हें तूप पोटांत घेतलें असतां गुल्म, कुष्ट शूळ, उदावायु, सूज, आध्मान, भगंदर आठप्रकारचे उदररोग हे सारे रोग दूर होतात. चीं अनुपानें माईचें दूध अथवा उंटिणीचें दूध अथवा कुळित्यांचा कादा अथवा ऊन-णी इतक्या अनुपानातून रोग तारतम्य पाहून अनुपान योजून त्यात या तुपाचे जितके दु सोडून पोटात घ्यावें तितके ढाळ होतात व या तुपाचा नाभीचे ठायीं लेप केला सतांही ढाळ होतात.

## त्रिफळाघृत नेत्ररोगांवर.

त्रिफलायारसप्रस्थंप्रस्थंवासारसोद्भवम्॥४६॥भृंगराजरसप्रस्थंप्रस्थमा
जंपयःस्मृतम् ॥ दत्वातत्रघृतप्रस्थंकल्कैःकर्षमितैःपृथ ॥ ४७ ॥ त्रि
फलापिप्पलीद्राक्षाचंदनंसैंधवंबला ॥ कांकोलीक्षीरकाकोलीमेदामरिच
नागरम् ॥४८॥ शर्करापुंडरीकंचकमलंचपुनर्नवा ॥ निशायुग्मंचम
धुकंसर्वैरेभिर्विपाचयेत् ॥ ४९ ॥ नक्तांध्यंनकुलाध्यंचकुंडूंपिल्लंतथै
वच ॥ नेत्रस्रावंचपटलंतिमिरंचार्जुनंजयेत् ॥ ६५० ॥ अन्येपिप्रशमं
यांतिनेत्ररोगाःसुदारुणाः॥त्रैफलंघृतमेतद्धिपानेनस्यादिपूजितम्॥५१॥

हिरडा, बेहडा, आंवळकटी, या तिघांचा अंगरस वेगळा वेगळा एक एक प्रस्थ वा व अंगरस न मिळेल तर त्याचे आठगुण पाणी घालून चवर्थाइ पाणी राही तों न काढा करावा त्याला अंगरस संज्ञा आहे. तो रस एकेक प्रस्थ घ्यावा व अडुळशाचा एक प्रस्थ, माक्याचा रस एक प्रस्थ, शेळीचें दूध एक प्रस्थ हे सारे रस व दूध एका जागीं क-

रून त्यांत तूप एक प्रस्थ प्रमाण घालावें व त्यांत कल्क करून टाकावयाचीं औषधें येणेंप्रमाणें. हिरडा बेहडा आंवळकटी, पिंपळी, द्राक्ष, पांढरा चंदन, सैंधव, चिकणामूळ, कांकोली व क्षीरकाकोली, या दोहोंचे अभावीं आसंध, मेदाचे अभावीं ज्येष्ठमध, मिर्यें, सुंठ, साखर, पांढरें कमळ, इतर कमळ, पुनर्नवा, हळद, दारुहळद, ज्येष्ठमध हीं एकुणीस औषधें कर्ष कर्ष प्रमाण घेऊन कल्क करून त्या तुपांत घालून तूप शेष राही तोंपर्यंत पाक करून तूप गाळून घ्यावें, याला त्रिफलाघृत म्हणतात. हें तूप पोटांत घेतलें असता रातांधळें व मुंगसासारखे डोळे चकचक फिरून पुढें काजवे येतात तो रोग व डोळ्यांचा कड, डोळ्याचे रोगाचा भेद पिल्लरोग, डोळ्यांतून पाणी येतें तो रोग, डोळ्याचे पटलांत तिमिर रोग होतो तो, मोतिबिंदु, नेत्ररोगाचा भेद अजक रोग हे सारे दूर होतात. यांशिवाय दुसरे जे लहान मोठे डोळ्यांचे रोग तेही दूर होतात. हें तूप नाकांतही घालावयाचे उपयोगीं पडतें. मतांतरीं त्रिफळेचा रस एक प्रस्थ, माक्याचा रस एक प्रस्थ, अडुळशाचा रस एक प्रस्थ, शतावरीचा रस एक प्रस्थ, शेळीचें दूध एक प्रस्थ, गुळवेलीचा रस एक प्रस्थ, आवळीचा रस एक प्रस्थ या सर्व रसांमध्यें एक प्रस्थ प्रमाण तूप घालून पक्व करावें हें घृत वंगसेनानीं सांगितलें आहे. तें पूर्वोक्त नेत्ररोगावर योजित करावें.

## गौर्याद्य घृत व्रणादिकांवर.

द्वेहरिद्रेस्थिरामूर्वासारिवाचंदनद्वयैः ॥ मधुपर्णीचमधुकंपद्मकेशरपद्मकैः ॥ ५२ ॥ उत्पलोशीरमेदाभिस्त्रिफलापंचवल्कलैः ॥ कल्कैःकर्षमितैरेतैर्घृतप्रस्थंविपाचयेत् ॥ ५३ ॥ विसर्पलताविस्फोटविषदुष्टव्रणापहम् ॥ गौर्याद्यमितिविख्यातंसर्पिर्विषहरंपरम् ॥ ५४ ॥

हळद, दारुहळद, रानगांजा, मोरवेल, उपरसरी, पांढराचंदन, रक्तचंदन, रानउडीद, ज्येष्ठमध, कमळाचे आतलें केंशर, पद्मकाठ, कमळ, वाळा, मेदाचे अभावीं ज्येष्ठमध, हिरडा, बेहडा, आंवळकटी, वडाची साल, उंबराची साल, पिंपळाची साल, पायरीची साल व परळ हीं बावीस औषधें कर्ष कर्ष प्रमाण घेऊन कल्क करून त्याचें चौपट पाणी घेऊन त्यांत तो कल्क मेळवून व तूप एक प्रस्थ घालून तूप शेष राही तोंपर्यंत पाक करून नंतर तें तूप गाळून पोटांत घ्यावें. तेणेंकरून विसर्परोग, लूता, विस्फोट, विषदोष, लहान कुष्ठ, व्रण हे रोग दूर होतात व या तुपापासून बहुतकरून विषबाधा दूर होतात.

## मयूराद्य घृत शिरोरोगादिकांवर.

बलामधुकरास्नाभिर्दशमूलफलात्रिकैः ॥ पृथक्द्विपलिकैरेभिर्द्रोणनीरेण

पाचयेत् ॥५५॥ मयूरंपक्षपित्तांत्रयकृतूपादास्यवर्जितम् ॥ पादशेषं
भृतंनीत्वाक्षीरंदत्वाचतत्समम् ॥५६॥ घृतप्रस्थंपचेत्सम्यक्जीवनीयैः
पिचून्मितैः॥तत्सिद्धंशिरसः पीडांमन्याग्रीवाग्रहंतथा॥५७॥अर्दितंकर्ण
नासाक्षिजिव्हागलगुरुजोजयेत् ॥ पानेनस्येतथाभ्यंगेकर्णपूरेप्रयुज्यते
॥ २८ ॥ हेमंतकालेशिशिरेवसंतेपुचसेव्यते ॥

चिकणामूळ, मोहाची साल, रास्ना, दशमूळाचीं औषधें, त्रिफला, एकंदर सोळा ते दोन दोन पळें घेऊन थोडीं थोडीं कुटून एक द्रोण प्रमाण पाणी घेऊन त्यात तीं घालून व मोर आणून मारून त्याचे पख व काळजात पित असते तें व आतडीं, वे बाजूस यकृत् आहेत तीं, पाय, तोंड हीं सारीं टाकून मोराचें शुद्धमास ऊन त्या घात घालून चवथाई पाणी राहीतोंपर्यंत काढा करून गाळून त्यात दूध काढ्याचे सम- घेऊन व तूप एक प्रस्थ प्रमाण घालावें व जीवनीय गणाचे औषधाचा कल्क करून तो घालून तूप शेष राही तोंपर्यंत पाक करून नंतर तें तूप गाळून पानकरण्याविषयीं, नाकात घालण्याविषयीं व अंगास लेप करण्याविषयीं, कानात घालण्याविषयीं रोग तार- म्य पाहून योजावें व याचें सेवन हेमंतकाळीं व शिशिरकाळीं व वसत काळीं करावें तेणें करून मस्तकाची पीडा दूर होते. मान व गळा याचा स्तभ व तोंड वाकडें होतें जेणेंकरून तो अर्दितवायू, व कर्णशूळ नाक, डोळे, जीभ गाल याचे ठायीं ज्या पीडा होतात त्या व हे सर्व रोग दूर होतात.

## फलघृत वंध्यादिकास पुत्र होण्यास.

त्रिफलामधुकंकुष्ठंद्वेनिशेकटुरोहिणी ॥ ५९ ॥ विडंगंपिप्पलीमुस्तं
विशालाकट्फलंवचा ॥ द्वेदेद्वेचकाकोल्योसारिवेद्वेप्रियंगुका ॥ ६० ॥
शतपुष्पाहिंगुरास्नाचंदनंरक्तचंदनम् ॥ जातीपुष्पंतुगाक्षरीकमलंशर्क
रातथा ॥६१॥ आजमोदाचंदतीचकल्कैरेतैश्चरागिरिः ॥ जीवद्वत्सै
कवर्णायाघृतमस्थंचगोःक्षिपेत् ॥६२॥ चतुर्गुणेनपयसापचेदारण्यगो
मयैः ॥ सुतिथौपुष्यनक्षत्रेमृद्वंडेतानजेतथा ॥६३॥ ततःपित्रेच्छुभदि
नेनारीवापुरुषोऽथवा ॥ एवत्सर्पिनरःपीत्वास्त्रीषुनित्यंवृषायते ॥६४॥
पुत्रानुत्पादयेद्धीमान्वंध्यापिलभतेसुतम् ॥ अनायुर्वयाजनयेतूयाचस्र
तापुनःस्थिता ॥ ६५ ॥ पुत्रंप्राप्नोतिसानारीबुद्धिमंतंशतायुषम् ॥
गृतन्फघृतंनामभारद्वाजेनभाषितम् ॥६८॥ मनुक्तंलक्ष्मणमुलंक्षिपे
त्तत्रचिकित्सक ॥

रून त्यांत तूप एक प्रस्थ प्रमाण घालावें व त्यांत कल्क करून टाकावयाचीं औषधें येणेंप्रमाणें. हिरडा बेहडा आंवळकटी, पिंपळी. द्राक्ष, पांढरा चंदन, सैंधव, चिकणामूळ, कांकोळी व क्षीरकांकोली, या दोहोंचे अभावीं आसंध, मेदाचे अभावीं ज्येष्ठमध, मिरें, सुंठ, साखर, पांढरें कमळ, इतर कमळ, पुनर्नवा, हळद, दारुहळद, ज्येष्ठमध हीं एकुणीस औषधें कर्ष कर्ष प्रमाण घेऊन कल्क करून त्या तुपांत घालून तूप शेष राही तोंपर्यंत पाक करून तूप गाळून घ्यावें. याला त्रिफलाघृत म्हणतात. हें तूप पोटांत घेतलें असतां रातांधळें व मुंगसासारखे डोळे चकचक फिरून पुढें काजवे येतात तो रोग व डोळ्यांचा कंडू, डोळ्यांचे रोगाचा भेद पिल्लरोग, डोळ्यांतून पाणी येतें तो रोग, डोळ्यांचे पटलांत तिमिर रोग होतो तो, मोतिबिंदु, नेत्ररोगाचा भेद अजक रोग हे सारे दूर होतात. यांशिवाय दुसरे जे लहान मोठे डोळ्यांचे रोग तेही दूर होतात. हें तूप नाकांतही घालावयाचे उपयोगीं पडतें. मतांतरीं त्रिफळेचा रस एक प्रस्थ, माक्याचा रस एक प्रस्थ. अडुळशाचा रस एक प्रस्थ, शतावरीचा रस एक प्रस्थ, शेळीचें दूध एक प्रस्थ, गुळवेलीचा रस एक प्रस्थ. आवळीचा रस एक प्रस्थ या सर्व रसांमध्यें एक प्रस्थ प्रमाण तूप घालून पक्क करावें हें घृत वंगसेनानीं सांगितलें आहे. तें पूर्वोक्त नेत्ररोगावर योजित करावें.

## गौर्याद्य घृत व्रणादिकांवर.

द्वेहरिद्रेस्थिरामूर्वासारिवाचंदनद्वयैः ॥ मधुपर्णीचमधुकंपद्मकेशर पद्मकैः ॥ ५२ ॥ उत्पलोशीरमेदाभिस्त्रिफलापंचवल्कलैः ॥ कल्कैः कर्षमितैरेतैर्घृतप्रस्थंविपाचयेत् ॥ ५३ ॥ विसर्पलूताविस्फोटविषकीटव्रणापहम् ॥ गौर्याद्यमितिविख्यातंसर्पिर्विषहरंपरम् ॥ ५४ ॥

हळद, दारुहळद, रानगांजा, मोरवेल, उपलसरी, पांढराचंदन, रक्तचंदन, रानउडदी, ज्येष्ठमध, कमळाचे आंतले केशर, पद्मकाठ, कमळ, वाळा, मेदाचे अभावीं ज्येष्ठमध, हिरडा, बेहडा, आंवळकटी, वडाची साल, उंबराची साल, पिंपळाची साल, पायरीची साल व परळ हीं बावीस औषधें कर्ष कर्ष प्रमाण घेऊन कल्क करून त्याचे चौपट पाणी घेऊन त्यांत तो कल्क मेळवून व तूप एक प्रस्थ घालून तूप शेष राही तोंपर्यंत पाक करून नंतर तें तूप गाळून पोटांत घ्यावें. तेणेंकरून विसर्परोग, लूता, विस्फोट, विषदोष, लहान कुष्ठ, व्रण हे रोग दूर होतात व या तुपापासून बहुतकरून विषबाधा दूर होतात.

## मयूरघृत शिरोरोगादिकांवर.

बलामधुकरास्नाभिर्दशमूलफलात्रिकैः ॥ पृथक्द्विपलिकैरेभिर्द्रोणनीरेण

पाचयेत् ॥५५॥ मयूरंपक्षपित्तांत्रयकृत्पादास्यवर्जितम् ॥ पादशेषं भृतंनीत्वाक्षीरंदत्वाचतत्समम् ॥५६॥ घृतप्रस्थंपचेत्सम्यक्जीवनीयैः पिचून्मितैः॥तत्सिद्धंशिरसः पीडांमन्याग्रीवाग्रहंतथा॥५७॥आर्दितंकर्ण नासाक्षिजिव्हागलरुजोजयेत् ॥ पानेनस्येतथाभ्यंगेकर्णपुरेपुयुज्यते ॥ २८ ॥ हेमंतकालेशिशिरेवसंतेपुचसेव्यते ॥

चिकणामूळ, मोहाची साल, रास्ना, दशमूळांचीं औषधें, त्रिफला, एकंदर सोळा औषधें दोन दोन पळें घेऊन थोडीं थोडीं कुटून एक द्रोण प्रमाण पाणी घेऊन त्यांत तीं घालून व मोर आणून मारून त्याचे पंख व काळजांत पित्त असतें. तें व आंतडीं, बाजूस यकृत् आहेत तीं, पाय, तोंड हीं सारीं टाकून मोराचें शुद्धमांस ऊन त्या घालून चवथाई पाणी राहीतोंपर्यंत काढा करून गाळून त्यांत दूध काढ्याचे सम-घेऊन व तूप एक प्रस्थ प्रमाण घालावें व जीवनीय गणाचे औषधांचा कल्क करून त्यांत तो घालून तूप शेष राही तोंपर्यंत पाक करून नंतर तें तूप गाळून पानकरण्याविषयीं व नाकांत घालण्याविषयीं व अंगास लेप करण्याविषयीं, कानांत घालण्याविषयीं रोग तार-तम्य पाहून योजावें व याचें सेवन हेमंतकाळी व शिशिरकाळीं व वसंत काळीं करावें तेणें करून मस्तकाची पीडा दूर होते. मान व गळा यांचा स्तंभ व तोंड वांकडें होतें जेणेंकरून तो अर्दितवायू, व कर्णशूळ नाक, डोळे, जीभ गाल यांचे ठायीं ज्या पीडा होतात त्या व हे सर्व रोग दूर होतात.

## फलघृत वंध्यादिकास पुत्र होण्यास.

त्रिफलामधुकंकुष्टंद्वेनिशेकटुरोहिणी ॥ ५९ ॥ विडंगंपिप्पलीमुस्तं विशालाकट्फलंवचा ॥ द्वेदेद्वेचकाकोल्यौसारिवेद्वेप्रियंगुका ॥ ६६ ॥ शतपुष्पाहिंगुरास्नाचंदनंरक्तचंदनम् ॥ जातीपुष्पंतुगाक्षरीकमलंशर्क रातथा ॥६१॥ आजमोदाचंदतीचकल्कैरेतैश्चकार्षिकैः ॥ जीवद्वत्सैकवर्णायाघृतप्रस्थंचगोःक्षिपेत् ॥६२॥ चतुर्गुणेनपयसापचेदारण्यगोमयैः ॥ सुतिथौपुष्यनक्षत्रेमृद्वग्निनाजेतथा ॥६३॥ ततःपिबेन्छुभदिनेनारीवापुरुषोऽथवा ॥ एवत्सर्पिर्नरःपीत्वास्त्रिपुनित्यंनृपायते ॥६४॥ पुत्रानुत्पादयेद्धीमानवंध्यापिलभतेसुतम्॥ अनायुर्धंयाजनयेत्याचस तापुनःस्थिता ॥ ६५ ॥ पुत्रंप्राप्नोतिसानारीबुद्धिमंतंशतायुषम् ॥ एतत्फलघृतंनामभारद्वाजेनभाषितम् ॥६६॥ अनुक्तंलक्ष्मणमुलंक्षिपे त्तत्रचिकित्सकः ॥

हिरडा, बेहडा, आंवळकाठी, ज्येष्ठमध, कोष्ठ, हळद, दारुहळद, कुटकी, वावडिंग, पिंपळी, नागरमोथे, कांवडळी, कटुफळ, वेखंड, मेदा व महामेदा या दोहोंचे अभावीं ज्येष्ठमध, कांकोली व क्षीर कांकोली यांचे अभावीं आसंध व पांढरी उपलसरी, काळी उपलसरी, वाघाटीचे मूळ अथवा राळ, बडीशोफ, हिंग भाजून, रास्ना, पांढराचंदन, रक्तचंदन, जाईची फुलें, वंशलोचन, कमळ, साखर, अजमोदा, दांतीमूळ हीं तीस औषधें कर्ष कर्ष प्रमाण घेऊन कल्क करून ज्या गाईला वासरूं आहे व एकवर्णी अशा गाईचें तूप एक प्रस्थ घेऊन त्यांत तो कल्क टाकून व पाक चांगला होण्याविषयीं तुपाचे चौपट गाईचें दूध घालून ते सर्व पदार्थ तांब्याचे भांड्यांत अथवा मडक्यांत घालून ज्या दिवशीं पुष्य नक्षत्र असेल अथवा चांगला दिवस असेल त्या दिवशीं रानगोवऱ्यांचा अग्नि देऊन तूप राही तो पर्यंतपाक करून तूप गाळून घ्यावें. याला फलघृत ह्मणतात. हें तूप भारतद्वाज ऋषींनीं सांगितलें आहे तें चांगला दिवस पाहून पुरुषांनीं अथवा स्त्रियांनीं घ्यावें. पुरुषानें घेतलें असतां त्याचा काम वाढेल स्त्रीसंग नित्य करील, त्याला पुत्र होतील ते बुद्धिवान् होतील व वांझोट्या बायकोनें घेतलें असतां तिला मुलें होतील व ज्या स्त्रियास मूल होऊन लागलेंच मरते व पुन्हां दुसरें होतें तेंही मरतें अशा स्त्रियेस मूल होईल तें शंभर वर्षें जगेल व बुद्धिमंत होईल या तुपांत लक्ष्मणामूळ सांगितलें नाहीं परंतु हें गर्भ देणारें आहे ह्मणून योजावें,

## पटोलपंचकघृत विषमज्वरादिकांवर.

वृषनिंबामृताव्याघ्रीपटोलानांशृतेनच ॥६७॥ कल्केनपक्वंसर्पिस्तुनिहन्याद्विषमज्वरान् ॥ पांडुकुष्टंविसर्पंचकृमीनर्शांसिनाशयेत् ॥६८॥

अडुळसा, कडुनिंब, गुळवेल, रिंगणी, पटोल हीं पांच औषधें घेऊन कल्क करून त्याचे चौपट तूप घेऊन त्यांत तो कल्क घालून व कल्काचा पाक चांगला होण्याविषयीं तुपाचे चौपट पाणी त्यांत घालून तूप शेष राही तोपर्यंत पाक करून तूप गाळून पोटांत घ्यावें. तेणेंकरून विषमज्वर, पांडुरोग, कुष्ठ, विसर्प, जंत, मूळव्याध रोग दूर होतात.

## लघुफलघृत योनिरोगावर.

सहचरेदारेद्वेत्रिफलांगुडूचींसपुनर्नवाम् ॥ शुकनासांहरिद्रेद्वेरास्नांमेदांशतावरीम् ॥६९॥ कल्कीकृत्यघृतप्रस्थंपचेत्क्षीरेचतुर्गुणे ॥ तत्सिद्धंपाययेन्नारींयोनिशूलनिपीडिताम् ॥६७०॥ पीडिताचलितायाचानिःसृताविवृताचया ॥ पित्तयोनिश्चविभ्रांतापंढयोनिश्चयास्मृता ॥७१॥ प्रपद्यंतेहि

ताः स्यानंगर्भंगच्छतिचासकृत् ॥ एतत्फलघृतंनामयोनिदोषहरंपरम्॥ ७२॥

वळा कोळिस्ता, काळा कोळिस्ता, हिरडा, बेहडा, भावळकुटी, गुळवेल, पुनर्नवा, हळद, दारुहळद, रास्ना, मद्याचे अभावीं ज्येष्ठमध, शतावरी हीं तेरा औषधें घेऊन करून एक प्रस्थ प्रमाण तूप घेऊन तो कल्क मेळवून व गाईचें दूध तुपाचे चौपट, त्या पाक चांगला होण्याविषयीं तुपाचे चौपट पाणी त्यांत घालून तूप शेष राही तो पाक करून नंतर तें तूप गाळून ज्या स्त्रियेस योनिशूळ आहे तिला द्यावें व वादिकें करून योनि पीडित आहे, ज्या स्त्रियेची योनि चळून फुल स्थानभ्रष्ट झालें व चें तोंड मोठें झालें तिला द्यावें, पित्तयोनी, विभ्रांतयोनी, षंढयोनी, ज्यांपासून गर्भधारण नाहीं अशा स्त्रियेला हें तूप दिलें असता सारे योनींचे रोग दूर होऊन योनि ठिकाणीं गर्भ धारण लवकर करिते या तुपाला लघुफलघृत म्हणतात हे तूप योनीच दोष करण्याविषयीं श्रेष्ठ आहे असें ह्मणावें

## तेलांचा साधनप्रकार त्यामध्यें प्रथम लाक्षातेल

लाक्षाढकंक्काथयित्वाजलस्यचतुराढकैः ॥ चतुर्थांशंमृतंनीत्वातैलप्रस्थं विनिक्षिपेत् ॥७३॥ मस्त्वाढकंचगोढस्तत्रैवविनियोजयेत् ॥ शत पुष्पमश्वगंधाहरिद्रांदेवदारुच ॥७४॥ कटुकीरेणुकामूर्वाकुष्ठंचमधु यष्टिकाम् ॥ चंदनंमुस्तकंरास्नापृथक्कूर्पप्रमाणतः ॥७५॥ चूर्णयेत्त त्रनिक्षिप्यसाधयेन्मृदुवन्हिना ॥ अस्याभ्यंगात्प्रशाम्यंतिसर्वेपिविषम ज्वरा ॥७६॥ कासश्वासप्रतिश्यायत्रिकपृष्ठग्रहास्तथा ॥ वात पित्तमपस्मारमुन्मादंयक्षराक्षसान् ॥७७॥ कंडूशूलंचदौर्गंध्यंगात्रा नास्फुरणंजयेत् ॥ पुष्टगर्भोभवेदस्यगर्विण्याभ्यंगतोभृशम् ॥७८॥

बोरीची अथवा कुड्याची लाख एक आढक प्रमाण घेऊन त्यांत पाणी चार आढक घालून चवथाई पाणी राही तोंपर्यंत काढा करून गाळून घ्यावा त्यांत तिळाचे तेल प्रमाण घालून चवथाई पाणी राही तोंपर्यंत काढा करून गाळून घ्यावा त्यात तिळाचे तेल एक प्रस्थ प्रमाण घालून गाईचे दह्याची निवळी एक आढक घालावी मग त्यांत सूर्ण काळ्यांची औषधें येणें प्रमाणे बाळंतशोफ, आसंध, हळद, देवदार, कटुकी, रेणुकबीज मोरवेल, कोष्ठ, ज्येष्टमध, पांढराचंदन, नागरमोथे रास्ना हीं बारा औषधें कर्ष कर्ष प्रमाण करून चूर्ण करून त्या तेलांत घालून हलक्या अग्नीनें, तेल शेष राही पर्यंत पाक करून नंतर तेल गाळून अंगास लावावें तेणेंकरून सारे विषमज्वर होतात व कास, श्वास, पडसें, कमरेचा व पाठीचा शूळ, वातप्रकोप, पित्तप्रकोप, उन्मादरोग, क्षयरोग, राक्षसादिक यांची पीडा कंडू, अंगाला दुर्गंध येणें ता

तो व ज्या वायूनें बहिरेपणा येतो तो वायु, गतिभंग वायु कटिग्रह, हस्तपादादि
चें शोषण करणारा वायु, चक्षुरादिक इंद्रियांचा नाश करणारा वायु, रक्तविकार, धा-
रोग, अंत्रवृद्धि, कुरंट ह्मणजे जेणेंकरून वृषण मोठा होतो तो वायु, दंतरोग, म-
च्या वायु, व पार्श्वशूळ, व जेणेंकरून पांगुळपणा येतो तो, बुद्धिभ्रंश व कवरे पा-
यापर्यंत गृध्रसी या नामें करून वायु होतो तो हे सारे वायु दूर होतात. या शि-
दुसरे विषमवायु लहान, मोठे वायु अथवा सर्वांगाचें ठायीं जे असतील
दूर होतात व या तेलाचे प्रभावेकरून वांझोट्या स्त्रियेस मुलें होतात व हें
अंगास लाविलें असता मनुष्यास सुख होतें. हत्तीचे व घोड्याचे अंगास लाविलें
तां त्यांनाही सुख होतें याविषयीं दृष्टांत जसा नारायण देव दुष्ट दैत्याचा नाश करितो
हें तेल सर्व वायूचा नाश करितें.

## बलातेल वातादिकांवर.

बलामूलकषायेणदशमूलशृतेनच ॥ ८९ ॥ कुलत्थयवकोलानांक्काथेन
पयसातथा ॥ अष्टाष्टभागयुक्तेनभागमेकंचतैलकम् ॥ ९० ॥ गणेन
जीवनीयेनशतावर्यैंद्रदारुणा ॥ मंजिष्ठाकुष्ठशैलेयतगरागरुसैंधवैः ॥
॥ ९१ ॥ वचापुनर्नवामांसीसारिवाद्वयपत्रकैः ॥ शतपुष्पाश्वगंधाभ्या
मेलयाचविपाचयेत् ॥९२॥ गर्भार्थिनीनांनारीणांपुंसांचक्षीणरेतसाम् ॥
व्यायामक्षीणगात्राणांसूतिकानांचयुज्यते ॥ ९३ ॥ राजयोग्यमिदंतैलं
सुखीनांचविशेषतः ॥ बलातैलमितिख्यातसर्ववातामयापहम् ॥ ९४ ॥

चिकणामूळ आठ प्रस्थ घेऊन त्यात पाणी बत्तीस प्रस्थ घालून चवथाई पाणी
तोंपर्यंत काढा करून गाळून घ्यावा. दशमूळाचीं औषधें दहा आहेत तीं सारीं
घेऊन आठ प्रस्थ घेऊन त्यात पाणी बत्तीस प्रस्थ घालून चवथाई पाणी राही तोंपर्यंत
काढा करून गाळून घ्यावा. कुळिथ, जव, बोरच्या आठ्यातील बीज हीं तीन औषधें
वेगळीं वेगळीं आठ प्रस्थ घेऊन त्या एकेकात पाणी बत्तीस बत्तीस प्रस्थ घालून चव-
थाई पाणी राही तोंपर्यंत काढे करून वेगळें वेगळें गाळावे. मग ते पाचही काढे एका-
त करून त्यात गाईचे दूध आठ प्रस्थ घालून व तिळाचे तेल एक प्रस्थ घालावें.
व चूर्ण टाकावयाचीं औषधें तीं येणेंप्रमाणे. जीवनीयगणाचीं औषधें, शतावरी, मंजिष्ठ,
, कोष्ठ, पत्थरफूल तगर, अगरु, सैंधव, वेखंड, पुनर्नवा, जटामांसी, पांढरी
सरी, काळी उपलसरी, तमालपत्र, बडीशोफ, आसंध, विलायची हीं चोवीस औषधें
चतुर्थांश घेऊन कल्क करून त्या तेलात घालून तेल शेष राही तोंपर्यंत पाक

करून नंतर तेल गाळून घ्यावें. याला बलातेल ह्मणतात. हें तेल ज्या स्त्रियांस गर्भाची इच्छा आहे त्यांचे अंगास लावावें व ज्या पुरुषांचा धातु क्षीण आहे त्यास व दूर जाण्या येण्याच्या परिश्रमेंकरून क्षीण आहेत गात्रें ज्या पुरुषांची त्यांस व बाळंत स्त्रियांस योजावें व हे तेल विशेषेंकरून राजास व सुखी मनुष्यास योग्य आहे यापासून सारे वायूचे प्रकार दूर होतात.

## प्रसारणीतेल वातकफन्यविकार व वायु यांजवर.

प्रसारणीपलशतंजलद्रोणेनपाचयेत् ॥ पादशेषोभृतोग्राह्यस्तैलंदधि च्वतत्समम् ॥ ९५ ॥ कांजिकंचसमंतैलाचतुर्गुणम् ॥ तैलात्तथाष्टमांशे नसर्वंकल्कानियोजयेत् ॥९६॥ मधुकंपिप्पलीमूलंचित्रकःसैंधवंवचा॥ प्रसारणीदेवदारुरास्नाचगजपिप्पली ॥९७॥ भल्लातःशतपुष्पा चमांसीचैभिर्विपाचयेत् ॥ एतत्तैलंवरंपक्वंवातश्लेष्मामयान्जयेत्॥९८॥ कौब्जत्वपंगुत्वंगृध्रसीमर्दितंतथा ॥ हनुपृष्ठशिरोग्रीवाकटीस्तंभंचना शयेत् ॥ ९९ ॥ अन्यांश्चविषमान्वातान्सर्वानाशुव्यपोहति ॥

चांदवेल शंभर पळें वजन घेऊन त्यांत पाणी एक द्रोण प्रमाण घालून चवथाई पाणी राही तोपर्यंत काढा करून गाळून घ्यावा. त्यांत तेल व दही व कांजी काढ्यांचे समभाग घालून त्यानें तेलाचें चौपट गाईचे दूध घालावें व त्यांत कल्क करून घालावयाची औषधें येणेप्रमाणे ज्येष्ठमध, पिंपळमूळ, चित्रक, सैंधव, वेखंड, चांदवेल देवदार, रास्ना, गजपिंपळी भिलावे, बडीशोप, जटामांसी ही सारी औषधें तेलाचे अष्टमांश घेऊन कल्क करून तेलांत घालून सेल शेष राही तोपर्यंत पाक करून नंतर तेल गाळून अंगास लावावें. तेणेंकरून वातश्लेष्मजन्य विकार व मनुष्य जेणेंकरून कुबडा होतो, तो वायु व लंगडा व जेणेंकरून पांगळा होतो तो वायु, गृध्रसीवायु अर्दितवायु, हनु, पृष्ट, शिर, ग्रीवा कटी याचा स्तंभ करितात ते सर्व वायु दूर होतात व याशिवाय दुसरे विषमवायु, ल्हान मोठे जे असतील तेही या तेलानें दूर होतात,

## माषादितैल ग्रीवास्तंभनादिकांवर.

माषायवातसीक्षुद्रामर्कटीनकुरंटकः ॥७००॥ गोकंटटुंटुकश्चैषांकुर्या त्समपलंपृथक् ॥ चतुर्गुणांबुनापक्त्वापादशेषंसमुत्तंनयेत् ॥१॥ काषां स्सार्धानिपृष्ठव्रणबीजंकुलित्थकम् ॥ पृथक्चतुष्पलंचतुर्गुणजलेपचेत ॥ २ ॥ चतुर्थभागशिष्टंचगृण्हीयात्क्वाथमुत्तमम् ॥ प्रस्थंकंछागमांस्यचतुःपष्टिपलंजले ॥३॥ निक्षिप्यपाचयेद्धिमान्पादशेषंसमंनयेत् ॥

तैलप्रस्थेततःकाथान्सर्वानेतान्विनिक्षिपेत् ॥ ४ ॥ कल्कैरेभिश्च विपचेदमृतांकुष्ठनागरैः ॥ रास्नापुनर्नवैरंडैःपिप्पल्याशतपुष्पया ॥ ५ ॥ बलाप्रसारणीभ्यांचमांसीकटुकयातथा ॥ पृथगर्धपलैरेतैः साधयेन्मृदुवन्हिना ॥ ६ ॥ हन्यात्तैलमिदंशीघ्रंग्रीवास्तंभापबाहुकौ ॥ अर्धांगशोषमाक्षेपमूरुस्तंभापतानकौ ॥ ७ ॥ शाखाकंपंशिरःकंपंविश्वाचीमर्दितंतथा ॥ माषादिकमिदंतैलंसर्ववातविकारनुत् ॥ ८ ॥

उडीद, जव, आळशीचें बीज, रिंगणी, कवचबीज, कोन्हाटा, गोखरूं, टेंटू हीं आठ औषधें सात सात पळें घेऊन त्यांत पाणी साऱ्या औषधाचे चौपट घालून चवथाई पाणी राही तोंपर्यंत काढा करून गाळून घ्यावा व कापसाऱ्या सरक्या, बोराच्या आठ्या, सणाचें बीज, कुळिथ ही चार औषधें चवदा चवदा पळें घेऊन त्यांत पाणी चौपट घालून चवथाई पाणी राही तोंपर्यंत काढा करून गाळून घ्यावा व तो बोकडाचें मांस एक प्रस्थ प्रमाण घेऊन त्यांत पाणी चवसष्ट पळें घालून चवथाई पाणी राही तोंपर्यंत काढा करून गाळावा. मग तिळाचें तेल एक प्रस्थ प्रमाण घेऊन त्यात ते सारे काढे मिळवावे. त्या कल्कात टाकावयाचीं औषधें तीं येणेंप्रमाणें. गुळवेल, कोष्ठ, सुंठ, रास्ना, पुनर्नवा, एरंडमूळ, पिंपळी, बडीशोफ, चिकणामूळ, चादवेल, जटामासी, कुटकी हीं बारा औषधें अर्धे अर्धे पळ घेऊन कल्क करून तेलात घालून हलक्या अग्नीनें तेल शेष राही तोंपर्यंत पाक करून नंतर तेल गाळून घ्यावें. याला माषादितैल म्हणतात. हें तेल अभ्यंग लावलें असता ग्रीवास्तंभ वायु, अपबाहुकवायु, अर्धांगवायु, आक्षेपक वायु ऊरुस्तंभ वायु, अपतानकवायु, हस्त पादादिक शाखा कांपवितो तो वायु, मस्तक कापवितो तो वायु, विश्वाची वायु अर्दितवायु हे सारे वायु दूर होतात.

## कृष्णात्रेयकथिततैल शूलवाय्वादिकांवर.

शतावरीबलायुग्मपर्ण्यौगंधर्वहस्तकः ॥ अश्वगंधाश्वदंष्ट्राचबिल्वःकाशःकुरंटकः ॥ ९ ॥ एषांसार्धपलान्भागान्कल्पयेच्चविपाचयेत् ॥ चतुर्गुणेननीरेणपादशेषंमृतंनयेत् ॥ ७१० ॥ नियोज्यतैलप्रस्थेचक्षीरप्रस्थंविविक्षिपेत् ॥ शत.वरीरसप्रस्थंजलप्रस्थंचयोजयेत् । ११ ॥ शतावरीदेवदार्व्यांसीतगरचंदनम् ॥ शतपुष्पाबलाकुष्ठमेलाशैलेयमुत्पलम् ॥ १२ ॥ ऋद्धिर्मेदाचमधुकंकाकोलीजीवकस्तथा ॥ एषाकर्षसमैः कल्कैस्तैलंगोमयवन्हिना ॥ १३ ॥ पचेत्तेनैवतैलेनस्त्रीपुनित्यंतृपायते ॥ नारीचलभतेपुत्रंयोनिशूलंचनश्यति ॥ १४ ॥ अंगशूलंशिरःशूलं

कमलांपांडुतांगरम् ॥ गृध्रसींप्लीहशोपांश्वमेहानदंडापतानकम् ॥ १५ ॥ सदाहंवातरक्तंचवातपित्तगदार्दितम् ॥ असृक्दरंतथाध्मानंरक्तपित्तंचन श्यति॥शतावरीतैलमिदंकृष्णात्रेयेणभाषितम्॥नारायण्यैस्वाहा ॥ उत्तराभिमुखोभूत्वाखनेत्खदिरशंकुना ॥१७॥ सर्वव्याधिनाशिन्यैस्वा हा॥इतिउत्पाटनमंत्रः ॥ कुमारजीवनीयैस्वाहा ॥ इतिपाचनमंत्रः ॥

शतावरी, चिकणामूळ, चक्रमेंदाचेंमूळ, रानगांजा, रानभाल, एरंडमूळ, आसंध, गोखरू, बेलमूळ, कमई म्हणजे कसाड, कोन्हांडा हीं अकरा औषधें दीड दीड पळ प्रमाण घेऊन त्यांत पाणी चौपट घालून चवथाई पाणी राही तोंपर्यंत काढा करून गाळून तिळाचें तेल एक प्रस्थ प्रमाण घालावें व गाईचें दूध एक प्रस्थ प्रमाण व शतावरीचा रस एक प्रस्थ व पाणी एक प्रस्थ प्रमाण हीं त्या तेलांत घालून त्यांत कल्क करून घालावयाचीं औषधें तीं येणेंप्रमाणें. शतावरी, देवदार, जटामांसी, तगर, पांढराचंदन, बडीशोफ, चिकणामूळ, कोष्ठ, विलायची, फत्तरफुल, कमळ, ऋद्धीचे अभावीं वाराहीकंद, मेदाचे अभावीं ज्येष्ठमध,- मोहाची साल, कांकोलीचे अभावीं आसंध, जीवकाचे अभावीं विदारी कंद हीं सोळा औषधें कर्ष कर्ष प्रमाण घेऊन कल्क करून त्या तेलांत घालून गाईच्या शेणाच्या गोंवऱ्यांचे अग्नीनें तेल शेष राहीं तोंपर्यंत पाक करून तेल गाळून घ्यावें. याला शतावरीतेल म्हणतात. हें तेल कृष्णात्रेय ऋषींनीं सांगितलें आहे. हें पुरुषानें अंगास लावलें असतां तो पुरुष स्त्रियांना नित्य फार प्रीति करून भोगितो व स्त्रियांनीं अंगास लावलें असतां त्यांना मुलें होतात. व योनिशूळ, अंगशूळ, मस्तकशूळ, डोळ्यांस कावीळ रोग होतो तो, पांडुरोग, विषबाधा, गृध्रसीवायु, पोटांत डावेकडे कवळु रोग होतो तो, शोष, परमा, दंडासारखें मनुष्यास लवविणो तो दंडापतानकवायु, दाहयुक्त वातरक्त व वातपित्तज्वरें करून स्त्रियांनां धुपणी लागते ती, पोटफुगी, रक्तपित्त हे सारे रोग दूर होतात. आतां रानांतून शतावरी आणावयाचा प्रकार.—नारायणी असें म्हणून नमस्कार करून उत्तरेकडे तोंड करून खैराचे खिळ्यासारख्या लांकडानें शतावरी खणावी व सर्व व्याधिनाशिनी असें म्हणून नमस्कार करून उपटावी व कुमारजीवनी असें म्हणून नमस्कार करून पाक करावा.

## काशीसादितैल अर्शावर,

कासीसलांगलीकुष्ठशुंठीकृष्णाचसैंधवम् ॥ मनःशिलाश्वमारंचविडंगंचि त्रकोवृषः ॥ १८ ॥ दंतीकोशातकीबीजदेमाव्हाहरितालकः ॥ कल्कैः कर्षमितैरेतैस्तैलप्रस्थंविपाचयेत् ॥ १९ ॥ सुधार्कपयसादद्यात्पृथक्

द्विपलसंमिते ॥ चतुर्गुणगवांमूत्रदत्वासम्यक्प्रसाधयेत् ॥ ७२० ॥ कथितंखरनादेनतैलमर्शोविनाशनम् ॥ क्षारवत्पातयत्येतदर्शांस्यभ्यंगतो भृशम् ॥ २१ ॥ वलीर्नदूषयत्येतत्क्षारकर्मकरस्मृतम् ॥

हिराकशी, कळलावी, कोष्ठ, सुंठ, पिंपळी, सैंधव, मनशीळ, कण्हेर, वावडिंग, चित्रक, अडुळसा, दातीमूळ, कडुदोडक्याचे बीज, चीक, हरताळ हीं पंधरा औषधें एक कर्ष प्रमाण घेऊन कल्क करून तिळाचें तेल एक प्रस्थ प्रमाण घेऊन त्यात तो कल्क टाकून व निवडुंगाचा चीक व रुईचा चीक हे दोन्ही दोन दोन पळें घेउन त्या तेलात टाकावे व तेलाचे चौपट गाईचे मूत्र त्यात टाकून तेल शेष राहीं तोंपर्यंत पाक करून तेल गाळून घ्यावें. हें तेल खरनाद ऋषींनी सांगितलें आहे. हें मूळव्याधीचे मोडास सोमलादिक क्षार लावितात त्या प्रमाणें लावावें तेणेकरून क्षाराचे लेपापरी गुदाचे आत तीन वळी आहेत त्यांना उपद्रव न होता मोड गळून मूळव्याध दूर होतें.

## पिंडतैल वातरक्तावर.

मंजिष्ठासारिवासर्जयष्टीसिक्थैःपलोन्मितैः ॥ २२ ॥
पिंडाख्यंसाधयेत्तैलमेरंडंवातरक्तनुत् ॥

मंजिष्ठ, उपलसरी, राळ, ज्येष्टमध, मेण हीं पाच औषधें पळ पळ प्रमाण घेऊन कल्क करून त्याचे चौपट एरंडेल तेल घेऊन त्यांत तो कल्क टाकून व पाक होण्या विषयीं कल्काचे चौपट पाणी त्या तेलात घालून तेल शेष राही तोंपर्यंत पाक करून नंतर तेल गाळून घ्यावें. हें तेल ज्या मनुष्यांस वातारक्त आहे त्या मनुष्यानीं अंगास लावावें तेणेकरून वातारक्त दूर होतें.

## अर्कतैल खरूज फोड इत्यादिकावर.

अर्कपत्ररसेपक्वंहरिद्राकल्कसंयुतम् ॥ २३ ॥
नाशयेत्सर्षपंतैलंपामांकच्छूंविचर्चिकाम् ॥

हळदीचा कल्क करून त्याचे चौपट शिरसेल तेल घेऊन त्यात तो कल्क घालून त्या तेलाचे चौपट रुईचे पानाचा रस घालून तेल शेष राहीं तोंपर्यंत पाक करून तेल गाळून आगास लावावें तेणेकरून खरूज, फोड, पाय फुटून उकलून भेगी पडतात तो विचर्चिकारोग हे दूर होतात.

## मरिचादितैल कुष्टादिकांवर.

मरिचंहरितालंचत्रिवृतंरक्तचंदनम् ॥ २४ ॥ मुस्तंमनशिलामांसींद्रनिशे

देवदारुंच ॥ विशालाकरवीरंचकुष्ठमर्कपयस्तथा॥२५॥ तथैवगोमयरसं कुर्यातूकर्षमितानपृथक् ॥ विषंचार्धपलंदेयंमस्थंचकटुतैलकम् ॥ २६ ॥ गोमूत्रंद्विगुणंदद्यातजलंचद्विगुणंभवेत् ॥ मरिचाद्यमिदंतैलंसिध्मकुष्ठहरं परम् ॥२७॥ जयेत्कुष्ठानिसर्वाणिपुंडरीकंविचार्चिकाम् ॥ पामांसिध्मा निरक्तंचकंडूंकच्छ्रूमणाशयेत् ॥ २८ ॥

मिर्यें, हरताळ, निशोत्तर, रक्तचंदन, नागरमोथे, मनशीळ, जटामासी, हळद, दारु-हाळद, देवदार, कांकडली मूळ, कण्हेराच्या मुळ्या, कोष्ठ, रुईचा चीक, गाईचे शेणाचा रस हीं पंधरा औषधें कर्ष कर्ष प्रमाण व शुद्ध केलेला वचनाग अर्धे पळ प्रमाण घेऊन सार्‍यांचा एकाजागीं कल्क करून शिरशेल तेल एक प्रस्थ प्रमाण घेऊन त्यांत तो कल्क टाकून त्यांत तेलाचे दुप्पट गोमूत्र व पाणी घालून तेल शेष राही तोपर्यंत पाक करून तेल अगास लावावें. तेणेंकरून सिध्मकुष्ठें आदिकरून सारीं कुष्ठें दूर होतात व पुंडरीक या नामेकरून कुष्ठ आहे तें व पाय फुटून उकलून भेगी पडतात तो विचर्चिका रोग खरूज, चित्रकुष्ट, रक्तकुष्ट, कंडू फोड हे सारे रोग दूर होतात.

## त्रिफलातैल व्रणावर.

त्रिफलारिष्टभूनिंबंद्वेनिशेरक्तंचदनम् ॥
एतैःसिद्धमलंपीणांतैलमभ्यंजनेहितम् ॥ २९ ॥

हिरडा, बेहडा, आवळकटी, कडूनिंब, किराईत, हळद, दारुहळद, रक्तचंदन हीं आठ औषधें घेऊन कल्क करून त्याचे चौपट तिळाचें तेल घेऊन त्यांत तो कल्क टाकून व कल्काचा पाक चांगला होण्याविषयीं तेलाचे चौपट पाणी त्यांत घालून तेल शेष राही तोपर्यंत पाक करून तेल गाळून ज्या मनुष्याचे अंगावर बहुत व्रण आहेत त्या व्रणास लावावें तेणें करून व्रण दूर होतात.

## निंबबीजतैल पलितरोगांवर.

भावयेन्निंबबीजानिभृंगराजरसेनहि ॥ तथासनस्यतोयेनतत्तैलंहंतिन
स्यतः ॥ ७३० ॥ अकालपलितंसद्यःपुंभांदुग्धान्नभोजिनाम् ॥

कडूनिंबाच्या बिया आणून त्यांना माक्याचे रसाचें पुट देऊन नंतर दुसरें बिबळ्याचे अथवा आसाण्याचे सालीचा रस काढून पुट देऊन त्या बियांचें तेल काढून नाकांत घालावें पथ्यास गाईचें दूध व भात द्यावा तेणेंकरून ज्या मनुष्याचे अकालीं पांढरे केश होतात ते लवकर काळे होतात.

## यष्टीमधुतैल केश येण्यास.

यष्टीमधुकक्षीराभ्यांनवधात्रीफलैःशृतम् ॥ ३१ ॥
तैलंनस्यकृतंकुर्यातूकेशान्श्मश्रूणिसर्वशः ॥

ज्येष्टमध व नवे ओले आवळे या दोहोंचा कल्क करून त्याचे चौपट तिळांचें तेल घेऊन त्यात तो कल्क घालून व तेलाचे चौपट गाईचें दुध व कल्काचा पाक चागला होण्याविषयीं तेलाचे चौपट पाणी त्यात घालून तेल शेष राही तोंपर्यंत पाक करून तें गाळून नाकांस नस्य द्यावें. तेणेंकरून मनुष्याच्या मस्तकाचे व मिशाचे व दाढीचे, जे केश गेले असतील ते येतात.

## करंजादितैल इंद्रलुप्तरोगांस.

करंजश्चित्रकोजातीकरवीरश्चपाचितम् ॥ ३२ ॥
तैलमेभिर्हतंहन्यादभ्यंगादिंद्रलुप्तकम् ॥

करंजसाल, चित्रक, जाईचा पाला, कण्हेरमूळ हीं चार औषधें घेऊन कल्क करून त्याचे चौपट तिळांचें-तेल घेऊन त्यांत तो कल्क घालून व कल्काचा पाक चांगला होण्याविषयीं तेलाचे चौपट पाणी त्यांत घालून तेल शेष राही तोंपर्यंत पाक करून तेल गाळून ध्यावें. हें तेल ज्या मनुष्याच्या मस्तकाचे अथवा मिशांचे अथवा दाढीचे केश जाऊन जागा गुलगुळीत होते त्यास इंद्रलुप्तरोग ह्मणतात. त्या जाग्यावर तेल लावावें तेणेंकरून लवकर केंस येतात.

## नीलिकादितैल पलितदारुणा इत्यादिरोगांवर.

नीलिकाकेतकीकंदंभृंगराजःकुरंटकः ॥ ३३ ॥ तथार्जुनस्यपुष्पाणि बीजकात्कुसुमान्यपि ॥ कृष्णास्तिलाश्चतगरंसमूलंकमलंतथा ॥ ३४ ॥ अयोरजःप्रियंगुश्चदाडिमत्वग्गुडूचिका ॥ त्रिफलापद्मपंकश्चकल्कैरेभिःपृथक्पृथक् ॥ ३५ ॥ कर्षमात्रंपचेत्तैलंत्रिफलाक्काथसंयुतम् ॥ भृंगराजरसेनैव.सिद्धकेशस्थिरीकृतम् ॥ ३६ ॥ अकालपलितंहंतिदारुणंचोपजिव्हिकाम् ॥

नीलपुष्पी, केवड्याचा कंद, माका, कोन्हाटा, अर्जुनवृक्षाचीं फुलें, बिबव्याचे अथवा साण्याचे वृक्षाचीं फुलें, काळेतीळ, तगर, गुळवेल, कंदसहित कमळ, लोहचूर्ण, डाळिंसाल, वाघांटीचें मूळ, हिरडा, बेहडा. आवळकटी, कमळ संबंधीं चिखल हीं सतरा औषधें कर्ष कर्ष प्रमाण घेऊन कल्क करून त्याचे चौपट तिळाचें तेल घेऊन त्यांत तो

कल्क घालून तेलाचे चौपट त्रिफळेचा काढा व माक्याचा रस त्यांत घालून तेल शेष राही तोंपर्यंत पाक करून तेल गाळून केंसास लावावें. तेणेंकरून केशाची स्थिरता होऊन केश बळकट होतात व अकालीं ज्या मनुष्याचे केश पांढरे होतात ते या तेलाने काळे होतात व मस्तकाचे ठायीं दारुणा होतो तो व उपजिव्हरोग हे रोग दूर होतात.

## भृंगराजतैल पलितादिरोगांवर.

भृंगराजरसेनैवलोहकीटंफलत्रिकम् ॥ ३७ ॥ सारिवांचपचेत्कल्कैस्तैलं दारुणनाशनम् ॥ अकालपलितंकंडूमिंद्रलुप्तंचनाशयेत् ॥ ३८ ॥

लोहाचें कीट ह्मणजे मळ, हिरडा, बेहडा, आवळकटी, उपलसरी या पाच औषधाचा कल्क करून त्याचे चौपट तिळाचें तेल घेऊन त्यात तो कल्क घालून माक्याचा रस त्यात घालून तेल शेष राही तोंपर्यंत पाक करून तेल गाळून घ्यावें. हें तेल मस्तकाचेठायीं लाविलें असता दारुणारोग दूर होतो व ज्या मनुष्याचे अकाली केंस पांढरे होतात ते या तेलेंकरून काळे होतात व कंडूरोग दूर होतो व मस्तकाचे अथवा दाढीचे अथवा मिशाचे केश झडून जागा गुळगुळीत झाली आहे त्या जाग्यावर केंश येतात

## इरिमेदादि तैल मुखदंतादिरोगांवर.

इरिमेदत्वचंक्षुण्णांपचेत्शतपलोन्मिताम्॥जलद्रोणेततःक्वाथंगृण्हीयात्पादशेषितम् ॥ ३९ ॥ तैलस्यार्धाढकंदत्वाकल्कैःकर्षमितैःपचेत् ॥ इरिमेदलवंगाभ्यांगैरिकागरपद्मकैः ॥ ७४० ॥ मंजिष्ठालोध्रमधुकैर्लाक्षान्यग्रोधमुस्तकैः ॥ त्वक्जातिफलकर्पूरकंकोलखदिरैस्तथा ॥ ४१ ॥ पतंगधातकीपुष्पंसूक्ष्मैलानागकेशरैः ॥ कट्फलेनचसंसिद्धंतैलंमुखरजं जयेत् ॥ ४२ ॥ प्रदुष्टमांसंचलितशीर्णदंतंचसौपिरम् ॥ शावदंतंप्रहर्पंच विद्रधिंकृमिदंतजं ॥४३॥ दंतस्फुटंचदौर्गंध्यंजिव्हाताल्वयोष्ठजांरुजम्॥

काळ्याखैराची साल शमरपळें घेऊन थोडी कुटून पाणी एक द्रोण प्रमाण घालून चवथाई पाणी राही तोंपर्यंत काढा करून गाळून घ्यावा. त्यान तिळाचें तेल अर्धा आढक प्रमाण घालून त्यात टाकावयाचीं औषधें. तीं येणेंप्रमाणें. काळ्या खैराची साल, लवंग, गेरू, आगरू, पद्मकाष्ट, मंजिष्ट, लोध, ज्येष्ठमध, लाख, नागरमोथे, वडाची साल, दालचिनी, जायफळ, कापूर, कंकोळ, पांढरे खैराचीसाल, पतंग, धायटीफूल, विलायची, नागकेशर, कटुफळ हीं एकवीस औषधें कर्ष कर्ष प्रमाण घेऊन कल्क करून त्या तेलात घालून तेल शेषराही तोंपर्यंत पाक करून तेल गाळून मुखसंबंधी पीडेवर लावावें

व दातांचें मास दुष्ट जाहलें असेल त्याजवर लावावें व दात हालत असता व दाताचे हिरड्याना भेगी पडून दुखत असता व दाताचे हिरड्याना सूज येऊन लाल पडत असतां लावावे व शावदंतरोग व दाताना शीतळ, रुक्ष, व आंबट, पदार्थ मोठा वायु स हन होत नाहीं. असा महर्ष ह्मणून दंतरोग आहे तो व दंतविद्रधी व दंतसंबंधीं रक्त व कृमी हे दुष्ट होऊन हिरड्याना काळीं छिद्रें पडून पुवादिकेंकरून वाहतात तो कृमिदंतकरोग व दंतस्फुटरोग, व दाताना दुर्गंधीपणा येतो तो रोग असे नानाप्रकारचे दंतरोग दूर होतात. व जीभ, तालू, ओंष्ठ याचेही रोग दूर होतात.

### हिंग्वादितैल कर्णशूळावर.

हिंगुतुंबरुशुंठीभिःकटुतैलंविपाचयेत् ॥ ४४ ॥
तस्यपूरणमात्रेणकर्णशूलःप्रणश्यति ॥

हिंग, तुंबरुफळ सुंठ या तीन औषधाचा कल्क करून त्याचे चौपट शिरसेल तेल घेऊन त्यात तो कल्क घालून व कल्काचा पाक चागला होण्याविषयीं तेलाचे चौपट पाणी त्यात घालून तेल शेष राही तोंपर्यंत पाक करून तेल गाळून कानात घालावें तेणेंकरून कर्णशूल दूर होतो.

### बिल्वादितैल बधिरपणावर

बालबिल्वानिगोमूत्रेपिष्ट्वातैलंविपाचयेत् ॥ ४५ ॥
साजक्षीरंचनीलंचबाधिर्यंकर्णपूरणात् ॥

कोंवळीं बेलफळें घेऊन गोमूत्रात वाटून कल्क करून त्याचे चौपट तिळाचे तेल घेऊन त्यात तो कल्क घालून व तेलाचे चौपट शेळीचें दूध व कल्काचा पाक चागला होण्याविषयीं तेलाचे चौपट पाणी त्यात घालून तेल शेष राही तोपर्यंत पाक करून तेल गाळून कानात घालावें तेणेकरून बहिरेपणा दूर होतो

### क्षारतेल कर्णस्रावादिकांस.

बालमूलकशुंठीनांक्षार क्षारयुगंतथा॥४६॥ लवणानिचपंचैवहिंगुशिग्रुमहौषधम् ॥ देवदारवचाकुष्ठंशतपुष्पारसांजनम् ॥४७ ग्रंथिकंभद्रमुस्तंचकल्कैःकर्षमितैःपृथक् ॥ तैलप्रस्थंचविपचेत्कदलीबीजपूरयोः ॥ ४८ ॥ रसाभ्यांमधुसूक्तेनचातुर्गुण्यमितेनच ॥पूयस्रावंकर्णनादंशूलंबधिरताकृमीन् ॥ ४९ ॥ अन्यान्कर्णजान्रोगान्मुखरोगांश्चनाशयेत ॥ जंबीराणांफलरस मस्थेकःकुडवोन्मितम् ॥५०॥ माक्षि

कैतत्रदातव्यंपलैकापिप्पलीस्मृता ॥एतदेकीकृतंसर्वंमृद्भांडेचनिधापये

त् ॥ ५१ ॥ धान्यराशिस्थितंमासंमधुसूक्तमुदाहृतम् ॥

मुळ्याचे कोंवळ्या शेंगांचा क्षार, साजीखार, जवखार, सैंधव, संचळ कोष्ठ, बिडलोण, बांगडखार, हिंग, शेवग्याचीसाल, सुंठ, देवदार, बडीशोफ, वेखंड रसांजन, पिंपळमूळ. नागरमोथे हीं मतरा औषधें कर्ष कर्ष प्रमाण घेऊन कल्क करून त्याचे चौपट तिळाचें तेल घेऊन त्यांत तो कल्क घालून व तेलाचे चौपट केळीचे कांद्याचा रस व महाळुंगाचे फळाचा रस व मधुसूक्त हीं त्यांत घालून तेल शेषराही तोंपर्यंत पाक करून तेल गाळून तें ज्या मनुष्याचे कानांतून पु वाहतो त्याचे कानांत घालावें तेणेकरून पू बंद होतो. व कर्णनाद, व कर्णशूळ, बहिरेपणा हे रोग दूर होतात. याशिवाय दुसरे नानाप्रकारचे कर्णरोग उत्पन्न होतात ते या तेलेकरूनच दूर होतात व मुखरोगही दूर होतो.

## पाठादितैल पीनसरोगावर.

पाठाद्वेचनिशेमूर्वापिप्पलीजातिपल्लवैः ॥ ५२ ॥

दंत्याचतैलंसंसिद्धंनस्यंस्यात्दुष्टपीनसे ॥

पाहाडमूळ, हळद, हारुहळद, मोरवेल पिंपळी, जाईचीं पानें, दांतीचें मूळ, हीं सात औषधें समभाग घेऊन कल्क करून त्याचे चौपट तिळाचें तेल घेऊन त्यांत तो कल्क घालून व कल्काचा पाक चांगला होण्यास तेलाचे चौपट पाणी त्यांत घालून तेल शेषराही तोंपर्यंत पाक करून तेल गाळून नाकांत नस्य द्यावें. तेणेकरून मोठा पीनस रोग दूर होतो.

## व्याघ्रीतैल पु व पीनसरोगावर.

व्याघ्रीदंतीवचाशिग्रुतुलसीव्योषसैंधवैः ॥ ५३ ॥

कल्कैश्चपाचितंतैलंपूतिनासागदापहम् ॥

रिंगणी. दांतीचेंमूळ, वेखंड, शेवग्याचीसाल, तुळशीचींपानें, व्योष म्हणजे सुंठ, मिर्यें पिंपळी, सैंधव हीं नऊ औषधें समभाग घेऊन कल्क करून त्याचे चौपट तिळाचें तेल घेऊन त्यांत तो कल्क घालून व कल्काचा पाक चांगला होण्याविषयीं तेलाचे चौपट पाणी त्यांत घालून तेल शेषराही तोंपर्यंत पाक करून तेल गाळून ज्या मनुष्याचे नाकांत पीनस रोग होऊन पू वाहतो त्याने नाकांत हे तेल घालावें. तेणेकरून पीनस रोग दूर होतो.

## कुष्ठतैल शिंकेवर.

कुष्ठंबिल्वकणाशुंठीद्राक्षाकल्ककषायवत् ॥ ५४ ॥
साधितंतैलमाज्यंवानस्यात्क्षवथुनाशनम् ॥

कोष्ठ, कोंवळें बेलफळ, पिंपळी, सुंठ, द्राक्ष हीं पांच औषधें समभाग घेऊन कल्क करून त्याचे चौपट तिळांचें तेल, अथवा तूप घेऊन त्यांत तो कल्क घालून व कल्काचा पाक चांगला होण्याविषयीं तेलाचे चौपट पाणी त्यांत घालून तेल शेष राहीतोंपर्यंत पाक करून तेल गाळून ज्या मनुष्यास बहुत शिंका येतात त्याचे नाकांत घालावें. तेणेंकरून शिंका दूर होतात.

## गृहधूमादितैल नासाशांवर.

गृहधूमकणादारुक्षारनक्ताव्हसैंधवैः ॥ ५५ ॥
सिद्धंशिखरिबीजैश्चतैलंनासार्शसांहितम् ॥

चुलीवरचा घेरोसा, पिंपळी, देवदार, जवखार, करंजसाल, सैंधव आघाड्याचें बीज हीं सात औषधें समभाग घेऊन कल्क करून त्याचे चौपट तिळांचें तेल घेऊन त्यांत तो कल्क घालून व कल्काचा पाक चांगला होण्याविषयीं तेलाचे चौपट पाणी घालून तेल शेष राही तोपर्यंत पाक करून तेल गाळून ज्या मनुष्याचे नाकांत मांसरूपी मोड आहे त्याचे नाकांत घालावें तेणेंकरून मोड दूर होतो या मोडास नासार्श ह्मणतात.

## वज्रीतैल सर्वकुष्टांवर.

महिषीविट्भवंद्रावंसर्वा
वज्रीक्षीरंरविक्षीरंद्रवंधत्तुराचित्रकम् ॥ ५६ ॥ ~~~ ॥ ५७ ॥ तैलावशे
शैतिलतैलकम् ॥ पचेत्तैलावशेषंचगोमूत्रेथचतुर्गुणे ॥ ५७ ॥ तैलावशे
षंपक्त्वाचततैलंप्रस्थमात्रकम् ॥ गंधकाग्निशिलातालंविडंगातिविषाविष·
म् ॥ ५८ ॥ तिक्तकोशातकीकुष्ठंवचामांसीकटुत्रयम् ॥ पीतदारुचय
ष्ट्याव्हंसर्जिकाक्षारजीरकम् ॥ ५९ ॥ देवदारुचकर्षांशंचूर्णंतैलेविनि
क्षिपेत् ॥ वज्रतैलमितिख्यातमभ्यंमात्सर्वकुष्टनुत् ॥ ७६० ॥

निवडुंगाचा चीक, रुईचा चीक, धोत्र्याचा रस, चित्रकाचा रस, ह्मशीचे शेणाचा रस हे सारे रस समभाग व तिळांचें तेल साऱ्यांचे समभाग घेऊन त्यांत ते सारे रस घालून तेल शेषराही तोंपावेतों पाक करून नंतर तेलाचे चौपट गोमूत्र घेऊन त्या तेलांत घालून फिरून तेल शेषराही तोंपर्यंत पाक करून तेल गाळून घ्यावें. त्यांत औषधें टाकावीं ती येणें प्रमाणें. गंधक, चित्रक, मनशील, हरताळ, वावडींग, अतिविष, शुद्ध

केलेला वचनाग कडुदोडके, कोष्ठ, वेखंड, जटामासी, ज्येष्ठमध, साजीखार, सुंठ, मिरें पिंपळी, दारुहळद, जिरें, देवदार हीं एकुणीस ओषधे कर्ष कर्ष प्रमाण घेऊन व बारीक चूर्ण करून त्या तेलात मेळवून तेल अंगास लावावें. तेणेंकरून सारी कुष्टें दूर होतात

## करवीरादितैल लोमशातनावर-

करवीरशिफादंतींत्रिवृत्कोशातकीफलम् ॥
रंभाक्षारोदकैस्तैलंप्रशस्तंलोमशातनम् ॥ ६१ ॥

कण्हेराचें मूळ, दातींचें मूळ, निशोत्तर, कडुदोडकीचें फळ या चार औषधांचा कल्क करून त्याचे चौपट तिळाचें तेल घेऊन त्यात तो कल्क घालून व केळीचे पानाची राख करून त्याचा क्षार काढून त्या क्षाराचें पाणी तेलाचे चौपट त्यात घालून तेल शेष राही तोंपर्यंत पाक करून तेल गाळून ज्या जाग्यावरचे केंश काढावयाचे आहेत त्या जाग्यावर लावावें तेणेंकरून केश जातात.

इति श्रीदामोदरसूनु शार्ङ्गधरेण विरचितायां संहितायां
चिकित्सास्थाने तैलकल्पना नाम नवमोऽध्यायः ॥ ९ ॥

---

# दशमोध्यायः ।

## आसव आणि अरिष्टादिक यांची कल्पना.

द्रवेषुचिरकालस्थंद्रव्यंयत्संधितंभवेत् ॥ आसवारिष्टभेदैस्तत्प्रोच्यतेभेषजोचितम् ॥६२॥ यदपक्वौपधांबुभ्यांसिद्धंमद्यसआसवः॥ अरिष्टःक्वाथसिद्धःस्यात्तयोर्मानंपलोन्मितम् ॥ ६३ ॥ अनुक्तमानारिष्टेषुद्रवद्रोणेतुलागुडम् ॥ क्षौद्रंक्षिपेद्गुडादर्धंप्रक्षेपंदशमांशकम् ॥ ६४ ॥ ज्ञेयःशीतरसःसिंधुरपक्वमधुरद्रवैः ॥ सिद्धपक्वरसःसिंधुसंपक्वमधुरद्रवैः॥ ६५ ॥ परिपक्वान्नसंधानसमुत्पन्नांसुरांजगुः ॥ सुरामंडःप्रसन्नास्यात्ततःकादंबरीघना ॥ ६६ ॥ तदधोजगलोज्ञेयोमेदकोजगलाद्घनः ॥ पक्वोमेहृतसारःस्यात्सुराबीजचकिण्वकम् ॥ ६७ ॥ यत्तालखर्जूररसैःसाधितासाहिवारुणी ॥ कंदमूलफलादीनिसस्नेहलवणानिच ॥ ६८ ॥ यत्रद्रवेभिषूयंतेतच्छुक्तमभिधीयते॥विनष्टमम्लतांयातंमधुवामधुरद्रवः ॥ ६९ ॥ विनष्टःसंधितोयस्तुतच्चुक्रमभिधीयते ॥ गुडांबुनातैलकंदमूलफलै स्तथा ॥ ७० ॥ संधितंचाम्लतांयातगुडशुक्तंतदुच्यते ॥ एवमेवेक्षु

सूक्तंस्यान्मृद्वीकासंभवंतथा ॥ ७१ ॥ तुषांबुसंधितंज्ञेयमामैर्विदलितै र्यवैः ॥ यवैस्तुनिस्तुषैःपक्कैःसौवीरंसंधितंभवेत् ॥७२॥ कुल्मापधान्य मंडादिसंधितंकांजिकंविदुः ॥ संडाकीसंधिताज्ञेयामूलकैःसर्षपादिभिः ॥७३॥

उदकादि द्रव पदार्थामध्यें औषधे घालून पात्राचे तोंडाला मुद्रा देऊन मास पक्ष पर्यंत हें ह्मणजे उत्कृष्ट औषध होतें तें आसव आणि अरिष्ट या भेदेंकरून दोन प्रकारचें ावें. आसव आणि अरिष्ठ यांचा भेद असा कीं, उदक व औषधें यांचा पाक केल्यावांचून क रीतीनें सिद्ध करितात त्याला आसव ह्मणतात, व काढा सिद्ध करून त्यामध्यें र्वे घालून पूर्वोक्त रीतीनें सिद्ध करितात त्याला अरिष्ट ह्मणतात. त्या दोहोंची पोटांत कवाची मात्रा पळ प्रमाण जाणावी व ज्या अरिष्ट प्रयोगाचे ठायीं जलादिकांचें न सांगितलें नाहीं त्या प्रयोगांत उदकादि द्रव पदार्थ एक द्रोण प्रमाण घेऊन त्यांत ळ एक तुळा प्रमाण घालून व गुळाचे अर्धे मान मध घालावी, त्यांत औषधाचें चूर्ण कावयाचें तें गुळाचे दशांश घालून अरिष्ट सिद्ध करावा. आतां सिंधु मद्याचे भेद सांगतों. पक्क अते जे उंसादिकाचे रस आदिकरून मधुरद्रव पदार्थ तिहींकरून सिद्ध झालें जें व त्याला सीतरससिंधु ह्मणतात व सपक्क असे जे मधुर द्रवपदार्थ तिहींकरून सिद्ध ाले जें मद्य त्याला पकरससिंधु ह्मणतात. सुरा प्रसन्नादिक मद्याचे भेद सांगतों. तंदु- ादिक धान्य शिजवून अग्निसंयोगें करून यंत्रद्वारा जें मद्य उत्पन्न करितात त्याला सुरा णतात व त्या सुरेचा जो मंड ह्मणजे फेन त्याला प्रसन्ना ह्मणतात व त्या प्रसन्ने ध्यें जो घन भाग ह्मणजे घट्ट त्याला कादंबरी ह्मणतात व त्या सुरेचें अधोभागीं द्रव ाग आहे त्याला जगल ह्मणतात व त्या जगलामध्यें जो घन भाग आहे त्याला मेदक णतात. तो मेदक पक्क करून त्यांतील सार काढून शेष राहिलें जें त्याला सुराबीज व िण्वक ह्मणतात. ताडाचा रस व खजुराचा रस यांपासून अग्निसंयोगें करून यंत्रद्वारा उत्पन्न रितात जे मद्य त्याला वारुणी ह्मणतात व कंद, मुळे, फलादिक, तैलादिक, स्नेह व व हीं सारीं उदकादि द्रवपदार्थामध्यें घालून अग्निसंयोगेंकरून यंत्रद्वारा जें मद्य का- ढतात त्याला सूक्त ह्मणतात. व नासून आम्लतेप्रत पावलें जें मद्य अथवा मधुर द्रव ांना पात्रात घालून तोंडाला मुद्रा देऊन मास पक्ष ठेऊन सिद्ध झालें जें मद्य त्याला क ह्मणतात व गूळ व पाणी व तेल व कंद मूळ फळें हीं सारीं पात्रांत घालून तोंडाला देऊन मास पक्ष ठेवून आम्लतेप्रत पावली असतां त्याला गुडसुक्त ह्मणतात याप्र- उंसाचें व द्राक्षाचें सूक्त करावें व कच्चे जव भरडून त्यात पाणी घालून पात्राचे मुद्रा देऊन काही एक दिवस ठेवावें त्याला तुषांब ह्मणतात व जवाचा कोंडा

काढून शिजवून त्यांत पाणी घालून पात्राचे तोंडाला मुद्रा देऊन कांहीं एक दिवस ठेवावें याला सौवीर ह्मणतात. कुळिथ अथवा तांदूळ घेऊन त्यांत पाणी घालून शिजवून त्यांतील मंड ह्मणजे पेज काढून त्यांत सुंठ, राई, जिरें, हिंग, सैंधव, हळद इत्यादिक घालून पात्राचे तोंडाला मुद्रा देऊन तीन चार दिवस ठेवावें त्याला कांजी ह्मणतात व मुळ्याचे काप काढून त्यांत पाणी घालून हळद, हिंग शिरीष म्हणजे मोहऱ्या, सैंधव, जिरें, सुंठ इत्यादिकांचें चूर्ण त्यांत घालून पात्राचें तोंड झाकून तीन चार दिवसपर्यंत ठेवावें. त्याला संडाकी म्हणतात. या प्रकारें आसव आणि अरिष्टादिक यांची कल्पना जाणावी.

### उशीरासव रक्तपित्तादिकांस.

उशीरंवालकंपद्मंकाश्मरीनीलमुत्पलम् ॥ प्रियंगुपद्मकंलोध्रंमंजिष्ठाधन्वयासकः ॥७४॥ पाठाकिराततिक्तंचन्यग्रोधोदुंबरंसटी॥पर्पटंपुंडरीकंचपटोलंकांचनारकम् ॥७५॥ जंबूशाल्मलिनिर्यासंप्रत्येकंपलसंमितान्॥ भागान्सुचूर्णितान्कृत्वाद्राक्षायाःपलविंशतिः ॥ ७६ ॥ धातकींषोडशपलांजलद्रोणद्वयेक्षिपेत्॥ शर्करायास्तुलांदत्वाक्षौद्रस्यैकतुलांतथा ॥ ७७ ॥ मासंसंस्थापयेत्भांडेमांसीमरिचधूपिते ॥ उशीरासवइत्येपरक्तपित्तनिवारणः ॥ ७८ ॥ पांडुकुष्ठप्रमेहार्शःकृमिशोफापहस्तथा ॥

वाळा, नेत्रवाळा, तांबडेंकमळ, शिवण निळेंकमळ, वाघांटीचें मूळ अथवा राळ, पद्मकाष्ट, लोध्र, मंजिष्ठ, धमासा, पाहाडमूळ, किराईत, कटुकी, वडाचीसाल, उंबराची साल, कचोरा, पित्तपापडा, पांढरेंकमळ आणि पटोल, कांचनवृक्षाचीसाल, जांभळीची साल, सावरीचा डिंक, हीं बेवीस औषधे पळपळ प्रमाण व द्राक्षें २० पळें, धायटीचीं फुलें १६ पळें घेऊन साऱ्यांचें चूर्ण करून दोन द्रोण प्रमाण पाणी घेऊन त्यांत चूर्ण घालून व साखर एक तुळा प्रमाण त्यांत घालून मडक्यास जटामांसी व मिऱ्यें यांची धुरी देऊन त्यांत तीं सारीं औषधें घालून मडक्याचे तोंडाला मुद्रा देऊन एक महिना ठेवून नंतर मुद्रा काढावी याला उशीरासव ह्मणतात. हा आसव पोटांत घ्यावा येणेकरून रक्त, पित्त, पांडुरोग, कुष्ट, परमा, मूळव्याध, जंतविकार, शोष हे रोग दूर होतात.

### पिपल्यासव क्षयादिकांवर.

पिप्पलीमरिचंचव्यंहरिद्राचित्रकोघनः ॥७९॥ विडंगंक्रमुकोलोध्रःपाठाधात्र्यैलवालुकम् ॥ उशीरंचंदनंकुष्ठंलवंगंतगरंतथा ॥८०॥ मांसीत्वगेलापत्रंचप्रियंगुर्नागकेशरम्॥एषामर्धपलान्भागान्सूक्ष्मचूर्णीकृता

व पांडुरोग. सूज, पोटांत गुल्में होतात तीं, मूळव्याध, कुष्ट, पोटांत डावेकडे होतो तो, कंडू, श्वास, खोकला, भगंदर, आवदणें, संग्रहणी हृद्रोग हे दूर होतात.

### कुटजारिष्ट सर्व ज्वरांवर.

तुलांकुटजमूलस्यमृद्वीकार्धतुलांतथा ॥ मधुकंपुष्पकाश्मर्योभागान्दशप लोन्मितान॥७९०॥चतुर्द्रोणेंभसःपक्त्वाक्काथेंद्रोणावशेषिते॥धातक्या विंशतिपलंगुडस्यचतुलांक्षिपेत् ॥ ९१ ॥ मासमात्रंस्थितोभांडेकुटजारि ष्टसंज्ञितः ॥ ज्वरान्प्रशमयेत्सर्वान्कुर्याच्चीक्ष्णंधनंजयम् ॥ ९२ ॥

कुडयाचे मूळ एक तुळा प्रमाण, द्राक्षें अर्ध तुळा प्रमाण, मोहाची फुलें, हीं दहा दहा पळें याप्रमाणें सारीं औषधें घेऊन थोडी कुटून चार द्रोण प्रमाण घेऊन त्यांत तीं औषधें घालून एक द्रोण पाणी राही तोंपर्यंत काढा करून त्यांत धायटीचें फुलांचें चूर्ण वीस पळ प्रमाण घालून व गूळ एक तुळा प्रमाण मेळवून सारीं मडक्यांत घालून त्याचे तोंडाला मुद्रा देऊन एक महिनापर्यंत ठेवून मुद्रा काढावी, याला कुटजारिष्ट म्हणतात. हा अरिष्ट पोटांत घ्यावा येणेंकरून ज्वर दूर होतात व अग्नि प्रदीप्त होतो,

### विडंगारिष्ट विद्रध्यादिकांस.

विडंगंग्रंथिकंरास्नाकुटजत्वक्फलानिच ॥ पाठेलवालुकंधात्रीभागान पंचपलान्पृथक् ॥९३॥ अष्टद्रोणेंभसःपक्त्वाकुर्याद्द्रोणावशेषितम् ॥ पूतेशीतेक्षिपेत्तत्रक्षौद्रंपलशतत्रयम् ॥९४॥ धातकीविंशतिपलंत्रिजात त्रिपलंतथा ॥ प्रियंगुकांचनाराणांसलोध्राणांपलंपलम् ॥ ९५ ॥ व्यो षस्यचपलान्यष्टौचूर्णीकृत्यप्रदापयेत् ॥ घृतभांडेविनिक्षिप्यमासमेकंवि धारयेत् ॥ ९६ ॥ ततःपिबेद्यथार्हंतुजयेद्विद्रधिमूर्छितम् ॥ ऊरुस्तंभा श्मरीमेहान्प्रत्यष्ठीलाभगंदरान् ॥ ९७ ॥ गंडमालांहनुस्तंभंविडंगा रिष्टसंज्ञितः ॥

वावडिंग, पिंपळमूळ, रास्ना, कुडेसाल, इंद्रजव, पाहाडमूळ, एलवालुक, हीं आठ औषधें पांच पांच पळें घेऊन थोडीं कुटून त्यांत आठ द्रोण प्रमाण पाणी घालून एक द्रोण प्रमाण पाणी राही तोंपर्यंत काढा करून गाळून थंड त्यांत तीनशें पळें मध घालावी व धायटीचीं फुलें वीस पळें व दालचिनी, वेलायची, तमालपत्र, हीं तीन औषधें पळपळ प्रमाण, गहुला, कांचन व लोध्र हीं एकेक पळ प्रमाण व सुंठ, मिऱ्यें, पिंपळी या तीन औषधांमिळून

॥ प्रमाणें सारीं औषधें घेऊन चूर्ण करून त्या काढ्यांत मेळवावें आणि सारीं त्या तुपाचे मडक्यांत घालून त्याचे तोंडाला मुद्रा देऊन एक महिनापर्यंत ठेवावें मुद्रा काढावी. याला विडंगारिष्ट ह्मणतात. हा अरिष्ट पोटात घ्यावा येणेंकरून वेरोग व ऊरुस्तंभरोग, मुतखडा, परमा, पोटांत वेंवांचेखालीं प्रत्यष्ठीला या नामें ह वायूचा रोग होतो तो, गंडमाळा, हनुस्तंभवायु हे सारे रोग दूर होतात.

## देवदार्व्यारिष्ट प्रमेहादिकांवर.

तुलार्धंदेवदारुःस्याद्वासाचपलविंशतिः ॥ ९८ ॥ मंजिष्ठेंद्रयवादंतीत गरंरजनीद्वयम् ॥ रास्नाकृमिघ्नमुस्तंचशिरीषंखदिरार्जुनौ ॥ ९९ ॥ भागान्दशपलान्दद्यात्यवान्यावत्सकस्यच ॥ चंदनस्यगुडूच्याश्चगे हिण्याश्चित्रकस्यच ॥८००॥ भागानष्टपलानेतानष्टद्रोणेंभसःपचेत् ॥ द्रोणशेषेकषायेचपूतेशीतेप्रद्रापयेत् ॥ १ ॥ धातक्याःषोडशपलंमाक्षि कस्यतुलात्रयम् ॥ व्योपस्यद्विपलंदद्यात्त्रिजातंचचतुःपलम् ॥ २ ॥ चतुःपलंप्रियंगुश्चद्विपलंनागकेशरम् ॥ सर्वाण्येतानिसंचूर्ण्यघृतभांडेवि धारयेत् ॥३॥ मासादूर्ध्वंपिबेदेनंप्रमेहंहंतिदुर्जयम् ॥ वातरोगान्ग्रहण्य र्शोमूत्रकृच्छ्राणिनाशयेत् ॥४॥ देवदार्व्यादिकोरिष्टःकंडूकुष्टविनाशनः ॥

देवदार अर्ध तुळा प्रमाण, अडूळसा तीस पळें प्रमाण, मंजिष्ठ, इंद्रजव, दांतीचेमूळ, तगर, हळद, दारुहळद, रास्ना, वावडिंग, नागरमोथे, शिरीष, खैराचीसाल, अर्जुनवृक्षाची साल हीं बारा औषधें दहा दहा पळ प्रमाण घ्यावीं अजमोदा, कुडासाल, पादरा चंदन, गुळवेल, कटुकी, चित्रक हीं सहा औषधें आठ आठ पळ प्रमाण घ्यावीं. मग सारीं औषधें थोडीं थोडीं कुटून त्यात आठ द्रोण पाणी घालून एक द्रोण पाणी राही तोपर्यंत काढा करून गाळून थंड जाहल्यावर त्यांत औषधें टाकावयाचीं तीं येणेंप्रमाणें– धायटीचीं फुलें सोळा पळें व मध तीन तुळा प्रमाण व सुंठ, मिरें, पिंपळी या तिहीं मिळून दोन पळ प्रमाण व दालचिनी, विलायची, तमालपत्र हीं तीन औषधें चार पळ प्रमाण व वाघाटीचें मूळ अथवा राळे चार पळ प्रमाण व नागकेशर दोन पळ प्रमाण हीं सारीं औषधें घेऊन चूर्ण करून त्या काढ्यात घालावें व मध सांगितल्याप्रमाणें घालून सारीं एकजागीं मेळवून तुपाने सानलेल्या मडक्यात घालून त्याचे तोंडाला मुद्रा देऊन एक महिनापर्यंत ठेवून नंतर मुद्रा काढावी. याला देवदार्व्यारिष्ट ह्मणतात. हा अरिष्ट पोटांत घ्यावा. येणेंकरून मोठा दुर्घट परमा दूर होतो व वायुरोग, मूळव्याध, संग्रहणी, मूतकृच्छ्र, कुष्ट हे रोग दूर होतात.

### खदिरारिष्ठ कुष्ठादिकांवर.

खदिरस्यतुलार्धंतुदेवदारुचतत्समम् ॥५॥ वाकुचीद्वादशपलादार्विस्या
त्पलविंशतिः॥त्रिफलाविंशतिपलान्यष्टद्रोणेंभसःपचेत्॥६॥ कषायद्रो
णशेषेचपूतेशीतेविनिक्षिपेत्॥तुाद्वयमंलाक्षिकस्यतुलैकाशर्करामता॥७॥
धातक्याविंशतिपलंकंकोलंनागकेशरम् ॥ जातीफलंलवंगैलात्वक्पत्रा
णिपृथक्पृथक् ॥८॥ पलोन्मितानिक्षुण्णायादद्यात्पलचतुष्टयम्॥घृत
भांडेविनिक्षिप्ययासादूर्ध्वांपिबेत्ततः ॥ ९ ॥ महाकुष्ठानिहृद्रोगंपांडुरो
गार्बुदंतथा ॥ गुल्मग्रंथिकृमीन्श्वासंकासंप्लीहोदरंतथा ॥८१०॥ एपवै
खदिरारिष्टःसर्वकुष्टनिवारणः ॥

खैराचीसाल अर्ध तुळा प्रमाण, देवदार अर्धतुळा, बावच्या बारा पळें, दारुहळद वीस पळें हिरडा, बेहडा, आवळकटी, या तिन्हीं मिळून वीस पळें याप्रमाणें सारीं औषधें घेऊन थोडीं थोडीं कुटून त्यांत आठ द्रोण प्रमाण पाणी घालून एक द्रोण पाणी राही तोंपर्यंत काढा करून गाळून थंड जाहल्यावर त्यांत दोन तुळाप्रमाण मध घालावी. व साखर एक तुळा प्रमाण घालावी, व धायटीचीं फुलें वीस पळें, कंकोळ, नागकेशर, जायफळ, लवंगा, विलायची, दालचिनी, तमालपत्र हीं सात औषधें एक एक पळ, पिंपळी चारपळें, या मानें घेऊन सान्यांचें चूर्ण करून त्या काढ्यांत मेळवून सारीं तुपाचे रावल्या मडक्यांत घालून त्याचे तोंडाला मुद्रा देऊन एक महिनापर्यंत ठेवून नंतर मुद्रा काढावी. याला खदिरारिष्ट म्हणतात. हा अरिष्ट प्यालें असतां महाकुष्टें, हृद्रोग, पांडुरोग व अर्बुदरोग व गुल्म, ग्रंथि, जंतविकार, श्वास, खोकला पोटांत डावेकडे कवळू रोग होतो तो. हे सारे रोग दूर होतात

### बब्बूल्यारिष्ट क्षयादिकांवर.

तुलाद्वयंचबब्बुल्याश्चतुर्द्रोणजलेपचेत् ॥ ११ ॥ द्रोणशेषेरसेशीतेगुडस्य
त्रितुलांक्षिपेत् ॥ धातकींषोडशपलांकृष्णांचद्विपलांतथा ॥ १२ ॥ जा
तीफलानिकंकोलमेलात्वक्पत्रकेशरम् ॥ लवंगंमरिचंचैवपलिकान्युप
कल्पयेत् ॥१३॥ मासंभांडस्थितस्त्वेषबब्बुल्यारिष्टःजयेत् ॥ क्षयंकुष्ट
मर्शांसारंप्रमेहश्वासकासनुत् ॥ १४ ॥

बाभळीची साल दोन तुळा प्रमाण आणून थोडी थोडी कुटून त्यांत चार द्रोण प्रमाण घालून एक द्रोण पाणी राही तोंपर्यंत काढा करून गाळून थंड जाहल्यावर त्यांत

ळ तीन तुळा प्रमाण घालून व धायटीचीं फुलें १६ पळें पिंपळी दोन पळें, जायफळ, कं-
केळू, विलायची, दालचिनी, तमालपत्र, नागकेशर, लवंग, मिर्यें हीं आठ औषधें पळ पळ
प्रमाण घेऊन साऱ्यांचें चूर्ण करून त्या काढ्यांत मेळवून सारीं मडक्यांत घालून त्याचे
तोंडाला मुद्रा देऊन एक महिना पर्यंत ठेवून तंतर मुद्रा काढावी. याला बब्बुल्यारिष्ट म्हण-
तात. हा अरिष्ट पोटांत घ्यावा. येणेंकरून क्षयरोग, कुष्ट, अतिसार, परमा, खोकला, श्वास,
हे सर्व रोग दूर होतात.

## द्राक्षारिष्ट उरःक्षतादिकास.

द्राक्षातुलार्धंद्विद्रोणेजलस्यविपचेत्सुधीः ॥ पादशेषेकषायेचपुतेशीतेविनिक्षिपेत् ॥१५॥ गुडस्यद्वितुलांतत्रत्वगेलापत्रकेशरम् ॥ प्रियंगुमरिचंकृष्णाविडंगंचेतिचूर्णयेत् ॥१६॥ पृथक्पलोन्मितैर्भागैस्ततोभांडेनिधापयेत् ॥ समंततोघाटयित्वापिवेज्जातरसंततः ॥१७॥ उरःक्षतंक्षयंहंतिकासश्वासगलामयान् ॥ द्राक्षारिष्टाव्हयःप्रोक्तोबलकृन्मलशोधनः ॥१८॥

द्राक्षे अर्धे तुळा प्रमाण घेऊन त्यांत पाणी दोन द्रोण प्रमाण घालून चवथाई पाणी राही
तोंपर्यंत काढा करून गाळून थंड जाहल्यावर त्यात गूळ दोन तुळा प्रमाण घालून दालचिनी
विलायची, तमालपत्र, नागकेशर, घापांटीचें मूळ अथवा राळें, मिर्यें, पिंपळी वावडिंग हीं
आठ औषधें पळ पळ प्रमाण घेऊन चूर्ण करून त्या काढ्यांत घालून ढवळून सारीं एक-
जागीं मेळवून मडक्यात घालून तोंडाला मुद्रा देऊन मास किंवा पक्षपर्यंत ठेवून त्या
औषधाचा चांगला रस जाहला असें जाणून नंतर मुद्रा काढावी. याला द्राक्षारिष्ट असें
म्हणतात. हा अरिष्ट पोटांत घ्यावा येणेंकरून उरःक्षत रोग, क्षयरोग, खोकला, श्वास, कंठाचे
रोग हे सारे रोग दूर होतात, शक्ति येते व मळ साफ होतो.

## रोहितारिष्ट अर्शादिकांवर.

रोहीतकतुलामेकांचतुर्द्रोणेजलेपचेत् ॥ पादशेषेरसेशीतेपूतेपलशतंद्वयम् ॥१९॥ दद्यात्गुडस्यधातक्याःपलषोडशिकामता ॥ पंचकोलंत्रिजातंचत्रिफलांचविनिक्षिपेत् ॥ ८२० ॥ चूर्णयित्वापलांशेनततोभांडेविधापयेत् ॥ मासादूर्ध्वंचपिबतांगुदजानांतिसंक्षयम् ॥ २१ ॥ ग्रहणीपांडुहृद्रोगप्लीहगुल्मोदराणिच ॥ कुष्ठशोफारुचिहरोरोहितारिष्टसंज्ञकः ॥ २२॥

रक्तरोडा एक तुळा आणून थोडा थोडा कुटून त्यांत चार द्रोण पाणी घालून चवथाई

पाणी राही तोंपर्यंत काढा करून गाळून थंड जाहल्यावर त्यांत गूळ दोनशे पळें घालून व धायटीचीं फुलें सोळा पळें घालून व पंचकोल औषधें ५ व त्रीजात औषधें ३ व त्रिफळा औषधें तीन हीं अकरा औषधें एक एक पळ प्रमाण घेऊन साऱ्याचें चूर्ण करून त्या काढ्यांत मेळवून सारी मडक्यात घालून त्याचे तोंडाला मुद्रा देऊन एक महिन्यापर्यंत ठेवून नंतर मुद्रा काढावी. याला रोहितारिष्ट म्हणतात. हा अरिष्ट पोटांत घ्यावा. येणेंकरून मूळव्याध, संग्रहणी, पांडुरोग, हृद्रोग, पोटांत डावेकडे कवलुरोग होतो तो, गुल्म उदर, कुष्ट, सूज, आवदणें हे रोग दूर होतात.

## दशमूलारिष्ट क्षयप्रमेहादिकांवर.

पर्णीद्वयंबृहत्यौगोकंटोबिल्वोग्निग्रंथिकोरलुः ॥ पाटलाकाश्मरीचेतिदश मूलमिहोच्यते ॥२३॥ दशमूलानिकुर्वीतभागैःपंचपलैःपृथक् ॥ पंच विंशत्पलंकुर्यात्चित्रकंपौष्करंतथा ॥२४॥ कुर्याद्विंशत्पलंलोध्रंगुडूची तत्समाभवेत् ॥ पलैःषोडशभिर्धात्रीरविसंख्यैर्दुरालभा ॥२५॥ खदि रोबीजसारश्चपथ्याचेतिपृथक्पलैः ॥ अष्टभिर्गणितात्कुष्ठंमंजिष्ठादेव दारुच ॥२६॥ विडंगंमधुकंभार्गीकपित्थोक्षःपुनर्नवा ॥ चव्यंमांसी प्रियंगुश्चसारिवाकृष्णजीरकम् ॥२७॥ त्रिवृतारेणुकारास्नापिप्पली क्रमुकःसटी ॥ हरिद्राशतपुष्पाचपद्मकंनागकेशरम् ॥ २८ ॥ मुस्तमिं द्रयवाः शृंगीजीवकर्षभकौतथा ॥ मेदाचान्यामहाभेदाकाकोल्यौऋद्धि वृद्धिके ॥२९॥ कुर्यात्पृथक्द्विपलिकान्पचेदष्टगुणेजले ॥ चतुर्थांशं शृतंनीत्वाभृद्भांडेसन्निधापयेत् ॥ ८३० ॥ चतुःषष्टिपलान्द्राक्षापचे न्नीरेचतुर्गुणे ॥ त्रिपादशेषंनीतंचपूर्वकायेशृतोक्षिपेत् ॥ ३१ ॥ द्वात्रिं शत्पलिकंक्षौद्रंदद्यात्गुडस्यचतुःशतम् ॥ त्रिंशत्पलनिधातक्याःकंकोलं जलचंदनम् ॥ ३२ ॥ जातीफलंलवंगंचत्वगेलापत्रकेशरम् ॥ पिप्पली चेतिसंचूर्ण्यभागैर्द्विपलिकैःपृथक् ॥३३॥ शाणमात्राचकस्तूरीसर्वमे कत्रनिक्षिपेत् ॥ भूमौनिखनयेद्भांडंततोजातरसंपिबेत् ॥ ३४ ॥ क तकस्यफलंक्षिप्त्वारसंनिर्मलतांनयेत् ॥ ग्रहणीमरुचिंश्वासंकासंगुल्मंभगं दरम् ॥ ३५ ॥ वातव्याधिंक्षयंछर्दिंपांडुरोगंचकामलाम ॥ कुष्टान्यर्शां सिमेहांश्चमंदाग्निमुदराणिच ॥३६॥ शर्करामश्मरींमूत्रकृच्छ्रंधातुक्षयं जयेत् ॥ कृशानांपुष्टिजननोवंध्यानांगर्भदःपरः ॥ ३७ ॥ अरिष्टोद शमूलाख्यस्तेजःशुक्रबलप्रदः ॥

बेलमूळ. ऐरणीमूळ, शिवणमूळ, रानगांजा, रालभाल. रिंगणी, मोतारिंगणी, गोखरू, बेलमूळ. ऐरणीमूळ, शिवणमूळ, डळमूळ, टेटूमूळ या दहा औषधानां दशमूळ असें ह्मणतात. हें दशमूळ अर्ध अर्ध प-
प्रमाण घ्यावें व चित्रक पंचवीस पळें व पोखरामूळ पंचवीस पळें व लोध वीस पळें व गु-
ठवेल वीस पळें व आवळकटी १६ पळें व धमासा १२ पळें व खैरसाल आठ पळें
। बिबव्याची साल अथवा आसाण्यांची साल आठ पळें व हिरडे आठ पळें व कुष्ठ, मं
जेष्ठ, देवदार, वावडिंग, ज्येष्ठमध, भारंगसाल, कंवठ, बेहडा, पुनर्नवा, चवर्क, जटामांसी
बाघांटीचें मूळ अथवा राळे, उपलसरी, शाहाजिरें, निशोत्तर, रेणुकबीज, रास्ना, पिंपळी
सुपारी, कचोरा, हळद, बडीशोफ, पद्मकाष्ठ, नागकेशर, नागरमोथे, इंद्रजव, कांकड-
शिंगी, जीवक ऋषभक या दोहोंचे अभावीं विदारी कंद व मेदा व महामेदा या दो-
होंचे अभावीं ज्येष्टमध, व कांकोली, क्षीरकांकोली या दोहोंचे अभावीं आसंध, व ऋद्धि,
वृद्धि या देहोंचे अभावीं वाराहीकंद हीं एकवीस औषधें दोन दोन पळें प्रमाण घ्यावीं.
मग हीं सारीं औषधें घेऊन थोडीं कटून त्यांत साऱ्या औषधांचे आठपट पाणी घालून
चवथाई पाणी राही तोंपर्यंत काढाकरून गाळून मडक्यांत ठेवावा मग द्राक्षें चवसष्ट
पळें घेऊन त्यांत पाणी चौपट घालून तीन हिसे पाणी राही तोंपर्यंत काढा करून गाळून
पहिलें काढयांत मेळवावा. त्यांत बत्तीस पळें मध घालून चारशेंपळें गुळ घालावा व
धायटीचीं फुलें तीस पळें, व कंकोल, वाळा, पांढरचंदन, जायफळ, लवंग, दालचिनी,
विलायची, तमालपत्र, नागकेशर, पिंपळी हीं दहा औषधें दोन दोन पळें घेऊन चूर्ण
करून त्या काढ्यांत मेळवावें. व कस्तुरी शाण प्रमाण घेऊन चूर्ण करून त्यांत मेळ-
वून मडक्याचे तोंडाला मुद्रा देऊन मासपक्ष पर्यंत भुईंत पुरून त्या औषधांचा चांगला
रस जाहला असें जाणून नंतर त्याला बाहेर काढून मुद्रा दूर करून त्यांत निर्मळीचे
बियांचें चूर्ण थोडें टाकावें, ह्मणजे तो रस निर्मळ होतो. याला दशमूलारिष्ट असें ह्मण-
तात. हा आरिष्ट पोटांत घ्यावा येणेकरून संग्रहणी, आवढणें, श्वास, खोकला, गुल्म,
भगंदर, वायूचे रोग, क्षयरोग, ओकारी, पांडुरोग, डोळ्यांत कावीळ रोग होतो तो,
कुष्टें, मूळव्याधी, परमा. अग्निमांद्य, उदररोग. मूतखडा, मूत्रकृच्छ्र, धातुक्षय हे सारे रोग
दूर होतात व हा अरिष्ट दुर्बल मनुष्याला पुष्टि देतो, व वांझोट्या स्त्रियांना पुत्र देतो व
तेज, धातु, बळ यांना देतो.

इति श्रीदामोदरसुनु शार्ङ्गधरेण विरचितायां संहितायां चिकित्सास्थाने
आसवारिष्टकल्पना नाम दशमोध्यायः ॥ १० ॥

# एकादशोऽध्यायः ।

## स्वर्णादिकधातूंचीं नांवें व शोधणें.

स्वर्णतारंताम्रमारंनागवंगौचतीक्ष्णकम् ॥ ३८ ॥ धातवःसप्तविज्ञेया स्ततस्ताञ्छोधयेद्बुधः॥स्वर्णताराऽरताम्राणांपत्राण्यग्नौप्रतापयेत्॥३९॥ निषिंचेत्तप्तानितैलेतक्रेचकांजिके ॥ गोमूत्रेचकुलत्थानांकषायेचत्रि धात्रिधा ॥ ८४० ॥ एवंस्वर्णादिलोहानांविशुद्धिः संप्रजायते ॥ नाग वंगौप्रतप्तौचगलितौतौनिषेचयेत् ॥ ४१ ॥ त्रिधात्रिधाविशुद्धिःस्या द्रविदुग्धेनचत्रिधा ॥

सोनें, रुपें, तांबें, पितळ, शिसें, कथिल, पोलादिलोह या सातांना धातु असें ह्मणतात हे सप्तधातु पर्वतादिकांपासून होतात यांचें शोधन–सोनें, रुपें, पितळ व तांबें याचे पत्रे करून अग्नींत तापवून तेलांत, ताकांत, कांजींत व गोमूत्रांत व कुळित्थांचे काढ्यांत तीन तीनवेळ विझवावे या प्रकारें सोनें आदिकरून सात्यांचीं शुद्धि करावी. व शिसें आणि कथील यांची विशेष शुद्धि करावयाची रीति या दोहोंला अग्नीवर तापवून रस करून तेलादिकांत तीन तीन वेळ ओतावीं व रुईचे चिकांत तीन तीन वेळ रस करून ओतून शुद्ध करावीं.

## सोन्याचें भस्म.

स्वर्णस्यद्विगुणंसूतमम्लेनसहमर्दयेत् ॥ ४२ ॥ तद्गोलकसमंगंधंनिद ध्यादधरोत्तरम् ॥ गोलकंचततोरुंध्याच्छरावेदृढसंपुटे ॥ ४३॥ त्रिंशद्व नोपलैर्दद्यात्पुटान्येवंचतुर्दश ॥ निरुत्थंजायतेभस्मगंधोदेयः पुनःपुनः॥४४॥

सोन्याचें बारीक चूर्ण एक भाग व शुद्ध केलेला पारा दोन भाग घेऊन निंबूचे रसांत दोहोंचा खल करून गोळा करावा मग त्या गोळ्याचे समभाग आंवळसरा गंधक घेऊन शोधून बारीक करून मातीचे बळकट त्याचेजोगे दोन शराव ह्मणजे परळ आणून त्या एक शरावांत अर्धा गंधक घालून त्याजवर तो गोळा ठेवून अर्धा गंधक राहिला तो त्या गोळ्यावर घालून दुसरा शराव त्याजवर उपडा ठेवून कापडमाती करून तीस रानगोंवऱ्या घेऊन त्याचेजागी खळी मणून अर्ध्या गोंवऱ्या खालीं व अर्ध्या वर मध्यें तो शरावसंपुट ठेवून अग्नि द्यावा. थंड जाहल्यावर बाहेर काढून फिरून याच रीतीनें कृती करून चवदावेळ अग्नि द्यावा तेणेंकरून सोन्याचें भस्म चांगलें होतें फिरून जिवंत होत नाहीं.

## दुसरा प्रकार.

**कांचनेगालितेनागंषोडशांशेननिक्षिपेत्॥चूर्णयित्वातथाम्लेनघृष्ट्वाकृत्वा चगोलकम् ॥ ४५ ॥ गोलकेनसमंगंधंदत्वाचैवाधरोत्तरम् ॥ शराव संपुटेदत्वापुटेत्त्रिंशद्वनोपलैः ॥ ४६ ॥ एवंसप्तपुटैर्हेमनिरुत्थंभ स्मजायते ॥**

सोन्याचा रस करून त्यांत सोळावा हिस्सा शिसें घालून घांसून त्याचें चूर्ण करून लिंबूचे रसांत खलून गोळा करून त्याचे समभाग गंधक घेऊन बारीक करून मातीचे दोन शराव म्हणजे परळ आणून त्या एकांत अर्धा गंधक घालून त्याजवर तो गोळा ठेवून अर्धा गंधक राहिला तो त्यावर घालून दुसरा शराव वर उपडा ठेवून कापडमाती करून तीस रानगोंवऱ्या आणून त्यांचे जोगी खांच करून अर्ध्या गोंवऱ्या वर व अर्ध्या गोंवऱ्या खालीं करून मध्यें तो शरावसंपुट ठेवावा आणि अग्नि द्यावा. याप्रमाणें अग्नीचीं सात पुटें दिलीं असतां सोन्याचें भस्म चांगलें होतें पुनः जिवंत होत नाहीं.

## तिसरा प्रकार.

**कांचनाररसैर्धृष्ट्वासमसूतकगंधयोः ॥४७॥ कज्जलींहेमपत्राणिलेपयेत्समात्रया॥कांचनारत्वचःकल्कोमूषायुग्मंप्रकल्पयेत् ॥४८॥ धृत्वा तत्संपुटेगोलंमृन्मूषासंपुटेचतत् ॥ निधायसंधिरोधंचकृत्वासंशोष्यगोम यैः ॥ ४५ ॥ वन्हिंखरतरंकुर्यादेवंदद्यात्पुटत्रयम् ॥ निरुत्थंजायते भस्मसर्वकार्येषुयोजयेत् ॥८५०॥ कांचनारप्रकारेणलांगलीहंतिकांच नम् ॥ ज्वालामुखीतथाहन्यात्तथाहंतिमनःशिला ॥ ५१ ॥**

पारा व गंधक समान भाग घेऊन कांचनवृक्षाच्या सालीचे रसांत खलून बारीक कज्जली करून त्या कज्जलीचे समभाग सोन्याचे पत्रे घेऊन त्या पत्र्यांस कज्जलीचा लेप करावा. मग कांचनवृक्षाची साल वाटून कल्क करून त्याच्या दोन मुसा कराव्या त्या एका मुसींत ते सोन्याचे पत्रे ठेवून त्याजवर दुसरी मूस घालून संधि मिळवून एक गोळा करून मातीचे शराव आणून त्यांत तो गोळा ठेवून दुसरा शराव त्याजवर उपडा ठेवून कापडमाती करून वाळवून रानगोंवऱ्याचा मोठा प्रखर अग्नि द्यावा. याप्रमाणें तीन अग्नि-पुटें दिलीं असतां सोन्याचें भस्म चांगलें होतें. फिरून जिवंत होत नाहीं. हें भस्म मात्या-कामावर योजावें. या प्रकारें कळलावी वनस्पती आहे तीमध्यें सोन्याचें भस्म होतें व कारजांभळीमध्यें होतें व मनशिळामध्येंही होतें.

## चवथा प्रकार.

शिलासिंदूरयोश्चूर्णंसमयोरर्कदुग्धकैः ॥ सप्तैवभावनादद्यात्शोषयेच्चपुनःपुनः ॥ ५२ ॥ ततस्तुगलितेहेम्निकल्कोयंदीयतेसमः ॥ पुनर्धमेदतितरांयथाकल्कोविलीयते ॥ ५३ ॥ एवंवेलात्रयंदद्यात्कल्कंहेममृतिर्भवेत् ॥

मनशील व शेंदूर समभाग घेऊन वारीक चूर्ण करून रुईचे चिकांत खलत घाळवावें या प्रमाणें सात पुटें त्या चूर्णाला देऊन नंतर सोन्याचा रस करून त्याचे समभाग चूर्ण त्यांत घालून मिळवून नाहींसें होई तोंपर्यंत भात्यानें अतिशयित फुंकून फिरून त्या रसांत चूर्ण घालून फिरून फुंकावें. या प्रमाणें तीन वेळ केलें असतां सोन्याचे भस्म होतें.

## पांचवा प्रकार.

पारावतमलैर्लिंपेदथवाकुक्कुटोद्भवैः ॥ ५४ ॥ हेमपत्राणितेपांचप्रदद्यादधरोत्तरम् ॥ गंधचूर्णसमंदत्वाशरावयुगसंपुटे ॥५५॥ प्रदद्यात्कुक्कुटपुटंपंचभिर्गोमयोपलैः ॥ एवंनवपुटंदद्यात्दशमंचमहापुटम् ॥५६॥ त्रिंशद्वनोपलैर्देयंजायतेहेमभस्मकम् ॥ सुवर्णंचभवेत्स्वादुतिक्तंस्निग्धंहिमंगुरु ॥ ५७ ॥ बुद्धिविद्यास्मृतिकरंविषहारिरसायनम् ॥

सोन्याचे पत्रे करून त्यांना पारव्याचे अथवा कोंबड्याचे पुरीषाचा लेप करून त्या पत्र्यांचे समभाग गंधक घेऊन चूर्ण करून मातीचे शराव आणून त्यांत अर्धा गंधक घालून त्याजवर सोन्याचे पत्रे ठेवून अर्धा गंधक राहिला तो त्याजवर घालून दुसरा शराव त्याजवर उपडा ठेवून कापडमाती करून गाईचे शेणाच्या गोंवऱ्या पांच घेऊन अग्नि द्यावा अशीं नऊ पुटें देऊन दहावें महापुट ३० गोंवऱ्यांचें द्यावें. या प्रमाणें दहा पुटें दिलीं असतां सोन्याचें भस्म होतें. या भस्माचें गुण मधुर व तिक्त व स्निग्ध व थंड व जड असे आहेत व हें भस्म बुद्धि व विद्या व स्मरण यांना देणारें आहे व विषबाधा दूर करणारें व रसायन आहे.

## रुप्याचें भस्म.

भागैकंतालकंमर्द्ययाममम्लेनकेनचित् ॥ ५८ ॥ तेनभागत्रयंतारपत्राणिपरिलेपयेत् ॥ धृत्वामूषापुटेरुध्वापुटोत्रिंशद्वनोपलैः ॥ ५९ ॥ समुद्धृत्यपुनस्तालंदत्वारुध्वापुटेपचेत् ॥ एवंचतुर्दशपुटैस्तारंभस्मप्रजायते ॥ ८६० ॥

तें पत्रे खलांतून काढून त्याचे दूप्पट गंधक घेऊन तो गंधक निंबुचे रसांत घोंटून त्या पात्र्यांना लेप करून एक गोळा करावा नंतर मीनाक्षी अथवा चुका अथवा या तिहींतून जी वनस्पती मिळेल ती आणून वाटून त्या गोळ्याचे भोंवता एक प्रमाण लेप देऊन मडक्यामध्यें तो गोळा ठेवून त्यावर मातीचा शराव उपडा त्याजवर वाळू मडक्याचे तोंपर्यंत घालून नंतर राख व मीठ पण्यांत कालवून त्याची मडक्याचे तोंडाला मुद्रा देऊन तें मडकें चुलीवर ठेवून क्रमेंकरून हलका, मध्यम, मोठा या प्रमाणें चार प्रहर अग्नि देऊन थंड जाहल्यावर तो गोळा बाहेर काढून सुरणाचे रसांत एक दिवस पर्यंत खलून त्याचा गोळा करून त्याचे अर्धा गंधक घेऊन दुधांत वाटून त्याचा त्या गोळ्याला लेप करून मातीचे दोन शराव आणून त्या एकांत तो गोळा ठेवून त्यांजवर दुसरा शराव उपडा घालून कापडमाती करून रानगोंवऱ्यांचा गजपुट अग्नि द्यावा, थंड जाहल्यावर तो शरावसंपुट बाहेर काढून त्यांतून ताम्रभस्म काढून घ्यावें. हें भस्म फार चांगले गुण देणारें आहे यापासून ओकारी व भ्रांति व ग्लानी व मूर्छा हीं कधींही होत नाहींत.

## पित्तलभस्म.

अर्कक्षीरेणसंपिष्टोगंधकस्तेनलेपयेत् ॥ ८७० ॥ समेनारस्यपत्राणिशुद्धान्यम्लद्रवैर्मुहुः ॥ ततोमूषापुटेधृत्वापुटेद्गजपुटेनच ॥ ७१ ॥ एवंपुटद्वयेनैवभस्मारंभवतिध्रुवम् ॥ एतद्वत्कांस्यमप्येवंभस्मतांयातिनिश्चितम् ॥ ७२ ॥ अर्कक्षीरंवटक्षीरंनिर्गुंडीक्षीरिकातथा ॥ ताम्ररीतिध्वनिवधेसमगंधक्षयेगतः ॥ ७३ ॥

पितळाचे पत्रे करून तापवून निंबुचे रसांत सातवेळ अथवा तीन वेळ भिजवून शुद्ध करून त्या पत्र्याचे समभाग गंधक घेऊन रुईचे दुधांत खलून त्या पत्र्यांना लेप करावा नंतर मातीच्या दोन मुसा करून त्या एका मुसींत ते पत्रे ठेवून त्याजवर दुसरी मूस उपडी घालून कापडमाती करून रानगोंवऱ्यांचा गजपुट अग्नि द्यावा याप्रमाणें दोन अग्निपुटें दिलीं असता पितळाचें भस्म निश्चयें करून होतें व या प्रमाणेंच काशाचेंही होतें. तांबे, पितळ, काशें यांचे मारण्याविषयीं दुसऱ्या प्रकारची रीति सांगतो. त्या तिहिंचे समभाग गंधक घेऊन रुईचे चिकांत अथवा वडाचे चिकांत अथवा गाईचे दुधांत अथवा निर्गुंडीचे रसांत तो गंधक वाटून त्या तिहींचें पत्र्यांना वेगळा वेगळा लेप करून वेगळीं वेगळीं रानगोंवऱ्यांचीं अग्निपुटें दिलीं असतां त्या तिहींचीं भस्में होतात.

## शिशाचें भस्म.

तांबुलीसरसंपिष्टशिलालेपात्पुनःपुनः ॥
द्वात्रिंशद्भिःपुटैर्नागोनिरुत्थोयातिभस्मताम् ॥ ७४ ॥

विड्याचे पानांचा रस काढून त्यात मनशीळ वाटून त्याचे समभाग शिशाचे पत्रे करून त्या पत्र्याना त्या मनशीळाचा लेप करावा. आणि मातीचे दोन शराव आणून त्या एकांत ते पत्रे ठेवून त्याजवर दुसरा शराव उपडा घालून कापडमाती करून खाडा खणून रानगोंवऱ्याचा गजपुट अग्नि द्यावा. या प्रमाणें ३२ अग्निपुटें दिलीं असता शिशाचें भस्म होतें. फिरून जिवंत होत नाहीं याला नागभस्म ह्मणतात.

## दुसरा प्रकार.

अश्वत्थचिंचात्वक्चूर्णंचतुर्थांशेनानिक्षिपेत् ॥ मृत्पात्रेणद्राविते नागेलोह
द्र्व्यांमचालयेत् ॥ ७५ ॥ यामैकेनभवेद्भस्मतत्तुल्यांचमन शिलाम् ॥
कांजिकेनद्वयंपिष्ट्वापचेतद्दढपुटेनच ॥ ७६ ॥ स्वांगशीतंपुनःशिष्टाशिल
याकांजिकेनच ॥ पुनःपुटेच्छरावाभ्यामेवषष्टिपुटैर्मृतिः ॥ ७७ ॥

मातीचें खापर चुलीवर ठेवून त्यात शिसें घालून रस करावा नंतर पिंपळाची साल व चिंचेची साल या दोहों सालींचें चूर्ण शिशाचे चवथा हिस्सा करून त्या शिशाचे रसावर थोडें थोडे टाकीत जावें आणि लोखंडाचे पळीनें घाटीत जावें याप्रमाणें एक प्रहर केलें असता शिशाचें भस्म होतें त्या भस्माचें समभाग मनशीळ घेऊन कांजींत दोहोंचा खल करून मातीचे दोन शराव आणून त्या शरावांत तें भस्म घालून त्याजवर दुसरा शराव उपडा ठेवून कापडमाती करून खाडा खणून रानगोंवऱ्याचा मोठा अग्नि गजपुटाप्रमाणें द्यावा. मग थंड झाल्यावर बाहेर काढून फिरून त्याचे समभाग मनशीळ घेऊन दोहोंचा कांजींत खल करून मातीचे शरावसंपुटात घालून कापडमाती करून रानगोंवऱ्याचा अग्नि द्यावा या प्रमाणें साठ पुटें दिलीं असता शिशाचें भस्म चांगलें होतें.

## कथिल भस्म.

मृत्पात्रेद्रावितेवंगेचिंचाश्वत्थत्वचोरज ॥ क्षित्वातेनचतुर्थांशमयोद
र्व्याप्रचालयेत् ॥ ७८ ॥ ततोद्वियाममात्रेणवंगभस्मप्रजायते ॥ अथ
भस्मसमंतालंक्षिप्त्वाम्लेनप्रमर्द्दयेत् ॥ ७९ ॥ ततोगजपुटेपक्त्वापुनर
म्लेनमर्दयेत् ॥ तालेनदशमांशेनयाममेकततःपुटेत् ॥ ८० ॥ एवंदशपुटैः
पक्वोवंगस्तुम्रियतेध्रुवम् ॥

मातीचें खापर चुलीवर ठेवून त्यांत कथिलाचा रस करावा मग चिंचेची साल व पिंपळाची साल या दोहों सालींचें चूर्ण कथिलाचे चवथा हिस्सा करून त्या कथिलाचे रसावर थोडें थोडें टाकीत जावें आणि लोखंडाचे पळीनें घाटावें याप्रमाणें दोन प्रहर करावें म्हणजे कथिलाचें भस्म होतें त्या भस्माचे सममाग हरताळ घेऊन निंबूचे रसांत दोहोंचा खल करून मातीचे शरावसंपुटांत घालून कापडमाती करून खाडा खणून रानगोंवऱ्यांचा गजपुट अग्नि द्यावा. मग थंड जाहल्यावर त्या भस्माचे दाहवा हिस्सा हरताळ घेऊन निंबूचे रसांत दोहोंचा खल करून मातीचे शरावसंपुटांत घालून कापडमाती करून रानगोंवऱ्यांचा गजपुट अग्नि द्यावा. याप्रमाणें दाहा पुटे दिलीं असतां कथिलाचें भस्म निश्चयें करून होतें. याला वंगभस्म असें ह्मणतात.

## पोलादि लोहभस्म.

शुद्धंलोहभवंचूर्णंपातालगरुडीरसैः ॥ ८१ ॥ मर्दयित्वापुटेद्वन्हौदद्या
देवंपुटत्रयम् ॥ पुटत्रयंकुमार्याश्चकुठारच्छिन्नकारसैः ॥ ८२ ॥ पुटष
ट्कंततोदद्यादेवंतीक्ष्णमृतिर्भवेत् ॥

पोलादि लोहाचें चूर्ण करून वासनवेलीचे रसांत खल करून शरावसंपुटांत घालून कापडमाती करून रानगोंवऱ्याचीं अग्निपुटें तीन द्यावीं व कोरफडाचे रसाचीं अग्निपुटें तीन व रानतुळशीचे रसाचीं अग्निपुटें सहा याप्रमाणें बारा अग्निपुटें दिलीं असता पोलादाचें भस्म चांगलें होतें.

## दुसरा प्रकार.

क्षिपेद्द्वादशमांशेनपादंतीक्ष्णचूर्णतः ॥ ८३ ॥ मर्दयेत्कन्यकाद्रावै
र्यामयुग्मंततःपुटेत् ॥ एवंसप्तपुटैर्मृत्युंलोहचूर्णमवाप्नुयात् ॥ ८४ ॥
रसैःकुठारच्छिन्नायाःपातालगरुडीरसैः ॥ स्तन्येनचार्कदुग्धेनतीक्ष्ण
स्यैवंमृतिर्भवेत् ॥ ८५ ॥

तिख्याचें चूर्ण करून त्याचे बाराचा हिस्सा हिंगूळ घेऊन कोरफडाचे रसांत दोहोंचा दोन प्रहर खल करून मातीचे शरावसंपुटात घालून कापडमाती करून रानगोंवऱ्याचें अग्निपुट द्यावें. याप्रमाणें सात अग्निपुटें दिलीं असतां पोलादि लोहाचें भस्म चांगलें होतें व दुसऱ्या प्रकारानें लोहभस्म करण्याची रीति. वासनवेलीचे रसांत व स्त्रीचे स्तनाचे दुधांत व रुईचे चिकांत पोलादाचें चूर्ण मर्दन एकेकाचीं वेगळीं वेगळीं सात अग्नि दिलीं असता तिख्याचें भस्म होतें.

## तिसरा प्रकार.

तकहिगुणंगंधंदत्वाकुर्याच्चकज्जलीम् ॥ द्वयोःसमंलोहचूर्णमर्द्दयेत्क यकाद्रवैः ॥ ८६ ॥ यामयुग्मंततःपिंडंकृत्वाताम्रस्यपात्रके ॥ घर्मे दत्वाऋबूथस्यपत्रैराच्छादयेद्बुधः ॥ ८७ ॥ यामार्धेनोष्णतांभूयात्धा न्यराशौन्यसेत्ततः ॥ दात्वोपरिशरावंतुत्रिदिनांतेसमुद्धरेत् ॥ ८८ ॥ पिष्ट्वाचगालयेद्वस्त्रादेवंवारितरंभवेत् ॥ एवंसर्वाणिलोहानिस्वर्णादीन्य पिगालयेत् ॥८९॥ शिलागंधार्कदुग्धाक्ताःस्वर्णवासर्वधातवः ॥ म्रियंते द्वादशपुटैःसत्यंगुरुवचोयथा ॥८९०॥

पारा एक भाग व गंधक दोन भाग घेऊन दोहोंचा खल करून कज्जली करावी मग या कज्जली समभाग पोलादचूर्ण घेऊन कोरफडाचे रसांत त्या कज्जलीचा व पोलादचूर्णाचा एकजागीं खल दोन प्रहर करून एक एक गोळा करावा. नंतर तांब्याचे ताम्हानांत गोळा ठेवून त्याजवर सुतीं एरंडाचीं पानें दोन अथवा तीन घालून उन्हांत चार घटकापर्यंत ठेवून नंतर तो गोळा उष्ण जाहल्यावर मातीचा शराव उपडा घालून धान्याचे राशीमध्यें तीन दिवस पर्यंत पुरून ठेवावा नंतर चवथे दिवशीं बाहेर काढून वस्त्रानें गाळून त्याची पूड पाण्यावर टाकावीं ती तरली असतां तें भस्म चांगलें जाहलें असें जाणावें याप्रमाणें सान्या लोहाचीं भस्में व सोनें आदिकरून भस्में फडक्यांत घालून पाण्यावर टाकून पाहावी तरलीं असतां ती चांगली भस्में जाहली असें जाणावें. आतां दुसऱ्या प्रकारानें सान्या धातूंचीं भस्में करावयाचीं रीति. मनशील व गंधक या दोहोंना रुईचे दुधांत वाटून सोनें आदिकरून सान्या धातूंना लेप करून रानगोवऱ्यांचीं बारा गजपुटें अग्नि द्यावा. तेणेंकरून सान्या धातूंचीं भस्में होतात. याविषयीं दृष्टांत—जसें गुरूचें वचन सत्य असतें तशीं या करून सान्या धातूंचीं भस्में निश्चय करून होतात.

## सात उपधातु.

माक्षिकंतुत्थकाभ्रांचनीलांजनशिलालकाः ॥
रसकश्चेतिविज्ञेयायतेसप्तोपधातवः ॥ ९१ ॥

सोनामुखी, मोरचूत, अभ्रक, सुरमा, मनशीळ, हरताळ, कलखापरी हे सात उपधातु असें जाणावें.

## सोनामुखीचें शोधन व मारण.

माक्षिकस्यत्रयोभागाभागैकसैंधवस्यच ॥ मातुलिंगद्रवैर्वाथजंबीरोत्थ

द्रवैःपचेत् ॥९२॥ चालयेल्लोहजेपात्रेयावत्पात्रंसुलोहितम् ॥ भवे
त्ततस्तुसंशुद्धिस्वर्णमाक्षिकमृच्छति ॥ ९३ ॥ कुलत्थस्यकषायेणघृ
ष्टातैलेनवापुटेत् ॥ तक्रेणवाथगोमूत्रेम्रियतेस्वर्णमाक्षिकम् ॥ ९४ ॥

सुवर्णमुखी तीन भाग व सैंधव एक भाग घेऊन दोहोंचें चूर्ण करून दोन्हीं लोखंडाचे कढईत घालून चूलीवर ठेवून खालीं जाळ घालून महाळुंगीचे फळांचा रस त्याजवर घालून लोखंडाचे पळीनें कढई लाल होईतोपर्यंत घाटून नंतर ती कढई खालीं उतरून थंड जाहल्यावर सोनामुखी बाहेर काढुन घ्यावी. याप्रमाणे शोधन झाल्यावर सोनामुखीला कुळिथाचे काढयांत अथवा तिळाचें तेलांत अथवा ताकांत अथवा गोमूत्रांत खलून मातीचे शरावसंपुटांत घालून कापडमाती करून रानगोवऱ्यांचें अग्निपुट द्यावें तेणेंकरून सोनामुखीचें भस्म होतें.

## रौप्यमाक्षिकाचें शोधन व मारण.

ककोंटीमेषशृंगुत्थैर्द्रवैर्जंबीरजैर्दिनम् ॥
भावयेदातपेतीव्रेविमलाशुद्ध्यतिध्रुवम् ॥ ९५ ॥

रौप्यमाक्षिकेचें चूर्ण करून करटवली व मेषशृंगी व जंबीर या तिहींचे रसांत एकेक दिवस खलून उन्हांत तापविलें असतां रौप्यमाक्षिक शुद्ध होतें. याचें मारण सोनामुखी प्रमाणें जाणावें.

## मोरचुताचें शोधन.

विष्ठयामर्दयेत्तुल्यंमार्जारककपोतयोः ॥ दशांशंटंकणंदत्वापचे
न्मृदुपुटेततः ॥९६॥ पुटंदद्यात्क्षौद्रैर्देयंतुल्यविशुद्धये ॥

मांजर व कपोतपक्षी या दोहोंची विष्ठा मोरचुताचे समभाग व मोरचुताचे दहावा हिस्सा टांकणखार घेऊन मोरचुतासहवर्तमान सारी एकजागीं खलून मातीचे शरावसंपुटांत घालून कापडमाती करून रानगोवऱ्यांचा हलका अग्नि द्यावा. नंतर बाहेर काढुन त्रिफळा दह्यांत खलून याप्रमाणें अग्नि द्यावा. नंतर मधांत खलून अग्नि द्यावा तेणेंकरून मोरचुताची शुद्धि होते.

## अभ्रकाचें शोधन व मारण.

कृष्णाभ्रकंधमेद्वन्हौततःक्षीरेविनिक्षिपेत् ॥९७॥ भिन्नपत्रंतुतत्कृत्वा
तंदुलीयाम्लयोर्द्रवैः ॥ भावयेदष्टयामंतदेवंशुद्ध्यतिचाभ्रकम् ॥९८॥
कृत्वाधान्याभ्रकंतत्तुशोषयित्वाथमर्दयेत् ॥ अर्कक्षीरैर्दिनमेकंचक्रा[illegible]

चकारयेत् ॥ ९९ ॥ वेष्टयेदर्कपत्रैश्चसम्यक्गजपुटेपचेत् ॥ पुनर्मर्धंपु नःपाच्यंसप्तवारंप्रयत्नतः ॥ १९० ॥ ततोवटजटाक्काथैस्तद्वदेयंपुटत्रयम् ॥ म्रियतेनात्रसंदेहःसर्वयोगेषुयोजयेत् ॥१॥ मृतंतंलभ्रंहरेन्मृत्युं जरापलितनाशनम् ॥ अनुपानैश्चसंयुक्तंतत्तद्रोगहरंपरम् ॥ २ ॥

काळें अभ्रक आणून कोळशांत घालून भात्यानें अथवा फुंकणीनें फुंकून तापवून दुधांत कून विझवावें नंतर त्याचे वेगळे वेगळे पत्रे करून तादुळजाचा व निंबूचा रस एकाजागीं रून त्यांत ते पत्रे आठ प्रहरपर्यंत भिजत घालावे तेणेंकरून अभ्रक शुद्ध होतें तें अभ्रक ां रसांतून बाहेर काढून मग त्याचें धान्याभ्रक करून नंतर त्याला रुईचे चिकांत एक हर खल्न त्याची वाटोळी चक्राकार वडी करून त्याचे भोंवतीं रुईचे पानें गुंडाळून मातीचे रावसंपुटांत घालून कापडमाती करून रानगोंवऱ्यांचा गजपुट अग्नि द्यावा. याप्रमाणें रुईचे चेकांत एकेक दिवस खलून सात गजपुटें द्यावीं नंतर वडाच्या पारंब्याचा काढा करून यांत अभ्रक एकेकदिवस खलून तीन गजपुटें द्यावीं. याप्रमाणें अग्निपुट दिली असतां अभ्रकाचे भस्म चांगलें होतें यांत संशय नाहीं. यापासून संपूर्ण रोग दूर होतात. व मृत्यूचेंही निवारण होतें. जरा दूर होते व पांढरे केशाचे काळे केंश होतात, व जसजशा अनुपानांत द्यावा तसतसे गुण होतात.

## प्रकार दुसरा.

शुद्धंधान्याभ्रकंमुस्तंशुंठीषड्भागयोजितम् ॥ मर्दयेत्कांजिकेनैवदिनंचित्रकजैरसैः ॥३॥ ततोगजपुटंदद्यात्तस्मादुद्धृत्यमर्दयेत् ॥ त्रिफला वारिणातद्वत्पुटेदेवंपुटैस्त्रिभिः ॥४॥ बलागोमूत्रमुसलीतुलसीसूरणद्रवैः ॥ मर्दितंपुटितंवन्हौत्रित्रिवेलंव्रजेन्मृतिम् ॥५॥

धान्याभ्रक करावयाची रीति पूर्वील अभ्रकभस्मावर सांगितलीच आहे त्याप्रमाणें धान्याभ्रक करून त्याचे सहावा हिस्सा नागरमोथे व सुंठ यांचें चूर्ण करून त्यांत मेळवून कांजीनें एक दिवस पर्यंत खल करून नंतर चित्रकाचे रसांत खल करून त्याला मातीचे शरावसंपुटांत कापडमाती करून रानगोंवऱ्यांचा गजपुट अग्नि द्यावा. मग थंड जाहल्यावर बाहेर काढयांत त्रिफळाचे त्रिफळाचे काढयांत तीन दिवस खल करून तीन गजपुटें द्यावीं नंतर रस अथवा त्याचा काढा व गोमूत्र व मुसळीचा काढा व तुळशीचे पाल्याचा व सुरणाचा रस हे पांच रस त्या अभ्रकांत वेगळे वेगळे घालावे व खल करून एकेकाचीं तीन गजपुटें द्यावीं त्याप्रमाणें गजपुटें दिलीं असतां अभ्रकाचे भस्म चांगलें होतें.

## सुरमा वगैरेआदिकरून यांचें शोधन.

नीलांजनंचूर्णयित्वाजंबीरद्रवभावितम् ॥ दिनैकमातपेशुद्धंभवेत्कार्येषु योजयेत् ॥६॥ एवंगैरिककाशीसंटंकणानिवराटिका ॥ तुवरीशंख कंकुष्ठंशुद्धिमायातिनिश्चितम् ॥७॥

सुरम्याचें चूर्ण करून जंबीरानें त्यांत भावना एक दिवस उन्हांत ठेविले, म्हणजे सुरमा शुद्ध होतो मग त्याची योजना कार्यांत करावी. याप्रमाणें गेरू व हिराकसी व टांकण

सार व कवडी व तुरटी व शंख व मुरदाडशिंग यांची गुरम्या सारखी शुद्धि करावी.

## मनशीळाचें शोधन.

पचेत्र्यहमजामूत्रेर्दोलायंत्रेमनःशिलाम्॥भावयेत्सप्तधापित्तैरजाया.शुद्धिमृच्छति॥८॥

काढे आदि करून जी द्रवद्रव्यें सांगेल ती मोठ्या मडक्यांत घालून जें औषध शोधावयाचें असेल त्याची पोतडी बांधून मडक्यामध्यें लोंबती टांगावी त्याला दोलायंत्र म्हणतात. त्या यंत्रांत मनशीळ घालून शेळीचे मुतामध्यें तीन दिवस शिजवून नंतर बाहेर काढून खलांत घालून शेळीचे काळजात पित्त असतें त्या पित्तानीं सात पुटे द्यावीं. तेणेंकरून मनशीळ शुद्ध होतें.

## हरताळाचें शोधन

तालकंकणशःकृत्वासुचूर्णकांजिकेक्षिपेत्॥दोलायंत्रेणयामैकंततःकूष्मांडजैः द्रवैः ॥९॥ तिलतैलेपचेद्यामंयामंचत्रिफलाजलैः ॥ एवंयंत्रेचतुर्यामंपाच्यंशुद्ध्यतितालकम् ॥ १९० ॥

हरताळाचे बारीक बारीक तुकडे करून त्यांची फडक्यांत पोतडी बांधून दोलायंत्रांत घालून कांजीमध्यें एक प्रहरपर्यंत शिजवावा. तसाच कोहळ्याचे रसामध्यें एकप्रहर व तिळाचे तेलामध्यें एकप्रहर व त्रिफळाचे काढ्यामध्यें एकप्रहर भिजवावा यांप्रमाणें दोलायंत्रांत हरताळ चार प्रहर शिजवला असता शुद्ध होतो.

## कलखापरीचें शोधन.

नमूत्रेश्चगोमूत्रैःसप्ताहंरसकंक्षिपेत् ॥ दोलायंत्रेणशुद्धःस्यात्ततःकार्येषुयोजयेत्॥११॥

कलखापरी दोलायंत्रांत घालून मनुष्याचे मुतामध्यें सात दिवस व गोमूत्रामध्यें सात दिवस अशी चवदा दिवस भिजत ठेवली असतां शुद्धि होते मग रोगादिकांवर योजावी

## धातूंचें सत्व काढावयाचें.

लाक्षामीनपयश्छागटंकणंमृगशृंगकम् ॥ पिण्याकंसर्षपाःशिग्रुर्गुंजोर्णागुडसैंधवाः ॥ १२ ॥ यवतिक्ताघृतंतक्षौद्रंयथालाभंविचूर्णयेत् ॥ एभिर्विमिश्रिताःसर्वधातवोगाढवन्हिना ॥ १३ ॥ मूषाध्माताःप्रजायंतेमुक्तसत्वानसंशयः ॥

लाख, लहानमासा, दूध, बोकडाचें मांस, टांकणखार, हरणाचें शिंग, तिळाची पेंड, शिरस, शेगव्याचें बीज, गुंजा, मेंढयाचे केस, गुळ, सैंधव, जव, कुटकी, तूप, मध; हीं सतरा औषधें प्रयत्नेंकरून जीं मिळतील तीं यथालाभ मिळवून ज्या धातूचें सत्व काढावयाचें आहे त्याचे आठवा हिस्सा एकेक औषध घेऊन सर्वांचें चूर्ण करून ज्याचें सत्व काढावयाचें तो धातु व तें चूर्ण एकाजागीं करून मुशींत घालून कोळशांत ती मूस ठेवून भात्यानें फुंकावें म्हणजे धातूपासून सत्व निघतें. याप्रमाणें ज्या धातूचें सत्व पाहिजे त्या धातूचें काढावें.

## हिऱ्याचें शोधन व मारण.

कुलित्थकाद्रवकाथेर्दोलायंत्रेविपाचयेत् ॥ १४ ॥ व्याघ्रीकंदगतंव त्रंत्रि-
दिनंशुद्धिमृच्छति ॥ तप्तंतप्तंतुतद्वज्रंखरमूत्रेनिषेचयेत् ॥ १५॥ पुनस्तप्यंपुनःसेच्य-
मेवंकुर्यात्रिसप्तधा ॥ मत्कुणैस्तालकंपिष्ट्वायावद्भव तिगोलकम् ॥ १६ ॥ तद्गोलेनि-
हितंवज्रंतद्गोलंवन्हिनाधमेत् ॥ सेचयेदश्वमूत्रेणतद्गोलेचक्षिपेत्पुनः ॥ १७ ॥ रु
ध्मातंपुनःसेच्यमेवंकुर्याचसप्तधा ॥ ठवंचाम्रियतेवज्रंचुर्णंसर्वत्रभोजयेत् ॥ १८ ॥

व्याघ्रीकंद आणून वाटून त्यामध्यें हिरा घालून त्याची वस्त्रानें पुर्चुंडी बांधून त्याला दो-लायंत्रात घालून कुळिथाचें काढ्यात तीन दिवस व कोद्रूधान्याचे काढ्यात तीन दिवस शि-जवावा तेणेंकरून हिरा शुद्ध होतो नंतर तो हिरा अग्नीमध्यें तापवून तापवून गाढवाचे मुतांत एकवीस वेळ विझवून नंतर ढेंकणामध्यें हरताळ वाटून त्याचा गोळा करून त्यामध्यें तो हिरा घालून तो गोळा मुशींत ठेवून कोळशामध्यें घालून भात्यानें फुंकून तापल्यावर त्याजवर थोडें घोड्याचें मूत्र शिंपून नंतर तो हिरा बाहेर काढून फिरून ढेंकणामध्यें हरताळ वाटून त्याचा गोळा करून त्यात तो हिरा घालून पहिल्या कृतीप्रमाणें भात्यानें फुंकून त्याज-वर घोड्याचें मूत्र शिंपावें याप्रमाणें सात वेळ कृती केली असतां हिऱ्याचें भस्म चांगलें होतें. मग तें भस्म संपूर्ण रोगावर योजावें.

### दुसरा प्रकार.

हिंगुसैंधवसंयुक्तेक्काथेकौलत्थेजोक्षिपेत्॥तप्तंतप्तंपुनर्वज्रंभूयाच्चुर्णंत्रिसप्तधा ॥१९॥

हिंग, सैंधव, कुळिथ या तिहींचा काढा करून हिरा तापवून तापवून एकवीस वेळ शि-जवावा. म्हणजे हिऱ्याचें भस्म होतें.

### तिसरा प्रकार.

भेकंकास्यजेपात्रेनिरुध्यस्थापयेत्सुधीः ॥ सभीतोमूत्रयेत्तत्रतन्मूत्रेवज्रमावपेत ॥
२० ॥ तप्तंतप्तंचबहुधावज्रस्यैवंमृतिर्भवेत् ॥

बेडूक आणून कांशाचे पात्रांत धरून ठेवावा नंतर त्याला भीति जाहली असतां तो मुततो त्या मूत्रांत हिरा बहुतवेळ तापवून तापवून विझवला असतां हिऱ्याचें भस्म होतें

### वैक्रांताचें शोधन व मारण.

वैक्रांतंवज्रवच्छोध्यंनीलंवालोहितंतथा ॥ २१ ॥ हयमूत्रेतुतत्सेच्यंतप्तं
तप्तंत्रिसप्तधा ॥ ततस्तुमेषशृंगयुक्तपंचांगेगोलकेक्षिपेत् ॥ २२ ॥
पुटेन्मूषापुटेरुध्वाकुर्यादेवंचसप्तधा ॥ वैक्रांतभस्मनायांगलिवज्रस्थाने
नियोजयेत् ॥ २३ ॥

वैक्रांतमणि व नीलमणि व लोहितमणि यांचें शोधन हिऱ्यासारखें करावें नंतर तो तापवून घोड्याचे मुतांत एकवीस वेळ विझवावा. नंतर मेंढशिंगीचें पंचांग आणून त्याचा गोळा करून त्यात तो वैक्रांत घालून मातीचे शरावसंपुटांत ठेवून कापड-करून रानगोंवऱ्यांचा गजपुट अग्नि द्यावा. याप्रमाणें सात वेळ अग्निपुटें दिलीं असतां होतें तें भस्म हिऱ्याचे अभावीं योजावें.

खार न कवडी व तुरटी व शंख व गुरदाडशिंग यांची सुरम्या सारखी शुद्धि करावी.

## मनशीळाचें शोधन.

पचेत्र्यहमजामूत्रेदोलायंत्रेमनःशिलाम्॥भावयेत्सप्तधापित्तैरजायाःशुद्धिमृच्छति॥८॥

काढे आदिकरून जीं द्रवद्रव्यें सागेल तीं मोठ्या मडक्यांत घालून जें औषधें शोधाव याचें असेल त्याची पोतांडी बांधून मडक्यामध्यें लोंबती टांगावी त्याला दोलायंत्र म्हणतात. त्या यंत्रात मनशीळ घालून शेळीचे मुतामध्यें तीन दिवस शिजवून नंतर बाहेर काढुन खलांत घालून शेळीचे काळजात पित्त असतें त्या पित्ताची सात पुटें द्यावीं. तेणेंकरून मनशीळ शुद्ध होतें.

## हरताळाचें शोधन

तालकंकणशःकृत्वात्तुचूर्णकांजिकेक्षिपेत्॥दोलायंत्रेणयामेकंततःकूष्मांडजैर्द्रवैः ॥९॥ तिलतैलेपचेद्यामंयामंचत्रिफलाजलैः ॥ एवंयं त्रेचतुर्यामंपाच्यंशुद्धचतितालकम् ॥ ९१० ॥

हरतळाचे बारीक बारीक तुकडे करून त्यांची फडक्यांत पोतांडी बांधून दोलायंत्रांत घालून कांजीमध्यें एक प्रहरपर्यंत शिजवावा. तसाच कोहळ्याचे रसामध्यें एकप्रहर व तिळाचे तेलामध्यें एकप्रहर व त्रिफळाचे काढ्यामध्यें एकप्रहर शिजवावा याप्रमाणें दोलायंत्रात हरताळ चार प्रहर शिजवला असता शुद्ध होतो.

## कलखापरीचें शोधन.

नमूत्रयाथगोमुत्रेसप्ताहंरसकंक्षिपेत् ॥ दोलायंत्रेणशुद्धःस्यात्ततःकार्येपुयोजयेत्॥११॥

कलखापरी दोलायंत्रांत घालून मनुष्याचे मुतामध्यें सात दिवस व गोमूत्रामध्यें सात दिवस अशी चवदा दिवस भिजत ठेवली असतां शुद्धि होते मग रोगादिकांवर योजावी.

## धातूंचें सत्व काढावयाचें.

लाक्षामीनपपछागटंकणंमृगशृंगकम् ॥ पिण्याकंसर्पपाःशिग्रुगुंजोर्णागुडसेंधवाः ॥ १२ ॥ यवतिक्ताघृतंतक्षौद्रंयथालाभंविचूर्णयेत् ॥ एभिर्विमिश्रिताःसर्वधातवोगाढवन्हिना ॥ १३ ॥ मूपाध्माताःप्रजायंतेशुद्धसत्वानसंशयः ॥

लाख, लहानमासा, दूध, बोकडाचें मांस, टांकणखार, हरणाचें शिंग, तिळांची पेंड, शिरस, शेगटाचें बीज, गुंजा, मेंढयाचे केश, गुळ, संधव, जव, कुटकी, तुप, मध, हीं सतरा औषधें प्रयत्नेंकरून जीं मिळतील तीं यथालाभ मेळवून ज्या धातूचें सत्व काढावयाचें आहे त्याचे आठवा हिस्सा एकेक औषध घेऊन सार्यांचें चूर्ण करून ज्याचें सत्व काढावयाचें तो धातु व तें चुर्ण एकाजागीं करून मुशींत घालून कोळशांत ती मूस ठेवून भात्यानें फुंकावें म्हणजे धातूपासून सत्व निघतें. याप्रमाणें ज्या धातूचें सत्व पाहिजे त्या धातूचें काढावें.

## हिऱ्याचें शोधन व मारण.

कुलित्थकाद्रवकाथेदोलायंत्रेविपाचयेत् ॥ १४ ॥ व्याघ्रीकंदगतंवज्रं अग्नि-दिनंशुद्धिमृच्छति ॥ तप्तंतप्तंतुतद्वज्रंखरमूत्रेनिषेचयेत् ॥ १५॥ पुनस्तप्यंपुनःसेच्य-मेवंकुर्यात्रिसप्तधा ॥ मत्कुणैस्तालकंपिष्ट्वायावद्भवतिगोलकम् ॥ १६ ॥ तद्गोलेनि-हितंवज्रंतद्गोलंवन्हिनाधमेत् ॥ सेचयेदश्वमूत्रेणतद्गोलेचक्षिपेत्पुनः ॥ १७ ॥ रु-ध्वाध्मातंपुनःसेच्यमेवंकुर्याच्चसप्तधा ॥ एवंचाम्रियतेवज्रंचूर्णंसर्वत्रभोजयेत् ॥ १८ ॥

व्याघ्रीकंद आणून वाटून त्यामध्यें हिरा घालून त्याची वस्त्रानें पुर्चुडी बांधून त्याला दोलायंत्रांत घालून कुळित्थाचें काढ्यांत तीन दिवस व कोद्रूधान्याचे काढ्यांत तीन दिवस शिजवावा तेणेंकरून हिरा शुद्ध होतो नंतर तो हिरा अग्नीमध्यें तापवून तापवून गाढवाचे मुतांत एकवीस वेळ विझवून नंतर ढेंकणामध्यें हरताळ वाटून त्याचा गोळा करून त्यामध्यें तो हिरा घालून तो गोळा मुशींत ठेवून कोळशामध्यें घालून भात्यानें फुंकून तापल्यावर त्याजवर थोडें घोड्याचें मूत्र शिंपून नंतर तो हिरा बाहेर काढून फिरून ढेंकणामध्यें हरताळ वाटून त्याचा गोळा करून त्यात तो हिरा घालून पहिल्या कृतीप्रमाणें भात्यानें फुंकून त्याजवर घोड्याचें मूत्र शिंपावें याप्रमाणें सात वेळ कृती केली असतां हिऱ्याचें भस्म चांगलें होतें. मग तें भस्म संपूर्ण रोगांवर योजावें.

### दुसरा प्रकार.

हिंगुसैंधवसंयुक्तेक्काथेकौलत्थजेक्षिपेत्॥तप्तंतप्तंपुनर्वज्रंभूयाच्चूर्णंत्रिसप्तधा ॥१९॥

हिंग, सैंधव, कुळिथ या तिहींचा काढा करून हिरा तापवून तापवून एकवीस वेळ शिंपावा. म्हणजे हिऱ्याचें भस्म होतें.

### तिसरा प्रकार.

मंडूकंकांस्यजेपात्रेनिगृह्यस्थापयेत्सुधीः ॥ सभीतोमूत्रयेत्तत्रतन्मूत्रेवज्रमावपेत ॥ २० ॥ तप्तंतप्तंचबहुधावज्रस्यैवंमृतिर्भवेत् ॥

बेडूक आणून कांशाचे पात्रांत धरून ठेवावा नंतर त्याला भीति जाहली असतां तो बेडूक मुततो त्या मूत्रांत हिरा बहुतवेळ तापवून तापवून विझवला असतां हिऱ्याचें भस्म होतें

### वैक्रांताचें शोधन व मारण.

वैक्रांतंवज्रवत्शोध्यंनीलंवालोहितंतथा ॥ २१ ॥ हयमूत्रेतुतत्सेच्यंतप्तं
तप्तंत्रिसप्तधा ॥ ततस्तुमेषशृंगयुक्तपंचांगेगोलकेक्षिपेत ॥ २२ ॥
पुटेन्मूषापुटेरुध्वाकुर्यादेवंचसप्तधा ॥ वैक्रांतभस्मनाप्राप्तंगतिनचप्रधाने
नियोजयेत् ॥ २३ ॥

वैक्रांतमणि व नीलमणि व लोहितमणि यांचें शोधन हिऱ्यासारखें करावें नंतर तो वैक्रांतमणि तापवून घोड्याचे मुतांत एकवीस वेळ विझवावा. नंतर मेंढशिंगीचें पंचांग आणून त्याचा गोळा करून त्यांत तो वैक्रांत घालून मातीचे शरावसंपुटात ठेवून कापडमाती करून रानगोवऱ्यांचा गजपुट अग्नि द्यावा. याप्रमाणें सात वेळ अग्निपुटें दिलीं असतां वैक्रांतभस्म होतें तें भस्म हिऱ्याचे अभावीं योजावें.

## संपूर्णरत्नांचें शोधन व मारण.

स्वेदयेद्दोलिकायंत्रेजयंत्यास्वरसेनच ॥ मणिमुक्ताप्रवालानांयामैकंशो धनंभवेत् ॥ २४ ॥ कुमार्यास्तंदुलीयेनस्तन्येनचनिषेचयेत् ॥ प्र त्येकंसप्तवेलंचतप्ततप्तानिकृत्स्नशः ॥ २५॥ मौक्तिकानिप्रवालानितथा रत्नान्यशेषतः ॥ क्षणाद्विविधवर्णानिम्रियंतेन.त्रसंशयः ॥ २६ ॥ उक्तमाक्षिकवन्मुक्ता.प्रवालानिचमारयेत् ॥ वज्रवत्सर्वरत्नानिशोधये न्मारयेत्तथा ॥ २७ ॥

सूर्यकांतमणि, मोतीं व पोंवळी यांला दोलायंत्रांत घालून जाईचे रसामध्यें एक प्रहर भिजविलीं असतां यांचें शोधन होत. नंतर यांचें मारण कोरफडाचा रस व तांदुळजाचा रस व स्त्रीचे स्तनाचें दूध या तिहींमध्यें तो मणी व मोतीं व पोंवळी तशीच नानाप्रकाच्यीं रत्नें हीं सारीं तापवून एकेकांत सातसात वेळ विझविलीं असता क्षणामध्यें सान्याचीं भस्में होतात. याविषयीं संशय नाहीं व यांचें मारण दुसऱ्याप्रकारानें सांगतों. सोनामुखीचें मारण सांगितलें आहे त्याप्रमाणें मोत्यांचें व पोंवळ्याचें मारण करावें व हिऱ्याचें मारण व शोधन सांगितलें आहे त्याप्रमाणें संपूर्ण रत्नांचें शोधन व मारण करावें.

## शिलाजिताचें शोधन.

शिलाजतुंसमानीयग्रीष्मतप्तशिलान्युतम् ॥ गोदुग्धैस्त्रिफलाकाथैर्भृंग द्रावैश्चमर्दयेत् ॥ २८ ॥ आतपेदिनमेकैकंतत्शुष्कंशुद्धतांव्रजेत् ॥

ग्रीष्मऋतूचे ठायीं ताप फार असतो यास्तव पर्वतावर मोठाल्या मोठ्या शिळा असतात त्या उन्हानें बहुत तापून तापून त्यांना बहुत पाझर येऊन त्यापासून रस गळून जमतो त्याला शिलाजित म्हणतात. तो शिलाजित आणून त्याचा गाईचे दुधात व त्रिफळेचे काढ्यात व माक्याचे रसांत वेगळा वेगळा एकेक दिवस खल करून उन्हात ठेवून कोरडा तो शिलाजित शुद्ध जाणावा.

## शिलाजित करावयाचा प्रकार.

गुरुणांशिलाजतुशिलांसूक्ष्मखंडप्रकल्पिताम् ॥ २९ ॥ निक्षिप्यात्यु ष्णपानीयेयामैकस्थापयेत्सुधीः ॥ मर्दयित्वाततोनीरंगृह्णीयाद्वस्त्रगा लितम् ॥ १३० ॥ स्थापयित्वाचमृत्पात्रेधारयेदातपेबुधः ॥ उपरि स्थंघनंचस्यात्तत्क्षिपेदन्यपात्रके ॥ ३१ ॥ धारयेदातपेभूयोजलमुपरिस्थं घनंनयेत्॥एवंपुनःपुनर्नीत्वाद्विमासाभ्यांशिलाजतु ॥१३२॥भूयात्तुकार्य क्षमंवन्हौक्षिप्तंलिंगोपमंभवेत् ॥ निर्धूमंचततःशुद्धंसर्वकर्मसुयोजयेत् धर्मोऽपिप्रावृषिवत्नखेत् ॥ ३४ ॥

[illegible] पाषाण शिलाजित होतो तो पाषाण चांगला पाहून आणून त्या पाषाणाचे बारीक बारीक तुकडे करून कढत पाण्यांत एक प्रहरपर्यंत भिजत घालून नंतर ते तुकडे त्याच पाण्यात बारीक वाटून तें पाणी मातीचे नांदींत गळून घ्यावें. नंतर ती नांदींत ठेवून वरचें पाणी घण फेंसा सारिखें होतें तें पाणी दुसऱ्या नादींत घेऊन त्यात दुसरें

पाणी घालून ती नांद उन्हांत ठेवून त्याजवरचें पाणी घण होतें तें तिसऱ्या नांदींत घ्यावें व त्यांत दुसरें पाणी घालून ती नांद उन्हांत ठेवावी. याप्रमाणें क्रम करीत जावा, व पहिल्या नांदींत खालीं गाळ राहिला तो पाण्यांत वाटून गाळून तें पाणी उन्हांत ठेवून त्यावरचें पाणी घण होईल तें दुसऱ्या नांदींत घेऊन त्यांत दुसरें पाणी घालून उन्हांत ठेवावें याप्रमाणें दोन महिनें क्रमी केली असतां शिलाजित चांगला तयार होतो. त्याची परीक्षा अग्नीवर टाकिला असतां त्याचा पिंडा सारखा आकार होतो व धूमरहित असतो तो शिलाजित जाणावा मग तो संपूर्ण कार्याचे ठायीं योजावा.

## मंडूर करावयाचा प्रकार.

अक्षांगारैर्धमेत्किट्टंलोहजंततूगवांजलैः ॥ सेचयेत्तप्ततप्तंतत्सप्तवारंपुनः पुनः ॥ ३५ ॥ चूर्णयित्वाततःक्वाथैर्द्विगुणैस्त्रिफलाभवैः ॥ आलोड्यभर्जयेद्वन्हौमंडूरंजायतेवरम् ॥ ३६ ॥

बेहड्याचें लांकडाचे कोळसे करून त्यात पुराणे लोहाचे कीट घालून भात्यानें फुंकून लाल जाहल्यावर तें कीट गोमूत्रांत विझवावें याप्रमाणें सातवेळ तापवून तापवून गोमूत्रात विझवून नंतर त्या कीटाचें बारीक चूर्ण करून त्याचें दुप्पट त्रिफळेचा काढा करून मडक्यांत घालून त्यांत तें कीटाचें चूर्ण टाकून चांगलें दवकून मडक्याचें तोंडाला कापडमाती करून रानगोवऱ्यांचा गजपुट अग्नि द्यावा. थंड जाहल्यावर तें मडकें बाहेर काढून त्यांतून त्या कीटाचा शुद्ध मंडूर होतो तो काढून घ्यावा. तो मंडूर उत्तम जाणावा.

## क्षार काढावयाची कल्पना.

क्षारवृक्षस्यकाष्ठानिशुष्कान्यग्नौप्रदीपयेत् ॥ नीत्वातद्भस्ममृत्पात्रेक्षिप्त्वानीरेचतुर्गुणे ॥३७॥ विमर्द्यधारयेद्रात्रौप्रातरच्छजलंनयेत् ॥ तन्नीरंक्वाथयेद्वन्हौयावत्सर्वंविशुष्यति ॥ ३८ ॥ ततःपात्रात्समुद्धिरेत्पक्षारोश्रात्यः सितप्रभः ॥ चूर्णाभःप्रतिसार्यःस्यात्पेयःस्यात्क्वाथवत्स्थितः ॥ ३९ ॥ इतिक्षारद्वयंधीमान्युक्तकार्येषुयोजयेत् ॥

ज्या वृक्षाचे क्षार होतात त्या वृक्षाचीं काष्ठें आणून वाळवून जाळून त्याची राख करून मातीचे मडक्यात घालून त्या राखेचे चौपट त्यात पाणी घालून दोन्ही एकजागीं कालवून सारी रात्र भिजत ठेवून प्रातःकाळीं वरचें निवळ पाणी लोहाचे कढईंत काढून खालीं जाळ करून सारें पाणी आटवून कढईचें बुडाला पांढरा सफेत चूर्णासारखा क्षार लागून राहतो तो काढून घ्यावा. या क्षाराला प्रतिसार्य असें म्हणतात. हा क्षार श्वासादिकांवर योजावा व काढ्यासारखा पातळ जो क्षार राहतो त्याला पेय क्षार म्हणतात. याप्रमाणें पातळ व चूर्णासारिखा असे दोन प्रकारचे क्षार जाणावे. तो क्षार गुल्मादिकांवर योजावा.

इति श्रीदामोदरसूनु शार्ङ्गधरेण विरचितायां संहितायांचिकित्सास्थाने धातुशोधनमारणो नाम एकादशोऽध्याय. ॥ ११ ॥

# द्वादशोऽध्यायः ॥

## पाऱ्याचीं नांवें व सूर्यादिनवग्रहांच्या नांवेंकरून ताम्रादि नव धातूंचीं नांवें.

पारदःसर्वरोगाणांजेतापुष्टिकरःस्मृतः ॥१४०॥ सुद्धेनसाधितःकुर्यात् संसिद्धिंदेहलोहयोः॥ रसेंद्रःपारदःसूतोहरजः सूतकोरसः॥४१॥मुकुंदश्चेतिनामानिज्ञेयानिरसकर्मसु ताम्रताराररनागाश्चहेमवंगौचतीक्ष्णकम् ॥ ४२ ॥ कांस्यकंवृत्तलोहंचधातवोनवयेस्मृताः ॥ सूर्यादीनांग्रहाणांतेकथितानामभिःक्रमात् ॥ ४३ ॥

साऱ्या रोगांस जिंकणारा, शरीर पुष्ट करणारा असा पारा आहे. तो पारा शुद्ध पुरुषांनीं साधिला असतां देहाची व लोहाची सिद्धि करितो. त्यांचीं नांवें रसेंद्र, पारद, सूत, हरज, सूतक, रस, मुकुंद हीं. सात नांवें रसकर्माचे ठायीं जेथें येतील तेथें पाऱ्याचीं जाणावीं व ताम्र, रुपें, पितळ शिसें, सोनें, कथील, पोलाद, कांसें, कांतिलोह हे नऊ धातु क्रमानें सूर्यादिनवग्रहांचे नांवें करून जाणावे. उदाहरण, जीं सूर्याचीं नांवें तीं ताम्राचीं जाणावीं व जीं सोमग्रहाचीं नांवें तीं रुप्याचीं जाणावीं व जीं मंगळाचीं नांवें तीं पितळेचीं जाणावीं. या क्रमानें जीं नवग्रहांचीं नांवें तीं नवां धातूंचीं जाणावी.

### पाऱ्याचें शोधन.

राजीरसोनमूषायांरसंक्षिप्त्वानिबंधयेत् ॥ वस्त्रेणदोलिकायंत्रेस्वेदयेत्कांजिकेत्र्यहम् ॥ ४४ ॥ दिनैकंमर्दयेत्सूतंकुमारीसंभवैर्द्रवैः ॥ तथाचित्रकजैःक्काथैर्मर्दयेदेकवासरम् ॥ ४५ ॥ काकमाचीरसैस्तद्वत्दिनमेकंचमर्दयेत् ॥ त्रिफलायास्ततः क्काथैर्रसोमर्द्यःप्रयत्नतः ॥ ४६ ॥ ततस्तेभ्यःपृथक्कुर्यात्सूतंप्रक्षाल्यकांजिकैः ॥ ततःक्षिप्त्वारसंखल्वेरसार्द्धंचसैंधवम् ॥ ४७ ॥ मर्दयेन्निंबुकरसैर्दिनमेकमनारतम्॥ ततोराजी रसोनश्चसुल्वयश्चनवसादरः ॥ ४८ ॥ एतैरससमैस्तद्वत्सूतोमर्द्यस्तुपांशुवा॥ ततःसंशोष्यचक्राभंकृत्वाक्षिप्त्वार्तिंहिंगुना ॥ ४९ ॥ द्विस्थालीसंपुटे धृत्वापुरयेल्लवणेनच ॥ अधस्थालींततोमुद्रांदद्यात्दृढतरांबुधः ॥ १५० ॥विशोष्याग्निंधोयाधोनिषिंचेदंबुनोपरि ॥ ततस्तुकुर्यात्तीव्राग्निंतद्ध्वं प्रहरत्रयम् ॥ ५१ ॥ एवंनिपातयेदूर्ध्वेरसोदोषविवर्जितः ॥ अथोर्ध्वपिठरीमध्येलग्नोग्राह्योरसोत्तमः ॥ ५२ ॥

राई व लसूण एकाजागीं वाटून त्यांची मूस करून त्यांत पारा घालून, त्याची धन्यानें पोतांडी बांधून दोलायंत्रांत कांजीमध्यें तीन दिवस शिजवावा नंतर तो पारा त्यांतून काढून खलांत घालून कोरफडाचे रसांत एक दिवस खल करावा नंतर चित्रकाचे रसांत व कांगणीचे रसांत व त्रिफळेच काढ्यांत एकेक दिवस खल करावा. नंतर कांजी घेऊन त्यांत तो पारा धुऊन धुऊन त्या औषधांचे रसापासून निराळा करून खलांत घालून त्या पाऱ्याचे अर्धा सैंधव त्यांत मिळवून दोहोंचा निंबूचे रसांत खल एक दिवस करावा. नंतर मोहोऱ्या व लसूण नवसागर हीं तीन औषधें पाऱ्याचे समभाग घेऊन त्यांत मेळवून मातीचे कौंड्याचा वाटा करून त्या खलांत घालून सारीं एकजागीं खलून शुष्क झाल्यावर त्याचा वाटोळा असा त्याचा वाटोळा असा चक्राकार गोळा करून त्याचे भोंवता हिंगाचा लेप देऊन तो गोळा

मडक्यांत ठेवून त्याजवर मीठ घालून मडक्याचे तोंडावर दुसरें मडकें उपडें घालून कापडमाती चांगली बळकट करून वाळल्यावर तें मडकें चुलीवर ठेवून खालीं जाळ करून वरें मडकें तापलें असतां पारा गळून पडेल यास्तव वरल्या मडक्याचे बुडावर पाण्याचा शिडकाव देव जावा. तो अग्नि मोठा प्रसर तीन प्रहरपर्यंत करावा मग थंड जाहल्यावर मडक्याचे तोंडाची कापडमाती हलक्या हातानें काढून वरचे मडक्यांत पारा लागून राहतो तो काढून घ्यावा तो पारा शुद्ध व दोषरहित जाणावा.

### गंधकाचें शोधन.

लोहपात्रेविनिक्षिप्यघृतमग्नौमतापयेत् ॥ तप्तेघृतेतत्समानंक्षिपेत्गंधकजं रजः ॥५३॥ विद्रुतंगंधकज्ञात्वादुग्धमध्येविनिक्षिपेत् ॥ एवंगंधक शुद्धिःस्यात्स-र्वेकार्येपुयोजयेत् ॥ ५४ ॥

लोखंडाचे कढयींत तूप घालून चांगलें तापवून त्याचे समभाग गंधक घेऊन बारीक करून त्या तुपांत घालावा. मग गंधक विरून तुपाला मिळाला ह्मणजे तें तूप दुधांत ओतून त्यांतून गंधक काढून घ्यावा तो गंधक शुद्ध जाणावा नंतर तो संपूर्ण कार्याचे ठायीं योजावा.

### हिंगुळांतून पारा काढावयाची कल्पना.

निंबूरसैर्निबपत्ररसैर्वायाममात्रकम् ॥पिष्ट्वादरदमूर्ध्वंचपातयेत्सुतयुक्तिवत् ।५५। ततःशुद्धरसंतस्मान्नीत्वाकार्येपुयोजयेत् ॥

निंबूचे रसांत अथवा निंबाचे पानांचे रसांत हिंगुळ एक प्रहर खलून डमरूयंत्रांत घालून खालीं जाळ करून त्यांतील पारा वरती जाऊन जमतो तो शुद्ध जाणावा. त्याला संपूर्ण कार्यांचे ठायीं योजावा.

### हिंगुळाचें शोधन.

मेषीक्षीरेणदरदमम्लवर्गैश्चभावितम ॥ ५६ ॥
सप्तवारंप्रयत्नेनशुद्धिमायातिनिश्चितम ॥

हिंगुळ खलांत घालून मेंढीचे दुधाचीं पुटें सात व निंबूचे रसांत पुटें सात अशीं चवदा पुटें द्यावीं नेंकरून हिंगूळ निश्चयें करून शुद्ध होतो.

### शुद्ध जाहलेल्या पाऱ्याला मुख करावयाचा प्रकार.

हालाहलोब्रह्मपुत्रो हारिद्रःस-क्तुकस्तथा ॥ सौराष्ट्रिकइतिप्रोक्ताविषभेदाअमीनव ॥५८॥ अर्कसेहुंडधत्तूरलांग-लीकरवीरकम् ॥ गुंजाहिफेनावित्येताःसप्तोपविषजातयः ॥५९॥ एतैर्विमर्दितःसू-तश्छिन्नपक्षःप्रजायते ॥ मुखंचजायतेतस्यधातूंश्चग्रसतेक्षणात ॥ ६० ॥

कालकूटोवत्सनाभःशृंगकश्चप्रदीपकः ॥ ५७ ॥

कालकुट. वत्सनाभ, शृंगक, प्रदीपक, हालाहल, ब्रम्हपुत्र, हारिद्र, सक्तुक. सौराष्ट्रिक हीं नऊ महाविषें व रुई, निवडुंग, धोतरा, कळलावी, कण्हेर, गुंज, अफीण हीं सात उपविषें अशीं सोळा विषें जाणावीं. यांमधून एकाला घेऊन पाऱ्याशीं सात दिवस खलून पारा धुवावा नंतर दुसऱ्याशीं सात दिवस खलून धुवावा असा वेगळा वेगळा सर्वांशीं खलून धुवावा तेणें करून पाऱ्याचें पक्षछेदन होतें ह्मणजे उडून जात नाहीं व त्याला मुख फुटून स्वर्णादिधा-

तूंना प्रतिा आता त्या कालकुटादि महाविषाची लक्षणें प्रथांतरी सांगितलीं आहेत तीं या पा यांचे शोधन मर्गे करून टीकाकार सांगतों कालकुट विषवर्णनरून पाढरें असतें व त्याचा र ताडे नि्तु बहुत असतात व दिसला सारखे मृदु असतें व हें विष देव आणि दैत्य त्याचे युद्धाम ये माले नामा जो दत्य त्याचे रक्तापासून उत्पन्न जाहलें व हें विष पिंपळाचे वृक्षासारखा एक वृक्ष आहे त्याचा चीक आहे व अहिछत्र व मलय, कोंकण, शृंगवेर या पर्वताचे ठायीं फारकरून असतें असें जाणावें. वत्सनाभ विषाचीं निर्गुंडीचे पानासारखीं पानं असून वचनागासारखी आकृति असते व त्याचे समीप वृक्ष,वल्ली,गवत हीं वाढत नाहीत व ९ विष द्रोणागिरि पर्वताचेठायीं फार करून असतें असे जाणावें शृंगकविष गाईचे शिंगासारखें असून त्याला दान फाटे असतात व गाईचे शिंगाला बांधिलें असता गाईचें दूध विषासारखें होतें व त्याचीं पानें आल्याचे पानासारखी असतात व नदींचे कडेला जेथें विरल असतें तेथें फार, करून हें असतें असें जाणावें व प्रदीपक विष जळजळीत निखाऱ्या सारखें असतें त्याची कांति रक्तवर्ण असतें व मोठा दाह करणारें असतें व त्याचीं पानें खजुराचे पानासारखीं असतात याचा वास घेतला असता अंगाचा दाह होतो आणि मनुष्य तात्काळ मरतो हें विष फारकरून समुद्राचे तीरावर असतें असें जाणावें हालाहलविष ताडाचे पानासारखें असून त्याचीं पानें नीलवर्ण असतात व त्याचें फळ गाईचे स्तनासारखें व पांढरें असतें व त्याचा कंद गाईचे स्तनासारखा असतो. व त्याचे आसपास वृक्षादिक होत नाहींत. याचा वास घेतला असता मनुष्य तात्काळ मरतें असें जाणावें. ब्रह्मपुत्रविष ब्रह्मपुत्रनामक नद आहे त्याचे कडेला फारकरून असतें. व त्याचीं पानें पळसाचे पानासारखीं असतात व त्याचें फळ पळसाचे बियासारखें असतें, कंद मोठा व पराक्रम मोठा असतो व हें विष रोग हरण्याविषयीं व रसायनाविषयीं समर्थ आहे असें जाणावें. व हारिद्रविष हळदीचे शेतामध्यें उत्पन्न होतें व त्याचीं पानें हळदीचे पानासारखीं असतात व त्याची गांठ हळदीचे गांठीसारखी असते व हें विष रसायनाविषयीं समर्थ आहे असें जाणावें व सक्तुकविष जवासारखें आकृतीनें असून आंत पांढरें असतें व हें लोलपर्वताचे ठायीं फारकरून असतें असें जाणावें व सौराष्ट्रिकविष सोरट देशामध्यें उत्पन्न होतें त्याचा कंद शासवानें गस्त मस्तकासारखा असून मोठा असतो व कृष्णागरूसारखा वर्ण असतो व त्याचीं पानें पळसाचे पानासारखी असतात व त्याचा पराक्रम मोठा असतो. याप्रकारें हीं नऊ विषें जाणावीं

## दुसरा प्रकार.

अथवात्रिकटुक्षारौराजीलवणपंचकम् ॥ रसोनोनवसारश्चशिग्रुश्चेंद्रत्रचूर्णितं ॥ ६१ ॥ समांशैःपारदादेतेर्जंबीरेणद्रवेणवा ॥ निंबुतोयैःकांजिकैर्वासोष्णखल्वेविमर्दयेत ॥ ६२ ॥ अहोरात्रत्रयेणस्यात्सो धातुचरमुखम् ॥ अथवाचिंचुलीक्षारैःमर्दयेत्त्रिवासरम ॥ ६३ ॥ करणाम्लैर्मुखंतस्मजायंतधातुघस्मरम् ॥

सुंठ, मिरें, पिंपळी, जवखार सांबारखार ,धव मचट, शिंदेखार समुद्रमीठ

बांगडखार, लसून, नवसागर, शेवग्याची साल हीं तेरा औषधं समभाग घेऊन चूर्ण करून पाऱ्याचे समभाग घेऊन दोहोंना तप्त खलात घालून जंबीर रसात अथवा लिंबूचे रसात किंवा कांजींत अहोरात्र तीन दिवसपर्यंत खल करावा त्तेणेकरून स्वर्ण धातु भक्षणाविषयीं पाऱ्याला चोंच फुटते. अथवा शिरवोटी या नामेकरून मृगक्रिडा असतो त्याला आणून त्याशीं समत्व-तमान पाऱ्याचा तीन दिवस खल करून नंतर लिंबूचा रस व सैंधव एका जागीं करून त्यात तीन दिवस खल करावा तेणेकरून पाऱ्याला मुख फुटतें.

## कच्छपयंत्रेंकरून गंधकजारण पाऱ्यास.

मृत्कुंडेनिक्षिपेन्नीरंतन्मध्येचशरावकम् ॥ ६४ ॥ महत्कुंडपिधानाभं मध्यमेख-लयायुतम् ॥ लिप्त्वाचमेखलामध्यंचूर्णेनात्ररसंक्षिपत् ॥ ६५ ॥ रसस्योपरिगंधस्य रजोदद्यात्समांशकम् ॥ दत्वोपरिशरावंचभस्ममुद्रांप्रदापयेत् ॥ ६६ ॥ ततोपरिपु-टंदद्यात्चतुर्भिर्गोमयोपलैः ॥ एवंपुनः पुनर्गंधंषड्गुणंजारयेत्बुधः ॥ ६७ ॥ गंध-जीर्णंभवेत्सूततीक्ष्णाग्निःसर्वकर्मकृत् ॥

मातीचें मडकें कुंडचासारखें रुंद तोंडाचें मोठें घेऊन त्यात पाणी घालून त्या कुंडयाचें झाकण होई अशी मातीची कुंडी घेऊन पाण्याला लागे अशी उताणी ठेवावी. नंतर त्या कोंडीत मा-तीचें वाटोळें एक अंगुळ उंच आळे करून त्यामध्यें चुना सारवून त्यात पारा घालून त्याचे समभाग गंधकाचें चूर्ण त्या पाऱ्यावर घालाव नंतर मातीची दुसरी कोंबी त्याजवर उपडी घालून त्याचे सधीला राखेंत थोडें सैंधव मिळवून त्या राखेची मुद्रा देऊन त्याजवर गाईचे शेणाच्या रानशेणी चार घालून अग्नि द्यावा यापमाणें त्या पाऱ्यावर साहावेळ गंधक घालून सांगितल्या कृतीनें अग्नि देऊन पाऱ्यास गंधकाचें जारण करावें मग तो पारा दैदीप्यमान अग्निसारिखा होऊन सर्व कार्ये करितो.

## पाराभस्म करावयाची कृती

धुमसारंरसंतोरींगधकंनवसादरम् ॥ ६८ ॥ यामेकंमर्दयेदम्लेभागंकृत्वासमं समम् ॥ काचकुप्यांविनिक्षिप्यतांचमृद्वस्त्रमुद्रया ॥ ६९ ॥ विलिप्यपरितोवक्त्रंसु-शुष्कंदत्वाचशोषयेत्॥अधःसच्छिद्रपिठरीमध्यकुपीं निवेशयेत् ॥ ९७० ॥ पिठ-रींवालुकापूरैर्भृत्वाचकूपिकागलम् ॥ निवेश्यचुल्यांतदधःकुर्याद्वन्हिंशनैःशनैः ॥७१॥ एवंद्वादशभिर्यामैर्म्रियतेसूतकोत्तमः तस्मादप्यधिकंकिंचित् पावकंज्वालयेत्क्रमात् ॥ अधःस्थंमृतसूतंचसर्वकर्म ॥ ७२ ॥ स्फोटयेत्स्वांगशीतंचऊर्ध्वगंगंधकंजयेत् ॥ सुयोजयेत् ॥ ७३ ॥

धुरोसा, पारा, तुरटी, गंधक, नवसागर, हीं पाच औषधें समभाग घेऊन लिंबूचे रसात एक प्रहर खल करून काचेचे कुपींत घालून तिला कापडमातीचा लेप करून कुपीचे तोंडाला बुचाप्रमाणें नळी बसवून तोंड बुजवावें. मग वाळल्यावर मग मातीचें मोठें मडकें घेऊन त्याचे बुडाला दामण जाईसें छिद्र पाडून त्या मडक्यात ती कुपी ठेवून त्यांत वाळू कुपीचे गळ्यापर्यंत भ-रून कुपीची नळी मोकळी ठेवावी या यंत्राला वालुकायंत्र असे म्हणतात मग तें मडकें चु-

लीवर ठेवून खालीं जाळ हलका लावून त्याहून काहीं मोठा करावा याप्रमाणें क्रमेंकरून बारा प्रहरपर्यंत अग्नि द्यावा. नंतर थंड झाल्यावर ती कुपी बाहेर काढून युक्तीनें फोडून तिचे तोंडाला गंधक लागून राहतो तो टाकून द्यावा. खालीं पाऱ्याचें भस्म राहतें तें घेऊन कार्याचे ठायीं योजावें.

## दुसरा प्रकार.

अपामार्गस्यबीजानांमूषायुग्मंप्रकल्पयेत् ॥ तत्संपुटेन्यसेत्सूतंमलदयूग्धमिश्रितम् ॥ ७४ ॥ द्रोणपुष्पीप्रसूनानिविडंगमरिचंभेदकः ॥ एतच्चूर्णमधोर्ध्वंचदत्त्वामुद्रांप्रदापयेत् ॥ ७५ ॥ तंगोलंसंधयेत्सम्यक्मृन्मूषा संपुटेसुधीः ॥ ७६ ॥ मुद्रांदत्त्वाशोषयित्वानलोगजपुटेपचेत् ॥ एवमेकपुटेनैवजायतेभस्मसूतकम् ॥ ७७ ॥

आघाड्याचें बीं आणून नारळाक वाटून त्याच्या दोन मुशी करून द्रोणपुष्पाची फुलें व वावडिंग, मिरची माळ, या तीन औषधांचें चूर्ण करून त्या एका मुशींत अर्धें चूर्ण घालून त्याजवर पारा ठेवून त्याजवर काळ्या उंबराचा चीक घालून त्याजवर अर्धें चूर्ण राहिलें तें घालावें. मग दुसरी मूस त्याजवर उपटी घालून संधी चांगल्या बुजवून गोळा करून मातीचे शरावसंपुटांत घालून कापडमाती करून वाळवून रानगोवऱ्यांचा गजपुट अग्नि द्यावा. त्या एका पुटानेंच पाऱ्याचें भस्म होतें.

## तिसरा प्रकार.

काष्ठोदुंबरिकादुग्धरसंकिंचिद्विमर्दयेत् ॥ ७८ ॥ तद्दुग्धंघृष्टहिंगोश्चमूषायुग्मंप्रकल्पयेत् ॥ क्षिप्त्वातत्संपुटेसूतंतत्रमुद्रांप्रदापयेत् ॥ ७९ ॥ धृत्वातंगोलकंप्राज्ञोमृन्मूषासंपुटेधिके ॥ पचेन्मृदुपुटेनैवमनतोयातिभस्मताम् ॥ ८० ॥

काळ्या उंबराचा चीक आणून त्यांत पाऱ्याचा थोडा रस करून नंतर त्याच उंबराचे चिकांत हिंग घालून वाटून त्याच्या दोन मुसा करून त्या एका मुशींत तो पारा ठेवून त्याजवर दुसरी हिंगाची मूस उपटी घालून चांगल्या संधि मेळवून गोळा करून मातीचे शरावसंपुटांत घालून कापडमाती करून रानगोवऱ्यांचा हलका अग्नि द्यावा. तेणेंकरून पाऱ्याचें भस्म होतें.

## चवथा प्रकार.

नागवल्लीरसैर्घृष्टःकर्कोटीकंदगर्भितः ॥
मृन्मूषासंपुटेपक्त्वामृतोयात्येवभस्मताम् ॥ ८१ ॥

विड्याचे पानाचे रसांत पाऱ्याचा खल करून करटवेलीचा कांदा आणून एक लहानसा व एक मोठा अशा दोन वाटया दोन जमल्यास करून त्या मोठ्या वाटीत ठेवून त्यांत पारा घालून त्याजवर त्या कांद्याचा चुरा पसरून त्याजवर दुसरी एक वाटी ठेवून संधि लिंपून कापडमाती करून त्याला मातीचे शरावसंपुटांत घालून कापडमाती करून रानगोवऱ्यांचा हलका अग्नि द्यावा. तेणेंकरून पाऱ्याचें भस्म होतें.

## ज्वरांकुश.

खंडितंहरिणशृंगंज्वालामुख्यारसैःसमम् ॥ रुध्वाभांडेपचेच्चुल्यांयामयुग्मं नागवल्यारसैःसा-
ततोनयेत् ॥ ८२ ॥ अष्टांशंत्रिकटुंदद्यान्निष्कमात्रंचभक्षयेत् ॥ नागवल्यारसैःसा-
धंवातपित्तज्वरापहम् ॥ ८३ ॥ अयंज्वरांकुशोनामरसःसर्वज्वरापहः ॥

हरणाचें शिंग आणून त्याचे बारीक तुकडे करून मडक्यांत ठेवून त्यांत भारजांभळीचा रस घालून त्याचे तोंडावर दुसरें लहानसर मडकें उपडें घालून कापडमाती करून चुलीवर दोन प्रहरपर्यंत अग्नि द्यावा. मग थंड जाहल्यावर त्या तुकड्यांचे भस्म होतें तें बाहेर काढून त्याचे आठवा हिस्सा सुंठ, मिऱ्यें, पिंपळी याचें चूर्ण करून त्या भस्माला मेळवून तें चूर्ण निष्कप्रमाण विड्यांच्या पानाचे रसांत द्यावें तेणेंकरून हा ज्वरांकुश सारे ज्वर दूर करितो. परंतु विशेषें करून वात, पित्त ज्वर हे दूर करितो.

## ज्वरारिरस.

पारदंरसकंतालंतुत्थंटंकणगंधकम् ॥ ८४ ॥ सर्वमेतत्समंशुद्धंकारवल्यारसै-
र्दिनम् ॥ मर्दयेल्लेपयेत्तेनताम्रपात्रोदरंभिषक् ॥ ८५ ॥ अंगुल्यार्धप्रमाणेनततोरुध्वा-
सतन्मुखम् ॥ पचेत्तंवालुकायंत्रेक्षिप्त्वाधान्यानितन्मुखे ॥ ८६ ॥ यदास्फुटंतिभा-
न्यानितदासिद्धंविनिर्दिशेत् ॥ ततोनयेत्स्वांगशीतंताम्रपात्रोदराद्भिषक् ॥ ८७ ॥
रसंज्वरारिनामानंविचूर्ण्यमरिचैःसमम् ॥ माषकंपर्णखंडेनभक्षयेन्नाशयेज्ज्वरम्॥८८॥
त्रिदिनैर्विषमंतीव्रमेकद्वित्रिचतुर्थकम् ॥

पारा, कलखापरी, हरताळ, मोरचूत, टाकणखार, गंधक ही महा औषधें आणून शोधून मारीं समभाग घेऊन कारलीच्या पाल्याचे रसांत एक दिवस खल करून तांब्याचा करंडा रुंद तोंडाचा घेऊन त्यांत त्या औषधांचा अर्धा अंगुळ प्रमाण लेप करून करंड्याचें झांकण बसवून त्याला वालुका यंत्रात घालून तें यंत्र चुलीवर ठेवून खाली जाळ करून त्या यंत्राचे तोंडावर साळीचें भात टाकुन त्याच्या लाह्या जाहल्या असतां तें औषध जाहलें असें जाणावें, मग अग्नि पुरे करावा. नंतर थंड जाहल्यावर बाहेर काढून त्या करंड्यांतील औषध काढून घ्यावें याला ज्वरारिरस ह्मणतात. त्याचे समभाग मिऱ्यें घेऊन बारीक वाटून दोन्ही एकजागीं करून एक मासाप्रमाण विड्याच्या पानांचे तुकड्यात हा ज्वरारिरस द्यावा येणेंकरून ऐकाहिकज्वर द्व्याहिक, त्र्याहिक व चातुर्थिक हे विषमज्वर दारुण असतांही दूर होतात.

## शीतज्वरारिरस.

तालकंतुल्यकंताम्ररसंगंधंमनःशिलाम् ॥८९॥कर्षंकर्षंप्रयोक्तव्यंमर्दयेत्त्रि फ-
लांबुभिः ॥ गोलंन्यसेत्संपुटकेपुटंदद्यात्प्रयत्नतः ॥ ९० ॥ ततोनि स्वांकदुग्धेन-
माषामा-
वर्त्यादुग्धेनसप्तधा ॥ क्वाथेनदंन्त्याःश्यामायाभावयेत्सप्त धापुनः ॥ ९१ ॥ माषामा-
त्रंरसंदिव्यंपंचाशन्मारिचैर्युतम् ॥ गुडगद्याणकंचैवतुलसीदलयुग्मकम् ॥ ९२ ॥भक्ष-
येत्रिदिनंभक्त्याशीतारिर्दुर्लभः परः ॥ पथ्यंदुग्धादनंदेयंविषमंशीतपूर्वकम् ॥९३॥
दाहपूर्वंहरत्याशुतृतीयकचतुर्थकौ ॥ त्र्याहिकंनतनंचैवनंवर्षंचनियच्छति ॥ ९४ ॥

हरताळ, मोरचूत, ताम्रभस्म, पारा, गंधक, मनशीळ हीं सहा औषधें महा महा कर्षप्र-

माण घेऊन त्रिफळेचे काढ्यांत खलून गोळा करून मातीचे शरावसंपुटांत घालून कापड-
माती करून रानगोवऱ्यांचा गजपुट अग्नि द्यावा. थंड जाहल्यावर बाहेर काढून खलांत घा-
लून रुईचे चिकाचीं पुटें सात व निवडुंगाचे चिकाचीं पुटें सात व दांतीचे मुळांचा काढा
करून त्याचीं पुटें सात व निशोत्तराचे काढ्याचीं पुटें सात याप्रमाणें पुटें देऊन मासाप्रमाण
गोळ्या बांधून पन्नास मिऱ्यें व गुळ सहामासे व तुळशीचीं पानें दोन अशीं सारीं एकाजा-
गीं करून त्यांतील एकेक गोळी घालून भक्षीकरून तीन दिवस घ्यावी तेणेंकरून शीतपूर्वक
विषमज्वर व दाहपूर्वकज्वर व तृतीयकज्वर व चातुर्थिक व अहोरात्रांत दोनवेळ येतो तो
द्व्याहिकज्वर व एकसारखा असून राहता तो ज्वर विलक्षण ज्वर हे सारे दूर होतात.

## ज्वरघ्नीगुटिका.

भागैकःस्याद्रसःशुद्धएलीयःपिप्पलीशिवा ॥ आकारकरभोगंधः कटुतैले-
नशोधितः ॥ ९५ ॥ फलानिचेंद्रवारुण्याश्चतुर्भागमिताअमी ॥ एकत्रमर्दयेत्
चूर्णमिंद्रवारुणिकारसैः ॥ ९६ ॥ माषोन्मितांगुटींकृत्वादद्यात्सर्वज्वरेबुधः ॥
छिन्नारसानुपानेनज्वरघ्नीगुटिकामता ॥ ९७ ॥

शुद्ध केलेला पारा एकभाग, एळ्याबोळ, पिंपळी, बाळहरीतकी, अकलकरा, शिरशेल-
तेलांत शोधलेला गंधक, कडुवृंदावनाचीं फळें हीं सहा औषधें चार चार भाग घेऊन चूर्ण
करून पाण्यासुद्धां खलांत घालून कडुवृंदावनाचे फळाचे रसांत खल करून मासा मासा
प्रमाण गोळ्या कराव्या नंतर ती एकेक गोळी गुळवेलीचे रसांत घ्यावी. तेणेंकरून सारे
ज्वर दूर होतात.

## लोकनाथ रस क्षयादिकांवर.

शुद्धोबुभुक्षितःसूतोभागद्वयमितोभवेत् ॥ तथागंधस्यभागौद्वौकुर्यात्क
ज्जलिकांतयोः ॥ ९८ ॥सूताच्चतुर्गुणेष्वेवकपर्देषुविनिक्षिपेत् ॥ भाग
कंटंकणंदत्वागोक्षीरेणविमर्दयेत् ॥ ९९ ॥ तथाशंखस्यखंडानांभागान
ष्टौप्रकल्पयन् ॥ क्षिपेत्सर्वंपुटस्यांतश्चूर्णलिप्तशरावयोः ॥ १००० ॥ गर्तेह
स्तोन्मितेधृत्वापचेद्गजपुटेनच ॥ स्वांगशीतंसमुद्धृत्यदृष्ट्वातत्सर्वमेकतः
॥ १ ॥ षड्गुंजासंमितंचूर्णमेकोनत्रिंशदूषणैः ॥ घृतेनवातजेदद्यात्
नवनीतेनपित्तजे ॥ २ ॥ क्षौद्रेणश्लेष्मजेदद्यादतीसारेक्षयेतथा ॥ अरु
चौग्रहणीरोगेकार्श्येमंदानलेतथा ॥ ३ ॥ कासेश्वासेषुगुल्मेषुलोक
नाथोग्निसंहितः ॥ तस्यांपक्तिनाचरसुर्जीतस्वल्पक्रमम् ॥ ४ ॥ मंच
क्षणेसमुनानःशर्यानानुपथानकं ॥ अनम्लमथवसघृतंभुंजीतमधुरंदधि
॥ ५ ॥ प्रायेणजांगलंमांसंमत्स्यंघृतपाचितम् ॥ सद्रंधमक्तंदद्याच्चजा
तेग्नौमांध्यभोजने ॥ ६ ॥ सघृतान्मुद्गवटकान्व्यंजनेष्ववचारयेत् ॥
तिलामलककल्केनस्नापयेत्सर्पिषाथवा ॥ ७ ॥ अभ्यंजयेत्सर्पिषाच
स्नानंकोष्णोदकेनच ॥ कंचित्तैलंनगृह्णीयात्तुत्याजिन्बिल्वकारवेल्लकम् ॥
॥ ८ ॥ वार्ताकंशफरींचैवचांम्लंयजेत्व्यायाममैथुनम् ॥ मद्यंसंधानकंही

गुंठीमाषानमसूरकान् ॥ ९ ॥ कुष्मांडराजिकांकोपंकांजिकांचेववर्ज
येत् ॥ त्यजेदयुक्तनिद्रांचकांस्यपात्रेचभोजनम् ॥१०१०॥ ककारादियुतं
सर्वंत्यजेत्शाकफलादिकम् प्रयोयंलोकनाथस्तुशुभनक्षत्रवासरे ॥
॥ ११ ॥ पूर्णातिथौशुक्लपक्षजातेचंद्रबलेतथा ॥ पूजयित्वालोकनाथंकुमा
रीर्भोजयेत्तत ॥ १२ ॥ दानंदद्याद्विघटिकामध्येग्रात्योरसोत्तमः ॥ र
सात्संजायतेतापस्तदाशर्करयायुतम् ॥ १३ ॥ सत्वंगुडुच्यागृण्हीयाद्वं
शरोचनयायुतम् ॥ खर्जूरंदाडिमंद्राक्षामिक्षुखंडानिचारयेत् ॥ १४ ॥
अरुचौनिस्तुषंधान्यघृतभृष्टसशर्करम् ॥ दद्यात्तथाज्वरधान्यंगुडूचीका
थमाहरेत् ॥ १५ ॥ उशीरवासककाथंदद्यात्समधुशर्करम् ॥ रक्त
पित्तेकफेश्वासेकासेचस्वरसंक्षये ॥ १६ ॥ अग्निभृष्टजयाचूर्णमधुना
निशिदीयते ॥ निद्रानाशातिसारेचग्रहेण्यांमंदपावके ॥ १७ ॥ सोव
र्चलाभयाकृष्णाचूर्णमुष्णजलैःपिबेत् ॥ शूलेऽजीर्णेतथाकृष्णामधूक्ता
ज्वरेहिता ॥ १८ ॥ प्लीहोदरेवातरक्तेऽर्ह्यांचेवगुदांकुरे ॥ नासिका
दिषुरक्तपुरसंदाडिपुष्पजम ॥ १९ ॥ दूर्वाया स्वरसेनस्येदद्याच्छर्कर
यायुतम् ॥ कोलमज्जाकणाबर्हिपक्षभस्मसशर्करम्॥ १०२० ॥ मधुनाले
हयेच्छर्दिहिक्काकोपस्यशांतये ॥ विधिरेषप्रयोज्यस्तुसर्वस्मिन्पोटलीरसे
॥ २१ ॥ मृगांकेहेमगर्भेचमौक्तिकाख्येरसेपुत ॥ इत्ययंलोकनाथो
क्तोरसःसर्वरुजोजयेत् ॥ २२ ॥

शुद्ध हो साता जो बुभुक्षित असा पारा ता दोन भाग व शुद्ध केलेला गंधक दोन भाग
या दोहोंना एकाजागीं खलून कज्जली करून पाऱ्याचे चौपट कवड्या घेऊन त्यात ती कज्ज-
ली भरावी. नंतर टाकणखार एक भाग घेऊन गाईचे दुधात घालून त्या कवड्याचे तोंडाला
त्याची मुद्रा द्यावी. नंतर शंखाचे तुकडे आठभाग वजन घेऊन मातीचे दोन शराव आणून
त्या एकात चुना सारवून त्यात शंखाचे तुकडे अर्धे खाली घालून त्यावर त्या कवड्या ठेवून
त्यानंतर अर्धे तुकडे राहिले ते घालून त्यावर दुसरा शराव उपडा घालून कापडमाती करून
एक हात खाडा खणून रानगोवऱ्याचा गजपुट अग्नि द्यावा मग थंड जाहल्यावर बाहेर काढून
त्या शराव संपुटाचे आत साऱ्याचें भस्म होतें तें एकाजागीं खलून ठेवावें. याला लोकनाथरस असें
म्हणतात हा लोकनाथरस सहा गुंजाप्रमाण एकुणतीस मिऱ्याचें चूर्ण करून त्यात मेळवून
वायूचा रोग असता तुपात द्यावा व पित्तरोग असता लोण्यात द्यावा व कफरोग असता
द्यावा अतिसार क्षय, आवढणें, संग्रहणी, कृशता, अग्निमांद्य, ज्वर, खोकला, गुल्म इतके
रोग दूर होण्याविषयीं हा लोकनाथरस प्रशस्त आहे याची मात्रा घेऊन त्यावर तुपभाताचे
तीन घास द्यावे नंतर माच्यावर बिछाना न घालता क्षणभर उताणे निजावें आंबट पदार्थ
वर्ज्य करून तुपाशीं भोजन करावें व चांगलें मधुर गोड दहीं असल्यास तेंही भोजनाबरोबर
घ्यावें व रानातील हरिणादिकांचें मास तुपात तळून खावें व संध्याकाळीं भूक लागली
असता दूधभात खावा व तोंडी लावण्यास मुगाच्या वड्या तुपात तळून खाव्या तीळ व

आंवळकाठी याचा कल्क करून अंगास लावून स्नान करावें अथवा तूप लावून करावें ते स्नानाशिवाय अंगास लावणें तें तुपच लावावें व स्नानास पाणी कोमट कोमट घ्यावें. तेलाचा स्पर्श करूं नये व बेलफळ, कारलें, वागे, वारीक मांसळी, चिंच, श्रम करणें, मैथुन, मद्य. मेधान, हिंग, सुंठ, उडीद, मसूर. कोंहळे, राई, कांजी यांचा त्याग करावा रोप सोडावा दिवसास निजूं नये, कांशाचे ताटांत भोजन करूं नये. ककार ज्यांना आदि आहे असा भाज्या व फळें इत्यादि पदार्थ वर्ज्य करावें. याप्रमाणें लोकनाथ रसाचें पथ्य करावें. चांगला दिवस व चांगला वार व पूर्णा तिथि व शुक्लपक्ष पाहून व आपलें चांगलें चंद्रबळ पाहून लोकनाथरसाची पूजा करून नंतर कुमारी मीस भोजन द्यावें नंतर कांहींएक सुवर्णादि दान देऊन लोकनाथरस घ्यावा. नंतर दोन घटिकांनीं शरीराचा संताप झाला असतां साखर व गुळवेलीचें सत्व व वंशलोचन हीं तिन्ही एकाजागी करून घ्यावीं. तेणेंकरून संताप दूर होतो. खजूर व डाळिंब, द्राक्ष व उंसाचे तुकडे हे पदार्थ थोडे खावें. तेणेंकरून संताप. आढवर्णे दूर होते. व धणे कुटून त्यांचा कोंडा काढून तुपांत भाजून त्यात साखर घालून त्यात लोकनाथ रस घ्यावा तेणेंकरून आढवर्णे दूर होते. धणे गुळवेल यांचा काढा करून त्यांत हा रस घ्यावा. तेणेंकरून ज्वर दूर होतो व वाळा व अडुळसा या दोहोंचा काढा करून मध साखर मेळवून त्यांत लोकनाथरस घ्यावा तेणेंकरून रक्तपित्त व कफ, श्वास, कास. स्वरभंग हे रोग दूर होतात. भांग थोडी भाजून चूर्ण करून त्यात हा रस घालून मर्धान रात्रीस घ्यावा तेणेंकरून निद्रा येत नसली तर येते व अतिसार संग्रहणी हे रोग दूर होतात अग्नि प्रदीप्त होतो, पादेलोण' बाळहिरडे, पिंपळी या तीन औषधांचें चूर्ण करून त्यांत लोकनाथरस घालून उष्ण पाण्यानें घ्यावा तेणेंकरून शूळ, अजीर्ण हीं दूर होतात. मधपिंपळीशीं लोकनाथरस घेतला असतां ज्वर दूर होतो. डाळिंबाच्या फळाचे रसांत घेतला असतां पोटांत टोंचकडे कफशूळ होतो तो. वासरक्त, ओकारी, मूळव्याध, नाकातोंडांतून रक्त पडतें तें हे सारे रोग दूर होतात. दूर्वाचा रस काढून त्यांत साखर व लोकनाथरस घालून नाकांत नस्य दिलें असतां नाकातून रक्त पडतें तें बंद होतें. घोरांचें आंटोंतला मगज. पिंपळी, मीरांचे पिठांचें भस्म हीं तीन औषधें एकाजागीं करून साखर मध मेळवून त्यांत लोकनाथरस घालून घेतला असतां ओकारी व उचकी हीं दूर होतात. याप्रमाणें संपूर्ण जितके पोटलीरस आहेत त्यांचे ठायीं व मृगांक व हेमगर्भ व मौक्तिकादिक रसायन यांचे ठायीं याप्रमाणेंच विधि करावा. याप्रकारें लोकनाथरस सांगितला हा लोकनाथ संपूर्ण रोग दूर करितो. असें जाणावें.

### लघुलोकनाथ रस ध्यावर.

वराटभस्मभागैकंचूर्णयित्वाघृतपचेत् ॥ तन्समंमरिचंचूर्णनागल्याविभा
वितम् ॥ २३ ॥ तच्चूर्णमधुनालेह्यमयवाटनतीर्नकः ॥ माषमात्रंक्षयंहं
नियामियामेचभक्षितम् ॥२४॥लोकनाथरसोन्ह्येषमंडलात्तराजक्ष्मनुत् ॥

कवड्यांचें भस्म एक भाग व मेंडर एक भाग व मिर्यें दोहोंचे समभाग हीं तीन औषधें एकाजागीं करून तुपांत भाजून तूप पोटीं आटल्यावर विड्याचे पानाचे रसांत खलून

माशा मासा प्रमाण गोळ्या बांधाव्या. याला लघुलोकनाथरस असें म्हणतात. हा लोकनाथ मर्यांत अथवा लोण्यांत प्रहरा प्रहरांनीं घेतला असतां सामान्यक्षय दूर होतो. याप्रमाणें एक-मंडळ घेतला असतां राजयक्ष्माही दूर होतो.

## मृगांकपोटलीरस क्षयादिकांवर.

भूर्जवत्तनुपत्राणिहेम्नःसूक्ष्माणिकारयेत् ॥२५॥ तुल्यानितानिसूतेन खल्वेक्षिप्त्वाविर्द-
येत् ॥ कांचनाररसेनैवज्वालामुख्यारसेनवा ॥२६॥ लांगल्यावारसस्तावद्यावद्भवति-
पिष्टिका ॥ ततोहेम्नश्चतुर्थांशंटंकणं तत्रनिक्षिपेत् ॥ २७ ॥ पिष्टमौक्तिकचूर्णंचहेमाद्वि-
गुणमावपेत् ॥ तेपुसर्वसमंगधंक्षिप्त्वाचैकत्रमर्दयेत् ॥ २८ ॥ तेपांकृत्वाततोगोलंवा-
सोभिः परिवेष्टयेत् ॥ पश्चान्मृदावेष्टयित्वाशोषयित्वाचधारयेत् ॥२९॥ शरावसंपु-
टस्यांतेतत्रमुद्रांप्रदापयेत् ॥ लवणापूरितेभांडेधारयत्तेचसंपुटं ॥ ३० ॥ मुद्रांद-
त्वाशोषयित्वाबहुभिर्गोमयैःपुटेत् ॥ततःशीतेसमाहृत्यगधंमृतसमंक्षिपेत् ॥ ३१ ॥
पृष्ठाचपूर्ववत्खल्वपुटेद्गजपुटेनच ॥स्वांगशीतंततोनीत्वागुंजायुग्मप्रकल्पयेत् ॥ ३२॥
अष्टभिर्मरिचैर्युक्तोकृष्णात्रययुतोथमा ॥ विलोक्यदोषदोषादीनिकंकारसरक्तिका
॥ ३३ ॥ सर्पिशामधुनावापिदद्याद्दोषादपेक्षया ॥ लोकनाथरसमपथ्यं कुर्यात्स्वस्थ-
मनाःशुचिः ॥ ३४ ॥ श्लेष्माणंग्रहणीकासंश्वासंक्षयमरोचकम् ॥ मृगांकोयंरसो-
हन्यात्कृशत्वंबलहानिताम् ॥ ३५ ॥

सोन्याचे भूर्जपत्रांसारखे पातळ पत्रे करून त्याचे समभाग शुद्ध पारा घेऊन दोहोचें एकाजागीं कंचनाचे रसांत अथवा भारजांभळीचे रसांत जोंपर्यंत एकाजागीं मिळोन चांगलें घट्ट होई तोंपर्यंत खल करावा. नंतर सोन्याचे चतुर्थांश टाकणखार, व सोन्याचे दुप्पट मोतीं, त्याचें खल केलेलें चूर्ण व सोन्याचे बरोबर गंधक घेऊन सारी एकाजागीं खलुन एक गोळा करून त्याचे भोंवतें कपडे गुंडाळून त्याजवर मातीचा लेप करून वाळल्यावर मातीचे दोन शराव आणून त्या एकांत तो गोळा ठेवून त्याजवर दुसरा शराव उपडा घालून त्याला कापडमाती करून मातीचे मडक्यांत मीठ घालून त्यांत तो शरावसंपुट ठेवून त्याजवर दुसरें मीठ घालून मडक्याचे तोंडावर दुसरें लहानसर मडकें उपडें घालून त्याचे संधीला कापडमाती करून गजपुट अग्नीपेक्षां कांहीं अधिक गाईचे शेणाच्या गोवऱ्या घेऊन अग्नि द्यावा. थंड झाल्यावर बाहेर काढुन फिरून त्या पाऱ्याचे बरोबर गंधक घेऊन सारें औषध खलांत घालून पहिल्यानें ज्या वनस्पतीचे रसांत खल केला आहे त्या वनस्पतीचे रसांत खल करून पहिल्या कृतीप्रमाणे कृती करून गजपुट अग्नि द्यावा. थंड झाल्यावर बाहेर काढून त्यांतील औषध काढून घ्यावें. याला मृगांक पोटलीरस असें म्हणतात. हा पोटली रस दोन गुंजा प्रमाण आठ मिऱ्यांशीं अथवा तीन पिंपळ्यांशीं द्यावा व दोषांचें तारतम्य पाहुन एक गुंजप्रमाण ... द्यावा व जशी दोषांनी अपेक्षा असेल तसा तुपांत अथवा मधांत द्यावा व अंतःकरण स्वच्छ करून शुचिर्भूत होऊन लोकनाथ रसासारखें पथ्य करावें याप्रमाणें आचरण केलें असतां या रसायनापासून कफरोग, ग्रहणी, कास, श्वास, क्षयरोग, अरुचि, अशक्तता व ... यांचे हे रोग दूर होतात.

### हेमगर्भ पोटलीरस कफ क्षयादिकांवर.

मृतात्पादप्रमाणेनहेम्नःपिष्टिंप्रकल्पयेत ॥ तयोःस्याद्द्विगुणोगंधोमर्दयेत्कांचनारिणा ॥ ३६ ॥ कृत्वागोलंक्षिपेन्मूषासंपुटेमुद्रयेत्ततः ॥ पचेद्भूधरयंत्रेणवासरत्रितयंबुधः ॥ ३७ ॥ ततउद्धृत्यतत्सर्वंदद्याद्गंधंचतत्समम् ॥ मर्दयेच्चार्द्रकरसैश्चित्रकस्वरसेनच ॥ ३८ ॥ स्थूलपीतवराटांश्चपुरयेत्तेनयुक्तितः ॥ एतस्माद्रसगंधात्कुर्यादष्टमांशेनटंकणम ॥ ३९ ॥ टंकणार्धंविषंदत्वापिष्ठासेदुंडदुग्धकैः ॥ मुद्रयेत्तेनकल्केनवराटानांमुखानिच ॥ १०४० ॥ भांडेचुर्णप्रलिप्तेथधृत्वामुद्रांप्रदापयेत ॥ गर्तेहस्तोन्मितेधृत्वापुटेद्गजनच ॥४१॥ स्वांगशीतंरसंज्ञात्वाप्रदद्यातलोकनाथवत ॥ पथ्यंमृगांकवज्ज्ञेयंत्रिदिनंलवणंत्यजेत ॥ ४२ ॥ यदाच्छर्दिर्भवेत्तस्यदद्याच्छिनाम्रृतंतदा ॥ मधुयुक्तंतथाश्लेष्मकोपेदद्यादगुडार्द्रकम ॥ ४३ ॥ विरेकेभर्जितांभंगामद्यादधिसंयुता ॥ जयेत्कासंक्षयंश्वासंग्रहणीमरुचिंतथा ॥ ४४ ॥ अग्निंचकुरुतेदीप्तंकफवातंनियच्छति ॥ हेमगर्भःपरोज्ञेयोरस.पोटलिकाभिधः ॥४५॥

शुद्धपारा एक भाग व त्याचे चवथा हिस्सा गाळ केलेला सोन्याचा चुरा व दोहोंचे दुप्पट गंधक घेऊन तिन्हीं कंचनाचे रसांत खलून त्याचा गोळा करून मातीचे शरावसंपुटांत घालून कापडमाती करून हातभर खाडा खणून त्यांत दुसरी लहान खळगी करून त्या खळगींत तो शरावसंपुट ठेवून त्याजवर बोटभर माती घालून त्याजवर रानगोवऱ्यांचे बारीक बारीक तुकडे घालून तीन दिवस अग्नि द्यावा याला भूधरयंत्र असें ह्मणतात. मग थंड जाहल्यावर बाहेर काढून त्याचे समभाग गंधक घेऊन दोहोंचा आल्याचे रसांत खल करून नंतर चित्रकाचे रसांत खल करावा. मग मोठ्या पिंवळ्या कवड्या आणून त्यांत तें औषधं युक्तीनें भरून मान्या औषधाचा आठवा हिस्सा टाकणखार व टाकणख्याराचे निम्मे बचनाग घेऊन दोहोंचा निवडुंगाचे दुधांत खल करून त्या कवड्यांचे तोंडाला त्याची मुद्रा द्यावी. नंतर मडक्याचे बुडाला चुना मारून त्यांत त्या कवड्या ठेवून मडक्याचे तोंडावर दुसरें मडकें उपडें घालून त्याचे संधीला कापडमाती करून हातभर खाडा खणून रानगोवऱ्यांचा गजपुट अग्नि द्यावा. थंड जाहल्यावर बाहेर काढून त्यांतील औषध काढून घ्यावें. याला हेमगर्भ पोटलीरस असें ह्मणतात. हा हेमगर्भ, लोकनाथरसाचे रीतीनें घ्यावा. पथ्य मृगांक रसायनाप्रमाणें करावें व याहून विशेष पथ्य तीन दिवस अलवण करावें. मग या औषधापासून ओकारी येऊं लागली तर गुळवेलीचा काढा करून त्यांत मध घालून घ्यावा. तेणेंकरून ओकारी दूर होते व कफाचा प्रकोप जाहला असता गूळ व आलें एकाजागीं करून घ्यावें. तेणेंकरून कफ दूर होतो व हाळ होऊं लागले असतां भांग थोडी भाजून दह्यांत द्यावी. तेणेंकरून हाळ बंद होतात व या हेमगर्भ पोटली रसापासून खोकला, क्षय, श्वास, संग्रहणी, अरुचि हे रोग दूर होतात व अग्नि प्रदीप्त होतो व कफवायूचा प्रकोप दूर होतो.

### दुसरा प्रकार.

रसस्यभागाश्चत्वारस्तावंतःकनकस्यच ॥ तयोश्चपिष्टिकांकृत्वागंधोद्वाद्श-

भागिकः ॥ ४६ ॥ कुर्यात्कज्जलिकांतेषांमुक्ताभागाश्चशोडश ॥ चतुर्विंशच्चशंख-भागैकंटंकणस्यच ॥ ४७ ॥ एकत्रमर्दयेत्सर्वंपक्वनिंबुकजैरसैः ॥ कृत्वातेषांततो-गोलंमूषासंपुटकेन्यसेत ॥ ४८ ॥ मुद्रांदत्वाततोहस्तमात्रेगर्तेचगोमयैः॥पुटेद्गजपुटे-नैवस्वांगशीतंसमुद्धरेत ॥ ४९ ॥ पिष्ठागुंजाचतुर्मानंदद्याद्गव्याज्यसंयुतम् ॥ एको-नत्रिंशदुन्मानमरिचैःसह दीयते ॥ १०५० ॥ राजतेमृन्मयेपात्रेकाचजेवावलेहयेत् ॥ लोकनाथसमंपथ्यंकुर्याच्छुचितमानसः ॥ ५१ ॥ कासेश्वासेक्षयेवातेकफग्रहणिका दे ॥ अतिसारेप्रयोक्तव्यापोटलीहेमगर्भिका ॥ ५२ ॥

पारा चार भाग व सोन्याचें बारीक चूर्ण चार भाग घेऊन दोन्हीं एकाजागीं चांगलें खल होई तोंपर्यंत खलून पाऱ्याचें बारा भाग गंधक घेऊन त्यात घालून तिहींचा खल करून कज्जली करावी नंतर पाऱ्याचे सोळा भाग मोतीं, चोवीस भाग शंख, एक भाग टांकणखार घेऊन त्या औषधांत मेळवून पिकल्या निंबाचे रसांत खलून त्याचा गोळा करून मातीचे शरावसंपुटांत घालून त्याला कापडमाती करून एक हात खाडा खणून त्यांत गाईचे शेणाच्या गोंवऱ्या घालून त्यांत तो शरावसंपुट ठेवून गजपुट अग्नि द्यावा, थंड जाहाल्यावर बाहेर काढून त्यांतील औषध घेऊन खलून ठेवावें. याला हेमगर्भ पोटलीस असें म्हणतात. हा हेमगर्भ चार गुंजाप्रमाणें एकुणतीस मिऱ्यांचे चूर्णाशीं रुप्याचे पात्रांत अथवा मातीचे अथवा कांचेचे प्याल्यांत गाईचें तूप घालून घ्यावा व अंतःकरण स्वस्थ करून लोकनाथ रसासारखें पथ्य करावें. तेणेंकरून श्वास, कास, क्षयरोग, वातविकार, कफ, संग्रहणी व अतिसार हे रोग दूर होतात.

महाज्वरांकुश विषमज्वरांवर.

शुद्धसूतोविषंगंधःप्रत्येकंशाणसंमितः ॥ धूर्तबीजंत्रिशाणंस्यात्सर्वं
भ्योद्विगुणाभवेत् ॥ ५३ ॥ हेमाव्हाकारयेदेषांसूक्ष्मचूर्णंप्रयत्नतः ॥
देयंजंबीरमज्जाभिश्चूर्णंगुंजाद्वयोन्मितम् ॥५४॥ आर्द्रकस्वरसंवापिज्व
रंहंतित्रिदोषजम् ॥ एकाहिकंद्व्याहिकंवात्र्याहिकंवाचतुर्थकम् ॥५५॥
विषमंचज्वरंहन्याद्विख्यातोयंज्वरांकुशः ॥

शुद्धपारा तीन मासे प्रमाण व शुद्ध केलेला वचनाग तीन मासे व गंधक तीन मासे व धोतऱ्याचें बीज नऊ मासे (व चोक म्हणजे पिसोळ्याचें मूळ. अथवा काळे धोतऱ्याचें मूळ हें सर्वांचें दुप्पट) घेऊन सार्‍यांचें एकाजागीं चांगलें बारीक चूर्ण करून जंबीराचे रसांत अथवा आल्याचे रसांत दोन गुंजप्रमाण द्यावें. तेणेंकरून त्रिदोषापासून जो ज्वर येतो तो दूर होतो व रोज येतो तो व दिवसरात्रीं दोनवेळां येतो तो व एका दिवसा आड येतो तो व चवथ्या रोजीं येतो तो हे सारे ज्वर दूर होतात. व हा ज्वरांकुश विषमज्वर दूर करण्यावि-षयीं विख्यात आहे असें जाणावें.

आनंदभैरवरस अतिसारादिकांवर.

दरदंवत्सनाभंचमरिचंटंकणंकणा ॥५६॥ चूर्णयेत्समभागेनरसोह्यानं
नंदभैरवः ॥ गुंजंवाद्विगुंजंवाबलंज्ञात्वाप्रयोजयेत् ॥५७॥ मधुना

लेहयेच्चानुकुटजस्यफलंत्वचम् ॥ चूर्णितंकर्पमात्रंतुत्रिदोषोत्थातिसार नुत् ॥ ५८ ॥ दध्यन्नंदापयेत्पथ्यंगवाज्यंतक्रमेवच ॥ पिपासायां जलंशीतंविजयाचहितानिशि ॥ ५९ ॥

हिंगुळ, शुद्ध केलेला बचनाग, मिर्यें, टाकणखार, पिंपळी हीं पांच औषधें समभाग घेऊन सान्याचा एका जागीं खल करून बारीक चूर्ण करावें, याला आनंदभैरवरस असें म्हणतात. हा आनंदभैरवरस इंद्रजव व कुडेसाल हीं दोन्ही एक कर्ष प्रमाण घेऊन चूर्ण करून त्याशीं रोगाचें बलाबळ पाहून एक गुंजाप्रमाण अथवा दोन गुंजाप्रमाण मधांत घ्यावा तेणें-करून त्रिदोषापासून जाहला जो अतिसार तो दूर होतो आणि पथ्याला गाईचें दहींभात अथवा तूपभात अथवा ताकभात घ्यावा व तहान लागली असता थंड पाणी प्यावें व रात्रीस थोडी भांग शुद्ध करून घ्यावी. ती भांग अतिसार यास हितकारक होते असें जाणावें.

लघुसूचिकाभरणरस सन्निपातावर.

विषंपलमितंसूतःशाणिकंचूर्णयेद्द्वयम् ॥ तच्चूर्णंसंपुटेक्षिप्त्वाकाचलिप्तश रावयोः ॥ १०६० ॥ मुद्रांदत्वाचसंशोष्यतच्चुल्यांनिवेशयेत् ॥ वह्निं शनैःशनैःकुर्यात्प्रहरद्वयसंख्यया ॥ ६१ ॥ ततउद्घाटयन्मुद्रामुपरिस्था शरावकात् ॥ संलग्नोयोभवेत्सूतस्तंगृह्णीयाच्छनैःशनैः ॥ ६२ ॥ घा युस्पर्शोयथानस्यात्तथाकुप्यांनिवेशयेत् ॥ यावत्सूच्यामुखेलग्नःकुप्या निर्यातिभेपजम् ॥ ६३ ॥ तावन्मात्रोरसोदेयोमूर्छितेसन्निपातिनि ॥ क्षीरेणप्रस्थितेमूर्ध्नितत्रांगुल्याचघर्षयेत् ॥ ६४ ॥ रक्तभेषजसंपर्कान्मू छितोपिहिजीवति ॥ तथैवसर्पदष्टस्तुमृतावस्थोपिजीवति ॥ ६५ ॥ यदातापेभवेत्तस्यमधुरंतत्रदीयते ॥

बचनाग एक पळ व शुद्ध केलेला पारा तीन मासे घेऊन दोहोंचा एका जागीं खल करून चूर्ण करावें नंतर मातीचे प्याल्यास, कांच वाटून लेप करून सिद्ध केलेले असे कांचेचे मोठे मोठे दोन प्याले आणून त्या एकांत तें चूर्ण घालून कापडमाती करून वा-ळल्यावर चुलीवर ठेवून हलका हलका अग्नि दोनप्रहरपर्यंत देऊन नंतर खालीं उतरून त्या पेल्याची मुद्रा काढून वरचे पेल्यांत पारा लागून राहिला तो हलक्या हातानें युक्तीनें वारा न लागता काढून कुपींत भरून ठेवावा. नंतर कुपींत सुया घालून जितका सुईचे अग्राला पारा येईल तितका बाहेर काढून ज्या मनुष्याला सन्निपात होऊन मूर्च्छा येते त्या मनुष्याचे मस्तकाचेठायीं टाळूचे जाग्यावर वस्त्र्यानें चांगले केश काढून तें औषध त्या जाग्यावर लावून बोटानीं जोंपर्यंत औषध रक्ताला मिळे तोंपर्यंत चोळावें, मग रक्ताचा व औषधाचा संबंध जाहल्यानंतर मनुष्यास मूर्छा येऊन मरणावस्थेप्रत जातो तोच मनुष्य या उपायेंकरून वाचतो व या उपायेंकरून शरीरांत दाह विशेष होऊं लागला असता गुलकंद, डाळिंब, द्राक्ष इत्यादिक मधुर पदार्थ भक्षणास द्यावे, तेणेंकरून दाह शांत होतो.

जलचूडामणिरस सन्निपातावर.

मृतभस्मसमंगंधंगंधात्पादंमनःशिला ॥ ६६ ॥ माक्षिकंपिप्पलीव्योषं प्रत्ये-कंशिलयासमम् ॥ चूर्णयेद्भावयेत्पित्तैर्मत्स्यमायूरमाभवं ॥ ६७ ॥ समधाभावयेच्छ-

कंदेयंगुंजाद्वयेहितम् ॥ तालपर्णीरसंश्चानुपंचकोलशृते नवा ॥ ६८ ॥ जलचूडोर- सोनामसन्निपातंनियच्छति ॥ जलयोगश्च कर्तव्यस्तेनवीर्यंभवेद्रसे ॥ ६९॥

पाऱ्याचें भस्म एक भाग, गंधक एक भाग, गंधकाचे चवथा हिस्सा मनशीळ, सोनामु- खीचें भस्म, पिंपळी, सुंठ, मिऱ्यें, पिंपळी हीं पांच औषधें मनशिळाचे समभाग घेऊन साऱ्याचें चूर्ण करून खलांत घालून माशाचे काळजांत पित्त असतें त्याचीं पुटें सात द्यावीं, नंतर मोराचे काळजांत पित्त असतें त्याचीं पुटें सात देऊन वाळवावें. याला जलचूडामणिरस असें ह्मणतात. हा जलचूडामणि दोन गुंजाप्रमाण मुसळीचे रसांत अथवा पंचकोलाचे काढ्यांत द्यावा व रोगी याचे जवळ थंड पाण्याचा योग करावा तेणेंकरून रसायनाला वीर्य येऊन सन्निपात दूर होतो.

### पंचवक्त्ररस सन्निपातावर.

शुद्धसूतंविषंगंधंमरिचंटंकणंकणा ॥ मर्दयेद्धूर्तजद्रावैर्दिनमेकंतुशोषयेत् ॥ १०७० ॥ पंचवक्त्रोरसोनामद्विगुंजः सन्निपातहा ॥ अर्कमूलकषा यंतुसत्र्यूषमनुपाययेत् ॥ ७१ ॥ युक्तंदध्योदनंपथ्यंजलयोगंचकार येत् ॥ रसेनानेनशाम्यंतिसक्षौद्रेणकफादयः ॥ ७२ ॥ मध्वार्द्रकरसं चानुपिबेदग्निविवृद्धये ॥ यथेष्टंघृतमांसाशीशक्तोभवतिपावकः ॥७३॥

शुद्ध केलेला पारा, शुद्ध केलेला बचनाग, गंधक, मिऱ्यें, टांकणखाराची लाही, पिंपळी [illegible] सहा औषधांचा धोतऱ्याचे रसात एक दिवस खल करून दोन दोन गुंजाप्रमाण गोळ्या [illegible]रून वाळवाव्या. याला पंचवक्त्र रस असें ह्मणतात. हा पंचवक्त्र रस रुईचे मुळांचा काढा [illegible]रून त्यांत सुंठ, मिऱ्यें, पिंपळी यांचें चूर्ण घालून द्यावा व पथ्याला दहींभात योजावा. [illegible]ग्याजवळ थंड पाण्याचा योग करावा, तेणेंकरून सन्निपात दूर होतो व हा रस मधांत [illegible]घेतला असतां कफादिरोग दूर होतात व आल्याचे रसांत मध मिळवून घेतला असता जठरा- [illegible]ग्नीची वृद्धि होते. तूप व मांस यथेष्ट भक्षण केलें असतां जठराग्नि त्यांना पचवून प्रदीप्त होतो.

### उन्मत्तरस सन्निपातावर.

रसगंधकतुल्यांशंधत्तूरफलजैरसैः ॥ मर्दयेद्दिनमेकंचतत्तुल्यंत्रिकटुक्षिपेत् ॥ ७४ ॥ उन्मत्ताख्योरसोनामनस्येस्यात्सन्निपातजित् ॥

शुद्धपारा एकभाग, गंधक एकभाग, सुंठ, मिऱ्यें, पिंपळी हीं तीन औषधें त्या दोहोंचे समभाग घेऊन सारीं एकाजागीं धोतऱ्याचे फळाचे रसांत एक दिवस खलून वाळवून पूड करावी. याला उन्मत्तरस असें म्हणतात. याची पूड ज्या मनुष्यास सन्निपात होतो त्या मनु- ष्याचे नाकांत घालावी. तेणेंकरून सन्निपात दूर होतो.

### अंजनरस सन्निपातावर.

निस्त्वक्जैपालबीजंचदशनिष्कंविचूर्णयेत् ॥ ७५ ॥ मरिचंपिप्पली सूतंप्रतिनिष्कंविमिश्रयेत् ॥ भाव्योजंबीरजैर्द्रावैःसप्ताहंसंप्रयत्नतः ॥ ७६ ॥ रसोयमंजनेदत्तःसन्निपातंविनाशयेत् ॥

जेपाळचे बियांची साल काढून तें बीज दहा निष्कप्रमाण व मिऱ्यें, पिंपळी, पारा हीं औषधें निष्क निष्क प्रमाण घेऊन या चोहोंचा जंबीराचे रसांत सात दिवस खल करून

गोळ्या बांधून ज्या मनुष्याला सन्निपात होतो त्याचे टाळ्यांत ती गोळी उगाळून घालावी. तेणेंकरून सन्निपात दूर होतो.

## नाराचरस शूलादिकांवर.

मृतटंकणकंतुल्यंमरिचंमृततुल्यकम् ॥ ७७ ॥ गंधकःपिप्पलीशुंठीद्वौद्वौभागौविचूर्णयेत् ॥ सर्वतुल्यंक्षिपेत्दंतीबीजंनिस्तुषितंभिषक् ॥ ७८ ॥ द्विगुंजंरेचनंसिद्धंनाराचोयंमहारसः ॥ आध्मानंशूलविष्टंभमुदावर्तंचनाशयेत् ॥ ७९ ॥

पारा एकभाग, टांकणखाराची लाही एकभाग, मिऱ्यें एकभाग, गंधक, पिंपळी, सुंठ हीं तीन औषधें पाऱ्याचे दोन दोन भाग, शुद्ध केलेलें जेपाळबीज साऱ्याचे समभाग घेऊन साऱ्या औषधांचा एकाजागीं खल करून पूड करावी; याला नाराचरस असें ह्मणतात. हा रस ढाळ होण्याविषयीं दोन गुंजा द्यावा तेणेंकरून ढाळ होतात. पोटफुगी, शूळ, मळाचा अवरोध, वायूची ऊर्ध्वगति होते ती, हे सारे रोग दूर होतात.

## इच्छाभेदीरस शूलादिकांवर.

दरदंटंकणंशुंठीपिप्पलीचोतिकार्षिकाः ॥ हेमाव्हापलमात्रास्याद्दंतीबीजंचतत्समम् ॥ १०८९ ॥ विशोष्यैकत्रसर्वाणिगोदुग्धेनैवपाययेत् ॥ त्रिगुंजंरेचनंदद्यात्विष्टंभाध्मानरोगिषु ॥ ८१॥

हिंगुळ. टाकणखाराची लाही, सुंठ, पिंपळी हीं चार औषधें कर्ष कर्ष प्रमाण, चोक एक पळ व शुद्ध केलेलें जेपाळबीज एक पळ घेऊन सारीं औषधें एका जागीं खलून पूड करावी. याला भेदीरस असें म्हणतात. हा रस ढाळ होण्याविषयीं गाईचे दुधात तीन गुंजा प्रमाण द्यावा. तेणेंकरून ढाळ होऊन मळाचा अवरोध, पोटफुगी हे रोग दूर होतात.

## राजमृगांकरस क्षयरोगावर.

मृतभस्मत्रयोभागाभागैकंहेमभस्यकम् ॥ मृताभ्रस्यचभागैकंशिलागंधकतालकम् ॥ ८२ ॥ प्रतिभागद्वयंशुद्धमेकीकृत्यविचूर्णयेत् ॥ वराटान् पूरयेत्तेनछागीक्षीरेणटंकणम् ॥ ८३ ॥ पिष्टातेनमुखंरुद्ध्वामृद्भांडेत निरोधयेत् ॥ शुष्कंगजपुटेपक्त्वाचूर्णयेत्स्वांगशीतलम् ॥ ८४ ॥ रसो राजमृगांकोयंचतुर्गजःक्षयापहः॥ दशपिप्पलिकाक्षौद्रैरेकोनत्रिंशदूषणैः ॥ ८५ ॥

पाऱ्याचें भस्म तीन भाग, सोन्याचें भस्म, अभ्रकाचें भस्म, एकेक भाग, मनशीळ, हरताळ, गंधक हीं तीन औषधें शुद्ध करून दोन दोन भाग घेऊन साऱ्यांचा एकाजागीं खल करून पूड करावी. नंतर मोठया मोठ्या कवड्या आणून त्यांचे तोंडांत त्या औषधांची पूड भरून नंतर टांकणखार शेळीच्या दुधांत खलून त्या कवड्यांचे तोंडाला त्याची मुद्रा देऊन त्यांना मडक्यांत घालून त्यावर दुसरें लहान मडकें उपडें घालून त्याचे संधीला कापडमाती करून वाळल्यावर रानगोवऱ्याचा गजपुट अग्नि द्यावा. थंड जाहल्यावर बाहेर काढून त्यांतील औषध खलून ठेवावें. याला राजमृगांकरस असें म्हणतात. हा राजमृगांक चार गुंजाप्रमाण दहा पिंपळ्या व एकुणतीस मिऱ्यें या दोहोंचें चूर्ण करून मधांत घालून द्यावा. तेणेंकरून क्षयरोग दूर होतो.

## स्वयमग्निरस क्षयादिकांवर.

शुद्धंसूतंद्विधागंधंकुर्यात्खल्वेनकज्जलीम् ॥ तयोःसमंतीक्ष्णचूर्णंमर्दयेत्कन्य-
काद्रवैः ॥ ८६ ॥ द्वियामांतेकृतंगोलताम्रपात्रेविनिक्षिपेत् ॥ आच्छाद्यैरंडपत्रेण-
यामार्धेत्युष्णताभवेत् ॥ ८७ ॥ धान्यराशौन्यसेत्पश्चादहोरात्रात्समुद्धरेत् ॥ संचू-
र्ण्यगालयेद्वस्त्रेसत्यंवारितरंभवेत् ॥ ८८ ॥ भावयेत्कन्यकाद्रावै सप्तधाभृंगजैस्तथा ॥
काकमाचीकुरंटोत्थद्रवैर्मुंडया पुनर्नवैः ॥ ८९ ॥ सहदेव्यामृतानील्यानिर्गुंड्याश्चि-
त्रजैस्तथा ॥ सप्तधातुपृथक्द्रावैर्भाव्यंशोष्यंतथातपे ॥ १०९० ॥ सिद्धयोगोत्थ्ययं
ख्यातःसिद्धानांचमुखागतः ॥ अनुभूतोमयासत्यंसर्वरोगगणापहः ॥ ९१ ॥ स्व-
र्णादीन्मारयेदेवंचूर्णीकृत्यतुलोहवत् ॥ त्रिफलामधुसंयुक्त सर्वरोगेपुयोजयेत ॥९२॥
त्रिकटुत्रिफलैलाभिर्जातीफललवंगकैः ॥ नवभागोन्मितैरेतैःसमःपूर्वरसोभवत्
॥ ९३ ॥ संचूर्ण्यलोडयेत्क्षौद्रैर्भक्ष्यंनिष्कद्वयंद्वये ॥ स्वयमग्निरसोनाम्नाक्षयकासनि-
कृंतनः ॥ ९४ ॥

शुद्ध पारा एक भाग व गंधक दोन भाग घेऊन दोहोंला एकाजागीं खलून कज्जली क-
रून त्याचे समभाग पोलादी लोहाचें चूर्ण घेऊन त्यात मेळवून कोरफडाचे रसात दोन प्रहर
खलून त्याचा गोळा करून नंतर ताम्याचे ताम्हनात तो गोळा ठेवून त्याजवर सुरती एर-
डाची पानें झाकण घालुन चार घटकांपर्यंत ठेवावा. तेणेंकरून तो गोळा फार उष्ण होतो
त्याला धान्याचे राशीमध्यें एक आहोरात्र पुरून ठेवून दुसरे दिवशीं बाहेर काढावा, तों त्याचें
भस्म होतें. त्याचा खल करून फडक्यात गाळून पाण्यावर टाकिलें असता निश्चयेंकरून तरतें
यात संशय नाहीं. मग त्या भस्माला खलात घालून ज्या वनस्पतीचीं पुटें द्यावयाचीं तीं ये-
णेंप्रमाणें. कोरफडाचे रसात खलून उन्हात तापवून वाळल्यावर, फिरून त्याच रसात खलून
उन्हात तापवून वाळल्यावर याप्रमाणें सात पुटें कोरफडाचीं द्यावीं. तशींच माक्याचे रसाचीं
पुटें सात व कागोमीचे रसाचीं पुटें सात व कोरांटयाचे रसाचीं पुटें सात व मुंडीचे रसाचीं
पुटें सात व पुनर्नव्याचे रसाचीं पुटें सात व सहदेवी व गुळवेल व नीली व निर्गुंडी व चित्र-
काचे रसाचीं पुटें वेगळीं वेगळीं सात सात द्यावीं, तेणेंकरून हें रसायन सिद्ध होतें, याला
स्वयमग्निरस असें म्हणतात. हा रस विख्यात आहे. महान् महान् सिद्ध पुरुषानीं सांगितला
यास्तव म्या अनुभव घेऊन कथिला. हा स्वयमग्निरस सारे रोग दूर करण्याविषयीं त्रिफळेचें
चूर्ण व मध या अनुपानाशीं दोन निष्कप्रमाण द्यावा. तेणेंकरून सारे रोग दूर होतात, सुंठ,
मिर्यें, पिंपळी, हिरडा, बेहडा, आवळकटी, विलायची, जाळफळ, लवंग हीं नऊ औषधें सम-
भाग घेऊन चूर्ण करून त्याचे समभाग हा स्वयमग्निरस घेऊन दोन्हीं एक करून मधांत मे-
ळवून दोन निष्कप्रमाण द्यावा. तेणेंकरून क्षयरोग व कासरोग हे जातात व रसायनचे री-
तीनें स्वर्णादिक धातूचें लोहासारखें चूर्ण करून क्षसें करावीं तीं होतात —

## सूर्यावर्तरस श्वासावर.

सूताधोंगंधकोमर्द्योयामैकंकन्यकाद्रवैः ॥ द्वयोस्तुल्यंताम्रपत्रंपूर्वकल्के नलेप-

येत् ॥ ९५ ॥ दिनैकंस्थालिकायंत्रेपक्त्वाचादायचूर्णयेत् ॥ सूर्यावर्तोरसोह्येषोद्विगुंजः श्वासजित्भवेत् ॥ ९६ ॥

शुद्ध पारा एक भाग व गंधक पाऱ्याचे अर्धाभाग घेऊन दोहोंचा एकाजागीं कोरफडीचे रसांत एक प्रहरपर्यंत खल करून कल्क करावा. मग दोहोंचे समभाग तांब्याचे पत्रे घेऊन त्यांनां त्या कल्काचा लेप करून ते पत्रे मातीचे मडक्यांत ठेवून त्याचे तोंडावर दुसरें लहानसर मडकें उपडें घालून त्याचे संधीला कापडमाती करून तें मडके चुलीवर ठेवून एक दिवस अग्नि द्यावा. याला स्थालिकायंत्र असें म्हणतात. मग थंड जाहल्यावर ते पत्रें बाहेर काढून खलून बारीक पूड करावी. याला सूर्यावर्तरस असें म्हणतात. हा रस दोन गुंजाप्रमाण ज्या मनुष्याला श्वास आहे त्याला द्यावा तेणेंकरून श्वास दूर होतो.

### स्वच्छंदभैरवरस वातरोगावर.

शुद्धसूतंमृतंलोहंताप्यंगंधकतालकम् ॥ पथ्याग्निमंथनिर्गुंडीत्र्यूषणंटंकणंविषम् ९७
तुल्यांशंमर्दयेत्खल्वेदिनंनिर्गुंडिकाद्रवैः ॥ मुंडीद्रावैर्दिनैकंतुद्विगुंजवटकीकृतम् ९८
भक्षयेद्वातरोगार्तोनाम्नःस्वच्छंदभैरवः ॥ रास्नामृतादेवदारुशुंठीवातारिजंभृतम्॥९९॥
सगुग्गुलुंपिबेत्कोष्णमनुपानंसुखावहम् ॥

शुद्ध पारा, लोहभस्म, स्वर्णमाक्षिक भस्म, गंधक, हरताळ, बाळहिरडे, एरण, निरगुड, सुंठ, मिरें, पिंपळी, टांकणखाराची लाही, शुद्ध केलेला बचनाग हीं तेरा औषधें समभाग घेऊन निर्गुंडीचे रसांत एक दिवस खल करावा. नंतर मुंडीचे रसांत एक दिवस खलून दोन दोन गुंजाप्रमाण गोळ्या बांधाव्या. याला स्वच्छंदभैरव रस असें म्हणतात. हा स्वच्छंदभैरवरस राम्ना, गुळवेल, देवदार, सुंठ, एरंडमूळ, या पांच औषधांचा काढा करून त्यांत गुग्गुळ मेळवून द्यावा. तेणेंकरून वायूचा रोग दूर होतो.

### हंसपोटलीरस संग्रहणीवर.

दग्धान्कपर्दिकान्पिष्ट्वात्र्यूषणंटंकणंविषम् ॥ १,१०० ॥ गंधकंशुद्धसूतंचतुल्यंजंबीरजैर्द्रवैः ॥ मर्दयेद्भक्षयेन्माषंमरिचाज्यंलिहेदनु ॥ १ ॥ निहंतिग्रहणीरोगंपथ्यंतक्रौदनंहितम् ॥

कवड्यांचें भस्म, सुंठ, मिरें, पिंपळी, टांकणखाराची लाही, शुद्ध केलेला बचनाग, गंधक, शुद्ध केलेला पारा हीं आठ औषधें जंबीराचे रसांत खलून मासामासा प्रमाण गोळ्या बांधाव्या. याला हंसपोटलीरस असें म्हणतात. हा पोटलीरस मिऱ्याचे चूर्णाबरोबर द्यावा व याला पथ्याला ताकभात द्यावा; तेणेंकरून संग्रहणी रोग दूर होतो.

### त्रिविक्रमरस अश्मरीरोगावर.

मृतंताम्रमजाक्षीरैःपाच्यंतुल्यंगतद्रवम् ॥ २ ॥ तत्ताम्रंशुद्धसूतंचगंधकंचसमंसमम् ॥ निर्गुंडिस्वरसैर्मर्द्यंदिनंतद्गोलकंकृतम् ॥ ३ ॥ यामैकंवालुकायंत्रेपाच्यंयोज्यंद्विगुंजकम् ॥ बीजपूरस्यमूलंतुसजलंचानुपाययेत् ॥ ४ ॥ रसस्त्रिविक्रमोनाम्नामासैकेनाश्मरीप्रणुत् ॥ ५ ॥

ताम्रभस्माचे समभाग शेळीचें दूध घेऊन त्यांत ताम्रभस्म घालून कढवून कोरडें करावें. तें ताम्रभस्म व शुद्ध केलेला पारा व गंधक हीं तिन्हीं समभाग घेऊन निर्गुंडीचे रसांत एक

दिवसपर्यंत खलून त्याचा गोळा करून त्याला वालुकायंत्रांत घालून एक प्रहर अग्नि द्यावा. थंड झाल्यावर बाहेर काढून त्यांतील औषध काढून घ्यावें, याला त्रिविक्रमरस असें ह्मणतात. हा रस दोन गुंजा प्रमाण महाळुंगीचें मुळ्यांचा रस अथवा काढा करून त्यांत द्यावा, तेणें-करून अश्मरीरोग एका महिन्यानें दूर होतो.

## महातालेश्वररस कुष्ठादिकांवर.

**तालंताप्यंशिलासूतंशुद्धंसैंधवटंकणम् ॥ समांशंचूर्णयेत्खल्वेसूतात्द्विगुणगंधकम् ॥ ६ ॥ गंधतुल्यंमृतंताम्रंजंबीरैर्दिनपंचकम् ॥ मर्द्यंषड्भिःपुटैःपाच्यंभूधरेसंपुटोदरे ॥ ७ ॥ पुटेपुटेद्रवैर्मर्द्यंसर्वमेतच्चषट्पलम् ॥ द्विपलंमारितंताम्रंलोहभस्मचतुःपलम् ॥ ८ ॥ जंबीराम्लेनतत्सर्वंदिनंमर्द्यंपुटेल्लघु ॥ त्रिंशदंशेविषंचास्यक्षिप्त्वासर्वंविचूर्णयेत् ॥ ९ ॥ माहिषाज्येनसंमिश्रंनिष्कार्द्धंभक्षयेत्सदा ॥ मध्वाज्यैर्बाकुचीचूर्णंकर्षमात्रंलिहेदनु ॥ ११० ॥ सर्वकुष्ठानिहंत्याशुमहातालेश्वरोरसः ॥**

हरताळ, स्वर्णमाक्षिक भस्म, मनशीळ, शुद्ध केलेला पारा, सैंधव, टांकणखार हीं सहा औषधें समभाग व पाऱ्याचे दुप्पट गंधक व गंधकाचे समभाग ताम्रभस्म घेऊन सारीं खलांत घालून, जंबीराचे रसांत पांच दिवसपर्यंत खलून त्याचा गोळा करून त्याला मातीचे शराव-संपुटांत घालून कापडमाती करून भूधर यंत्रांत तो शरावसंपुट ठेवून रानगोंवऱ्यांचा अग्नि द्यावा मग थंड झाल्यावर बाहेर काढून त्याला खलांत घालून फिरून पांच दिवसपर्यंत जंबीराचे रसांत खलून पहिल्या रीतीनें भूधरयंत्रांत घालून अग्नि द्यावा. याप्रमाणें सहा वेळ जंबीराचे रसांत खलून व सहा वेळ भूधरयंत्रांत घालून अग्नि द्यावा. नंतर भस्म होतें तें भस्म सहा पळें व ताम्रभस्म दोन पळें व लोहभस्म चार पळें हीं तिन्हीं भस्में एका जागीं करून खलांत घालून जंबीराचे रसांत एक दिवसपर्यंत खलून मातीचे शरावसंपुटांत घालून कापड माती करून रानगोंवऱ्यांचा हलका अग्नि द्यावा. थंड झाल्यावर बाहेर काढून त्याचे तिसावा भाग बचनाग शुद्ध केलेला बारीक करून त्यांत मेळवावा याला महातालेश्वररस असें ह्मण-तात. हा तालेश्वर रस अर्ध निष्क प्रमाण म्हशीचे तुपांत द्यावा व त्याजवर लागलेंच तूप व मध हीं दोन्हीं एका जागीं करून त्यांत बावच्यांचें चूर्ण एक कर्ष प्रमाण घालून द्यावें तेणें-करून संपूर्ण कुष्ठें लवकर दूर होतात.

## कुष्ठकुठाररस.

**मृतभस्मसमोगंधोमृतायस्ताम्रगुग्गुलु ॥ ११ ॥ त्रिफलाचपहानिंबाश्चित्रकश्चशिलाजतु ॥ इत्येतच्चूर्णितंकुर्यात्प्रत्येकंशाणषोडश ॥ १२ ॥ चतुःषष्टिकरंजस्यबीजस्वबीजचूर्णप्रकल्पयेत् ॥ चतुःषष्टिमृतंचाभ्रंमध्वाज्याभ्यांविलोडयेत् ॥ १३ ॥ स्निग्धभांडेधृतंखादेत्द्विनिष्कंसर्वकुष्ठनुत् ॥ रसःकुष्ठकुठारोयंगलत्कुष्ठनिवारणः ॥ १४ ॥**

पाऱ्याचें भस्म, गंधक, लोहभस्म, ताम्रभस्म, गुग्गुळ, हिरडा, बेहडा, आंवळकटी, मऊ-णानिंब, चित्रक, शिलाजित हीं अकरा औषधें एकेक सोळा सोळा शाण प्रमाण घेऊन व चवसष्टशाण करंजबीज घेऊन साऱ्यांचें चूर्ण करून अभ्रकभस्म चवसष्टशाण घेऊन त्या चूर्णाला मिळवून तुपानें गवसलेलें मडकें घेऊन त्यांत तूप व मध घालून त्यांत

चूर्ण कालवून तुपधीला मेळवावें याला कुष्ठकुठाररस असें म्हणतात. हा रस दोन नष्कप्रमाण ध्यावा. तेणेंकरून सारीं कुष्टें व गलत्कुष्टें हीं दूर होतात.

### उदयादित्यरस कुष्ठांवर.

शुद्धंसुतंद्विधागंधंमर्दयेत्कन्याद्रवैर्दिनम् ॥ तद्गोलंपिठारीमध्येताम्रपात्रेणरो
धयेत् ॥१५॥ सूतकाद्द्विगुणेनैवशुद्धेनाधोमुखेनच ॥ पार्श्वेभस्मनिधाया
थपात्रोर्ध्वेगोमयंजलम् ॥ १६ ॥ किंचित्प्रदातव्यमग्निंचुल्यांयामद्वयं
पचेत् ॥ चंडाग्निनातदुद्धृत्यस्वांगशीतंविचूर्णयेत् ॥१७॥ काष्ठोदुंबरि
कावान्हित्रिफलाराजवृक्षकम् ॥ विडंगंबाकुचीबीजंक्काथयेत्तेनभावयेत्
॥ १८ ॥ दिनैकंशुद्धयादित्योरसोदेयोद्विगुंजकः ॥ विचर्चिकाद्रद्रुकुष्ठ
वातरक्तंचनाशयेत् ॥१९॥ अनुपानंचकर्तव्यंबाकुचीफलचुर्णकम् ॥
खदिरस्यकषायेणसमेनपरिपाचितम् ॥ ॥२० ॥ त्रिपाणतत्तूगवां
क्षीरैःक्काथैर्वात्रिफलैःपिबेत् ॥ त्रिदिनांतेभवेत्स्फोटःसप्ताहाद्वाकिलामके
॥ २१ ॥ नीलीगुंजाश्वकाशीसंधत्तूरंहंसपादिकम् ॥ सूर्यभक्ताचचांगे
रीपिष्ट्वामूलानिलेपयेत् ॥ २२ ॥ स्फोटस्थानप्रशांत्यर्थसप्तरात्रंपुनः
पुनः ॥ श्वितकुष्टानिहंत्याशुसाध्यासाध्यंनसंशयः ॥ २३ ॥ अपर
श्वित्रलेपोपिकथ्यतेत्रभिषग्वरैः ॥ गुंजाफलाग्निचूर्णंचप्रलेपाश्वित्रनाशनुत्
॥ २४ ॥ शिलापामार्गभस्मापिलिप्तश्वित्रंविनाशयेत् ॥

शुद्ध केलेला पारा एक भाग व गंधक दोन भाग घेऊन कोरफडीचे रसांत दोहींस खलून त्याचा गोळा करून मडक्यात ठेवून पाऱ्याचे तिप्पट शुद्ध केलेलें तांबें घेऊन त्याची वाटी करून त्या गोळ्यावरती उपडी घालून त्याचे संधीला गोवऱ्यांची राख दडपून गाईचें शेण व पाणी एकाजागीं कालवून त्या वाटीला थोडा लेप करून तें मडकें चुलीवर ठेवून त्या खालीं मोठ्या अग्नीचा जाळ दोनप्रहरपर्यंत करावा मग थंड झाल्यावर बाहेर काढून खलांत घालून त्याला पुटें द्यावयाचीं औषधें-काळा उंबर, चित्रक, हिरडा, बेहडा, आवळकंठी, बाहाव्याचे शेंगेतला मगज, वावडिंग, बावच्या या आठ औषधांचा काढा करून त्या रसायनांत घालून एक दिवसपर्यंत खल करून तें रसायन कोरडें करावें याला उदयादित्यरस असें म्हणतात. हा रस दोन गुंजाप्रमाण खैराचे सालीचा काढा करून त्यांत बावच्यांचें चूर्ण तीन मासे प्रमाण घालून त्यात घ्यावा अथवा गाईचे दुधांत अथवा त्रिफळेचे काढ्यांत घ्यावा तेणेंकरून विचर्चिकारोग, दाद, कुष्ट, वातरक्त हे रोग दूर होतात. हा उदयादित्यरस तीन दिवस घेतल्यानंतर त्यापासून चवथे रोजीं अथवा सातवे रोजीं ज्या मनुष्यास पांढरें कुष्ट आहे त्याचे अंगावर फोड उत्पन्न होतात. ते बरे होण्याविषयीं औषधें नीळपुष्पी, गुंजा, हिराकशी, धोतरा, हंसपादी, सूर्यफुल, चुका या सात औषधांच्या मुळ्या समभाग घेऊन बारीक वाटून त्याचा त्या फोडाला सात दिवसपर्यंत नित्य लेप करावा तेणें करून फोड बरे होऊन पांढरें कोड साध्य किंवा असाध्य असलें तरी दूर होतें यात संशय नाहीं. लेपाचा दुसरा प्रकार. गुंजा व चित्रक यांचे बारीक चूर्णकरून पाण्यांत कालवून अंगास लाविलें

असतां व मनशील आणि आघाड्याची राख ही दोन्ही पाण्यात खलून अंगाला लेप केला असतां पांढरें कोड दूर होतें.

## सर्वेश्वररस कुष्ठादिकांवर.

शुद्धंसूतंचतुर्गंधंपलंयाममंविचूर्णयेत् ॥२५॥ मृततास्राभ्रलोहानांदरदं च रलंपलम् ॥ सुवर्णरजतंचैवप्रत्येकंदशनिष्ककम् ॥ २६ ॥ माक्षिकं मृतयक्षंचतालंशुद्धंपलद्वयम् ॥ जंबीरोन्मत्तवासाभिःस्नुह्यर्कविषमुष्टिभिः ॥ २७ ॥ मर्दंहयारिजैर्द्रावैःप्रत्येकेनदिनंदिनम् ॥ एवंसप्तदिनंमर्द्यतद्गोलंवस्त्रवेष्टितम् ॥२८॥ वालुकायंत्रगंस्वेद्यंत्रिदिनंलघुवन्हिना ॥ आदायचुर्णयेत्श्लक्ष्णंपलैकंयोजयेद्विषम् ॥ २९ ॥ द्विपलंपिप्पलीचूर्णं मिश्रंसर्वेश्वरोरसः ॥ द्विगुंजोलिह्यतेक्षौद्रैःसुप्तिमंडलकुष्ठनुत् ॥३०॥ वाकुचीदेवकाष्ठंचकर्षमात्रंसुचुर्णयेत् ॥ लिहेदेरंडतैलाक्तमनुपानंसुखावहम् ॥ ३१ ॥

शुद्ध केलेला पारा चार पळें व गंधक एक पळ प्रमाण घेऊन दोहोंचा एकाजागीं एक प्रहर खल करावा नंतर ताम्रभस्म व अभ्रकभस्म व लोहभस्म व हिंगूळ हीं चार पळ पळ प्रमाण घेऊन, सुवर्णभस्म, रौप्यभस्म हीं दोन दहा दहा निष्कप्रमाण व हिराभस्म एक मासा व हरतळाचें सत्व दोन पळ प्रमाण हीं सारीं त्या पाऱ्यात व गंधकात मेळवून जंबीराचे रसात एक दिवसपर्यंत खलून धोतऱ्याचे रसात एक दिवस खल करावा. नंतर अडुळशाचा रस व निवडुंगाचा चीक व रुईचा चीक व कुचलाचा रस व कण्हेराचे मुळ्याचा रस या रसांत एकेक दिवस खल करावा याप्रमाणें सात दिवस खल करून त्याचा गोळा करून मग त्याचे भोवतें फडकें गुंडाळून त्याला वालुकायंत्रात घालून चुलीवर ठेवून तीन दिवस हलका अग्नि द्यावा. मग थंड झाल्यावर त्यातील रसायन काढून घ्यावें नंतर शोधलेल्या बचनागाचें चूर्ण एक पळप्रमाण व पिंपळीचें चूर्ण दोन पळें हीं दोन्ही त्या रसायनाला मेळवावीं याला सर्वेश्वररस असें म्हणतात. हा रस दोन गुंजा प्रमाण मधांत घ्यावा त्याजवर लागलेंच बावच्या व देवदार याचें चूर्ण एक कर्ष प्रमाण घेऊन एरंडेल तेलात मिळवून घ्यावें तेणेंकरून सुप्तिकुष्ट व मंडळकुष्ट हीं दूर होतात.

## स्वर्णक्षीरीरस सुप्तिकुष्ठावर.

हेमाव्हांपंचपलिकांक्षिप्त्वातक्रघटेपचेत् ॥ तक्रेजीर्णेसमाहृत्यपुनःक्षीरघटेपचेत् ॥ ३२ ॥क्षीरेजीर्णेसमुद्धृत्यक्षालयित्वाविशेषतः ॥ तच्चुर्णं पंचपलिकंमरिचाणांपलद्वयम् ॥ ३३ ॥ पलैकंमूर्छितंसूतंएकीकृत्यतुभक्षयेत् ॥ निष्कैकंसुप्तिकुष्टार्तःस्वर्णक्षीरीरसोन्ह्ययम् ॥ ३४ ॥

चोक पाच पळें घेऊन मडक्यात ताक घालून त्यात चोक टाकून कढवून ताक आटल्यावर त्यातून काढून फिरून त्याला दुधात घालुन कढवून दुध आटल्यावर बाहेर काढून धुवून घ्यावें मग त्याचें चूर्ण पाच पळें व मिऱ्याचें चूर्ण दोन पळें व पाऱ्याचें भस्म एक पळ प्रमाण घेऊन तिन्ही एका जागीं करावीं. याला स्वर्णक्षीरी रस असें म्हणतात. हा रस निष्क प्रमाण घेतला असता सुप्तिकुष्ठ दूर होतें.

## मेहवद्धरस परम्यावर.

भस्मसूतंमृतंकांतंमुंडभस्मशिलाजतु ॥ शुद्धंताप्यंशिलाव्योपंत्रिफलांशो लबीज कम् ॥ ३५ ॥ कपित्थरंजनीचूर्णंभृंगराजेनभावयेत् ॥ विंशद्वारंविशोष्याथमधुयु-क्तंलिहेत्सदा ॥ ३६ ॥ निष्कमात्रंहरेन्मेहान्मेहवद्धरसोमहान् ॥ महानिंबस्यबी-जानिपिष्टाषट्संमितानिच ॥ ३७ ॥ पलंतंदुलतोयेनघृतनिष्कद्वयेनच ॥ एकीकृत्य-पिबेच्चानुहंतिमेहंचिरंतनम् ॥ ३८ ॥

पाऱ्याचें भस्म, कांतलोहाचें भस्म, लोहभस्म, शुद्ध केलेला शिलाजित, स्वर्णमाक्षिकभस्म, मनशीळ, सुंठ, मिरें, पिंपळी, हिरडा, बेहडा, आवळकाठी, अंकोलबीज, कवठीचें फळ, हळद हीं पधरा ओषधें समभाग घेऊन भस्म खेरीज जीं ओषधें आहेत त्यांचें चूर्ण करून तीं भस्में व तें चूर्ण एका जागीं करून माक्याचे रसात खलून वाळवून फिरोन माक्याचे रसात खलून वाळवावें याप्रमाणे माक्याचे रसाची वीस पुटें द्यावीं याला मेहबद्ध रस असें म्हणतात हा रस निष्क प्रमाण मधात घेतला असता महान् परमे दूर होतात व बकाणा निंबाच्या बिया सहा आणून चूर्ण करून तांदुळाचें धूण एक पळ प्रमाण घेऊन त्यात तें चूर्ण व दोन निष्क प्रमाण तूप मेळवून त्यात हें मेहबद्धरसायन घालून घेतलें असता बहुत दिवसाचे परमे असले तरी तेही दूर होतात

## महावन्हिरस सर्वउदरांवर.

सूतुःसूतस्यगंधाष्टौरजनीत्रिफलाशिवा ॥ प्रत्येकंचाष्टिभागंस्यात्तन्निवृत्जेपालचि-त्रकम् ॥ ३९ ॥ प्रत्येकंचत्रिभागंस्यात्त्र्यूषणंदंतिजीरकम् ॥ प्रत्येकमष्टभागंस्यात्-एकीकृत्यविचूर्णयेत् ॥ ११४० ॥ जयतीस्नुकपयोभृंगावान्हिवातारितैलकः ॥ प्रत्ये केनक्रमात्भाव्यंसप्तवारंपृथकपृथक् ॥ ४१ ॥ महावन्हिरसोनामानिष्कमुष्णजलः पिबेत् ॥ विरेचनंभवेत्तेनतत्रभक्तंससैंधवम् ॥ ४२ ॥ दिनांतेदापयेत्पथ्यंवर्जयेच्छी-तलजलम् ॥ सर्वोदरहरःप्रोक्तोमूढवातहरःपरः ॥ ४३ ॥

पारा चार भाग व गंधक आठ भाग व हळद, हिरडा, बेहडा, आवळकाठी, हरीतकी हीं पाच ओषधें दोन दोन भाग व निशोत्तर, शोधलेले जेपाळ, चित्रक, हीं तीन ओषधें तीन तीन भाग व सुंठ, मिरें, पिंपळी, दातीचें मूळ, जिरें हीं पाच ओषधें आठ आठ घेऊन सा या ओषधांचें चूर्ण करून ल्हान ऐरणीचे रसात खलून वाळवून फिरून त्याच रसात खलून वाळवावें याप्रमाणें ऐरणीचे रसाचीं पुटें सात व माक्याचे रसाचीं सात व चित्रकाचे रसाचीं सात व एरंडेल तेलाची पुटें सात याप्रमाणें सात सात पुटें देऊन निष्क निष्क प्रमाण गोळ्या बांधून त्यांतील एक गोळी उष्ण पाण्याबरोबर द्यावी तणेकरून ढाळ होतात ते जाहल्यावर सायंकाळी पऱ्याला ताकभात खावा व मिठाचे ऐवजीं सैंधव व उष्ण पाणी प्यावें या रसायनाला महावन्हिरस असें म्हणतात या रसायनापासून ढाळ होऊन संपूर्ण उदररोग दूर होतात व मूढवातही दूर होतो.

नाने तुकड्यांत ध्यावा व त्याजवर लागलेच हिंग भाजून, सुंठ, मिरें, वेखंड, मिरें या पांच औषधांचें चूर्ण एक कर्ष प्रमाण उष्ण पाण्यांत घालून प्यावें तेणें करून जो अजीर्ण शूळ आहे तोही दूर होतो.

## अग्नितुंडीरस मंदाग्न्यादिकांवर.

शुद्धसूतंविषंगंधमजमोदाफलत्रयम्॥स्वर्जिक्षारयवक्षारंवह्निसैंधवजीरकम्॥५३॥ सौवर्चलविडंगानिसामुद्रं त्र्यूषणंसमम् ॥ विषमुष्टिसर्वतुल्यांजंबीराम्लेनमर्दयेत् ॥ ५४ ॥ मरिचाभावटींखादेत्सर्वाजीर्णप्रशांतये ॥

शुद्ध केलेला पारा, शुद्ध केलेला वचनाग, गंधक, अजमोदा, हिरडा, बेहडा, आंवळकटी, साजीखार, जवखार, चित्रक, जिरें, पादेलोण, वावडिंग, समुद्रमीठ, सुंठ, मिरें, पिंपळी हीं जठरा औषधें समभाग व कुचल्याचें बीज सार्‍या औषधाचे समभाग घेऊन सार्‍यांचें एकाजागीं चूर्ण करून जंबीराचे रसात खल करून मिऱ्याप्रमाणें गोळ्या बांधून त्यांतून एकेक गोळी ध्यावी तेणेंकरून सार्‍या प्रकारचीं अजीर्णे दूर होतात.

## अजीर्णकंटकरस.

शुद्धसूतंविषंगंधंसमंसर्वंविचूर्णयेत् ॥ मरिचंसर्वतुल्यांशंकंटकार्याफलद्रवैः ॥५५॥ मर्दयेद्भावयेत्सर्वमेकविंशतिवारकम् ॥ वटींगुंजात्रयंखादेत्सर्वाजीर्णप्रशांतये ॥ ५६ ॥ अजीर्णकंटकश्चायंरसोहंतिविषूचिकाम् ॥

शुद्ध केलेला पारा, शुद्ध केलेला वचनाग व गंधक हीं तीन औषधें समभाग व मिऱ्यें तिहींचें समभाग घेऊन सारीं खलांत घालून रिंगणीचे फळाच्या रसात खल करून वाळल्यानंतर फिरून त्याच रसात खल करून वाळवावें याप्रमाणें एकवीस पुटें रिंगणीचे फळाच्या रसाचीं देऊन तीन गुंजा प्रमाण गोळ्या बांधाव्या याला अजीर्णकंटक रस असें म्हणतात. या रसाची एकेक गोळी घेतली असता सार्‍या प्रकारचीं अजीर्णे व मोडशीही दूर होते.

## मंथानभैरवरस क्षयकासादिकांवर.

मृतंसूतंमृतंताम्रंहिंगुपुष्करमूलकम् ॥५७॥ सैंधवंगंधकंतालंकटुकींचूर्णयेत्समम् ॥ पुनर्नवादेवदालीनिर्गुंडीतंदुलीयकैः॥५८॥ तिक्तकोशातकीद्रावैर्दिनैकंमर्दयेद्दृढम् ॥ माषमात्रंलिहेत्क्षौद्रैःरसंमंथानभैरवम् ॥५९॥ कफरोगप्रशांत्यर्थंनिंबक्वाथंपिबेदनु ॥

पार्‍याचें भस्म, ताम्र भस्म, हिंग, पोखरमूळ, सैंधव, गंधक, हरताळ, कुटकी हीं आठ औषधें समभाग घेऊन भस्माशिवाय जीं औषधें आहेत त्यांचें चूर्ण करून तें चूर्ण व हीं भस्में एकाजागीं खलात घालून पुनर्नव्याचे रसात एक दिवस खल करावा नंतर देवडांगरी व निर्गुंडी व तांदुळजा व कडु दोडकी या एकेकाचे रसांत एकेक दिवस खल करून गोळ्या बांधाव्या याला मंथानभैरवरस असें म्हणतात. हा रस एक मासा प्रमाण मधांत घ्यावा त्याजवर लागलाच कडुलिंबाचे सालीचा काढा प्यावा. तेणेंकरून कफ दूर होतो.

## शूलनाशनरस.

सूतहाटकवज्राणिताम्रंलोहंचमाक्षिकम् ॥१६०॥ तालंनीलांजनंतुत्थमहिफेनंसमांशकम् पंचानांलवणानांचभागमेकंविमर्दयेत् ॥६१॥

वत्रीक्षीरैर्दिनं कुर्याद्ध्याधोभूधरेपचेत् ॥ माषैकमार्द्रकद्रावैर्लेहयेत्तुवात नाशनम् ॥ ६२ ॥ पिप्पलीमूलजंकाथंसकृष्णामनुपाययेत् ॥ सर्वा न्वातविकारांस्तुनिहंत्याक्षेपकादिकान् ॥ ६३ ॥

पाऱ्याचे भस्म, सुवर्णभस्म, हिराभस्म, ताम्रभस्म, लोहभस्म, स्वर्णमाक्षिकभस्म, हरताळ भस्म, शुद्ध केलेला सुरमा, मोरचूतभस्म, अफू हीं दहा औषधें समभाग व सैंधव व संचळ, बिडलोण, बागडखार, समुद्रमीठ या पांच क्षारामिळून एक भाग. म्हणजे तीं दहा औषधें एकेक तोळा आहेत तर पांच क्षारामिळोन एक तोळा घ्यावा याप्रमाण सारीं एकाजागीं करून निवडुगाचे चिकांत एक दिवस खलून मातीचे शरावसंपुटांत घालून वापडमाती करून भूधरयंत्रांत ठेऊन अग्नि द्यावा मग तें थंड जाहल्यावर बाहेर काढून त्यांतील औषध काढून घ्यावें याला वातनाशनरस असें म्हणतात. हा रस एक मासा प्रमाण आल्याच्या रसांत द्यावा व त्यावर लागलाच पिंपळमुळाचा काढा करून त्यांत पिंपळीचे चूर्ण घालून द्यावा. तेणेकरून संपूर्ण आक्षेपकादिक वायु दूर होतात.

कनकसुंदररस सन्निपातादिकावर

कनकस्याष्टशाणाःस्युःसूतोद्वादशभिर्मितः ॥ गंधोपिद्वादशप्रोक्तस्ताम्रं शाणद्वयोन्मितम् ॥६४॥ अभ्रकस्यचतु.शाणमाक्षिकंचद्विशाणिकम् ॥ वंगोद्विशाण.सौवीरंत्रिशाणंलोहमष्टकम् ॥ ६५ ॥ विषंत्रिशाणिकंतु यातलागलीपलसंमिता ॥ मर्दयेत्तुदिनमेकंचरसेरम्लफलोद्भवैः ॥ ६६ ॥ दद्यान्मृदुपुटेवन्हातत:सूक्ष्मंविचूर्णयेत् मापमात्रोरसोदेयःसन्निपाते सदारुणे ॥ ६७ ॥ आर्द्रकस्वरसेनैवरसोनस्यरसेनवा ॥ किलासंस कुष्ठानिविसर्पंचभगंदरम्॥६८॥ज्वरंगरमजीर्णंचजयेद्रोगहरोरसः ॥

धोतऱ्याचें बीज आठ शाण व पारा बारा शाण व गंधक बारा शाण व ताम्रभस्म दोन शाण व अभ्रकभस्म चार शाण व स्वर्णमाक्षिक भस्म दोन शाण व वंगभस्म दोन शाण व सुरमा शुद्ध करून तीन शाण व लोहभस्म आठ शाण व शुद्ध बचनाग तीन शाण व कळलावीच्या मुळ्या एक पळप्रमाण घेऊन सारीं बारीक करून खलांत घालून निंबूचे रसांत एक दिवसपर्यंत खलून मातीचे शरावसंपुटांत घालून कापडमाती करून रानगोंवऱ्याचा हलका अग्नि द्यावा थंड झाल्यावर बाहेर काढून बारीक करून ठेवावा याला कनकसुंदररस असें म्हणतात हा रस एक मासा प्रमाण आल्याचे रसांत अथवा लसुणाचे रसांत घालून द्यावा तेणेंकरून मोठा दुर्धर सन्निपात दूर होतो व किलासकुष्ठ व दुसरीं सारीं कुष्ठ, विसर्प, भगंदर ज्वर, विषदोष, अजीर्ण हे रोग दूर होतात

सन्निपातभैरवरस.

रसंगंधंत्रिवृत्कंपाकुर्यात्कज्जलिकांद्वयोः ॥ ६९ ॥ तारातामभ्रवंगा हिंसाराश्चकेककार्षिकाः ॥ शिग्रुज्वालामुखीशुंठीनिर्गुंडीभ्यस्तदुलीयका तु ॥ ११७० ॥ प्रत्येकंस्वरसेकुर्यायामंकंविमर्दयेत् ॥ कन्यांगो लंघृतंस्त्रिल्वणापूरितेन्यसेत ॥ ७१ ॥ काचभांडेतन्स्थाल्याकाचकूपीं

निवेशयेत् ॥ वालुकाभिःप्रपूर्याथवान्हियामद्वयंभवेत् ॥ ७२ ॥ ततउद्धृत्यतंगोलंचूर्णयित्वाविमिश्रयेत् ॥ प्रवालचूर्णकर्षणशाणमात्रविषेणच ॥७३॥ कृष्णसर्पस्यगरलैर्दिनंभावयेत्तथा ॥ नगरंसमुलीमांसीहेमाव्हावेतसःकणा ॥७४॥ नीलिनीपत्रकंचैलाचित्रकश्चकुठेरकः ॥ शतपुष्पादेवदालीधत्तूरागस्त्यमुंडिका ॥ ७५ ॥ मधूकजातिमदनरसैरेषांविमर्दयेत् ॥ प्रत्येकमेकवेलंचततःसंशोष्यधारयेत् ॥ ७६ ॥ बीजपूरार्द्रकद्रावैर्मरिचैःषोडशोन्मितैः ॥ रसोद्विगुंजाप्रमितःसन्निपातस्यदीयते ॥ ७७ ॥ प्रसिद्धोयंरसोनाम्नासन्निपातस्यभैरवः ॥

शुद्ध पारा तीन कर्ष व गंधक तीन कर्ष घेऊन दोहोंचा एकाजागीं खल करून कज्जली करावी. नंतर रुप्याचें भस्म व अभ्रकभस्म व ताम्रभस्म व वंगभस्म व नागभस्म व लोहभस्म हीं सहा भस्में एकेक कर्ष कर्ष प्रमाण घेऊन त्या पाऱ्यागंधकाचे कज्जलींत घालून मेळवावीं मग शेवग्याचे सालीचे रसांत खल एक प्रहर करावा. नंतर भारजावळीचे रसांत व सुंठीचे काढ्यांत व बेलफळाचे रसांत व तांदुळज्याचे रसात एकेकाचा वेगळा वेगळा खल एकेक प्रहर करून त्याचा गोळा करून त्यावे भोंवतें फडकें गुंडाळून तो गोळा काचेचे प्याल्यात ठेवून त्याजवर दुसरा प्याला उपटा घालून कापडमाती करून मातीचे मडक्यात मीठ अर्धे खालीं व अर्धे वरती मध्यें तो काचेचा संपुट ठेवून तें मडकें चुलीवर चढवून खालीं जाळ दोन प्रहरपर्यंत करावा मग तें थंड झाल्यावर बाहेर काढून त्या गोळ्याचें चूर्ण करून त्यांत पोंवळ्याचें चूर्ण एक कर्ष व शोधलेला बचनाग एक शाणप्रमाण घालून कृष्णसर्पाची गरळ आणून त्या रसायनांत घालून एक दिवसपर्यंत खल करून नंतर तें रसायन काचेचे कुपींत घालून कुपीला कापडमाती करून तोंडाला मातीची गुडदी बसवून ती कुपी वालुकायंत्रात घालून चुलीवर ठेवून दोन प्रहरपर्यंत फिरून अग्नि द्यावा. थंड झाल्यावर त्या कुपींतून औषध बाहेर काढून खलात घालून त्याला दुसरे औषधाचीं पुटें द्यावयाचीं तीं औषधें येणेंप्रमाणें—तगर, मुसळी, जटामासी, चोक, परळ, पिंपळी. नीलपुष्पी, तमालपत्र. विलायची, चित्रक, रानतुळस, नदीशोफ, देवडंगरी, धोत्रा, अगस्ता, मुंडी, मोहा, जाई, मेणफळ या एकुणीस औषधांचे आंगरस वेगळे वेगळे काढून त्यांतून प्रथम त्या रसायनात एका औषधाचा रस घालून खल करून वाळल्यावर दुसऱ्या औषधांचा रस घालून खल करावा या प्रमाणें बाकीच्या औषधांचा वेगळा वेगळा खल करावा. ज्या औषधांचा रस निघत नाहीं त्यांचा काढा करून त्या रसायनात घालून खल करून वाळल्यावर त्याच्या गोळ्या बांधून ठेवाव्या याला सन्निपातभैरवरस असें म्हणतात, हा रस दोन गुंजाप्रमाण महाळुंगीने फळाचा व आल्याचा रस हे दोन्हीं एकाजागीं करून त्यात सोळा मिऱ्याचें चूर्ण घालून ज्याला सन्निपात होतो त्याला द्यावा तेणेंकरून सन्निपात दूर होतो हा सन्निपातभैरवरस प्रसिद्ध आहे असें जाणावें,

## ग्रहणीकपाटरस ग्रहणीरोग.

तारमौक्तिकहेमानिसारश्चैकैकभागिकाः ॥ ७८ ॥ द्विभागोगंधकःसूत-

त्रिधागोमर्दयेदिमान् ॥ कपित्थस्वरसंगाढंमृगशृंगेततःक्षिपेत् ॥७९ ॥ पुटेन्मध्यपुटेनैवततउद्धृत्यमर्दयेत् ॥ बलारसैःसप्तवेलमपामार्गरसैस्त्रिधा ॥ ११८० ॥ लोध्रप्रातिविषामुस्तंधातकीद्रयवामृता ॥ प्रत्येकमेषां स्वरसैर्भावनास्यात्त्रिधात्रिधा ॥ ८१ ॥ माषमात्रोरसोदेयोमधुनाम-रिचैस्तथा ॥ हन्यात्सर्वानतीसारान्ग्रहणींसर्वजामपि ॥ ८२ ॥ कपाटोग्रहणीरोगेरसोयंवन्हिदीपनः ॥

रुप्याचें भस्म, मोती व सुवर्णभस्म, लोहभस्म हीं चार एकेक भाग व गंधक दोन भाग व शुद्ध पारा तीन भाग घेऊन सारी खलात घाऊन कवठाची फळाचे रसात खल करून त्याला हरिणाचे शिंगात दडपून भरून त्या शिंगाला कापडमाती करून रानगोंवऱ्याचा मध्यम अग्नि द्यावा. मग थंड जाहल्यावर तें बाहेर काढून खलात घालून चिकण्याचे रसाचीं पुटें सात द्यावीं. नंतर आघाडा व लोध, अतिविष, नागरमोथे, धायटीफूल, इंद्रजव, गुळवेल याचे वेगळे वेगळे आगरस काढून एकेकाचीं वेगळीं वेगळीं तीन तीन पुटें द्यावीं व ज्या औषधाचे आगरस निघत नाहीत त्याचे काढे करून त्या रसायनात घालून पुटें द्यावीं. नंतर वाळल्यावर त्याच्या मासा मासा गोळ्या बांधाव्या याला ग्रहणीकपाटरस असें म्हणतात. याची एकेक गोळी मिऱ्याचे चूर्णाबरोबर घ्यावी तेणेकरून सारे अतिसार व सारे संग्रहणीरोग दूर होतात व अग्नि प्रदीप्त होतो.

ग्रहणीवज्रकपाटरस संग्रहणीवर.

मृतसूताभ्रकंगंधंयवक्षारंसटंकणम् ॥ ८३ ॥ अग्निमंथंवचांकुर्यात्समुततु-ल्यानिमान्सुधी ॥ ततोजयंतीजंबीरभृंगद्रावैर्विमर्दयेत् ॥ ८४ ॥ त्रि-वासरंततोगोलंकृत्वासंशोष्यधारयेत् ॥ लोहपात्रेशरावंचदत्वोपरिविमु-द्रयेत् ॥ अधोवन्हिंशनैःकुर्यात्यामार्धंततउद्धरेत् ॥ रसतुल्यां-प्रतिविषांदद्यान्मोचरसंतथा ॥ ८६ ॥ कपित्थविजयाद्रावैर्भावयेत्सप्त-धाभिषक् ॥ धातकींद्रयवामुस्तालोध्रंबिल्वंगुडूचिका ॥ ८७ ॥ एतद्र-सैर्भावयित्वावेलैकैकंचशोषयेत् ॥ रसंवज्रकपाटाख्यंशाणेकंमधुनालिहे त् ॥ ८८ ॥ वन्हिशुंठीविडंबिल्वंलवणंचुर्णयेत्समम् ॥ पिबेदुष्णांबु नाचानुसर्वजांग्रहणींजयेत् ॥ ८९ ॥

पाऱ्याचें भस्म, अभ्रकभस्म, गंधक, जवखार, टाकणखार, ऐरणमाल, वेखंड हीं सात औषधें समभाग घेऊन ऐरणीचे रसात एक दिवस खल करावा नंतर जंबीराचे रसात एक दिवस व मक्याचे रसात एक दिवस याप्रमाण तिहींचे रसात तीन दिवस खलून त्याचा गोळा करून वाळल्यावर तो गोळा लोखंडाचे कढईत ठेवून त्याजवर मातीचा शराव उपडा घालून त्याचे सांधीला मातीची मुद्रा देऊन ती कढयी चुलीवर ठेऊन खालीं जाळ हलका हलका चार घटकापर्यंत करावा मग थंड झाल्यावर तो गोळा बाहेर काढून त्याचे समभाग अति-विषाचें चूर्ण व मोचरसाचें चूर्ण घेऊन तिन्ही खलात घालून कवठीच्या फळाच्या रसाचीं पुटें सात व भांगेचे रसाचीं पुटें सात द्यावीं. नंतर धायटीफूल व इंद्रजव व नागरमोथे, लोध,

बेलफळ, गुळवेल या औषधाचे वेगळे वेगळे रस काढून त्या रसायनाला एकेकाचें वेगळें वेगळें एकेक पुट देऊन वाळल्यावर त्याच्या शाण शाण प्रमाण गोळ्या बांधाव्या. याला ग्रहणीवज्रकपाटरस असें म्हणतात याची गोळी ज्याला संग्रहणीरोग झाले त्याला मधांने द्यावी, त्यावर लागलेंच चित्रक व सुंठ, विडलोण, कोंवळें बेलफळ व सैंधव या पांच औषधाचें चूर्ण करून ऊनपाण्यांत द्यावें तेणेंकरून सात्प्रकारची संग्रहणी दूर होते.

## मदनकामदेवरस वाजीकरणावर.

तारंवज्रंसुवर्णंचताम्रंसूतकगंधकम् ॥ लोहंक्रमविवृद्धानिकुर्यादेतानि मानया ॥ १९० ॥ विमर्द्यकन्यकाद्रावैर्न्यसेत्काचमयेघटे ॥ विष्णु न्यांमिठरीमध्येधारयेत्तसैंधवावृतः ॥ ९१ ॥ पिठरींमुद्रयेत्सम्यक्ततश्चु-ल्यांनिवेशयेत् ॥ वन्हिंशनैःशनैःकुर्यात्दिनैकंततउद्धरेत् ॥ ९२ ॥ स्वां गशीतंचसंचूर्ण्यभावयेदर्कदुग्धकैः ॥ अश्वगंधाककांकोलीवानरीमुसली क्षुरा ॥ ९३ ॥ त्रिविनेलंरसैरेषांशतावर्याश्चभावयेत् पञ्चवंदुकसे रूणांरसं काशस्यभावयेत् ॥ ९४ ॥ कस्तूरीच्योपकर्पूरंकंकोलैलालवं गकम् ॥ पुरचूर्णादष्टमांशमेतच्चूर्णंविमिश्रयेत् ॥ ९५ ॥ सर्वैःसमांशर्क- रांदत्वाशाणोन्मितंपिबेत् ॥ गोदुग्धद्विपलेनैवमधुराहारसेवकः ॥९६॥ अस्यप्रभावात्सौंदर्यंबलंभेत्रात्रसंशय ॥ तरुणीरमयेत्वन्हीः शुक्रहानिर्नजायते ॥ ९७ ॥

रुप्याचें भस्म एक भाग व हिरामस्म दोन भाग व सुवर्णभस्म तीन भाग व ताम्रभस्म चार भाग व शुद्ध पारा पाच भाग व गंधक सहा भाग व लोहभस्म सात भाग याप्रमाणें मार्गी औषध घेऊन खलांत घालून कोरफडाचे रसात खलून कांचेचे कुपींत घालून तिला कापडमाती करून कुपीचे तोंडाला मातीची गुडदी देऊन वाळल्यावर ती कुपी मडक्यात ठेवून कुपीचे गळ्यापर्यंत त्या मडक्यात सैंधव घालून कुपीची नळी मोकळी ठेवावी. नंतर मडक्याचे तोंडावर मातीचा पगळ उपडा घालून त्यांचे संधीला कापडमाती करून तें मडकें चुलीवर ठेवून खालीं जाळ हलका हलका एक दिवसपर्यंत करावा. मग थंड झाल्यावर त्या कुपींतून तें औषध बाहेर काढून खलांत घालून रुईचे चिकांनीं पुटें तीन द्यावीं. नंतर आसंध व कांकोलीचे अभावीं आसंध कचकीज, मुसळी, तालीमखाना, शतावरी कमळकंद कचोरा, कसई या नऊ औषधाचे वेगळे वेगळे रस काढून एकेकाचीं तीन तीन पुटें द्यावीं मग रसायन सिद्ध झालें असें जाणावें त्यांत चूर्ण मेळवावयाचीं औषधें कस्तुरी सुंठ, मिरें, पिंपळी, कापूर, कंकोळ, विलायची, लवंग या आठ औषधाचें चूर्ण रसायनाचे आठवा हिस्सा घेऊन त्यात मेळवून मग तें रसायन एक शाण प्रमाण घेऊन त्याचे समभाग साखर त्यात मेळवून दोन पळ प्रमाण गाईचें दूध घेऊन त्यात प्यावें. तेणेंकरून शरीर बहुत सुंदर, बळवंत व तेजस्वी होतें व त्या पुरुषानें बहुत तरुण स्त्रियांचा उपभोग केला असतां धातूचा क्षय होत नाहीं. या रसायनाला पथ्य आंबट वर्जकरून मधुर मधुर पदार्थ खावे

कंदर्पसुंदररस वाजीकरणावर.

सूतोवज्रमहिमुक्तातारहेमसिताभ्रकम् ॥ रसैःकर्पाशकानेतान्मर्दयेदिरिमेदजैः ॥९८॥ धात्रीचूर्णंगंधश्चद्विद्विकर्षौविमिश्रयेत् ॥ ततोश्वगंधास्वरसैर्विमर्द्यमृगशृंगके ॥९९॥ क्षिप्त्वामृदुपुटेपक्त्वाभावयेद्धातकीरसैः ॥ काकोलीमधुकंमांसीबलात्रयविशेंगुदम् ॥ १२०० ॥ द्राक्षापिप्पलिवंदाकवरीपर्णीचतुष्टयम् ॥ परूषकंकसेरुश्चमगुकवानरी तथा ॥ १ ॥ भावयित्वारसैरेषांशोषयित्वाविचूर्णयेत् ॥ एलात्वक्पत्रकवांशीलवंगागरुकेशरम् ॥ २ ॥ मुस्तंमृगमदःकृष्णाजलचंद्रश्चमिश्रयेत् ॥ एतच्चूर्णःशाणमितैरसंकंदर्पसुंदरम् ॥ ३ ॥ खादेच्छाणमितंरात्रौसिताधात्रीविदारिका ॥ एतेषांकर्षचूर्णेनसर्पिःकर्षसुसंपुतम् ॥ ४ ॥ तस्यास्तुद्विपलंक्षीरंपिबेत्सुस्थितमानसः ॥ रमयेद्रमयेद्बह्वीःशुक्रहानिर्नजायते ॥ ५ ॥

पारदभस्म, हिराभस्म, नागभस्म, मोती, रौप्यभस्म, सुवर्णभस्म, पांढऱ्या अभ्रकाचें भस्म हीं सात औषधें कर्ष कर्ष प्रमाण घेऊन सारीं खलांत घालून खैराचे सालीचे रसांत खलून नंतर आंवळ्यांचें चूर्ण व गंधक हीं दोन दोन कर्ष घेऊन त्या औषधांत मेळवून त्यांत आसंधाचा रस घालून खल करावा नंतर तें औषध हरिणाचे शृंगांत भरून त्याला कापडमाती करून रानगोवऱ्यांचा हलका अग्नि द्यावा. मग तें थंड झाल्यावर बाहेर काढून खलांत घालून त्या रसायनाला पुटें द्यावयाचीं तीं येणेंप्रमाणें. धायटीफूल, काकोलीचे आसंध, ज्येष्ठमध, जटामांसी, चिकणामूळ, लेंची, चक्रमेंद, कमळांचा देंट, हिंगणबेट, द्राक्ष, पिंपळी, बांदांगूळ, शतावरी, रानगांजा, रानमाल, रानमुंगी, रानउडदी, कचोरा, मोहा, कवचबीज या एकवीस औषधांचे वेगळे वेगळे रस काढून रसायनाला एकेकाचीं वेगळीं वेगळीं पुटें देऊन वाळवून त्याचें चूर्ण करावें यालो कंदर्पसुंदररस असें म्हणतात. याचे बरोबर चूर्ण करून घ्यावयाचीं औषधें तीं—विलायची, दालचिनी, तमालपत्र, वंशलोचन, लवंग, अगरु, केशर, नागरमोथे, कस्तुरी, पिंपळी, वाळा, कापूर या बारा औषधांचें चूर्ण एक शाण प्रमाण व हें रसायन एक शाण प्रमाण अशीं दोन्हीं एकाजागीं करून एक कर्ष प्रमाण तूप घालून त्यांत कालवून खडीसाखर, आंवळकाठी, विकारीकंद यांचें चूर्ण व साखर अशीं तिन्हीं एकेक कर्षप्रमाण घेऊन त्यांत मेळवून रात्रीस घ्यावें व त्याजवर लागलेच प्रसन्नचित्त करून दोन पळ प्रमाण दूध प्यावें तेणेंकरून पुरुषांनीं बहुत स्त्रिया भोगिल्या असतां धातूचा क्षय होत नाहीं.

लोहरसायन क्षयादिकांवर.

शुद्धरसंद्विभागैकंद्विभागःशुद्धगंधकम् ॥ क्षितेत्कज्जलिकांकुर्यात्ततस्तीक्ष्णभवंरजः ॥६॥ क्षिप्त्वाकज्जलिकातुल्यंमर्दयेत्कविमर्दतः ॥ तत्रकन्याद्रवंःखल्वेत्रिदिनंपरिमर्दयेत् ॥ ७ ॥ ततःसंजायतेतस्यस्तोष्णोधूमोद्रवोमहान् ॥ अत्यंतपिंडितंकृत्वाताम्रपात्रे निधायच ॥ ८ ॥ मध्येधान्यस्यराशेस्त्रिदिनंधारयेद्बुधः ॥ उद्धृत्यतस्मात्खल्वेचूर्णि

प्पाघर्मेनिधापच्च ॥ ९ ॥ रसैःकुठारछिन्नायास्त्रिवेलंपरिभावयेत् ॥ संशोष्यघर्मेक्काथै श्चभावयेत्रिकटोस्त्रिधा ॥१०॥ वासामृताचित्रकाणांरसैर्भाव्यंक्रमात्त्रिधा ॥ लोहपात्रे ततःक्षिप्त्वाभावयेत्त्रिफलाजलैः ॥ ११ ॥ निर्गुंडीदाडिमत्वग्भिर्बिसभृंगकुरंटकैः ॥ पलाशकदलीद्रावैर्बीजकस्यशृतेनवा ॥१२॥ नीलिकालंबुपाद्रावैर्बुब्बूलफलिकारसैः॥ त्रित्रिवेलंयथालाभंभावयेदेभिरौषधैः ॥ १३ ॥ ततःप्रातर्लिहेत्क्षौद्रघृताभ्यांकालमात्रकम् ॥ पलमात्रवरक्काथंपिबेदस्यानुपानकम् ॥१४॥ मासत्रयंशीलितंस्याद्वलीपलितनाशनम् ॥ मंदाग्निंश्वासकासौचपांडुतांकफमारुतौ ॥ १५ ॥ पिप्पलीमधुसंयुक्तं हन्यादेतन्नसंशयः ॥ वातास्रंमूत्रदोषाश्चग्रहणींतोयजांरुजम् ॥ १६ ॥ अंडवृद्धिंजपेदेतच्छिन्नासत्वमधुप्लुतम् ॥ बलवर्णकरंवृष्यमायुष्यंपरमंस्मृतम् ॥ १७ ॥ कूष्मांडं तिलतैलंचमाषान्नंराजिकांतथा॥ मद्यमम्लरसंचैवत्यजेत्लोहस्यसेवकः ॥ १८ ॥

शुद्ध केलेला रसेंद्र ( पारा ) एक भाग, शुद्ध गंधक दोन भाग यांची कज्जली करून तिचे समभाग तिख्याचें चूर्ण करून त्यांत घालून एक प्रहरपर्यंत खल करावा. मग कोरफडाचे रसांत तीन दिवस खल करावा म्हणजे त्यांतून कढत कढत असा धूर येऊं लागतो. नंतर त्याचा घट्ट गोळा करून तो तांब्याचे भांड्यांत ठेवून तोंड बंद करून तें भांडें साळीचे भातांत तीन दिवस पुरून ठेवावें. मग चौथे दिवशीं तो गोळा बाहेर काढून खलांत घालून उन्हांत ठेवावा; नंतर त्याला रानतुळशीचे रसाच्या भावना ( पुटें ) देऊन उन्हांत वाळवावा असें तीन वेळां करावें. यानंतर–सुंठ–मिरें व पिंपळी या तिहींचा काढा करून त्याच्या पण अशाच भावना द्याव्या. नंतर अडुळशाचे रसाच्या तीन, गुळवेलीचे रसाच्या तीन व चित्रकाचे रसाच्या तीन अशा नऊ भावना द्याव्या. मग तें रसायण लोखंडाचे पात्रांत ठेऊन त्रिफळ्या काढ्याचीं तीन पुटें, निर्गुंडी डाळिंबसाल, कमळाचा देठ, माका, पिंवळा कोऱ्हांटा, पळस, केळीचाकंद, चिवळा किंवा आस्ताणा, नीलपुष्पी, मुंडी, बाभळीच्या शेंगा या बारा औषधांतून मिळतील त्यांचे रसांचीं वेगळीं वेगळीं तीन- तीन पुटें द्यावीं. शुष्क औषधाचे काढ्याचीं पुटें द्यावीं. तेव्हां हें लोहरसायण सिद्ध झालें असें समजावें. हें रसायण प्रातःकाळीं एकत्र मधतुपांत कोलप्रमाण घेऊन त्याजवर लगेच त्रिफळेच काढा ४ तोळे घ्यावा. असें तीन महिने केलें असतां, वलीपलित ( आंगास कऱ्या पडून व केश पांढरे झाले असतात ते ) काळे होऊन वळट्या मोडतात. मध पिंपळी बरोबर घेतल्यानें अग्निमांद्य, दमा खोकला, पांडुरोग, कफवायु हे निःसंशय नाहींसे होतात. मध व गुळवेलीचें सत्व यांसह घेतलें असतां वातरक्त; मूत्रदोष, संग्रहणी, पाण्याचे सर्व विकार, अंडवृद्धी हे रोग दूर होतात. हें रसायण घेतल्यानें शरीरास बळकटी व कांति येते, काम वाढतो आणि आयुष्यवृद्धी होते. कोहळा, तिळांचें तेल उडदांचे पदार्थ, मोहऱ्या, मद्य, आंबट, पदार्थ हे याचें सेवन करणारानें खाऊं नयेत.

द्वितीयखंड समाप्त.

॥ श्री ॥

# ॥ अथ तृतीयखंड प्रारंभः ॥

19695

अथ स्नेहपानविधि.

श्रीगणेशाय नमः ॥ उत्तरखंडप्रारंभः ॥

स्नेहश्चतुर्विधःप्रोक्तोघृततैलवसातथा ॥ मज्जाचतंपिबेन्मर्त्यःकिंचिदभ्युदितेरवौ ॥ १ ॥

स्नेह चार प्रकारचे आहेत. ते तूप तेल, चरबी ( मांसस्नेह ) मज्जा ( हाडांचें तेल ) हे चार स्नेह य.त्किंचित् सूर्योदय जाहला न जाहला त्या वेळेस घ्यावे.

ते स्नेह दोन प्रकारचे

स्थावरंजंगमंचैवद्विधायोनिःस्नेहउच्यते ॥ तिलतैलंस्थावरेषुजंगमेषुघृतंवरम् ॥ २ ॥

स्थावर व जंगम या भेदेंकरून स्नेह दोन प्रकारचे, त्यांमध्यें स्थावर पदार्थांचे स्नेह अनेक आहेत, त्यांमध्यें तिळांचे तेल श्रेष्ठ आहे असें जाणावें, व जंगम पदार्थांचें तूप आदिकरून वसादिक स्नेह अनेक आहेत त्यांमध्यें तूप श्रेष्ठ आहे याप्रकारें स्नेहाचे दोन प्रकार जाणावे.

स्नेहाचे भेद.

द्वाभ्यांत्रिभिश्चतुर्भिस्तैर्यमकस्त्रिवृतोमहान् ॥

तूप व तेल, हीं दोन एकाजागीं जाहलीं असतां त्याला यमक असें ह्मणतात व तूप व तेल व मांसस्नेह हीं तीन एकाजागीं जाहलीं असतां त्याला त्रिवृत असें ह्मणतात, व तूप व तेल व मांसस्नेह व हाडांचें तेल हीं चार एकाजागीं जाहलीं असता त्याला महान् असें ह्मणतात. याप्रकारें स्नेहाचे तीन भेद जाणावे.

स्नेह घ्यावयाचा क्रम.

पिबेत्त्र्यहंचतुरहंपंचाहंषडहंतथा ॥ ३ ॥

तूप तीन दिवस घ्यावें; व तेल चार दिवस; व मांसस्नेह पांच दिवस; व हाडांचें तेल साहा दिवस घ्यावें; याप्रमाणें क्रमेंकरून घृतादि स्नेह घ्यावयाचा क्रम जाणावा.

स्नेह घ्यावयाचा क्रम

सप्तरात्रात्परंस्नेहःसात्मीभवतिसेविनः ॥

सातां दिवसांनंतर घृतादिक स्नेह घ्याले असतां आहारास रिखे होतात, त्यापासून गुण व अवगुण कांहीं एक होत नाहीं.

स्नेह आहारासारिखा केव्हां होतो तें

दोषकालाग्निवयसांवलंदृष्ट्वाप्रयोजयेत् ॥४॥ हीनांचमध्यमांज्येष्ठांमात्रांस्नेहस्यबुद्धिमान् ॥

वातादिक दोष काल, अग्नि, वय, यांचें बलाबल पाहून घृतादिक स्नेहाची पोटांत घ्यावयाची मात्रा हीन ह्मणजे अल्प व मध्यम व ज्येष्ठ यांतून शक्तितारतम्य पाहून योजावी.

स्नेहाच्या मात्रेचें प्रमाण सोडून स्नेह घेतला असतां दोष होतोसें

अमात्रयातयाकालेमिथ्याहारविहारतः ॥५॥ स्नेहःकरोतिशोफार्शस्तंद्रानिद्राविसंज्ञिताः ॥

19695

घृत दिक स्नेह प्यावयाचें प्रमाण सांगितलें आहे, त्यापेक्षा कमी अथवा अधिक प्यालें असता व प्यावयाचा काळ सोडून भलत्याच काळीं प्यालें असता व घृतादिक स्नेह पिऊन मिथ्याहार व मिथ्या विहार केले असता, त्या स्नेहापासून सूज व मूळव्याध हे रोग होतात, व डोळ्यावर झापड पडोन फार निद्रा येते आणि सज्ञेचा नाश होतो

दीप्ताग्नि, मध्यमाग्नि व अल्पाग्नि याचे ठायीं स्नेहाची मात्रा किती द्यावी तें प्रमाण

देयादीप्ताग्नयेमात्रास्नेहस्यपलसंमिता॥६॥मध्यमायत्रिकर्षास्याज्जघन्यायद्विकार्षिकी॥

ज्या मनुष्याचा अग्नि प्रदीप्त आहे, त्या मनुष्यास घृतादिक स्नेह एक पळप्रमाण प्यावयास द्यावा, व ज्याचा मध्यम अग्नि आहे त्या मनुष्यास तीन कर्षप्रमाण द्यावा, व ज्याचा मंद अग्नि आहे त्या मनुष्यास दोन कर्ष प्रमाण द्यावा

दुसऱ्या स्नेहाच्या तीन मात्रा आहेत त्या

अथवास्नेहमात्रास्युस्तिस्रोऽन्याःसर्वसंमताः ॥ ७ ॥अहोरात्रेणमहतीजीर्यंतयान्हितुमध्यमा ॥ जीर्यत्यल्पादिनार्धेनसाविज्ञेयासुखावहा ॥ ८ ॥

सान्या ऋषींस मान्य अशा दुसऱ्या घृतादिक स्नेह प्यावयाच्या मात्रा तीन प्रकारच्या आहेत त्या सांगतों, जी मात्रा आठ प्रहरांनीं पचन होते तिला महती ह्मणतात, ती एक पळ प्रमाण जाणावी, व जी मात्रा एका दिवसानें पचन होते तिला मध्यमा ह्मणतात, ती तीन कर्ष प्रमाण जाणावी, व जी मात्रा दोन प्रहरानीं पचन होते तिला अल्पा ह्मणतात; ती दोन कर्ष प्रमाण जाणावी व ही सुख देणारी जाणावी

अल्पादिकमात्राचे गुण

अल्पास्यादीपनीवृष्यास्वल्पदोषेपुपूजिता ॥ मध्यमास्नेहनीज्ञेयाबृंहणीभ्रमहारिणी ॥९॥ ज्येष्ठाकुष्ठविषोन्मादग्रहापस्मारनाशिनी ॥

घृतादिक स्नेह प्यावयाची जी दोन कर्ष प्रमाणाची अल्प मात्रा आहे, ती जठराग्नि प्रदीप्त करून स्त्रीसंगाविषयीं इच्छा देते; व वातादिक दोषाचा अल्प प्रकोप दूर करिते, व तीन कर्ष प्रमाणाची जी मध्यम मात्रा आहे ती शरीराला पुष्ट करून धातूची वृद्धि करिते व भ्रम दूर करिते, व पळ प्रमाणाची जी ज्येष्ठ मात्रा आहे ती कुष्ठरोग व विषदोष व उन्माद व भूतादिग्रह व अपस्मार हे रोग दूर करिते.

दोषाचे ठायीं अनुपान विशेष

केवलपैत्तिकेसर्पिर्वातिकेलवणान्वितम् ॥ १० ॥ देयंबहुकफेवापिव्योषक्षारसमन्वितम्॥

पित्ताचा कोप असता नुस्तें तूप प्यावयास द्यावें व वायूचा कोप असता तुपात सैंधव मेळवून द्यावें व कफाचा फार कोप असता व्योष व जवखार याचें चूर्ण करून तुपात मेळवून तें तूप द्यावें

ज्याना तूप द्यावयाचें तें

रुक्षक्षतविषार्तानांवातपित्तविकारिणाम्॥११॥ हीनमेधास्मृतीनांचसर्पिःपानप्रशस्यते ॥

रुक्ष व उरक्षतरोग व विषदोष इहींकरून पीडित आहे शरीर ज्याचें, अशा मनुष्यास

व ज्या मनुष्यांस वातपित्ताचा विकार आहे त्यांस, व हीन आहे धारणरूपा व स्मरणरूपा बुद्धि ज्यांची, इतक्या मनुष्यांस तुपाचें पान प्रशस्त आहे.

जे तेल प्यावयास योग्य ते रोगी.

क्रमिकोष्ठानिलाविष्टाःप्रवृद्धकफमेदसः ॥१२॥ पिबेयुस्तैलसात्म्याश्चतैलंदीप्ताग्नयस्तुये॥

जंतविकार आहे पोटामध्यें ज्यांच्या, व वायूकरून व्याप्त आहे शरीर ज्यांचें, व प्रवृद्ध झाहला आहे कफ व मेद ज्यांचा अशा मनुष्यांनीं तेल प्यावें व ज्यांच्या प्रकृतीला तेल भावतें, त्यांणीं व प्रदीप्त आहे अग्नि ज्यांचा त्या मनुष्यांनीं प्यावें.

जे मांसस्नेह प्यावयास योग्य ते.

व्यायामकर्षिताःशुष्करेतोरक्तामहारुजः ॥१३॥ महाग्निमारुतप्राणावसायोग्यानराःस्मृताः ॥

मल्लादि युद्ध व धनुरादिकांचें आकर्षण इहींकरून पीडित आहे शरीर ज्यांचें व क्षीण आहे धातु व रक्त ज्यांचें, व शरीराचे ठायीं मोठ्या आहेत वेदना ज्यांच्या, व अग्नि व वायू हे आहेत प्रबळ ज्यांना अशा प्रकारचे मनुष्य मांसाचा स्नेह प्यावयास योग्य आहेत असें जाणावें.

हाडांचें तेल प्यावयास योग्य ते.

क्रूराशयाःक्लेशसहावातार्तादीप्तवन्हयः ॥ १४ ॥ मज्जानंचपिबेयुस्तेसर्पिर्वासर्वतोहितम् ॥

दुष्ट आहे कोष्ठ ज्यांचा व दुःख सहन करणारे मनुष्य, व जे मनुष्य वायूनें पीडित आहेत ते, व प्रदीप्त आहे अग्नि ज्यांचा, अशा मनुष्यांनीं हाडांचें तेल प्यावें, अथवा तूप प्यावें, तेणेंकरून शरीरास हित होतें.

स्नेह केव्हां प्यावा ते.

शीतकालेदिवास्नेहमुष्णकालेपिबेन्निशि॥१५॥वातपित्ताधिकेरात्रौवातश्लेष्मादिकेदिवा॥

शीत कालाचे ठायीं घृतादिक स्नेह दिवसास प्यावे, व उष्ण कालाचे ठायीं वातपित्त प्रबळ असतां रात्रीस प्यावे; व कफवायू प्रबळ असतां दिवसास प्यावे, याप्रमाणें स्नेह प्यावयाचा क्रम जाणावा.

स्नेहाची स्थलविशेषीं योजना.

नस्याभ्यंजनगंडूषमूर्धकर्णाक्षितर्पणे ॥ १६ ॥ तैलंघृतंवायुंजीतदृष्ट्वादोषबलाबलं ॥

नाकांत घालण्याविषयीं व अंगास मर्दन करण्याविषयीं व चुळा टाकण्याविषयीं व मस्तक व कर्ण व डोळ्यांचे तृप्तीविषयीं वातादिक दोषांचें बलाबल पाहून तेल अथवा तूप यांची योजना करावी.

स्नेहाचीं वेगळीं वेगळीं अनुपानें.

घृतेकोष्णजलंपेयंतैलेयूषःप्रशस्यते ॥१७॥ वसामज्जयोःपिबेन्मंडमनुपानंसुखावहम् ॥

तूप पिऊन त्याजवर कोमट पाणी प्यावें; व तेल पिऊन त्याजवर यूष प्यावा; व मांस स्नेह व हाडांचें तेल पिऊन त्याजवर मंड प्यावा; तेणेंकरून सुखावह होतें. याप्रमाणें अनुपानें जाणावीं.

भाताबरोबर स्नेह द्यावयाचा तो.

स्नेहद्विषःशिशून्वृद्धान्सुकुमारान्कृशानपि ॥१८॥ तृष्णातुरानुष्णकालेसहभक्तेनपाययेत् ॥

घृतादिक स्नेहाचा द्वेष आहे ज्यांस, व बाल व वृद्ध व नाजुक मनुष्य तृषेनें पीडित अशा मनुष्यांस उष्ण काळाचे ठायीं भाताबरोबर घृतादिक स्नेह द्यावे.

स्नेहायांचून यवागूपासून सद्यस्नेहन होतें तें.

सर्पिष्मतीबहुतिलायवागूःस्वल्पतंदुला ॥१९॥ सुखोष्णासेव्यमानातुसद्यःस्नेहनकारिणी॥

तीळ कुटून त्याची कोंद करून त्यांत थोडके तांदूळ मेळवून तूंप व पाणी त्यांत घालून चुलीवर कढवून पातळ लापशी करावी, तिला यवागू असें ह्मणतात. ती यवागू कोमट कोमट घेतली असतां त्याच वेळेस शरीराचे ठायीं धातु उत्पन्न होते असें जाणावें.

धारोष्ण दुधापासून तत्काल धातू उत्पन्न होते तें.

शर्कराचूर्णसंभृष्टेदोहनस्थेघृतेतुगाम् ॥२० ॥ दुग्ध्वाक्षीरंपिबेदुष्णंसद्यःस्नेहनमुच्यते ॥

खडीसाखरेचें चूर्ण तुपांत घालून तें तूप चुलीवर थोडें गरम करून दूध काढावयाचे भांड्यांत घालावें; मग त्या भांड्यांत गाईचें दूध काढून त्याच वेळेस गरम गरम आहे तोंच प्यावें तेणेंकरून त्याच वेळेस शरीराचे ठायीं धातु उत्पन्न होते.

मिथ्याचारेंकरून स्नेह जिरला नाहीं त्याचा प्रतीकार.

मिथ्याचाराद्बहुत्वाद्वायस्यस्नेहोनजीर्यति ॥२१॥ विष्टभ्यवापिजीर्येतवारिणोष्णेनवामयेत् ॥

घृतादिक स्नेह पिऊन त्याजवर व्यायामादिक परिश्रम जाहले असतां, व कफकारक पदार्थ खाण्यांत आले असतां तेणेंकरून ते स्नेह जिरले नाहींत अथवा फार पिण्यांत आले यास्तव जिरले नाहींत, अथवा मळाचा अवरोध करून जिरले अशा मनुष्याला उष्ण पाणी देऊन ओकवावें तेणेंकरून अजीर्णाचा दोष दूर होतो.

दुसरा स्नेहाचे अजीर्णाचा प्रतीकार.

स्नेहस्याजीर्णशंकायांपिबेदुष्णोदकंनरः ॥२२॥ ततोद्गारोभवेच्छुद्धोभक्तंप्रतिरुचिस्तथा ॥

घृतादिक स्नेह पिऊन अजीर्ण जाहलें अशी शंका प्राप्त जाहली असतां, त्याजवर उष्ण पाणी प्यावें, तेणेंकरून शुद्ध चांगला ढेंकर येऊन अन्नावर इच्छा गेली असतां अजीर्ण दूर जाहलें असें जाणावें.

स्नेहेंकरून पित्ताचा कोप होऊन तहान वाढली असतां उपाव.

स्नेहात्पैत्तिकस्याग्निर्यदातीक्ष्णतरीकृतः ॥ २३ ॥ तदास्योदीरयेत्तृष्णांविषमांतस्पपा-
ययेत् ॥ शीतंजलंवामयेचपिपासातेनशाम्यति ॥ २४ ॥

ज्या मनुष्याची आधींच पित्ताची प्रकृति त्यांत तो मनुष्य घृतादिक स्नेह प्याला तेणेंकरून त्या मनुष्याचा अग्नि फार तीक्ष्ण होऊन त्यापासून तहान फार वाढली असतां तिचे शमनार्थ मनुष्यास थंड पाणी द्यावें, व ओकारी करवावी, तेणेंकरून तहान दूर होते.

जे स्नेह प्यावयास योग्य नाहींत ते.

अजीर्णीवर्जयेत्स्नेहंउदरीतरुणज्वरी ॥ दुर्बलोरोचकीस्थूलोमूर्छार्तोमदपीडित.॥२५॥
दत्तवस्तिर्विरिक्तश्चवांतितृष्णासमन्वितः ॥अकालप्रसवानारीदुर्दिनेचविवर्जयेत्॥२६॥

अजीर्णाचा विकार, व उदररोग हे आहेत ज्यांस ते, व तरुणज्वरी, व दुर्बळ मनुष्य, व आवढणें आहे ज्यास तो, व ज्याचें शरीर मोठें आहे तो, व मूर्छा व मद इहींकरून पीडित व बस्तिकर्म केलेला मनुष्य, व ज्याला ढाळ होतात तो, व ओकारी व तहान, इहींकरून, युक्त, व बाळंत होण्याचा काळ सोडून भलत्याच काळीं बाळंत जाहलेली स्त्री, इतक्या रोग्यांस घृतादिक स्नेहपान करवूं नये व ज्या दिवशीं अमाल देतें त्या दिवशीं देऊं नये.

जे स्नेह प्यावयास योग्य ते.

स्वेद्यसंशोध्यमद्यस्त्रीव्यायामासक्तचिंतकाः ॥ वृद्धाबालाःकृशारुक्षाःक्षीणास्राःक्षीणरेतसः ॥ २७॥ वातार्ततिमिरार्तायेतेपांस्नेहनमुत्तमम् ॥

औषधादिकेंकरून ज्यांचे आंगाचा घाम काढिला आहे असे मनुष्य व रेचक औषधेंकरून शोधन केलेले मनुष्य, व मद्य पिणारे, व स्त्री, व परिश्रम जाहलेले, व चिंतेकरून व्याप्त, व वृद्ध, व बाळ व, कृश, व रुक्ष, व क्षीण आहे रक्त ज्यांचें असे मनुष्य व धातुक्षीण मनुष्य, व वायूकरून पीडित, व तिमिर रोगानीं व्याप्त अशा प्रकारचे मनुष्य घृतादिक स्नेह प्यावयास योग्य आहेत असें जाणावें.

स्नेह पिऊन चांगला स्निग्ध जाहला त्याचें लक्षण.

वातानुलोम्यंदीप्तोग्निर्वर्चःस्निग्धमसंहतम् ॥ २८ ॥ मृदुस्निग्धांगताग्लानिःस्नेहोद्वेगोथलाघवम् ॥ विमलेंद्रियतासम्यक्स्निग्धेरूक्षेविपर्ययः ॥ २९ ॥

घृतादिक स्नेह पिऊन अंगाचा रुक्षपणा जाऊन मनुष्य चांगला स्निग्ध जाहला असतां त्याची लक्षणें, वायु शरीरांत चांगला वर्ततो, व अग्नि प्रदीप्त होतो, व मळ सचिक्कण असोन मोकळा होतो. व शरीर मृदु असोन सचिक्कण होतें. व ग्लानिरहित होतें व घृतादिक स्नेहाचें सेवन केलें असतां त्याचे उपद्रव होत नाहींत. व शरीर हलकें होतें. व इंद्रियें निर्मळ होतात याप्रमाणें लक्षणें जाणावीं, व रुक्ष मनुष्य जो त्याची या लक्षणांहून विपरीत लक्षणें जाणावीं; तात्पर्य शरीराचे ठायीं घृताचें यथार्थ स्नेहन झालें नसतां जो रुक्ष ह्मणजे भस्मरोगी त्यास विपरीत लक्षणें जाणावीं.

स्नेहपान फार केलें त्याचे उपद्रव.

भक्तद्वेषोमुखस्रावोगुदेदाहःप्रवाहिका ॥ तंद्रातिसारःपांडुत्वंभृशंस्निग्धस्यलक्षणम् ॥३०॥

जो मनुष्य घृतादिक स्नेह फार प्याला त्याचीं लक्षणें. अन्नाचा कंटाळा करितो, व तोंडावाटें लाळ पडते, व गुदाचे ठायीं दाह होतो, व मळाचे भसे हगतो, व डोळ्यांवर झांपड पडते, व अतिसार होतो. शरीर पांढरें होतें, याप्रमाणें लक्षणें जाणावीं.

रुक्षाला स्निग्ध करणें स्निग्धाला रुक्ष करणें त्याचा प्रतिकार.

रुक्षस्यस्नेहनंस्नेहैरतिस्निग्धस्यरूक्षणम् ॥ श्यामाकचणकाद्यैश्चतक्रपिण्याकसक्तुभिः ॥ ३१ ॥

रुक्ष मनुष्य जो त्यास स्निग्ध पदार्थ जे, लोणी काढिल्या वेगळें ताकाचा मठ्ठा, व तिळांचा कल्क व जवांचें सत्व इहींकरून स्निग्ध करावा व स्निग्ध मनुष्य जो त्यास रुक्ष पदार्थ जे सांवा धान्य व चणे इत्यादिकेंकरून रुक्ष करावा.

स्नेहाचें सेवन केलें असतां प्रकृति कशी होते ती.

दीप्ताग्निःशुद्धकोष्ठश्चपुष्टधातुर्जितेंद्रियः ॥ निर्जरोबलवर्णाढ्यःस्नेहसेवीभवेन्नरः ॥३२॥

*घृतादिक स्नेहाचें सेवन करणारा मनुष्य जो त्याचीं लक्षणें. अग्नि प्रदीप्त होतो व* कोष्ठ शुद्ध असतो व शरीरांत रसादिक धातु पुष्ट होतात, व तो मनुष्य जितेंद्रिय असतो, व जरारहित असतो, व बळ, व कांति इहींकरून युक्त असतो, याप्रमाणें लक्षणें जाणावीं.

स्नेहपानाचे ठायीं वर्ज पदार्थ.

स्नेहेव्यायामसंशीतवावातप्रजागरान् ॥ दिवास्वप्नमभिष्यंदिरुक्षान्नंचविवर्जयेत् ॥ ३३ ॥

स्नेह पिणारा जो मनुष्य, त्यानें परिश्रम करूं नये, व अति शीत पदार्थ; व मळमूत्रादिकांचें संधारण, व जागरण दिवसास नीज व कफकारक पदार्थ, व रुक्षान्न इतके पदार्थ वर्ज करावे.

इतिश्री दामोदरसूनु शार्ङ्गधरेण विरचितायां चिकित्सास्थाने उत्तरखंडस्य प्रथमोऽध्यायः ।

---

# द्वितीयोध्यायः ।

स्नेहापानानंतर घाम काढावयाचा विधि. प्रथम त्याचे भेद.

स्वेदश्चतुर्विधःप्रोक्तस्तापोष्मौस्वेदसंज्ञितौ ॥ उपनाहोद्रवःस्वेदःसर्वेवातार्तिहारिणः ॥ ३४ ॥

चार प्रकारचे घाम आहेत त्यांचीं नामें—ताप १ उष्ण २ उपनाह ३ द्रव ४ हे चार प्रकारचे घाम वायूची पीडा दूर करणारे आहेत, असें जाणावे.

स्नेहपानानंतर घाम काढावयाचा विधि प्रथम त्याचे भेद.

स्वेदौतापोष्मजौप्रायःश्लेष्मघ्नौसमुदीरितौ ॥ उपनाहस्तुवातघ्नःपित्तसंगेद्रवोमतः ॥ ३५ ॥

ताप या नामें करून जो घाम आहे तो व उष्म या नामेंकरून जो घाम आहे तो हे दोन्ही घाम बहुतकरून कफाचा नाश करणारे आहेत, व उपनाह या नामेंकरून जो घाम आहे तो वायूचा नाश करणारा आहे, व द्रव या नामेंकरून जो घाम आहे तो पित्तवायूचा नाश करणारा आहे असें जाणावें.

वायूचे तारतम्यें करून अधिक, न्यून, मध्यम याची योजना.

महाबलेमहाव्याधौशीतेस्वेदोमहान्स्मृतः ॥ दुर्बलेदुर्बलःस्वेदोमध्यमेमध्यतमोमतः ॥३६॥

ज्याचे शरीरांत मोठा बळकट वायूचा रोग आहे त्याचे अंगांतून फार घाम काढावा व हलका रोग आहे त्याचे आंगांतून थोडा घाम काढावा व मध्यम रोग आहे त्याचे अंगांतून मध्यम घाम काढावा.

रोगविशेषेंकरून घामाचा विशेष.

बलासेरुक्षणःस्वेदोरुक्षस्निग्धःकफानिले ॥ कफमेदावृतेवातेस्नेहणगेहस्वेदःकरान् ॥३७॥ नियुद्धमार्गगमनंगुरुप्रावरणंभयम् ॥ चिंताव्यायामभारांश्चसेवेतामयमुक्तये॥३८॥

कफाचा रोग असतां रुक्ष पदार्थ जे वाळुकादि इहींकरून अंगाचा घाम काढावा व कफवायूचा रोग असतां स्निग्ध व रुक्ष या दोहीं पदार्थेंकरून घाम काढावा व कफमे-

दोषयुक्त वायूचा रोग असतां घरांत ज्या जाग्यांत गर्मी असेल त्या जाग्यांत बसून अंगाला सहन होई अशी थोडी थोडी गर्मी घ्यावी व सूर्याचे किरण अंगावर घ्यावे व कुस्ती करावी व कांहीं थोडा मार्ग चालावा व कांबळें व धाबळ इत्यादिक पांघरावीं व कांहींएक चिंतन करावें, उगेंच बसूं नये व परिश्रम करावा व कांहींएक अंगावर भार घ्यावा. इतके उपाय घाम निघण्याविषयीं करावे. तेणेंकरून कफमेदोयुक्त जो वायूचा रोग आहे तो दूर होतो.

उयांचा पूर्वी घाम काढावयाचा ते.

येषांनस्यंविधातव्यंबस्तिश्चापिहिदेहिनाम् ॥ शोधनीयाश्चयेकेचित्पूर्वंस्वेद्याश्चतेमताः ॥३९॥

नस्यकर्माविषयीं जे योग्य ते, बस्तिकर्माविषयीं जे योग्य ते व ढाळक देण्याविषयीं जे योग्य ते इतक्या मनुष्यांचे अंगाचा पहिल्यानें घाम काढून नंतर नस्यादिक उपाय करावे.

स्वेद्याःपूर्वंव्रणोपीहभगंदर्यर्शसीतथा ॥ अश्मर्याचातुरोजंतुःशमयेच्छस्त्रकर्मणा ॥४० ॥

ज्या मनुष्याला भगंदर रोग आहे तो व मूळव्याध आहे तो व अश्मरी रोगेंकरून पीडित आहे तो अशा तीन प्रकारचे रोग्याचे अंगाचा पहिल्यानें घाम काढून नंतर शस्त्रकर्मेंकरून हे रोग शमवावे.

ज्यांचा उत्तर घाम काढावयाचा ते.

पश्चात्स्वेद्यागतेशल्येमूढगर्भेगदेतथा ॥ कालेप्रजाताकालेवापश्चात्स्वेद्यानितंबिनी ॥४१॥

ज्या स्त्रीचे पोटांत गर्भाचें सल असतें त्याचें पतन जाहलें असतां व नऊ महिन्यांनंतर अथवा नऊ महिन्यांचे आलीकडे बाळंत जाहली असतां तिचे अंगाचा घाम काढावा.

घाम काढावयाचा देश काल.

सर्वान्स्वेदान्निवातेचजीर्णाहारेचकारयेत् ॥

हे चोहों प्रकारचे घाम मनुष्याचे आहाराचें पचन झाल्यानंतर ज्या जाग्यांत वायूचा लेश नसेल त्या जाग्यांत काढावे.

घाम काढल्यावर कोणत्या मार्गानें दोष दूर होतात.

स्वेदाद्धातुस्थितादोषाःस्वेदःस्निग्धस्यदेहिनः ॥ ४२ ॥ द्रवत्वंप्राप्यकोष्ठांतर्गतायांतिविरेकताम् ॥

औषधादिकेंकरून मनुष्याचे अंगाचा घाम काढला असतां त्या मनुष्याचे व मोठ्या भांड्यांत तेल घालून त्यांत मनुष्य बसविला असतां त्याचे वातादिक दोष रसादि सत धातूंचे ठायीं राहात होत्साता कोष्ठामध्यें गेले असता ते दोष पातळ होऊन गुदावाटे ढाळ होऊन पडतात.

अंगाचा घाम काढल्यावर ढाळ आहले असतां त्याची चिकित्सा.

विध्मानशरीरस्यहृदयंशीतलैःस्पृशेत् ॥४३॥ स्नेहाभ्यक्तशरीरस्यशीतैराच्छायचक्षुषी ॥

मनुष्याचे अंगाचा घाम काढिला असतां त्या योगानें त्याचे पोटांतील दोष पातळ होऊन गुदावाटे ढाळ होऊन पडले असतां त्याचे छातीला चंदनाचा लेप करावा तेणेंकरून प्रकृति स्वच्छ होते व जो मनुष्य तेलांत बसविला त्यायोगानें त्याचे दोष पातळ

होऊन गुदावाटे ढाळ होऊन पडले असतां त्याचे डोळ्यांवर कमळाचीं पानें अथवा केळीचीं पानें थंडाईकरितां ठेवावीं. त्या थंडाईकरून ग्लानी दूर होऊन प्रकृति स्वस्थ होते.

जे घाम काढण्याविषयीं योग्य नाहींत ते.

अजीर्णीदुर्बलोमेहीक्षतक्षीणीपिपासितः ॥४४॥ अतिसारीरक्तपित्तीपांडुरोगितथोदरी ॥ मदार्तोगर्भिणीचैवनहिस्वेद्याविजानता ॥ ४५ ॥ एतानपिमृदुस्वेदैःस्वेदसाध्यानुपाचरेत् ॥

ज्या मनुष्याला अजीर्ण आहे तो व दुर्बळ मनुष्य व ज्याला परमा आहे तो व उरःक्षतेंकरून पीडित व ज्याला फार तहान आहे तो व अतिसार व रक्तपित्त व पांडुरोग उदररोग व मदरोग हे रोग ज्या मनुष्यास आहेत ते व गर्भिणी स्त्री हे इतके रोगी घाम काढण्याविषयीं योग्य नाहींत; यांचे अंगाचा घाम काढूं नये. जर हे रोगी घाम काढून साध्य होत असले तर हलक्या उपायेंकरून थोडा घाम काढावा.

अल्प घाम काढावयाचीं स्थळें.

मृदुस्वेदंप्रयुंजीततथाहृन्मुष्कदृष्टिषु ॥ ४६ ॥

हृदय व अंड व नेत्र यांचा घाम काढणें तो हलका काढावा.

घाम फार निघाला असतां त्याचे उपद्रव.

अतिस्वेदात्संधिपीडादाहतृष्णाक्लमोभ्रमः॥ पित्तास्रक्पिटिकाकोपस्तत्रशीतैरुपाचरेत्॥४७॥

अंगांतून फार घाम निघाला असतां सर्व संधींना पीडा व तृष्णा व ग्लानि व भ्रम व रक्तपित्त हे उपद्रव होतात व अंगावर पुटकुळ्या उत्पन्न होतात, याचे शमनाविषयीं शीतळ उपाय करावे; तेणेंकरून उपद्रव दूर होतात.

चार प्रकारचे घाम त्यामध्यें तापनामक जो घाम त्याचें लक्षण.

तेषुतापाभिधःस्वेदोवालुकावस्त्रपाणिभिः ॥ कपालकंदुकांगारैर्यथायोग्यंप्रजायते ॥४८॥

चार प्रकारचे घाम आहेत त्यांमध्यें ताप या नामेंकरून जो घाम आहे तो वाळू १ वस्त्र २ हात ३ खापर ४, चिरगुटांचा गेंद ५ व निखारे ६ इहींकरून वाळुकादिकांमधून ज्यामध्यें जशी जशी शक्ति आहे तसा तसा उत्पन्न होतो. हे सहा प्रकार सांगितले यांची क्रिया कशी करावी ती सांगतों. गौऱ्याचे अथवा कणगर लांकडाचे धूमरहित व जळजळीत असे निखारे करून त्याजवर वाळू तापवून ती वाळू मुर्डी एरंडाचे पानांत घालून त्या पानांची पुरचुंडी करून त्या पुरचुंडीनें मनुष्याचें अंग शेकावें. तेणेंकरून अंगाचा घाम निघतो. हा एक प्रकार व निखाऱ्यावर आपले हात ऊन करून रोग्याचें अंग हातानें शेकावें. व चिरगुटाचा गेंद करून निखाऱ्याजवळ धरून ऊन करून त्या गेंदानें रोग्याचें अंग शेकावें जुनें फडकें निखाऱ्याजवळ धरून ऊन करून त्या फडक्यानें अंग शेकावें. व निखारे घागरींत घालून ते घागर रोग्याचे अंगास शेक लागे असें ठेवावें या इतक्या उपायेंकरून घाम काढावा.

उष्मसंज्ञक, जो घाम त्याचें लक्षण.

उष्मास्वेदःप्रोक्तःगोलोहपिंडेष्टिकादिभिः ॥ प्रतप्तैरम्लसिक्तैश्चकायेरल्लकवेष्टिते ॥ ४९ ॥ अथवावातनिर्नाशीद्रव्यक्काथरसादिभिः ॥ उष्णैर्घटंपूरयित्वापार्श्वेछिद्रं निधायच ॥ ५० ॥ विमुच्यास्यंनिरुंध्यांचधातुजांकाष्ठवंशजाम् ॥ षडंगुलास्यांगोपुच्छांनलींयुज्यात्द्विहस्तिकाम् ॥ ५१ ॥ सुखोपविष्टंस्वभ्यक्तंगुरुप्रावरणावृतम् ॥ हस्तिशुंडिकयानाड्यास्वेदयेद्वातरोगिणम् ॥ ५२ ॥ पुरुषायाममात्रांवाभूमिमुत्कीर्यखादिरैः ॥ काष्ठैर्दग्ध्वातथाभ्युक्ष्यक्षीरधान्याम्लवारिभिः ॥ ५३ ॥ वातघ्नपत्रैराच्छाद्यशयानंस्वेदयेन्नरम् ॥ एवमापादिभिःस्विन्नैःशयानःस्वेदमाचरेत् ॥ ५४ ॥

उष्मा या नांवेंकरून जो घाम आहे त्याची क्रिया लोखंडाचा गोळा अथवा विटकर तपवून त्याजवर थोडा आंबट पदार्थाचा शिडकाव देऊन रोगी यास कांबळें पांघरवून त्या गोळ्यानें किंवा विटकरानें रोग्याचें अंग शेकावें तेणेंकरून घाम निघतो, हा एक प्रकार अथवा दशमूळादिक अशीं जीं वायुहारक औषधें त्यांचा काढा अथवा त्या औषधांचा रस उष्ण करून मातीचे घागरींत भरून घागरीचे तोंडाला मुद्रा देऊन तोंड बुजवून त्या घागरीचे कुशीला भोंक पाडून धातूची अथवा लांकडाची अथवा बांबूची दोन हात नळी करावी; त्या नळीला तीन संधी करून तिचें तोंड सहा अंगुळें लांब रुंद करावें अथवा गाईचे पुच्छासारखें करावें. या नळीचा आकार हत्तीचे सोंडेसारखा होतो यास्तव हिला हस्तिशुंडिका नाडी असें ह्मणतात. मग ती नळी घागरीचे कुशीस त्या छिद्राला लावून संधिरोग करावा. मग वायूनें पीडित जो मनुष्य त्यानें स्वस्थ बसून अंगाला तूप अथवा तेल लावून घोंगडें किंवा रजई अथवा कांबळा पांघरून त्याचे आंत त्या नळीचें तोंड घालून अंगाचा घाम काढावा अथवा मनुष्याचे साडेतीन हात अथवा चार हात लांब जमीन खणोन त्यांत खैराचीं लांकडें घालून जाळून कोळसे लवकर बाहेर काढून नंतर ती जमीन दूध व धण्याचें पाणी व ताक अथवा कांजी इहींकरून शिंपून त्या जमिनीवर वायुहारक औषधींचीं पानें पसरून त्याजवर रोगी यास निजवून अंगाचा घाम काढावा. याप्रकारें उडीद घेऊन त्यांना चांगली वाफ देऊन अर्धकच्चे शिजवून त्या तापलेल्या खाणींत पसरून त्याजवर सुर्ती एरंड इत्यादिकरून वातहारक औषधींचीं पानें घालून त्याजवर रोग्यास निजवून वरतें कांबळें पांघरवून त्याचे अंगाचा घाम काढावा. याप्रकारें उष्मसंज्ञक घामाचीं लक्षणें जाणावीं.

उपनाहसंज्ञक घामाचें लक्षण.

अथोपनाहस्वेदंचकुर्याद्वातहरौषधैः ॥ प्रदिह्यदेहंवातार्तंक्षीरमांसरसान्वितैः ॥ ५५ ॥ अम्लपिष्टैःसलवणैःसुखोष्णैःस्नेहसंयुतैः ॥

उपनाह या नांवेंकरून जो घाम आहे त्याची क्रिया दशमूळादि वायुहारक औषधें आणून कुटून चूर्ण करून त्यांत दूध व हरिणादिकांचे मांसाचा स्नेह हे दोन्ही मेळवून थोडें गरम करून वायूनें पीडित जें अंग त्या अंगाला सहन होईल असा दाट लेप करून वस्त्राकरीं बांधून अंगाचा घाम काढावा अथवा वायुहारक औषधें आणून कुटून चूर्ण करून

व वृद्धि व अपस्मार व ज्वर व उन्माद व रक्तातिसार व नासापाक व तालुपाक व ओष्ठपाक व कर्णस्राव व द्विजिव्हक व गलशुंड व अतिसार व पित्तश्लेष्मरोग व मेदोरोग व अरुची हे रोग आहेत. व इतक्या रोगांतून एखादा रोग ज्यास आहे त्या रोग्यास वैद्यांनीं ओकवावें.

जे ओकावयास योग्य नाहींत ते.

नवामनीयस्तिमिरीनगुल्मीनोदरीकृशः ॥ ७५ ॥ नातिवृद्धोगर्भिणीचनचस्थूलः क्षतातुरः ॥ मदार्तोबालकोरूक्षःक्षुधितश्चनिरूहितः ॥ ७६ ॥ उदावर्त्यूर्ध्वरक्तीच दुश्छर्दिःकेवलानिली ॥ पांडुरोगीक्रमिव्याप्तःपठनात्स्वरघातकः ॥ ७७ ॥ एतेप्य- जीर्णव्यथितावाम्यायेविषपीडिताः ॥ कफव्याप्ताश्चतेवाम्यामधुकाथप्रपानतः ॥ ७८ ॥

तिमिररोग व गुल्मरोग व उदररोग हे आहेत ज्या मनुष्यांस ते व कृश व अतिवृद्ध व गर्भिणी स्त्री व मोठें अंग आहे ज्याचें तो व उरक्षतेंकरून पीडित आहे तो व बाल व रुक्ष व क्षुधित व निरूहित ह्मणजे गुदावाटें पिचकाऱ्या मारलेल्या आहेत ज्यास तो व ज्याला उदावर्तरोग आहे तो व ऊर्ध्वरक्ती व ज्याला ओकारी सहन होत नाहीं तो व ज्याला केवळ वायूचाच रोग आहे तो व पांडुरोगी व जंताचे उपद्रवेंकरून व्याप्त आहे तो व वेदशास्त्राचे अतिघोषेंकरून ज्याच्या कंठाचा स्वर फुटला आहे तो इतक्या रोग्यांस ओकारीचें औषध देऊं नये. जर हे रोगी अजीर्णेंकरून व विषदोषेंकरून व कफेंकरून व्याप्त आहेत तर यांना ज्येष्ठीमधीचा अथवा मोहाचे सालीचा काढा पाजून ओकवावें.

विशेषेंकरून ओकावयास योग्य नाहींत ते.

सुकुमारंकृशंबालंवृद्धंभीरुंनवामयेत् ॥

नाजूक मनुष्य, कृश, बाल, वृद्ध व भिना या पांचा मनुष्यांस ओकारीचें औषध देऊं नये.

ओकावयास जे विहित पदार्थ.

पीत्वायवागूमाकंठंक्षीरतक्रदधीनिवा ॥ ७९ ॥ असात्म्यैःश्लेष्मलैर्भोज्यैर्दोषानुत्क्लिश्य- देहिनः ॥ स्निग्धस्विन्नायवमनंदत्तंसम्यक्प्रवर्तते ॥ ८० ॥

ज्या मनुष्याला ओकवावयाचा त्याला पहिल्यानें पोटभर यवागू पाजावी अथवा दूध अथवा ताक अथवा दहीं हीं पोटभर प्यावयास द्यावीं. व प्रकृतीला मानवत नाहीं ते पदार्थ व कफकारक पदार्थ खावयास देऊन मनुष्याचे दोष उचंबळवावे; तेणेंकरून मनुष्य चांगला ओकतो व ज्या मनुष्यानें घृतपान केलें आहे त्या मनुष्यास एका दिवसानंतर ओकारीचा प्रयोग केला असतां उत्तम प्रकारचा ओकतो.

ओकारीविषयीं ग्राह्य पदार्थ.

वमनेषुचसर्वेषुसैंधवंमधुनाहितम् ॥ बीभत्संवमनंदद्याद्विपरीतंविरेचनम् ॥ ८१ ॥

जितके ओकारीचे प्रयोग आहेत तितक्या प्रयोगांमध्यें सैंधव अथवा मध यांचें मेलन करावें हितकारक होतात. व बीभत्स वमन द्यावें- मनुष्याला दावक देणें तें सुगंधानें द्यावें.

ओकण्याविषयीं काढा करावयाचें प्रमाण.

क्वाथ्यद्रव्यस्यकुडवंश्रपयित्वाजलाढके ॥ अर्धभागावशिष्टंचवमनेष्ववचारयेत् ॥ ८२ ॥

काढ्याचीं औषधें एक कुडव प्रमाण घेऊन थोडीं कुटून त्यांत एक आढक प्रमाण पाणी घालून अर्धें पाणी राहीं तोंपर्यंत काढा करून ओकारी होण्याविषयीं प्यावयास द्यावा.

ओकण्याविषयीं काढा प्यावयाचें प्रमाण.

क्वाथपानेनवप्रस्थाज्येष्ठामात्राप्रकीर्तिता ॥ मध्यमाषण्मितामोक्तात्रिप्रस्थाचकनीयसी ॥८३॥

ज्या मनुष्यास ओकवावयाचा त्या मनुष्यास नऊ प्रस्थ काढा पाजिला असतां ती मोठी मात्रा जाणावी व सहा प्रस्थ काढा पाजिला असतां मध्यम मात्रा जाणावी व तीन प्रस्थ काढा पाजिला असतां हलकी मात्रा जाणावी.

ओकारीविषयीं कल्कादिकांचें प्रमाण.

कल्कचूर्णावलेहानांत्रिपलंश्रेष्ठमात्रया ॥ मध्यमंद्विपलंविद्यात्कनीयस्तुपलंभवेत् ॥८४॥

कल्क व चूर्ण व अवलेह हीं तीन पळें मनुष्यास दिलीं असतां ती मोठी मात्रा जाणावी. व दोन पळें दिलीं असता मध्यम मात्रा जाणावी व एक एक पळ दिलीं असतां हलकी मात्रा जाणावी.

ओकारीविषयीं उत्तम, मध्यम, कनिष्ठ वेगाचें प्रमाण.

वमनेचापिवेगाःस्युरष्टौपित्तांतमुत्तमाः ॥ षड्वेगामध्यवेगाश्चचत्वारस्त्ववरामताः ॥८५॥

मनुष्यास ओकारीचें औषध दिलें असता सात वेगपर्यंत सारे दोष पडोन आठव्ये वेगास पित्त पडलें असतां ते उत्तम वेग जाणावे. तसेच पांच वेगपर्यंत सारे दोष पडोन सहावे वेगाचे ठायीं पित्त पडलें असतां ते मध्यम वेग जाणावे व तीन वेगपर्यंत दोष पडोन चवथ्या वेगाचे ठायीं पित्त पडलें असतां ते कनिष्ठ वेग जाणावे.

ओकारीविषयीं प्रस्छाचें प्रमाण.

वमनेचविरेकेचतथाशोणितमोक्षणे ॥ सार्धत्रयोदशपलंप्रस्छमाहुर्मनीषिणः ॥ ८६ ॥

ओकारी होण्याविषयीं व ढाळ होण्याविषयीं जें औषध प्रस्छ प्रमाण घ्यावयास सांगेल तेथें साडेतेरा पळाचा प्रस्छ घ्यावा व शिरा देऊन एक प्रच्छ प्रमाण रक्त काढावयाचें असता तेथेंही साडेतेरा पळाचा प्रस्थ जाणावा.

ओकारीचे ठायीं औषध विशेषेंकरून कफादिकांचा जय.

कफंकटुकतीक्ष्णेनपित्तंस्वादुहिमैर्जयेत् ॥ सस्वादुलवणाम्लोष्णैःसंसृष्टंवायुनाकफम् ॥८७॥

तीक्ष्ण औषधेंकरून कफ जिंकावा व मधुर असोन जें थंड औषध तेणेंकरून पित्त जिंकावें व मधुर व क्षार अम्ल व उष्ण इहींकरून वायुला मिळाला जो कफ त्यातें जिंकावें.

कफादिकांना ओकून पाडावयाचीं औषधें

कृष्णाराठफलैःसिंधुकफेकोष्णजलैःपिबेत् ॥ पटोलवासानिंबैश्चपित्तेशीतजलंपिबेत् ८८

सश्लेष्मवातपीडायांसक्षीरंमदनंपिबेत् ॥ अजीर्णेऽरोष्णपानीयंसंपीत्वावमेत्सुधीः ॥८९॥

कफदोषाचे ठायीं पिंपळी व गेळफळ व सैंधव यांचें चूर्ण करून कोमट पाण्यांत मेळवून प्यालें असतां ओकारीबरोबर कफ पडतो व पित्तदोषाचे ठायीं पटोल व अडूळसा [illegible] कडुनिंबाच्या पानाचें चूर्ण करून थंड पाण्यांत घालून प्यालें असतां ओकारीबरोबर पि[illegible] [illegible] व कफवायूची पीडा असता गेळफळाचें चूर्ण दुधांत घालून प्यावें तेणेंकरून मनुष्[illegible]

ओकून कफवायूची पीडा दूर होते व अजीर्णाचे ठायीं कोमट पाण्यांत सैंधव घालून त्यालें असतां मनुष्य ओकून अजीर्ण दूर होतें.

ओकविण्याचे बाह्योपचार.

वमनंपाययित्वाचजानुमात्रासनेस्थितम् ॥कंठमेरंडनालेनस्पृशंतंवामयेद्भिषक्॥९०॥ ललाटंवमतःपुंसःपार्श्वौद्वौचप्रबोधयेत् ॥

मनुष्यास ओकारीचें औषध देऊन भुईला गुढघे टेकवून बसवावा आणि एरंडाचें मूळ बारीक लांब असेल तें घेऊन त्याचे तोंडांत घालून तें मूळ कंठाला स्पर्श होई तों हलक्या हातानें पुढें सारावें; याप्रमाणें मागेंपुढें सारून सारून वैद्यांनीं मनुष्य ओकवावा व त्या ओकणाराचे कपाळाचे ठायीं व दोन्ही कुशींचे ठायीं हलक्या हातानें चोळावें.

ओकारी चिकोपास गेल्याचीं लक्षणें.

प्रसेकोहृद्ग्रहःकोठःकंडूर्दुश्छर्दितात्भवेत् ॥ ९१ ॥

ज्या मनुष्याला ओकारीचें औषध देऊन त्यामध्यें कांहीं विकार जाहला असतां त्याचे तोंडावाटे लाळ पडते व हृदयास पीडा होते व अंगावर कोठ व कंडू होतो.

ओकारी फार जाहली असतां तिचे उपद्रव.

अतिवांते भवेत्तृष्णाहिक्कोद्गारौविसंज्ञिता ॥ जिव्हानिःसर्पणंचाक्ष्णोर्व्यावृत्तिर्हनुसंहतिः ॥ ९२ ॥ रक्तछर्दिःष्ठीवनंचकंठेपीडाचजायते ॥

मनुष्यास ओकारी फार जाहली असतां त्याला तहान फार लागते व उचकी व अंग जड होतें व संज्ञेचा नाश होतो व जीभ बाहेर पडते व नेत्र तारून चंचळ होतात व भ्रम पडतो व हनुवटीचा स्तंभ होतो अथवा पीडा होते व तोंडावाटे रक्त पडतें व वारंवार थुंका येतो व कंठाचे ठायीं पीडा होते याप्रकारचीं लक्षणें होतात.

ओकारी फार जाहली असतां चिकित्सा.

वमनस्यातियोगेतुमृदुकुर्याद्विरेचनम् ॥ ९३ ॥

मनुष्यास ओकारी फार जाहली असतां त्याला हलकें ढाळक द्यावें.

ओकतां ओकतां जीभ खोल गेली असतां चिकित्सा

वमनांतःप्रविष्टायांजिव्हायांकवलग्रहः ॥ स्निग्धाम्ललवणैर्हृद्यैर्घृतक्षीररसैर्हितः ॥९४॥ फलान्यम्लानिखादेयुस्तस्यचान्येग्रतोनराः ॥

फार ओकून ओकून मनुष्याची जीभ आत गेली असतां मनाला प्रियकर असे आंबट, तिखट, गोड व खारट पदार्थ भाताबरोबर खावयास द्यावे व तूप व दूध हीं भाताबरोबर खावयास द्यावीं व त्या रोग्याच्या पुढें दुसऱ्या मनुष्यांनीं लिंबें अथवा नारिंग चोखून चोखून खावें. तेणेंकरून मनुष्याची जीभ ठिकाणीं येऊन प्रकृति स्वस्थ होते.

ओकतां ओकतां जीभ बाहेर आली असता उपचार.

निःसृतांतुतिलद्राक्षाकल्कैर्लिप्त्वाप्रवेशयेत् ॥ ९५ ॥

मनुष्याची जीभ ओकून ओकून बाहेर आली असता तीळ व द्राक्ष याचा कल्क करून त्या जिभेला वैद्यांनीं लेप करून जीभ आंत न्यावी.

ओकारीनें डोळ्यांस विकार जाहला असतां उपचार.

व्यावृत्ताक्षिणघृताभ्यक्तेपीडयेच्छनैःशनैः ॥

ज्या मनुष्याचे ओकून ओकून डोळे ताठले असतां त्याचे डोळ्यांना हलक्या हातानें तूप लावून डोळे ठिकाणीं आणावे.

ओकून ओकून हनुवटीचा स्तंभ जाहला असतां उपचार.

हनुमोक्षेस्मृतःस्वेदोनस्यंचश्लेष्मवातहृत् ॥ ९६ ॥

मनुष्य फार ओकून ओकून हनुवटीचा स्तंभ जाहला असतां त्याचे अंगाचा घाम काढावा. व कफवायुहारक नाकांत औषध घालावें, तेणेंकरून हनुवटीचा स्तंभ दूर होतो.

ओकतां ओकतां रक्त पडों लागलें असतां उपचार.

रक्तपित्तविधानेनरक्तछर्दिमुपाचरेत् ॥

मनुष्य फार ओकून ओकून रक्त ओकूं लागला असतां जे उपाय रक्तपित्तावर सांगितले आहेत ते उपाय करून रक्ताची ओकारी बंद करावी.

ओकारी फार होऊन तहान लागली असतां उपचार.

धात्रीरसांजनोशीरलाजाचंदनवारिभिः ॥ ९७ ॥ मंथंकृत्वापाययेच्चसघृतक्षौद्रशर्करम् ॥ शाम्यंत्यनंततृष्णाद्याःपीडाश्छर्दिसमुद्भवाः ॥ ९८ ॥

आंवळकाठी १ रसांजन २ वाळा ३ साळीच्या लाह्या ४ रक्तचंदन ५ नेत्रवाळा ६ या सहा औषधांचे मंथ करून त्यांत तूप व मध व साखर घालून प्यालें असतां ओकारीपासून जे तृष्णादिक उपद्रव होतात जे दूर होतात.

ओकारी चांगली जाहल्याचें लक्षण.

हृत्कंठशिरसांशुद्धिर्दीप्ताग्नित्वंचलाघवम् ॥ कफपित्तविनाशश्चसम्यग्वांतस्यचेष्टितम् ॥९९॥

जो मनुष्य उत्तमप्रकारें चांगला ओकला त्याचें लक्षण हृदय व कंठ व मस्तक यांचे ठायीं जे कफादिक दोष असतात ते दूर होऊन त्यांची शुद्धि होते व अग्नि प्रदीप्त व अंग हलकें होतें व कफदोष व पित्तदोष हे दूर होतात.

ओकारी चांगली झाल्यानंतरचें पथ्य.

ततोपराह्णेदीप्ताग्निर्मुद्गषष्टिकशालिभिः ॥ हृद्यैश्चजांगलरसैःकृत्वायूषम्चभोजयेत् ॥ १०० ॥

मनुष्य चांगला ओकल्यानंतर तिसऱ्या प्रहरीं अग्नि प्रदीप्त होई असा मूग व साठी तांदूळ यांचा व मनाला प्रियकर असे रानांतील हरिणादिकांच्या मांसाचे रस यांचा यूष करून त्या यूषाबरोबर भोजन करावें.

ओकारी चांगली जाहली असतां जे होत नाहींत ते.

तंद्रानिद्रास्यदौर्गंध्यंकंडूश्चग्रहणीविषम् ॥ सुवांतस्यनपीडायैभवंत्येतेकदाचन ॥१०१॥

जो मनुष्य उत्तमप्रकारचा ओकला त्याला डोळ्यांवर झांपड व निद्रा व तोंडाला दुर्गंधि व कंडू व संग्रहणी रोग व विषदोष हे उपद्रव कधींही होत नाहींत.

ओकारीविषयीं निषिद्ध पदार्थ.

अजीर्णशीतपानीयंव्यायामंमैथुनंतथा ॥ स्नेहाभ्यंगप्रकोपंचदिनैकंवर्जयेत्सुधीः ॥ १०२ ॥

जड पदार्थ व थंड पाणी व परिश्रम व मैथुन व अंगाला तेल लावणें व रागें भरणें हे विषय ज्यादिवशीं ओकारीचें औषध घ्यावें त्यादिवशीं वर्ज करावें.

इति श्री दामोदरसूनु शार्ङ्गधरेण विरचितायां संहितायां उत्तर-
खंडे वमनविधिर्नाम तृतीयोऽध्यायः समाप्तः ॥ ३ ॥

# चतुर्थोऽध्यायः

वमनानंतर ढाळकाचा विधि.

स्निग्धस्विन्नस्यवांतस्यदद्यात्सम्यग्विरेचनम् ॥ अवांतस्यत्वधःस्रस्तोग्रहणींछादये-त्कफः ॥ १०३ मंदाग्निंगौरवंकुर्याज्जनयेद्वाप्रवाहिकाम् ॥ अथवापाचनैरामंवला संचविपाचयेत् ॥ १०४ ॥

पूर्वी मनुष्याला स्निग्ध करावा ह्मणजे उक्त प्रकारें स्नेह पाजावा व नंतर स्विन्न करावा ह्मणजे अंगाचा घाम काढावा. नंतर वांति करवून ह्मणजे ओकवून उत्तम प्रकारें विरेचन द्यावें ह्मणजे ढाकळ द्यावें. कारण अवांत मनुष्याला ढाळक दिलें असतां तेणें-करून अधोभागीं गळला जो कफ तो ग्रहणी ह्मणजे साहावी पित्तधरा व अग्निधरा जी कळा तिचें आच्छादन करितो त्यामुळें अग्निमांद्य व गौरव ह्मणजे अंगाला जडपणा व प्रवाहिका रोग अतिसाराचा भेद आहे तो हे रोग उत्पन्न होतात अथवा अधःस्रस्त जो कफ व आम त्यातें पाचनैः ह्मणजे शुंठ एरंडमूलादिक जीं तिहींकरून पाचयेत् ह्मणजे पचवावें.

ढाळकाचा दुसरा विधि.

स्निग्धस्नेहनैःकार्यस्वेदैःस्विन्नस्यरेचनं ॥

घृत दुग्धादिक स्नेह द्रव्यें जीं तिहींकरून स्निग्ध मनुष्य जो त्यास व पिंडस्वेदा-दिकेंकरून स्विन्न ह्मणजे अंगाचा घाम काढिला असा मनुष्य जो त्यास ढाळक द्यावें हा वांत केल्यावांचून विरेचनाचा दुसरा प्रकार.

शरदृतौवसंतेचदेहशुध्यैविरेचयेत् ॥ १०५ ॥ अन्यदात्ययिकेकालेशोधनंशीलयेद्बुधः ॥

शरत्कालाचे ठायीं वसंतकालाचे ठायीं मनुष्यानें शरीराच्या शुद्धीकारणें ढाळक घ्यावें; तेणें-करून देहाची शुद्धि होऊन शरीर चांगलें वागतें व उक्त कालांशिवाय दुसरे कालाचे ठायीं रोग उत्पन्न जाहला असता त्या कालाचे ठायींही वैद्यानें रोगी यास विचार करून ढाळक द्यावें.

विशेषेंकरून ढाळक देण्याविषयीं जे योग्य रोग ते

पित्तेविरेचनंदद्यादामोद्भूतेगदेतथा ॥ १०६ ॥ उदरेचतथाध्मानेकोष्ठशुद्धौविशेषतः ॥

पित्तविकार व आमवायु व उदर रोग व आध्मान वायु व बद्धकोष्ठ या रोगाचे ठायीं वैद्यानीं विशेषेंकरून ढाळक द्यावें.

दोष दूर करण्याविषयीं ढाळकाची उत्कृष्टता

दोषाःकदाचित्कुप्यंतिजितालंघनपाचनैः ॥१०७॥ येतुसंशोधनैःशुद्धानतेषांपुनरुद्भवः ॥

वातादिक दोष लंघन व पाचन इहींकरून शमन जाहले असतां एखादे वेळेस कोपातें पवतात व जे दोष ढाळक देऊन शुद्ध जाहले त्या दोषाचा फिरून उद्भव होत नाहीं असें जाणावें.

ढाळक देण्याविषयीं जे योग्य ते.

जीर्णज्वरीगरव्याप्तोवातरक्तीभगंदरी ॥ १०८ ॥ अर्शःपांडूदरग्रंथिहृद्रोगारुचिपी-
डिताः ॥ योनिरोगप्रमेहार्तागुल्मप्लीहव्रिणार्दिताः ॥ १०९ ॥ विद्रधिच्छर्दिविस्फोट-
विषूचीकुष्ठसंयुताः ॥ कर्णनासाशिरोवक्त्रगुदमेंढ्रामयान्विताः ॥ ११० ॥ यकृत्-
शोथोक्षिरोगार्ताःकृमिक्षारानिलार्दिताःशूलिनोमूत्रघातार्ताविरेकार्हानरामताः ॥१११॥

जीर्णज्वर व बचनागादिक विषदोष व वातरक्त व भगंदर इहींकरून व्याप्त असा मनुष्य व अर्श व पांडुरोग व उदररोग व ग्रंथिरोग व हृद्रोग व अरोचक व परमा व योनिरोग व गुल्म व प्लीहा म्हणजे पाणथरी व व्रणरोग व विद्रधि व ओकारी व विस्फोट व विषूची व कुष्ठ व कर्णरोग व नासारोग व मस्तकरोग व मुखरोग व गुदरोग व शिस्नाचे ठायीं उपदं-शादिकरोग व यकृत् व सूज व नेत्ररोग व कृमिरोग व सोमल व क्षारजन्य विकार व वातरोग व शूळरोग व मूत्राघातरोग इतक्यातून एखाद्या रोगेंकरून व्याप्त जे मनुष्य ते ढाळक देण्याविषयीं योग्य जाणावे.

ढाळक देण्याविषयीं जे योग्य नाहींत ते

बालवृद्धावतिस्निग्धक्षतक्षीणोभयान्वितः ॥ श्रांतस्तृषार्तःस्थूलश्चगर्भिणीचनवज्वरी॥१२॥
नवप्रसूतानारीचमंदाग्निश्चमदात्ययी ॥ शल्यार्दितश्चरूक्षश्चनविरेच्याविजानता ॥ १३ ॥

बाल वृद्ध व अति स्निग्ध मनुष्य व उरक्षतेंकरून क्षीण मनुष्य व भयेंकरून युक्त व श्रमित मनुष्य व तृषेंकरून पीडित व स्थूल म्हणजे शरीरेंकरून मोठें मनुष्य व गर्भिणी व नवज्वरेंकरून पीडित व नूतन बाळंत झालेली स्त्री व मंदाग्नि मनुष्य व मदात्ययरोगेंकरून पीडित व शल्येंकरून पीडित व रूक्ष म्हणजे निस्तेज मनुष्य इतक्या मनुष्यांना सुज्ञ वैद्यांनीं ढाळक देऊं नये.

ढाळक देण्याविषयीं मृदु, मध्यम, क्रूर असे कोष्ठ

बहुपित्तोमृदुःप्रोक्तोबहुश्लेष्माचमध्यमः॥बहुवातःक्रूरकोष्ठोदुर्विरेच्यःसकथ्यते॥१४॥
मृद्वीमात्रामृदौकोष्ठेमध्यकोष्ठेचमध्यमा ॥ क्रूरेतीक्ष्णामतातज्ज्ञैर्मृदुमध्यमतीक्ष्णकैः ॥१५॥

ज्या मनुष्याचा कोठा फार पित्तेंकरून व्याप्त आहे तो मनुष्य मृदुकोष्ठ जाणावा व ज्याचे कोठ्यामध्यें फार कफ आहे तो मध्यमकोष्ठ जाणावा, व ज्याचे कोठ्यात फार वायु आहे तो मनुष्य क्रूरकोष्ठ जाणावा; तो क्रूरकोष्ठ ढाळकाविषयीं दुःखदायक होय, म्हणजे ढाळक दिलें असतां लवकर ढाळ होत नाहीं असें जाणावें. आणि ज्याचा मृदु कोठा आहे त्याला मृदु औषधेंकरून मृदु मात्रा द्यावी व ज्याचा कोठा मध्यम आहे त्याला मध्यम औषधेंकरून मध्यम मात्रा द्यावी व ज्याचा क्रूर कोठा आहे त्याला तीक्ष्ण औषधेंकरून तीक्ष्ण मात्रा द्यावी; तीं औषधें पुढील श्लोकांत सांगतों.

मृदुमध्यमादि कोठ्याचे ठायीं मृदुमध्यमादिक औषधें.

मृदुर्द्राक्षापयश्चंचुतैलैरपिविरिच्यते ॥ मध्यमस्त्रिवृतातिक्काराजवृक्षैर्विरिच्यते ॥१६॥ क्रूरःस्नुकूपयसाहेमक्षीरीदंतीफलादिभिः ॥

मृदु आहे कोठा ज्याचा त्याला द्राक्षें व दूध व एरंडेल तेल इहींकरून ढाळक द्यावें च मध्यम आहे कोठा ज्याचा त्याला निसोत्तर व कटुकी व बाहव्याचे शेंगेंतला मगज या तीन औषधेंकरून ढाळक द्यावें व क्रूर आहे कोठा ज्याला त्याचा निवडुंगाचें दूध व हेमक्षीरी ह्मणजे पिसोळा अथवा कांटेधोतरा व जेपाळबीज आदिशब्देंकरून कावंदळीचें मूळ ह्मणजे इंद्रवारुणीचें मूळ इत्यादिक इहींकरून ढाळक द्यावें; तेणेंकरून ढाळ होतात.

उत्तमादि भेदेंकरून ढाळांचें प्रमाण.

मात्रोत्तमाविरेकस्यत्रिंशद्वेगैःकफांतिका ॥१७॥ वेगोविंशतिभिर्मध्याहीनोक्तादशवेगिका ॥

ढाळकाचे वेग तीस होऊन शेवटले ढाळकाचे अंतीं कफ पडूं लागला असतां ती उत्तम मात्रा जाणावी व ढाळाचे वेग वीस होऊन कफ पडों लागला असतां ती मध्यम मात्रा जाणावी व दहा वेग होऊन अंतीं कफ पडूं लागला असतां ती हीनमात्रा जाणावी.

ढाळ होण्याविषयीं कषायादिकांच्या मात्रेचें प्रमाण.

द्विपलंश्रेष्ठमाख्यातंमध्यमंचपलंभवेत् ॥१८॥ पलार्धंचकषायाणांकनीयस्तुविरेचनम् ॥

ढाळ होण्याविषयीं दोन पळें प्रमाण कषाय ह्मणजे काढा तो दिला असतां तें ढाळक उत्तम जाणावें. व एक पळ प्रमाण काढा दिला असतां तें ढाळक मध्यम जाणावें, व अर्धे पळ काढा दिला असतां तें ढाळक कनिष्ठ जाणावें.

ढाळाविषयीं कल्कादिकांचें प्रमाण.

कल्कमोदकचूर्णानांकर्षंमध्वाज्यलेहतः ॥ १९ ॥ कर्षद्वयंपलंवापिवयोरोगाद्यपेक्षया ॥

कल्क व मोदक व चूर्ण हीं प्रत्येक मधा तुपांत मेळवून ढाळ होण्याविषयीं द्यावीं. अथवा वय व रोग यांचें तारतम्य पाहून दोन कर्ष प्रमाण अथवा पळ प्रमाण द्यावीं.

धाळकाचे ठायीं निसोत्तर आदिकरून औषधें घ्यावयाचा प्रकार.

पित्तोत्तरेत्रिवृच्चूर्णंद्राक्षाकाथादिभिःपिवेत् ॥ २० ॥ त्रिफलाक्काथगोमूत्रैःपिवेद्व्योषंकफार्दितः ॥ त्रिवृत्सैधवशुंठीनांचूर्णमम्लैःपिबेन्नरः ॥ २१ ॥ वातार्दितोविरेकायजांगलानांरसेनवा ॥

पित्ताचें आधिक्य असता निसोत्तराचें चूर्ण करून द्राक्षाचे काढ्यांत घालून द्यावें. आदिशब्देंकरून गुलकंद गुलाबफूल बडीशोप इत्यादिकांचे काढ्यांत द्यावें व कफाचा प्रकोप जाहला असतां त्रिफळेचा काढा, व गोमूत्र एका जागीं करून त्यांत व्योष ह्मणजे सुंठ, मिऱ्यें, पिंपळी यांचें चूर्ण घालून द्यावें व मनुष्य वायूनें पीडित असतां ढाळ होण्याविषयीं निसोत्तर व सैंधव व सुंठ यांचें चूर्ण करून लिंबूच्या रसांत द्यावें अथवा अरण्यसंबंधी मांसाचे रसांत द्यावें, तेणेंकरून ढाळ होतात.

अन्य औषधेंकरून ढाळकांचें विधान.

एरंडतैलंत्रिफलाक्काथेनद्विगुणेनच ॥ २२ ॥ युक्तंपीत्वापयोभिर्वानचिरेणविरिच्यते ॥

एरंडेल तेलाचे दुप्पट त्रिफळेच्या काढा करून त्यांत एरंडेल तेल घालून काढा द्यावा. अथवा तें तेल दुधांत घालून द्यावें तेणेंकरून लवकर ढाळ होतात.

ऋतुभेदेंकरून ढाळकें.

त्रिवृताकौठबीजंचपिप्पलीविश्वभेषजम्॥२३॥समृद्वीकारसक्षौद्रंवर्षाकालेविरेचनम्॥

निसोत्तर व इंद्रजव व पिंपळी व सुंठ व द्राक्षांचा रस व मध हीं औषधें ढाळ होण्याविषयीं वर्षाकाळीं योजावीं.

शरत्कालाचे ठायीं ढाळक

त्रिवृत्दुरालभामुस्ताशर्करादिव्यचंदनम्॥२४॥ द्राक्षांबुनासयष्टीकंशीतलंचघनात्यये॥

निसोत्तर धमासा व नागरमोथे व उत्तम पांढरा चंदन व ज्येष्ठीमध या औषधांचें चूर्ण करून द्राक्षांचे पाण्यांत मेळवून शरत्कालाचे ठायीं घ्यावें. तेणेंकरून ढाळ होतात. हें ढाळक शीतळ आहे असें जाणावें.

हेमंतऋतूचेठायीं ढाळक

त्रिवृताचित्रकंपाठामजाजीसरलावचा॥२५॥ हेमक्षीरीचहेमंतेचूर्णमुष्णांबुनापिवेत्॥

निसोत्तर व चित्रक व पहाडमूळ व जिरें व देवदार व वेखंड हेमक्षीरी ह्मणजे पिसोळा अथवा कांटेधोतरा यांचें चूर्ण करून उष्ण पाण्यांत घालून हेमंतऋतूचेठायीं घ्यावें. तेणेंकरून ढाळ होतात.

शिशिर व वसंत यांचेठायीं ढाळक

पिप्पलीनागरंसिंधुशामात्रिवृतयासह॥२६॥ लिहंत्क्षौद्रेणशिशिरेवसंतेचविरेचनम्॥

पिंपळी व सुंठ व सैंधव व वरधरा व निसोत्तर या औषधांचें चूर्ण करून मधांत कालवून शिशिर व वसंत या ऋतूचे ठायीं चाटावें तेणेंकरून ढाळ होतात.

ग्रीष्मऋतूचे ठायीं ढाळक.

त्रिवृताशर्करातुल्याग्रीष्मकालेविरेचनं॥ २७॥

निसोत्तराचें चूर्ण करून त्यांत साखर घालून ढाळ होण्याविषयीं ग्रीष्मकाळीं घ्यावें.

सुखेंकरून ढाळ होण्याविषयीं अभयादिमोदक

अभयामरिचंशुंठीविडंगामलकानिच॥ पिप्पलीपिप्पलीमूलंत्वक्पत्रंमुस्तमेवच॥ २८॥
एतानिसमभागनिदंतीचद्विगुणाभवेत्॥ त्रिवृदष्टगुणाज्ञेयाषड्गुणाचात्रशर्करा॥ २९॥
मधुनामोदकंकृत्वाकर्षमात्रप्रमाणतः॥ एकैकंभक्षयेत्प्रातःशीतंचानुपिबेज्जलं॥३०॥
तावद्विरिच्यतेजंतुर्यावदुष्णेनसेव्यते॥ पानाहारविहारेषुभवेन्नियंत्रणंसदा॥ ३१॥
विषमज्वरमंदाग्निपांडुकासभगंदरान्॥ दुर्नामकुष्ठगुल्यार्शोगलगडव्रणोदरान्॥३२॥
विदाहप्लीहमेहांश्चयक्ष्माणंनयनामयान्॥ वातरोगंतथाध्मानंमूत्रकृच्छ्राणिचाश्मरीं॥३३॥
पृष्ठपार्श्वोरुजघनकट्युदररुजंजयेत्॥ सततंशीलनादेषपलिताविनाशयेत्॥३४॥
अभयामोदकाह्येतेरसायनवराःस्मृताः॥

हरितकी १ मिऱ्यें २ सुंठ ३ वावडिंग ४ आंवळकाठी ५ पिंपळी ६ पिंपळमूळ ७

दालचिनी ८ तमालपत्र ९ नागरमोथे १० हीं दाहा औषधें समभाग घ्यावीं व दांतीचें मूळ ह्मणजे दांतुणीचें मूळ तें तीन भाग व निसोत्तर आठ भाग व साखर साहाभाग याप्रमाणें भाग घेऊन सर्व्यांचें चूर्ण करून मधांत मेळवून एक एक कर्ष प्रमाण मोदक ह्मणजे गोळ्या कराव्या. मग तो एक मोदक प्रातःकालचे ठायीं ढाळ होण्याविषयीं भक्षण करावा. त्याजवर थोडें थंड पाणी प्यावें आणि जोंपर्यंत ढाळ होतात तो काळपर्यंत उष्ण पदार्थांचें सेवन करूं नये व पान आणि आहार व विहार ह्मणजे श्रमादिक यांचे ठायीं सर्वकाळ नियमित असावें. तेणेंकरून विषमज्वर व अग्निमांद्य व पांडुरोग व खोकला व भगंदर व कुष्ठ व गुल्म व अर्श व गलगंड व भ्रम व उदर व विदाह व कवलू व परमा व राजयक्ष्मा व नेत्ररोग व वातरोग व पोटफुगी व मूत्रकृच्छ्र व अश्मरीरोग व पाठ व पार्श्व व कंबर व मांड्या व पोटऱ्या व उदर यांचे ठायीं ज्या पीडा होतात त्या हे सर्व रोग दूर होतात. या मोदकाला अभयामोदक ह्मणतात. हा अभया मोदक निरंतर सेविला असतां पलित ह्मणजे मनुष्याचे पांढरे केश होतात ते येणेंकरून काळे होतात. व हा मोदक उत्तम रसायनरूप आहे असें जाणावें.

ढाळकास साह्य करणारे उपचार.

पीत्वाविरेचनेशीतजलैःसंसिच्यचक्षुषी ॥ ३५ ॥ सुगंधंकिंचिदाघ्रायपतांबूलंशीलयेन्नरः ॥

मनुष्याला ढाळकाची मात्रा देऊन त्याजवर त्याचे डोळ्यांना पाणी लावून डोळे पुसावे आणि कांहीं एक सुगंध वास घ्यावयास अर्गजादिक द्यावें व भक्षयास विडा द्यावा. हें योग्य जाहलें असतां उत्तम प्रकारचे ढाळ होतात, असें जाणावें.

ढाळ जाहल्यावर कसें वागावें तें लक्षण.

निर्वातस्थोनवेगांश्चधारयेन्नस्वपेत्तथा ॥ ३६ ॥ शीतांबुनिस्पृशेत्क्वापिकोष्णनीरंपिबेन्मुहुः ॥

ढाळ जाहल्यानंतर वाऱ्यांत बसूं नये व वातमूत्र इत्यादिकांचें संधारण करूं नये व झोंप घेऊं नये; व थंड पाण्याचा स्पर्श अगदीं करूं नये व ढाळांचेमध्यें कोमट पाणी वारंवार पीत असावें तेणेंकरून चांगले ढाळ होतात.

ढाळांबरोबर जे पदार्थ पडतात ते.

बलासौषधपित्तानिवायुर्वायंतथाव्रजेत् ॥३७॥ रेचनात्तथामलंपित्तंभेषजंचकफोव्रजेत् ॥

ओकारीनें औषध घेतलें असतां त्यापासून कफ व जें औषध घेतलें असेल तें व पित्त व वायु हे पदार्थ जसे ओकारीवाटे बाहेर पडतात तसें ढाळक घेतलें असतां त्यापासून मळ व पित्त औषध व कफ हे पदार्थ ढाळाबरोबर गुदावाटे बाहेर पडतात.

ढाळ चांगले जाहले नसतां जे उपद्रव होतात ते.

दुर्विरेकस्यनाभेस्तुस्तब्धत्वंकुक्षिशूलता ॥ ३८॥ पुरीषवातसंगश्चकंडूमंडलगौरवाः ॥

विदाहोरुचिराध्मानंभ्रमच्छर्दिश्चजायते ॥ ३९ ॥

ढाळ चांगले जाहले असतां मनुष्याचे नाभीचे ठायीं स्तब्धता व कुक्षीचे ठायीं शूळ व मळ आणि वायु यांची अप्रवृत्ति व अंगाचे ठायीं कंडू व मंडलें हीं उत्पन्न होतात व अंगाला जडपणा व दाह व अरुचि व पोटफुगी व भ्रम व ओकारी हे उपद्रव होतात.

ज्यास चांगले ढाळ झाले नाहींत त्यास उपचार

तंपुनःपाचनैःस्नेहैःपक्त्वासंस्नेह्यरेचयेत् ॥ तेनास्योपद्रवायांतिदीप्तोग्निर्लघुताभवेत् ॥४०॥

ज्या मनुष्याला चांगले ढाळ जाहले नाहींत त्याला आरग्वधादि पाचन देऊन आवेचें पचन करावें व नंतर त्याला स्नेहपान ह्मणजे तूप प्यावयास देऊन त्याचा कोठा स्निग्ध करून फिरून ढाळक द्यावें, तेणेंकरून त्याचे सारे उपद्रव दूर होऊन जठराग्नि प्रदीप्त होतें। आणि अंग हलकें होतें.

ढाळ फार जाहले असतां जे उपद्रव होतात ते

विरेकस्यातियोगेनमूर्छाभ्रंशोगुदस्यच ॥ शूलंकफातियोगःस्यान्मांसधावनसंनिभम् ॥ ४१ ॥ मेदोनिभंजलाभासंरक्तंचापिविरिच्यते ॥

ज्या मनुष्याला फार ढाळ जाहले असता मूर्छा व गुदाचे ठायीं पीडा व शूळहे उपद्रव होतात आणि कफ फार पडतो व मासाचे धुवणासारखें व मद्यासारखें व पाण्यासारखें असें गुदावाटें रक्त पडतें.

ढाळ फार होऊन जे उपद्रव होतात त्यावर उपाय.

तस्यशीतांबुभिःसिक्तंशरीरंतंदुलांबुभिः ॥४२॥ मधुमिश्रैस्तथाशीतै'र्कारयेद्वमनंमृदु ॥

ढाळ फार जाहले असता मनुष्याचें शरीर थंड पाण्यात भिजवावें, त्याप्रकारें थंड तांदुळाचे धुवणात मध मेळवून मनुष्याला प्यावयास देऊन हलकी ओकारी करवावी तेणेंकरून उपशम होतो.

ढाळ बंद होण्याविषयीं उपाय

सहकारत्वचःकल्कोदध्नासौवीरकेनवा ॥४३॥ पिष्टोनाभिप्रलेपेनहंत्यतीसारमुल्बणम् ॥

आंब्याची साल गाईचे दह्यांत अथवा सौवीरात वाटून कल्क करून नाभीचे ठायीं लेप करावा तेणेंकरून ढाळ बंद होतात.

ढाळ बंद होण्याविषयीं

अजाक्षीरंपिबेद्वापिवैष्किरहारिणंतथा ॥ ४४ ॥ शालिभिःषष्टिकैःस्वल्पंमसूरैर्वापिभोजयेत् ॥ शीतैःसंग्राहिभिर्द्रव्यैः कुर्यात्संग्रहणंभिषक् ॥ ४५ ॥

ढाळ बंद होण्याविषयीं शेळीचें दूध प्यावें अथवा शकुनी पक्षी याचा रस व हरिणाचे मांसाचा रस याचें सेवन करावें व साठी तांदुळाचा भात करून थोडा खावा अथवा मसूर शिजवून थोडे खावे आणि डाळिंब आदिकरून शीतळ आणि ग्राहक अशा पदार्थांचें सेवन करावें तेणेंकरून ढाळ बंद होतात.

ज्याला चांगले ढाळ जाहले त्याचें लक्षण

लाघवेमनसस्तुष्ट्यामनुलोमेगतेऽनिले ॥ सुविरक्तंनरंज्ञात्वापाचनंपाचयेन्निशि ॥ ४६ ॥

ढाळ होऊन त्या योगानें देहाला हलकेपणा व चित्ताचे ठायीं प्रसन्नता व वायूचें स्वस्थानीं गमन इतकीं लक्षणें झालीं असता त्या मनुष्याला चांगले ढाळ जाहले असें जाणून रात्रीचे ठायीं त्याला पाचन द्यावें.

दाळक घेतलें असतां काय होतें तें

इंद्रियाणांबलंबुद्धेःप्रसादोवन्हिदीप्तता ॥ धातुस्थैर्यंवयस्थैर्यंभवंद्रेचनसेवनात् ॥ ४७ ॥

मनुष्यानें दाळकाचें सेवन केलें असतां इंद्रियांना बळ येतें व बुद्धि प्रसन्न होते व जठराग्नि प्रदीप्त होतो व धातु आणि वय यांना स्थिरपणा येतो.

दाळक घेतलें असतां वर्ज्य पदार्थ

प्रवातसेवाशीतांबुस्नेहाभ्यंगमजीर्णताम् ॥ व्यायामंमैथुनंचैवनसेवेतविरेचितः ॥४८॥

मनुष्यानें दाळ झाल्यानंतर फार वारा घेऊं नये व थंड पाणी व तैलाभ्यंग व अजीर्ण व परिश्रम व मैथुन यांचें सेवन करूं नये.

दाळकाचे दार्थी पथ्य

शालिषष्टिकमुद्गाद्यैर्यवागूंभोजयेत्कृतः॥ जांगलैर्विष्किराणांवारसैःशाल्योदनंहितम् ॥४९॥

दाळ जाहल्यानंतर पथ्यास साटी तांदूळ व मुग आदिकरून जीं धान्यें यांची यवागू करून प्यावी व अरण्य संबंधी हरिणादिकांचे मांसाचा रस अथवा शकुंत पक्षी आणि कोंबडे इत्यादिकांचे मांसाचा रस यावरोबर तांदुळाचा भात खावा.

---

# पंचमोऽध्यायः

जे अनुवासनबस्तीविषयीं योग्य नाहींत ते.

नानुवास्यस्तुकुष्ठीस्यान्मेहीस्थूलस्तथोदरी ॥ आस्थाप्यानानुवास्याःस्युरजीर्णोन्माद-तृष्ण्युताः ॥ ५५ ॥ शोकमूर्च्छारुचिभयश्वासकासभयातुराः ॥

कुष्ठी व मेही म्हणजे परमा आहे ज्यास तो व स्थूल व उदरी म्हणजे उदररोग आहे ज्यास तो हे अनुवासन बस्तीविषयीं योग्य नाहींत व अजीर्ण व उन्माद तृषा शोक, मूर्च्छा अरुची, भय, श्वास, खोकला, व क्षय इहींकरून पीडित जे मनुष्य, ते आस्थाप्य म्हणजे निरूह बस्तीविषयीं योजावे. त्यांची अनुवासन बस्तीविषयीं योजना करूं नये.

बस्तीचे मुख स्थापनाविषयीं सुवर्णादिकांची नळी.

नेत्रंकार्यंसुवर्णादिधातुभिर्वृक्षवेणुभिः ॥१५६॥ नलैर्दंतैर्विषाणाग्रैर्मणिभिर्वाविधीयते ॥

नेत्र म्हणजे गुदाचे ठायीं पिचकाऱ्या मारावयाची नळी ती सुवर्णादि धातूची अथवा बांबूची अथवा देवनळ, हस्तिदंत व शिंगाचें अग्र व बिलोर अथवा सूर्यकांतादिक मणी याची नळी करावी.

रोग्याच्या वयाचे प्रमाणावरून नळीचें प्रमाण करावें.

एकवर्षात्तुषड्वर्षोयावन्मानंषडंगुलम् ॥ ५७ ॥ ततोद्वादशकंयावन्मानंस्यादष्टसंमितम् ॥ ततःपरंद्वादशभिरंगुलैर्नेत्रदीर्घता ॥ ५८ ॥

बस्तीची नळी एका वर्षापासून ६ वर्षेपर्यंत ६ अंगुळ प्रमाण लांब व ६ वर्षांपासून बारा वर्षेपर्यंत आठ अंगुळ प्रमाण लांब बारा वर्षांनंतर बारा अंगुळें प्रमाण लांब असावी.

नळीचे छिद्राचें प्रमाण.

मुद्गच्छिद्रंकलायाभंछिद्रंकोलास्थिसन्निभम् ॥ यथासंख्यंभवेन्नेत्रंश्लक्ष्णंगोपुच्छस-न्निभम् ॥ ५९ ॥ आतुरांगुष्ठमानेनमूलेस्थूलंविधीयते ॥ कनिष्ठिकापरीकाहमग्रेच-गुटिकामुखम् ॥ ६० ॥ तन्मूलेकर्णिकेद्वेचकार्येभागाच्चतुर्थकात् ॥ योजयेत्तत्रबस्तिं चबंधद्वयविधानतः ॥ ६१ ॥

जी सहा अंगुळ प्रमाण नळी आहे तिचें छिद्र मुगाच्या दाण्याप्रमाणें व जी आठ अंगुळ प्रमाण नळी आहे तिचें छिद्र लाखेचे दाण्याप्रमाणें व जी बारा अंगुळ प्रमाण नळी आहे तिचें बोराचे आंठीप्रमाणें याप्रमाणें क्रमेंकरून नळीचीं छिद्रें करावीं आणि ती नळी चिकण असून गाईचे पुच्छासारखी करावी व त्या नळीचें मूळ रोग्याचे आंगठ्या इतकें मोठें आणि अग्रभागीं करंगुळी इतकी जाडी असून तिचें तोंड वाटोळें करावें व त्या नळीचे तीन भाग टाकून चवथे भागीं मूळाचे ठायीं दोन कर्णिका कमळपत्रासारिख्या करून हरिणादिकाचे अंडाचा बस्ति तेथें योजून त्या कर्णिकेशीं बस्तीला दोहों बंधनेंकरून बांधून संधि मिळवाव्या.

बस्ति कोणाचे अंडाचा असावा तो प्रकार.

मृगाजसूकरगवांमहिषस्यापिवाभवेत् ॥ मूत्रकोशस्यबस्तिस्तुतदलाभेनचर्मजः ॥ ॥ ६२ ॥ कषायरक्तः सुमृदुर्बस्तिःस्निग्धोदृढोहितः ॥

हरीण व बोकड व डुक्कर व बैल अथवा टोणगा यांचे अंडाचा बस्ती योजावा. ते न मिळेल तर यांचेच अंगाच्या कातड्याचा बस्ती योजावा आणि तो बस्ती बोर व तरवड इत्यादिकांचे सालीचे काढ्यांत रंगविलेला असून मृदु व चिक्कण व बळकट असा असावा.

व्रण बस्तीचें प्रमाण.

व्रणवस्तेस्तुनेत्रंस्यात्श्लक्ष्णमष्टांगुलोन्मितम् ॥ ६३ ॥ मुद्गच्छिद्रंगृध्रपक्षनलिकापरिणाहिच ॥

व्रणाविषयीं जो बस्ती योजावयाचा त्याची नळी ती आठ अंगुळ प्रमाण लांब व चिक्कण व तिचें छिद्र मुगा इतकें व गिधाडाचे पक्षाला नळी असते तितकी मोठी जाणावी.

बस्तीचे गुण.

शरीरोपचयंवर्णंवलमारोग्यमायुषः ॥ ६४ ॥ कुरुतेपरिवृद्धिंचवस्तिसम्यगुपासितः ॥

बस्तीचें उत्तम प्रकारें सेवन केलें असतां शरीराची वृद्धि व कांति व बळ व आरोग्य व आयुष्याची वृद्धि हे गुण उत्पन्न होतात.

बस्तीचा सेवनकाल.

दिवसांतेवसंतेचस्नेहेवस्तिःप्रदीयते ॥६५॥ ग्रीष्मवर्षाशरत्कालेरात्रौस्यादनुवासनम् ॥ नचातिस्निग्धमशनंभोजयित्वानुवासयेत् ॥ ६६ ॥ मदंमूर्छांचजनयेत्द्विधास्नेहः-प्रयोजितः ॥ रुक्षंभुक्तवतोत्यन्नंवलंवर्णंचहीयते ॥ ६७ ॥

वसंतऋतूचे ठायीं स्नेहबस्ती म्हणजे अनुवासनबस्ती तो सायंकाळीं योजावा. ग्रीष्मऋतु, वर्षाऋतु व शरदृतु यांचे ठायीं रात्रीस योजावा व रोग्यास फार स्निग्ध भोजन देऊन अनुभवासन बस्तीचा प्रयोग करूं नये. तेणेंकरून मद व मूर्च्छा हे उत्पन्न होतात. व फार रुक्ष भोजन देऊन बस्तीचा प्रयोग केला असतां बल व कांति यांची हानि होते. याप्रकारें दोहों प्रकारचा बस्ती योजिला असतां हे उपद्रव होतात असें जाणावें.

बस्तीचे ठायीं हीन मात्रा व अतिरिक्त मात्रा त्यांचें फळ.

हीनमात्रावुभौवस्तीनातिकार्यकरौस्मृतौ ॥ अतिमात्रौतथानाहक्लमातीसारकारकौ ॥ ६८ ॥

अनुवासनबस्ती व निरूहबस्ती यांची अल्प मात्रा जाहली असतां यांजपासून फार कार्य होत नाहीं म्हणजे रोग चांगले दूर होत नाहींत व यांची फार मात्रा जाहली असता आनाहरोग व ग्लानि व अतिसार हे रोग उत्पन्न होतात.

उत्तमादिकांची मात्रा.

उत्तमस्यपलैःषड्भिर्मध्यमस्यपलैस्त्रिभिः ॥ पलार्धेनहीनस्यप्रयुक्तामात्रानुवासने ॥ ६९ ॥

उत्तमप्रकारचें आहे बळ ज्याला त्याची मात्रा अनुवासना बस्तीचे ठायीं सहा पळ प्रमाण जाणावी. व मध्यम बळ मनुष्य जो त्याची मात्रा तीन पळ प्रमाण जाणावी. व हीन बळ मनुष्य जो त्याची मात्रा दीड पळ प्रमाण जाणावी.

स्नेहाचे ठायीं सैंधवादि मात्रेचें मान.

शताव्हासैंधवाभ्यांचदेयंस्नेहेचचूर्णकम् ॥ तन्मात्रोत्तममध्यांत्याःषट्चतुर्द्वयमाषकैः ॥७०॥

शतावरी व सैंधव यांचें चूर्ण अनुवासनबस्तीचे ठायीं द्यावयाचें त्याची मात्रा

जी सहा मासे प्रमाण ती उत्तम व जी चार मासे प्रमाण ती मध्यम व जी दोन मासे प्रमाण ती कनिष्ठ याप्रकारें मात्रा जाणाव्या.

ढाळकादि दिल्यानंतर अनुवासन बस्ती द्यावयाचा प्रकार

विरेचनात्सप्तरात्रेगतेजातबलायच ॥ भुक्तान्नायानुवास्यायबस्तिर्देयोऽनुवासनः ॥ ७१ ॥

मनुष्याला ढाळक देऊन सात दिवस गेल्यानंतर बळ आल्यावर त्याला भोजन देऊन अनुवासन नामक बस्तीविषयीं योग्य जो मनुष्य त्याला अनुवासन बस्ती योजावा.

अथत्रानुवास्यंस्वभ्यक्तमुष्णांबुस्वेदितंशनैः ॥ भोजयित्वायथाशास्त्रंकृतचंक्रमणंततः ॥ ७२ ॥ उत्सृष्टानलविण्मूत्रंयोजयेत्स्नेहबस्तिना ॥ सुप्तस्यवामपार्श्वेनवामजंघाप्रसारिणः ॥ ७३ ॥ कुंचितापरजंघस्यनेत्रस्निग्धोगुदेन्यसेत् ॥ बध्वाबस्तिमुखसूत्रं वामहस्तेनधारयेत् ॥ ७४ ॥ पीडयेद्दक्षिणेनैवमध्यवेगेनधीरधीः ॥ जृंभाकासक्षवादींश्च बस्तिकालेनकारयेत् ॥ ७५ ॥

अनुवासनबस्तीविषयीं जो योग्य मनुष्य त्याचे अंगाला तेल लावून उष्ण पाण्यानें अंगाचा हलका घाम काढून त्याला यथाशास्त्र भोजन देऊन अंमळसा इकडे तिकडे हिंडवून त्याला मुताायला व शौचाला होत असल्यास बसवून व वायु सरत असल्यास सरवून व बस्तीचे ठायीं योजावा. आणि त्याला डावे कुशीस निजवून डावा पाय लांब पसरवून उजवा पाय आखडून धरवावा, आणि गुद स्निग्ध करून बस्तीची नळी बस्ति मुखाचे ठायीं दोऱ्यानीं बांधून त्या नळीला गुदाचे ठायीं ठेवावी, आणि कुशळ वैद्यानीं ती नळी डावे हातानें धरून उजवे हातानें मध्यम वेगेंकरून पीडन करावें ह्मणजे चिपनळ्या माराव्या व बस्तीकालीं जांभई व खोकला व शिंकादिक हीं रोग्यास येऊं देऊं नयेत.

चिपनळ्या मारण्याविषयीं काळ

त्रिंशन्मात्रामितःकालःप्रोक्तोबस्तेस्तुपीडने॥ततःप्रणिहितःस्नेहउत्तानोवाक्शतंभवेत् ७६

चिपनळ्या मारण्याविषयीं तीस मात्रापर्यंत काळ जाणावा आणि तो स्नेह अभ्यंतरीं प्राप्त जाहला असता शंभर आंख मोजे तोंपर्यंत उताणें निजावें. त्या मात्रेचें प्रमाण पुढील श्लोकांत आहे.

किती काळाची मात्रा होते त्याचें प्रमाण

जानुमंडलमावेष्ट्यकुर्याच्छोटिकयायुतम् ॥ सकामात्राभवेदेपासर्वत्रैपविनिश्चयः ॥७७॥

गुडघ्यावरता स्पर्श लागे असा हाताचा फेरा फिरवून चिटकी मारावी इतक्या काळाची एक मात्रा जाणावी, असा निश्चय सर्वत्र आहे असें जाणावें

चिपनळ्या मारल्यानंतरची क्रिया

प्रसारितैःसर्वगात्रैर्यथावीर्यंप्रसर्पति ॥ ताडयेत्तलयोरेनंत्रीन्वारांश्चशनैःशनैः ॥ ७८ ॥ स्फिजश्चैवततःश्रोणींशय्यांचैवोत्क्षिपेत्ततः ॥ जातेविधानेतु ततःकुर्यान्निद्रांयथासुख ॥ ७९ ॥

चिपनळ्या मारल्यानंतर रोग्याकडून हस्तपादादिक सर्व गात्रें ढिलीं सोडवून लांब करावीं. तेणेंकरून रसादिक धातु आपल्या स्थानाप्रत जातात व रोग्याचे हातापायांचे

तळव्यांना तीन वेळ हलक्या हलक्या टाळ्या माराव्या. तशांत मांड्यांचे ठायीं व कटि पश्चात्भागाचे ठायीं तीन वेळ टाळ्या मारून त्याला पलंगावर बसवावा. याप्रकारचा विधि जाहल्यानंतर रोग्यानें स्वस्थ निद्रा करावी.

वस्तिकर्म चांगलें जाहलें असतां त्याचे गुण.

सानिलःसपुरीषश्चस्नेहःप्रत्येतियस्यतु ॥ उपद्रवंविनाशीघ्रंससम्यगनुवासितः ॥ ८० ॥

गुदाचे आंत गेला जो स्नेह तो वायु व मळ इहींशीं सहवर्तमान उपद्रवावांचून लवकर बाहेर आला असतां त्या मनुष्यास वस्तिकर्म चांगलें जाहलें असें जाणावें.

स्नेहाचा विकार दूर होण्याविषयीं उपाय.

जीर्णान्नमथसायान्हेस्नेहेप्रत्यागतेपुनः ॥ लघ्वन्नंभोजयेत्कामंदीप्ताग्निस्तुनरोयदि ॥८१॥
अनुवासितायदेयंस्याद्दिनेऽन्हिसुखोदकं॥ धान्यशुंठीकषायोवास्नेहव्यापत्तिनाशनं॥८२॥

गुदावाटे स्नेह निःशेष बाहेर आला असतां आणि जर मनुष्याचा अग्नि प्रदीप्त आहे तर त्याला सायंकाळीं जुनें अन्न असून किंचित् मितीचें आहारापेक्षां कमी असें पथ्यास द्यावें आणि अनुवासित मनुष्य जो त्याला दुसऱ्या दिवशीं सुखोदक द्यावें ह्मणजे कोमट पाणी प्यावयास द्यावें अथवा धणे व सुंठ यांचा काढा करून द्यावा तेणेंकरून स्नेहाचा विकार दूर होतो.

वातादि दोषांचे ठायीं चिपनळ्या मारावयाचें प्रमाण.

अनेनविधिनाषड्वासप्तवाष्टौनवापिवा ॥ विधेयावस्तयस्तेषामंतेचैवनिरूहणं ॥८३॥

पूर्वोक्त विधीकरून वातादिक दोषांचे ठायीं सहावेळ अथवा सातवेळ अथवा आठवेळ अथवा नऊवेळ चिपनळ्या माराव्या त्या चिपनळ्याचे अंतीं निरूह वस्ति योजावा.

वस्तीचे गुण.

दत्तस्तुप्रथमोवस्तिस्नेहयेद्वस्तिवंक्षणेः ॥ सम्यग्दत्तोद्वितीयस्तुमूर्धस्थमनिलंजयेत् ॥ ८४ ॥ बलंवर्णंचजनयेत्तृतीयस्तुप्रयोजितः ॥ चतुर्थपंचमौदत्तौस्नेहयेतांरसासृजि ॥८५॥षष्ठोमांसंस्नेहयतिसप्तमोमेदएवच अष्टमोनवमश्चापिमज्जानंचयथाक्रमम्॥८६॥ एवंशुक्रगतान्दोषान्द्विगुणःसाधुसाधयेत्॥अष्टादशाष्टादशकान्वस्तीनांयोनिषेवते८७ सकुंजरबलोऽश्वंजयेत्तुल्योऽमरप्रभः ॥

प्रथम चिपनळी मारली असतां ती वस्ती वंक्षण ह्मणजे अंड संधिद्वारा शरीराचे ठायीं स्नेहन करिते ह्मणजे धातु वाढविते. दुसरी चिपनळी दिली असतां मस्तकांतील वायू दूर होतो, तिसरी चिपनळी दिली असतां शरीराचे ठायीं बळ व कांति हीं येतात, चवथ्यानें, पांचव्यानें, चिपनळी मारली असतां रस व रक्त यांची वृद्धि होते, सहाव्यानें, सातव्यानें चिपनळी दिली असतां मांसाला व मेदाला स्निग्धपणा येतो, आठव्यानें व नवव्यानें, चिपनळी दिली असतां मज्जेला व श्लोकांत चकार आहे तेणेंकरून शुक्रधातूला स्निग्धपणा येतो. याप्रकारें द्विगुण ह्मणजे अठरा चिपनळ्या दिल्या असतां शुक्रधातुगत जे दोष त्यांचा नाश होतो व जो मनुष्य छत्तीस चिपनळ्यांचें सेवन करितो त्याला हत्तीसारखें बळ येऊन वेगानें अश्वाला देखील जिंकील आणि देवासारखी कांति होते.

अनुवासन वस्ती व निरूह वस्ती हे कोणास द्यावयाचे ते प्रकार.

रुक्षायबहुवातायस्नेहबस्तिंदिनेदिने ॥ ८८ ॥ दद्याद्वैद्यस्तथान्येषामन्यांबाधामपा-
हरेत् ॥ स्नेहोल्पमात्रोरुक्षाणांदीर्घकालमनत्ययः ॥ ८९ ॥ तथानिरुहस्निग्धाना-
मल्पमात्रःप्रशस्यते ॥

रुक्ष असून जो फार वायूनें पीडित मनुष्य त्याला वैद्यानी दिवसादिवसाचे ठायीं स्नेहबस्ती द्यावा ह्मणजे स्नेहाच्या चिपनळ्या नित्य माराव्या. त्याप्रकारें अन्येषा ह्मणजे स्निग्ध व स्थूलादिक मनुष्य जे त्यास अन्या ह्मणजे निरूहण बस्ती तो दिवसादिवसाचे ठायीं द्यावा तेणेंकरून बाधा ह्मणजे रोग तो दूर होतो व रुक्ष मनुष्य जे त्यास स्नेहबस्ती थोडा द्यावा ह्मणजे स्नेहाची हलकी चिपनळी मारावी, परंतु रोगी बहुत दिवस वांचायाचा आहे तर स्निग्ध मनुष्य जो त्यास निरूह बस्ति थोडा द्यावा.

एकलाच स्नेह बाहेर आला असतां उपाय

अथवायस्यतत्कालंस्नेहोनिर्यातिकेवलः ॥९०॥ तस्यान्योन्यतरोदेयोनहिस्निग्धस्यतिष्ठति॥

स्निग्ध मनुष्य जो त्याचे गुदावाटें चिपनळ्या मारिल्यावर लागलाच स्नेह बाहेर येतो, ठरत नाहीं, यास्तव स्नेहबस्ती देऊन लागलाच निरूह बस्ती द्यावा असे पाहून दोहों प्रकारचे बस्ती द्यावे

स्नेह बाहेर येत नाहीं त्याचे उपद्रव व उपाय

अशुद्धस्यमलोन्मिश्रःस्नेहोनैतियदापुनः ॥ ९१ ॥ तदाशैथिल्यमाध्मानं-
शूलश्वासश्चजायते ॥ पक्काशयोगुरुत्वंचतत्रदद्यान्निरूहणं ॥ ९२ ॥ तीक्ष्णती-
क्ष्णौषधियुताफलवर्तींर्हितातथा ॥ यथानुलोमनंवायुर्मलस्नेहश्चजायते ॥ ९३ ॥
तथाविरेचनंदद्यात्तीक्ष्णंनस्यंचशस्यते ॥

ढाळक व वमन इत्यादिक होऊन ज्या मनुष्याची शुद्धि केली नाहीं त्याचे गुदावाटें मळमिश्रित स्नेह जर बाहेर आला नाहीं तर शरीराला शिथिलपणा व आध्मान ह्मणजे पोटफुगी व शूळ व श्वास व पक्काशयाचे ठायीं जडपणा हे उपद्रव होतात. हे दूर होण्याविषयीं तीक्ष्ण असा निरूहण बस्ति योजावा याप्रकारें तीक्ष्ण औषधेंकरून युक्त अशी फलवर्ती जेणेंकरून वायु अधोगामी होऊन मळमिश्रित स्नेह गुदावाटें बाहेर येई अशी योजावी व तसेच तीक्ष्ण ढाळक व तीक्ष्ण नस्यें हीं योजावीं.

स्नेहबस्ती ज्याला उपद्रव करीत नाहीं त्याचें विधान

यस्यनोपद्रवंकुर्यात्स्नेहबस्तिरनिःसृतः॥९४॥सर्वोल्पोव्यावृतेरौक्ष्यादुपेक्ष्यःसविजानता ॥

स्नेहबस्ती ह्मणजे स्नेहाची चिपनळी ती गुदात घातल्यानंतर गुदाचा संपूर्ण भाग व्यावृत ह्मणजे व्यापून राहिली होतसाती अथवा मनुष्यास रुक्षपणा आहे ह्मणोन गुदाचा एक देश व्यापून राहिली होतसाती शूळादिक उपद्रव करीत नाहीं ती चिपनळी ह्मणजे स्नेहबस्ती तो बहुत वेळ तसाच ठेवावा.

अहोरात्रांत स्नेह बाहेर आला नाहीं तर त्याजवर उपाय

अनायातेत्वहोरात्रेस्नेहंस्यात्संशोधनैर्हरेत्॥९५॥स्नेहबस्तावनायातेद्वाभ्यांस्नेहोविधीयते ॥

स्नेहाची चिनपळी मारिली असतां जो स्नेह बाहेर येत नाहीं त्याला दोन वेळ पिच-नळ्या मारून स्नेह बाहेर येईसें करावें व जो स्नेह अहोरात्रांमध्यें बाहेर येत नाहीं त्याला ढाळक देऊन बाहेर येईसा करावा.

अनुवासन तेल.

गुडूच्येरंडपूतीकभार्गीवृषकरोहितम् ॥९६॥ शतावरीसहचरंकाकनासापलोन्मितम् ॥ यवमाषातसीकोलकुलित्थान्प्रसृतोन्मितान् ॥ ९७ ॥ चतुर्द्रोणांभसापक्त्वाद्रोण शेषेणतेनच ॥ पचेत्तैलाढकेपेष्यैर्जीवनीयैःपलोन्मितैः ॥ ९८ ॥ अनुवासनमेतत्विसर्वैवातविकारनुत् ॥

गुळवेल १ एरंडमूळ २ करंजसाल ३ भारंगमूळ ४ आडुळसा ५ रोहिसतृण ६ शतावरी ७ कोऱ्हांटा ८ कावळी ९ हीं नऊ औषधें पळ पळ प्रमाण, जव, उडीद, आळशी, बोरीचें बीज, व कुळिथ हीं पांच औषधें दोन दोन पळें हीं सारीं औषधें कुटून त्यांत पाणी चार द्रोण घालून एक द्रोण पाणी राहीं तोंपर्यंत काढा करून त्यांत तिळाचें तेल एक आढक परिमित घालावें आणि जीवनीय गणाचीं औषधें पळ पळ प्रमाण घेऊन चूर्ण करून बारीक वांटून त्या तेलांत घालून फिरून कढवावें आणि काढा आटून तेल राहिलें म्हणजे खालीं उतरून तेल गाळून घ्यावें. याला अनुवासन तेल म्हणतात. हें तेल संपूर्ण वायूचे रोग दूर करितें, असें जाणावें.

अनुवासनबस्तीमध्यें विपर्यास होऊन जे रोग होतात ते.

षट्सप्ततिःस्युरापदस्तुजायंतेबस्तिकर्मणः ॥९९॥ दूषितात्तत्प्रशान्त्येतच्चिकित्सां सुश्रुतात् ॥

बस्ति कर्मामध्यें दोषरूप कांहीं विपर्यास होऊन त्यापासून शहात्तर प्रकारचे रोग उत्पन्न होतात. त्यांची चिकित्सा सुश्रुत ग्रंथाचे ठायीं आहे त्याजवरून करावी.

बस्तिकर्माचेठायीं पथ्य.

पानाहारविहाराश्चपरिहाराश्चकृत्स्नशः ॥२००॥ स्नेहपानसमाःकार्यानात्रकार्याविचारणा ॥

अन्नपान आणि विहारादिक यांचें आचरण जसें स्नेहपानाचे ठायीं सांगितलें आहे तसें सर्व प्रकारें या स्नेहबस्तीचे ठायीं करावें; याविषयीं विचार करूं नये.

---

# षष्ठोऽध्यायः।

निरूहबस्तीचा विधि.

निरूहबस्तिर्बहुधाभिन्नःकारणांतरैः ॥ २०१ ॥ नैरूहनप्यनामानिरूहनामनिर्मुनिपुंगवैः ॥

निरूह बस्ति कारणभेदेंकरून अनेक प्रकारचा होतो आणि जसें जसें कारणाचें नांव असेल तसें तसें त्याचीं नांवें होतात. उदाहरण उत्क्लेशन बस्ति दोषहरबस्ति दोषशमनबस्ति इत्यादिक नांवें जाणावीं.

निरूहबस्तीचें दुसरें नाम.

निरूहस्यापरंनामप्रोक्तमास्थापनंबुधैः ॥२०२॥ स्वस्थानस्थापनाद्दोषधातूनांस्थापनंमतम् ॥

निरूह बस्तीचें दुसरें नाम आस्थापन असें जाणावें. त्याची व्युत्पत्ति दोष व रसादिक धातु यांना आपल्या स्वस्थानीं बसविते ह्मणोन त्याला आस्थापन ह्मणतात व वातादिक दोष अथवा रोग यांना दूर करितो ह्मणोन त्याला निरूह ह्मणतात.

निरूहबस्तीचे ठायीं काढ्यादिकांचें प्रमाण.

निरूहस्यप्रमाणंतुप्रस्थःपादोत्तरंमतम् ॥ ३ ॥ मध्यमेप्रस्थमुद्दिष्टंहीनस्यकुडवास्त्रयः ॥

निरूहबस्ति देण्याविषयीं कषायादिकाचें प्रमाण सवाप्रस्थ उत्तम व एक प्रस्थ मध्यम, तीन कुडव कनिष्ठ याप्रकारें जाणावें.

जे निरूह बस्तीविषयीं योग्य नाहींत ते.

अतिस्निग्धोत्क्लिष्टदोषोक्षतोरस्कःकृशस्तथा ॥ ४ ॥ आध्मानछर्दिहिक्कार्शःकासश्वा-
सप्रपीडितः ॥ गुदशोफातिसारार्त्तोविषुचीकुष्ठसंयुतः ॥ ५ ॥ गर्भिणीमधुमेही-
चनास्थाप्यश्चजलोदरी ॥

फार स्निग्ध जो मनुष्य तो व ज्याचे ऊर्ध्वगामी दोष जाहले आहेत तो व उरक्षतेंकरून पीडित, कृश, आध्मान ह्मणजे पोटफुगी रोग, ओकारी, उचकी, अर्श, खोकला, श्वास इहींकरून पीडित जो मनुष्य तो गुदाचे ठायीं, पीडा, सूज अतिसार, मोडशी, कुष्ठ, इहींकरून पीडित गर्भिणी स्त्री, मधुमेही व जलोदरी हे रोगी आस्थापन ह्मणजे निरूह बस्ती त्याविषयीं योग्य नाहींत.

निरूहबस्तीविषयीं जे योग्य ते

वातव्याधावुदावर्तेवातासृग्विषमज्वरे ॥६॥ मूर्छातृष्णोदरानाहमूत्रकृच्छ्राश्मरीषुच ॥
वृद्धासृग्दरमंदाग्निप्रमेहेषुनिरूहणम् ॥७॥ शूलेम्लपित्तेहृद्रोगेयोजयेद्विधिवद्बुधः ॥

वातरोग, उदावर्त, वातरक्त विषमज्वर, मूर्छा, तृषा, उदर, आनाहरोग, मूत्रकृच्छ्र, अश्मरीरोग, बहुत दिवसांचे असृग्दर ह्मणजे धुपणी, अग्निमांद्य, परमा, शूलरोग, आम्ल पित्त, व हृद्रोग हे रोग निरूह बस्तीविषयीं योग्य जाणावे.

निरूहबस्ती देण्याचा प्रकार.

उत्सृष्टानिलविण्मूत्रंस्निग्धंस्विन्नमभोजितम् ॥८॥ मध्यान्हेगृहमध्येचयथायोग्यंनिरूहयेत् ॥
स्नेहबस्तिविधानेनबुधःकुर्यान्निरूहणम् ॥ ९ ॥ जातेनिरूहेचततोभवेदुत्कटकासनः ॥
तिष्ठेन्मुहूर्तमात्रंचनिरूहागमनेच्छया ॥ १० ॥ अनायातंमुहूर्तेतुनिरूहशोधनैर्हरेत् ॥

निरूह बस्ती ज्या मनुष्याला द्यावयाचा त्याला मुतायास व शौचास होत असल्यास जाऊं नये असें सांगून व त्याचे कोठ्यात वायूचा फुगारा असला तर तो सरवून कोठा शुद्ध करून त्याचे अंगाला स्नेह पदार्थ लावून थोडा अंगाला घाम काढून त्याला भोजन न देता दोन प्रहरीं घरामध्यें यथायोग्य ह्मणजे जसा ज्या रोगावर बस्ती द्यावयाचा असेल तसा स्नेह बस्तीचे विधानेंकरून निरूहण बस्ती द्यावा. ह्मणजे तेलादिकांच्या पिचनळ्य गुदावाटें माराव्या आणि निरूह बस्तीचें कर्म जाहल्यानंतर तो निरूह बाहेर यावया-

करितां एक मुहूर्तमात्र ह्मणजे दोन घटिकापर्यंत उकिडवें बसावें. जर एका मुहूर्तांत तो निरूह बाहेर आला नाहीं तर त्याला शोधन करून बाहेर येईसा करावा.

निरूह बाहेर आला नाहीं त्याच्या शोधनाचीं औषधें.

निरूहैरेवमतिमान्क्षारमूत्राम्लसैंधवैः ॥ ११ ॥

निरूह बस्ती गुदातून बाहेर आला नसतां जवखार व गोमूत्र व लिंबूचा रस अथवा जंबीराचा रस व सैंधव हीं चार औषधें एकत्र करून गुदाचे ठायीं पुनः निरूह योजावा. तेणेंकरून निरूह बाहेर येतो

ज्याला निरूह बस्ती उत्तम झाला त्याचें लक्षण.

यस्यक्रमेणगच्छंतिविट्पित्तकफवायवः ॥ लाघवंचोपजायेतसुनिरूढंतमादिशेत् ॥१२॥

ज्या मनुष्याला निरूह बस्ती दिला असतां त्याचे मळ व पित्त व कफ आणि वायु हे क्रमेंकरून गुदावाटें बाहेर आले असतां व शरीराला हलकेपणा असता निरूह बस्तीचें कर्म चांगलें झालें असें जाणावें.

ज्याला निरूह बस्ती उत्तम झाला नाहीं त्याचें लक्षण.

यस्यस्याद्बस्तिरल्पाल्पवेगोहीनमलानिलः ॥ मूत्रार्तिजाड्यारुचिमान्दुर्निरूढंतमादिशेत् ॥१३॥

ज्याला निरूह बस्ती दिला आणि त्या बस्तीचा बाहेर येण्याचा वेग अल्प यास्तव मळ व वायु हे जितके बाहेर यावयाचे तितके न आले आणि व थोडे आले, मूत्राचे ठायीं पीडा व शरीराला जडपणा व अरोचक इतक्या लक्षणेंकरून युक्त जो मनुष्य त्याल निरूह बस्ती चांगला झाला नाहीं असें जाणावें.

निरूह बस्ती व स्नेहबस्ती यांचें चांगलें देण्याचें लक्षण

विविक्ततामनस्तुष्टिःस्निग्धताव्याधिनिग्रहः ॥ आस्थापनस्नेहबस्त्योः सम्यग्दानेतुलक्षणम् ॥ १४ ॥ अनेनविधिनायुंज्यान्निरूहंबस्तिदानवित् ॥

रोग्याचे अंगास हलकेपणा व मनाचा संतोष व अंगाला घामाचा चिकटा व रोगाचा नाश हें आस्थापन ह्मणजे निरूहबस्ती व स्नेहबस्ती यांचें चांगलें दिल्याचें लक्षण जाणावें. आणि पूर्वोक्त विधीकरून बस्तिकर्म जाणणारा जो वैद्य त्यानें निरूह बस्ति योजावा.

निरूहण बस्ती किती वेळ द्यावा त्याचा प्रकार.

द्वितीयंवातृतीयंवाचतुर्थंवायथोचितम् ॥ १५ ॥ सस्नेहएकःपवनेपित्तेद्वौपयसासह ॥ कषायकटुरूक्षाद्याःकफेकोष्णास्त्रयोमताः ॥१६॥ पित्तश्लेष्मानिलाविष्टंक्षीरयूषरसैः क्रमात् ॥ निरूहंयोजयित्वाचततस्तदनुवासयेत् ॥ १७ ॥

निरूह बस्ती दोन वेळ, अथवा तीन वेळ अथवा चार वेळ जसा दोष असेल तसा योजावा. व वातरोग असतां स्नेहयुक्त निरूह बस्ती एकवेळ द्यावा व पित्तरोग असता दुग्धयुक्त दोन वेळ द्यावा व कफरोग असतां कषाय व कटु व रूक्ष इत्यादिक पदार्थ एकत्र करून किंचित् उष्ण करून तीन वेळ निरूहबस्ती द्यावा. ह्मणजे या औषधाच्या तीन वेळ पिचकाऱ्या माराव्या अथवा कफ व पित्तवायु इहींकरून मनुष्य पीडित असतां दूध व यूष व रस ह्मणजे

मांसरस याचे क्रमेंकरून गुदादिकांचे ठायीं बस्ती द्यावे. नंतर अनुवासन बस्ती द्यावा ह्मणजे स्नेहाच्या चिपनळ्या माराव्या.

सुकुमारादिक मनुष्यांस निरूहबस्तीची योजना.

सुकुमारस्यवृद्धस्यबालस्यचमृदुर्हितः ॥ बस्तिस्तीक्ष्णप्रयुक्तस्तुतेषांहन्यात्बलायुषी ॥१८॥

सुकुमार ह्मणजे नाजूक मनुष्य वृद्ध व बाल यांना मृदु बस्ती द्यावा ह्मणजे हलक्या चिपनळ्या माराव्या आणि यांचे ठायीं तीक्ष्ण ह्मणजे दारुण असा बस्ती योजिला असतां यांचे बळाचा व आयुष्याचा नाश होतो.

आदि मध्य व अंत्य यांचे ठायीं बस्तीची योजना.

दद्यादुत्क्लेशनंपूर्वंमध्येदोषहरंततः ॥ पश्चात्संशमनीयंचदद्याद्बस्तिंविचक्षणः ॥ १९ ॥

प्रथम दोष उचंबळत अशा औषधांचा बस्ती योजावा व मध्यें दोषनाशक अशा औषधांचा बस्ती द्यावा-अंतीं संशमनीय ह्मणजे आपले स्वस्थानीं दोष बसत असा बस्ती द्यावा. ह्मणजे अशा औषधांच्या चिपनळ्या माराव्या.

दोष उचंबळणाराचा बस्ति.

एरंडबीजंमधुकंपिप्पलीसैंधवंवचा ॥ हपुषाफलकल्कश्चबस्तिरुत्क्लेशनःस्मृतः ॥ २० ॥

एरंडाचें बीज १ मोहाची साल २ पिंपळी ३ सैंधव ४ वेखंड ५ शेरणीचीं फळें ६ हीं द्रव्यें औषधें समभाग घेऊन वाटून कल्क करून दोष उचंबळावयाकरितां हा उत्क्लेशन बस्ति योजावा.

दोषहरबस्ति.

शताव्हामधुकंबिल्वंकौटजंफलमेवच ॥ सकांजिकःसगोमूत्रोबस्तिर्दोषहरःस्मृतः ॥२१॥

शतावरी १ ज्येष्ठमध २ बेलफळ ३ कौटज ४ हीं चार औषधें समभाग घेऊन कांजींत बारीक वांटून त्यांत गोमूत्र मेळवून गुदाचे ठायीं चिपनळ्या माराव्या. तेणेंकरून वातादिक दोषांचें शमन होतें.

शोधनबस्ति.

शोधनद्रव्यनिक्वाथस्तत्कल्कैःस्नेहसैंधवैः ॥ युक्तःखजेनमथितोबस्तयःशोधनाःस्मृताः.२२

निसोत्तरादिक जीं शोधनद्रव्यें त्यांचा काढा करून आणि त्याच औषधांचा कल्क त्या काढ्यांत व सैंधव त्यांत मेळवून दुसीनें खज ह्मणजे रवी त्या रवीनें मंथन करून दोषांचे शोधनाविषयीं बस्ति द्यावे. ह्मणजे चिपनळ्या द्याव्या.

दोषशमनबस्ति.

प्रियंगुर्मधुकोमुस्तास्तथैवचरसांजनम् ॥ सक्षीरःशस्यतेबस्तिर्दोषाणांशमनेस्मृतः ॥२३॥

वाघाटीचें मूळ अथवा राळे १ मोहाची साल २ नागरमोथे ३ रसांजन ४ हीं चार औषधें समभाग घेऊन दुधात बारीक वांटून दोषशमन होण्याविषयीं बस्ति योजावा; ह्मणजे चिपनळ्या माराव्या.

लेखनबस्ति.

त्रिफलाक्वाथगोमूत्रक्षौद्रक्षारसमायुताः ॥ ऊषकादिप्रतीवापैर्बस्तयोलेखनाःस्मृताः ॥२४॥

त्रिफळेचा काढा करून त्यांत गोमूत्र व मध आणि जवखार घालून आणि ऊषकादिक

गणाचे औषधांचें चूर्ण त्यांत मेळवून लेखन ह्मणजे मेदोरोगादिकांचें जें कृशीकरण त्याविषयीं वस्ति योजावा.

वृंहणवस्ति.

वृंहणद्रव्यनिकाथःकल्कैर्मधुरकैर्युतः ॥ सर्पिर्मांसरसोपेतावस्तयोवृंहणामताः ॥ २५ ॥

. मुसळी, गोखरू, कवचबीज इत्यादि जीं वृंहणद्रव्यें ह्मणजे धातुवर्धनद्रव्यें त्यांचा काढा करून त्यांत मोहाची साल व द्राक्षे व डाळिंब इत्यादिक मधुर द्रव्यें जीं त्यांत कल्क व तूप व मांसरस हीं सारीं घालून वर्धन होण्याविषयीं बस्ति योजावा.

पिच्छिलवस्ति.

बदर्यैरावतीसेलुशाल्मलीधन्वनागराः ॥क्षीरसिद्धाःक्षौद्रयुक्तानाम्नापिच्छिलसंज्ञिताः२६

अजोरभ्रैणरुधिरैर्युक्तादेयाविचक्षणैः॥ मात्रापिच्छिलवस्तीनांपलैर्द्वादशभिर्मताः ॥२७॥

बोरीची साल १ नारंगी २ भोकरीची साल ३ सांवरीची साल ४ धमासा ५ सुंठ ६ हीं सहा औषधें समभाग घेऊन दुधांत वांटून त्यांत बोकड व मेंढा व हरिण यांचें रक्त मिश्रित करून कुशलवैद्यांनीं दोष पातळ होण्याविषयीं बस्ति योजावे. याला पिच्छिलबस्ति ह्मणतात. या बस्तीच्या मात्रेचें प्रमाण बारा पळें जाणावें.

निरूहणमात्रेचा विधि.

दत्वादौसैंधवस्याक्षंमधुनःप्रसृतिद्वयम् ॥ विनिमथ्यततोदद्यात्स्नेहस्यप्रसृतित्रयम् ॥ २८ ॥ एकीभूतेततःस्नेहेकल्कस्यप्रसृतिंक्षिपेत् ॥ संमूर्छितेकषायेतुचतुःप्रसृतिसंमितम् ॥ २९ ॥ क्षिप्त्वाविमथ्यदद्याच्चनिरूहंकुशलोभिषक् ॥ वातेचतुःपलंक्षौद्रंदद्यात्स्नेहस्यषट्पलम् ॥ ३० ॥ पित्तेचतुःपलंक्षौद्रंस्नेहस्यचपलत्रयम् ॥ कफेषट्पलकंक्षौद्रंस्नेहस्येवचतुःपलम् ॥ ३१ ॥

प्रथम सैंधव एक अक्ष प्रमाण ह्मणजे कर्ष प्रमाण व मध दोन प्रसृति ह्मणजे चार पळें या दोहोंचें एकाजागीं मर्दन करून नंतर त्यांत तूप अथवा तेल साहा पळें प्रमाण घालून एका जागीं मेळवून त्यांत कल्काचीं जीं औषधें सांगितलीं त्यांचा कल्क करून त्या स्नेहांत मेळवावा अथवा त्या कल्काची संमूर्छित ह्मणजे कढवून काढा करून त्या स्नेहांत मेळवून कुशल वैद्यांनीं निरुहबस्ति योजावा. ह्मणजे गुदाचे ठायीं चिपनळ्या माराव्या. हा निरुहबस्तीचा साधारण विधि जाणावा. विशेष विधी तर वातरोग असतां चार पळ प्रमाण मध व स्नेह साहा पळें प्रमाण हीं एकत्र करून बस्ति योजावा व पित्तरोग असतां मध चार पळें आणि स्नेह तीन पळें प्रमाण हीं एका जागीं करून बस्ति योजावा वें कफरोग असतां मध सहा पळें व स्नेह चार पळें हीं एकत्र करून वस्ति योजावा.

मधुतैलक बस्ति.

एरंडक्काथतुल्यांशंमधुतैलंपलाष्टकम् ॥ शतपुष्पापलार्धेनसैंधवार्धेनसंयुतम् ॥ ३२ ॥ ॥मधुतैलकसंज्ञोयंबस्तिःखजविलोडितः ॥ मेदोगुल्मकृमिप्लीहमलोदावर्तनाशनः ॥३३॥ ॥ बलवर्णकरश्चैववृष्योवृंहणदीपनः ॥

एरंडाचे मुळाचा काढा आठ पळें व मध आणि तेल हीं चार चार पळें व बडीशोप आणि सैंधव हीं अर्धे अर्धे पळ सारीं एकाजागीं खज ह्मणचे रवी त्या रवीनें ढवळावी त्याला मधुतैलकबस्ती ह्मणतात. हा बस्ती गुदाचे ठायीं योजिला असतां येणेंकरून मेदोरोग व गुल्मरोग व कृमिरोग व कवळू व उदावर्तवायु यांचा नाश होतो बल, कांति व स्त्रीविषयीं प्रीति, धातूची वृद्धि यांतें देतो व प्रदीप्त होतो.

दीपनवस्ति.

क्षौद्राज्यक्षीरतैलानांमसृतिःमसृतींभवेत् ॥३४॥ हपुपासैंधवाक्षांशौबस्तिःस्याद्दीपनःपरः॥

मध, तूप व दूध हीं दोन दोन पळें व शेरणी आणि सैंधव हीं दोन औषधें कर्ष प्रमाण घेऊन बारीक वांटून त्या मधांत तुपांत दुधांत कालवून जठराग्नि प्रदीप्त होण्याविषयीं बस्ती योजावा.

युक्तरथवस्ति.

एरंडमूलनिःक्वाथोमधुतैलंससैंधवम् ॥३५॥ एपयुक्तरथोबस्तिःसवचापिप्पलीफलः ॥

एरंडमुळाचा काढा करून त्यांत मध व तेल घालून आणि सैंधव व वेखंड व पिंपळी व गेळीचें फळ हीं चार औषधें समभाग घेऊन चूर्ण करून त्या काढ्यांत मेळवून गुदाचे ठायीं बस्ती योजावा ह्मणजे चिपनळ्या माराव्या याला युक्तरथबस्ती ह्मणतात हा बस्ती सर्व रोगांवर आहे असें जाणावें.

सिद्ध वस्ती.

पंचमूलस्यनिःक्काथस्तैलंमागधिकामधु॥ ३६ ॥ससैंधवःसमधुकःसिद्धबस्तिरितिस्मृतः॥

थोर पंचमुळाचा काढा करून तेल व पिंपळीचें चूर्ण व सैंधव मोहाचे लांकडाच्या आतला सार ह्मणजे गाभा अथवा ज्येष्ठमध हीं सर्व त्या काढ्यांत घालून बस्ती योजावा त्याला सिद्ध बस्ती ह्मणतात, हा बस्ती सर्व रोगांवर द्यावा.

वस्तीचे ठायीं सेव्य पदार्थ व निषिद्ध पदार्थ.

स्नानमुष्णोदकैःकुर्याद्दिवास्वप्नमजीर्णताम् ॥३७॥ वर्जयेदपरंसर्वमाचरेत्स्नेहवस्तिवत् ॥

चिपनळ्या घेणारा मनुष्य जो त्यानें ऊन पाण्यानें स्नान करावें व दिवसां निजूं नये व अजीर्ण होऊं देऊं नये. दुसरीं सर्व आचरणें स्नेहबस्तीसारखीं करावीं.

---

# सप्तमोऽध्यायः ।

उत्तरवस्तीचा विधि.

अतःपरंप्रवक्ष्यामिबस्तिमुत्तरसंज्ञितम् ॥ ३८ ॥ द्वादशांगुलकंनेत्रंमध्येचकृतकर्णिकम् ॥ मालतीपुष्पवृन्ताभंछिद्रंसर्षपनिर्गमम् ॥ ३९ ॥

यानंतर उत्तरबस्तीचें प्रमाण सांगतो. बारा अंगुळ प्रमाण नेत्र ह्मणजे नळी लांबीची

असून त्या नळीचा मध्यभाग कमळपत्राचे कर्णिकेसारखा असावा आणि ती नळी मोगरीचे फुलाइतकी मोठी असून तिचे छिद्र आंत मोहरी जाई इतके असावे.

वयोमानेंकरून मात्रेचें प्रमाण.

पंचविंशतिवर्षाणामधोमात्राद्विकार्षिकी ॥ तदूर्ध्वंपलमानंचस्नेहस्योक्ताविचक्षणैः ॥४०॥

मनुष्याला पंचवीस वर्षे होत तोंपर्यंत बस्तीविषयीं स्नेहाची मात्रा दोन कर्षे प्रमाण विचक्षण वैद्यांनीं योजावी; व पंचवीस वर्षानंतर पळ प्रमाण योजावी.

उत्तरवस्तीची योजना कशी करावी तो प्रकार.

अथास्थापनशुद्धस्यतृप्तस्यस्नानभोजनैः ॥ स्थितस्यजानुमात्रेणपीठेत्विष्टशलाकया ॥ ४१ ॥ स्निग्धयामेंढ्रमार्गेचततोनेत्रंनियोजयेत् ॥ शनैःशनैर्घृताभ्यक्तंमेंढ्रेषडंगुलानिपद् ॥४२॥ ततोवपीडयेद्बस्तिंशनैर्नेत्रंचनिर्हरेत् ॥ ततःप्रत्यागतेस्नेहेस्नेहबस्तिक्रमोहितः ॥ ४३ ॥

आस्थापन ह्मणजे निरूहवस्ती त्या बस्तीकरून शुद्ध झाला आणि स्नान व भोजन इहींकरून तृप्त झाला असा जो त्याला आसनाचे ठायीं गुढगे टेंकून बसवून इष्ट शलाका ह्मणजे यथायोग्य सळई ती सचिकण असून नेत्र ह्मणजे ती सळईची नळी तिला तूप लावून शिश्नमार्गाचे ठायीं योजून त्या नळीचा शिश्नरंध्राचे आंत हलका हलका सहा अंगुळ प्रमाण प्रवेश करून वस्तीचें पीडन करावें ह्मणजे चिपनळी मारावी. नंतर ती नळी हलकी हलकी बाहेर काढावी. नंतर तो स्नेह बाहेर आला असतां उत्तम बस्तिकर्म होय. याप्रकारें स्नेहवस्तीचा क्रम जाणावा.

स्त्रियांस वस्ती देण्याचा प्रकार.

स्त्रीणांकनिष्ठिकास्थूलंनेत्रंकुर्याद्दशांगुलम् ॥ मुद्गप्रवेशंयोज्यंचयोन्यंतश्चतुरंगुलम् ॥ ४४ ॥ द्व्यंगुलंमूत्रमार्गेचसूक्ष्मनेत्रंनियोजयेत् ॥

स्त्रियांस वस्ती देण्याविषयीं नेत्र ह्मणजे बस्तीची नळी ती करंगुळी इतकी मोठी असून दहा अंगुळ प्रमाण लांब व तिचें छिद्र मूग जाई इतकें बारीक करून त्या नळीच्या योनीचे आंत चार अंगुळ प्रमाण प्रवेश करून नंतर चिपनळी मारावी. व स्त्रियांचे मूत्रमार्गाचे ठायीं सूक्ष्म नेत्र ह्मणजे बारीक नळी ती योजून त्या नळीचा दोन अंगुळ प्रमाण त्या मूत्रमार्गांत प्रवेश करून चिपनळी मारावी.

बाळकांस वस्ती देण्याविषयीं प्रमाण.

मूत्रकृच्छ्रविकारेषुबालानांत्वेकमंगुलम् ॥४५॥ शनैर्निःकंपमाधेयंसूक्ष्मनेत्रंविचक्षणैः ॥

बालकांस मूत्रकृच्छ्रविकार झाला असता वैद्यांनीं निःकंप ह्मणजे हात न कापतां बारीक नळी योजून हलका हलका त्या नळीचा शिश्नाचे आंत एक अंगुळ प्रमाण प्रवेश करून चिपनळी मारावी.

स्त्रियांस व बाळकांस वस्ती देण्याविषयीं स्नेहाचे मात्रेचें प्रमाण.

योनिमार्गेषुनारीणांस्नेहमात्राद्विपालिकी ॥ ४६ ॥ मूत्रमार्गेपलोन्मानाबालानांच-

द्विवार्पिकी ॥ उत्तानायैस्त्रियैदद्यादूर्ध्वजान्वैविचक्षणः ॥ ४७ ॥ अप्रत्यगच्छति-भिषक्बस्तावुत्तरसंज्ञिके ॥

स्त्रियांस योनिमार्गाचे ठायीं बस्ती देण्याविषयीं स्नेह मात्रा ह्मणजे स्नेहाचें प्रमाण तें दोन पळ प्रमाण जाणावें. व स्त्रियांच्या मूत्रमार्गाचे ठायीं ती स्नेहमात्रा एक पळ प्रमाण जाणावी. व बाळकांस दोन कर्ष प्रमाण जाणावी आणि उत्तरसंज्ञक बस्तीचे ठायीं कुशल वैद्यांनीं त्या स्त्रियेला उताणी निजवून आणि तिचे गुडघे वरती उचलून धरून नंतर तो स्नेह बाहेर न येई अशी पिचकारी मारावी.

शोधनद्रव्यैंकरून बस्तीचें विधान.

भूयोबस्तिनिदध्याचसंयुक्तःशोधनैर्गणैः ॥ ४८ ॥ फलवर्तिनिदध्याद्वायोनिमार्गेदृढां-भिषक् ॥ सूत्रैर्विनिर्मितास्निग्धांशोधनद्रव्यसंयुताम् ॥ ४९ ॥ वृद्धमानेतथाबस्तौद-द्याद्बस्तिविचक्षणः ॥ क्षीरवृक्षकषायेणपयसाशीतलेनच ॥ ५० ॥ बस्तिःशुक्ररुजः पुंसांस्त्रीणामार्तवजारुजः ॥ हन्यादुत्तरबस्तिस्तुनोचिवामोहिनांकचित् ॥ ५१ ॥

मूत्रकृच्छ्रादिक जे रोग त्याचे ठायीं शोधनद्रव्यें जीं एरंडेल तैलादिक जीं औषधें त्यांचा समुदाय जो तिहींकरून योनिमार्गाचे ठायीं बस्ती द्यावा, ह्मणजे पिचकाऱ्या माराव्या. अथवा फलवर्ती ह्मणजे एरंडबीजादिक जीं औषधें त्याची घट्ट वात करून अथवा सुताची वात करून त्या वातीला एरंडबीजादिक जीं औषधें त्यांचा चोपड करून ती वात योनीचे ठायीं योजावी. जर त्या वातीचे अधोभागीं बस्तिस्थान आहे तें विदग्ध ह्मणजे विकृत झालें असतां उंबर, वड आदिकरून क्षीरवृक्ष जे त्यांचा काढा करून बस्ती योजावा. अथवा थंड दुधाचा योजावा. तेणेंकरून बस्तिस्थान शुद्ध होतें. आणि हा बस्ती शुक्रधातुसंबंधीं ज्या पीडा होतात त्यातें व स्त्रियांस विटाळशीपणासंबंधीं ज्या पीडा होतात त्यातें दूर करितो व ज्या मनुष्यांना परमा आहे त्यांना उत्तरबस्तीचा कचित् उपयोग होत नाहीं असें जाणावें.

बस्तिकर्म झालें असतां त्याचें लक्षण

सम्यग्दत्तस्यलिंगानिव्यापदःक्रमएवच ॥ बस्तेरुत्तरसंज्ञस्यशमनंस्नेहबस्तिना ॥५२॥

उत्तरसंज्ञकबस्ती स्नेहबस्तीकरून उत्तमप्रकारें योजिला असता त्याचें लक्षण क्रमेंकरून शुक्रधातुसंबंधीं ज्या प्रमेहादिक पीडा त्या दूर होतात.

गुदाचे ठायीं फलवर्ति योजना.

घृताभ्यक्तेगुदेक्षेप्याश्लक्ष्णस्वांगुष्ठसंनिभा॥ मलप्रवर्तिनीवर्तिःफलवर्तिस्त्वसास्मृता ॥५३॥

गुदाचे ठायीं तूप लावून रोग्याचे अंगुष्ठ प्रमाण चांगली घट्ट वात करून मळ होण्या-विषयीं एरंडबीजादिक जीं रेचक औषधें त्यांचा त्या वातीला लेप करून ती गुदाचे ठायीं योजावी. हिला फलवर्ति असें ह्मणतात.

# अष्टमोऽध्यायः।

नस्यविधि-

नस्यंतत्कथ्यतेधीरैर्नासाग्राह्यंयदौषधम् ॥ नावनंनस्यकर्मेतितस्यनामद्वयंमतम् ॥९४॥

जें औषध नाकांत घालावयाचें त्याला नस्य ह्मणतात. त्या नस्याचीं नामें नावन आणि नस्यकर्म अशीं दोन जाणावीं.

नस्याचे भेद.

नस्यभेदोद्विधाप्रोक्तोरेचनंस्नेहनंतथा ॥ रेचनंकर्षणंप्रोक्तंस्नेहनंबृंहणंमतम् ॥ ९५ ॥

या नस्याचे भेद दोन. एक रेचन आणि एक स्नेह. त्यामध्यें जें नस्यरेचन तें कर्षण जाणावें ह्मणजे वातादि दोषांचें छेदन करणारें होय व जें स्नेहन तें बृंहण जाणावें ह्मणजे धातुवृद्धि करणारें होय.

नस्याचे काळ.

कफपित्तानिलध्वंसेपूर्वमध्यापराण्हके ॥ दिनस्यगृह्यतेनस्यंरात्रौवाप्युत्कटेगदे ॥९६॥

कफाचे नाशाविषयीं नाकांत औषध प्रातःकाळीं घालावें व पित्ताचे नाशाविषयीं दोन प्रहरीं घालावें व वायूचे नाशाविषयीं सायंकाळीं घालावें व रोगाचें फार बळ, असलें तर नाकांत औषध रात्रीसही घालावें.

नस्याचा विधि.

नस्यंत्यजेद्भोजनांतेदुर्दिनेचापतर्पणे ॥ तथानवप्रतिश्यायीगर्भिणीगरदूषितः ॥९७॥
अजीर्णीदत्तबस्तिश्चपीतस्नेहोदकासवः ॥ क्रुद्धःशोकाभिभूतश्चतृषार्तोवृद्धबालकौ ९८
वेगावरोधीस्नातश्चस्नातुकामश्चवर्जयेत् ॥

नाकांत नस्य घालावयाचें तें भोजन केल्यावर लागलीच व दुर्दिन ह्मणजे अकाळीं अभाळ आलें असतां व लंघन केलें असतां घालूं नये, ज्याला नूतन पीनसरोग आहे तो मनुष्य व गर्भिणी स्त्री व विषदोषेंकरून व अजीर्णेंकरून पीडित मनुष्य व ज्याला बस्तिप्रयोग केला आहे तो व तूप तेल इत्यादिक स्नेह व पाणी व मद्य यांचें सेवन केलेला मनुष्य व क्रोधिष्ट व शोकेंकरून व तृषेंकरून पीडित व वृद्ध व बाल व वातमूत्र मळ यांचा निरोधी व स्नान केलेला व स्नान करावयाचें आहे तो मनुष्य इतक्या मनुष्यांस नस्य देऊं नये.

नस्यकर्माचे ठायीं योग्य व अयोग्य.

अष्टवर्षस्यबालस्यनस्यकर्मसमाचरेत् ॥९९॥ अशीतिवर्षादूर्ध्वंचनावनंनैवदीयते ॥

आठ वर्षांचे बालकास नस्यकर्म करावें ह्मणजे नाकांत औषध घालावें आणि ऐंशीं वर्षांपलीकडे मनुष्याचें नाकांत औषध घालूं नये.

रेचकनस्याचें विधान.

अथैवरेचनंनस्यंग्राह्यंतैलैःसुतीक्ष्णकैः ॥१००॥ तीक्ष्णभेषजसिद्धैर्वास्नेहैःक्वाथैरसैस्तथा ॥

जें रेचनाविषयीं औषध नाकांत घालावयाचें तें ओंवा मोहऱ्या इत्यादिकांचें तीक्ष्ण तेल

काढून नाकांत घालावें अथवा तीक्ष्ण औषध जें तेणेंशी सह स्नेह सिद्ध करून अथवा तीक्ष्ण औषधाचा काढा अथवा रस त्यांत स्नेह सिद्ध करून नाकांत घालावा.

रेचननस्याचे प्रकार.

नासिकारंध्रयोरष्टौपट्चत्वारश्चबिंदवः ॥६१॥ प्रत्येकंरेचनेयोज्याश्रुत्यमध्यांत्यमात्रया ॥

रेचनाविषयीं नाकाचे दोहों छिद्रांमध्यें औषधांचे आठ बिंदू घातले असतां ती उत्तम मात्रा जाणावी. व साहा बिंदू घातले असतां ती मध्यम मात्रा जाणावी. व चार बिंदू घातले असतां ती कनिष्ठ मात्रा जाणावी.

नस्यकर्माचे ठायीं औषधाचें प्रमाण.

नस्यकर्मणिदातव्यंशाणैकंतीक्ष्णमौषधम् ॥६२॥ हिंगुस्याद्यवमात्रंतुमाषैकंसैंधवंमतम् ॥
क्षीरंचैवाष्टशाणंस्यात्पानीयंचत्रिकार्षिकम् ॥६३॥ कार्षिकंमधुरंद्रव्यंनस्यकर्मणियोजयेत् ॥

नस्यकर्माचे ठायीं जें तीक्ष्ण औषध असेल तें एकशाण प्रमाण योजावें. व हिंग एक यवप्रमाण व सैंधव माषप्रमाण व दूध आठ शाण व पाणी तीन कर्ष व साखर, डाळिंब इत्यादिक मधुर द्रव्यें जीं तीं प्रत्येक एक कर्ष प्रमाण याप्रकारें याची योजना करावी.

विरेचननस्याचे दुसरे दोन भेद.

अवपीडःप्रधमनंद्वौभेदावपरौस्मृतौ ॥ ६४ ॥ शिरोविरेचनस्यानेतौद्युदेयौयथायथम् ॥

त्या विरेचननस्याचे भेद दोन. एक अवपीड व एक प्रधमन असे जाणावे. हे मस्तकाचे रेचनाविषयीं योजावे.

अवपीडन व प्रधमन यांचें लक्षण.

कल्कीकृताद्यौषधाद्यःपीडितोनिःसृतोरसः ॥ ६५ ॥ सोवपीडःसमुद्दिष्टस्तीक्ष्णद्रव्यसमुद्भवः ॥ षडंगुलाद्विवक्त्रापानाडीचूर्णंतयाधमेत् ॥ ६६ ॥ तीक्ष्णकोलमितंवक्त्रवातैः प्रधमनंहितम् ॥

तीक्ष्ण औषध वांटून त्याचा कल्क करून पिळून जो रस निघतो त्याला अवपीड म्हणतात व सहा अंगुळें प्रमाण लांब आणि सरळ अशी नळी करून त्यामध्यें तिखट असें चूर्ण कोल प्रमाण घालून तोंडाचे वाऱ्यानें नाकांत फुंकावें त्याला प्रधमन म्हणतात.

रेचन व स्नेहन याचे नस्याविषयीं जे योग्य ते.

ऊर्ध्वजत्रुगतेरोगेकफजेस्वरसंक्षये ॥ ६७ ॥ अरोचकेप्रतिश्यायेशिरःशूलेचपीनसे ॥
शोफापस्मारकुष्ठेषुनस्यंवैरेचनंहितम् ॥६८॥ भीरुस्त्रीकृशबालानांनस्यंस्नेहनदीयते ॥

ऊर्ध्वजत्रुगत रोग व कफसंबंधी स्वरांचा क्षय व अरोचक व पडसें व मस्तकशूळ व पिनस व सूज व अपस्मार व कुष्ठ या रोगांचे ठायीं रेचक नस्य हितकारक जाणावें व भित्रा मनुष्य व स्त्री व कृश मनुष्य व बाल याचे ठायीं स्नेहयुक्त नस्य द्यावें.

अवपीडन नस्याविषयीं जे योग्य ते.

गलरोगेसंन्निपातेनिद्रायांविषमज्वरे ॥ ६९ ॥ मनोविकारेकृमिषुयुज्यतेचावपीडनं ॥

गळरोग व संनिपात व फार झोप व विषमज्वर व मनोविकार व कृमिरोग यांचे ठायीं अवपीडन नस्य योजावें.

प्रधमननस्याविषयीं जे योग्य ते.

अत्यंतोत्कटदोषेषुविसंज्ञेषुचदीयते ॥७०॥ चूर्णंप्रधमनंधीरैस्तद्धितीक्ष्णतरंयतः ॥

अत्यंत उत्कृष्ट दोष ह्मणजे मूर्छा अपस्मारादिक व संज्ञा नष्ट झाली आहे ज्यांपासून असे संन्यासादिक रोग यांचे ठायीं अत्यंत तीक्ष्ण असें प्रधमनसंज्ञक चूर्ण नस्याविषयीं योजावें.

रेचनसंज्ञक नस्य.

नस्यंस्याद्गुडशुंठीभ्यांपिप्पलीसैंधवेनच ॥ ७१ ॥ जलपिष्टेनतेनाक्षिकर्णनासाशिरोगदाः ॥ हनुमन्यागलोद्भूतानश्यंतिभुजपृष्ठजाः ॥ ७२ ॥

सुंठ कोमट पाण्यांत उगाळून त्यांत गूळ मेळवून नाकांत घालावी व पिंपळी व सैंधव हीं कोमट पाण्यांत उगाळून नस्य घावें. ह्मणजे नाकांत घालावें; तेणेंकरून डोळे व कर्ण व मस्तक व हनुवटी व मान व भुज व पाठ यांचे ठायीं ज्या पीडा होतात त्या दूर होतात.

रेचननस्याचा दुसरा प्रकार.

मधूकसारकृष्णाभ्यांवचामरिचसैंधवैः ॥ नस्यकोष्णजलेपिष्टंदद्यात्संज्ञाबोधनं ॥ ७३ ॥ अपस्मारेतथोन्मादेसंनिपातेपतंत्रके ॥

मोहाचे लांकडाचे आंतला सार ह्मणजे गाभा व पिंपळी व वेखंड व मिऱ्यें व सैंधव हीं औषधें कोमट पाण्यांत वांटून नस्य घावें येणेंकरून अपस्मार ह्मणजे फेपरें व उन्माद व सन्निपात व अपतंत्र वायु यांपासून संज्ञा ह्मणजे चेष्टा व प्रबोध ह्मणजे ज्ञान हीं नष्ट होतात तीं दूर होऊन मनुष्य लवकर सावध होतो असें जाणावें.

रेचननस्याचा तिसरा प्रकार.

सैंधवंश्वेतमरिचंसर्षपाःकुष्ठमेवच ॥ ७४ ॥ बस्तमूत्रेणपिष्टानिनस्यंतंद्रानिवारणं ॥

सैंधव व शेगव्याचें बीज व पांढऱ्या मोहऱ्या व कोष्ठ हीं औषधें बोकडाचे मूत्रांत वांटून नस्य घावें. तेणेंकरून तंद्रा ह्मणजे डोळ्यावर झांपड पडते ती दूर होते व पूर्वोक्त अपस्मारादिक रोग दूर होतात.

प्रधमनसंज्ञक नस्य.

रोहीतमत्स्यपित्तेनभावितंसैंधवंवचा ॥ ७५ ॥ मरीचंपिप्पलीशुंठीवंकोलंलशुनंदृरम् ॥ कट्फलंचेतितच्चूर्णंदेयंप्रधमनंबुधैः ॥ ७६ ॥

सैंधव, वेखंड, मिऱ्यें, पिंपळी, सुंठ, वंकोल, लसुण, गुग्गुळ व कट्फळ यांचें चूर्ण करून रोहितसंज्ञक मत्स्य जो त्याच्या पित्ताचें त्या चुर्णाला पुट घावें; आणि पाठल्यावर पूर्वी नळीचें मान सांगितलें आहे त्या रीतीनें नळी घेऊन त्यामध्यें हें चूर्ण घालून नाकांत फुंकावें. येणेंकरून पूर्वोक्त तंद्रादिक रोग दूर होतात. या चूर्णाला प्रधमन असें ह्मणतात.

बृंहणनस्याची कल्पना.

अथबृंहणनस्यस्यकल्पनाकथ्यतेऽधुना ॥ मर्शश्चप्रतिमर्शश्चद्वेभेदौस्नेहनेमतौ ॥७७॥ मर्शःस्यात्तर्पणीमात्राप्रतिमर्शस्तुबिंदुभिः ॥ मध्यमाचचतुःशाणैर्हीनाशाणमितास्मृता ॥७८॥ एकैकस्मिन्तुमात्रेयंदेयानासापुटेबुधैः ॥ मर्शस्यद्विविधंमात्राःस्युर्दशपलदलम् ॥७९॥ एवंविरद्धचंतिवानस्यंदद्याद्विचक्षणः ॥ त्र्यहंपंचाहमथवासप्ताहंवाहर्त्रितः ॥ ८० ॥

बृंहण ह्मणजे धातुवृद्धि करणारें असें नस्य ह्मणजे नाकांत औषध घालवयाचें त्याची कल्पना सांगतों. त्या बृंहणनस्याचे भेद दोन. मर्श व प्रतिमर्श. हे स्नेहनाविषयीं योग्य जाणावे. त्यामध्यें मर्शनस्याची तर्पणी मात्रा जाणावी. ती आठ शाण प्रमाणाची मुख्य मात्रा होय व चार शाणाची मध्यम मात्रा व एक शाणाची हीनमात्रा जाणावी; आणि ती मात्रा दोषाचें बळाबळ पाहून मनुष्याला वस्त्रादिकांनीं वेष्टित करून एकेक्या नाकपुडींत दोन अथवा तीन वेळ अथवा एका दिवसाआड अथवा दोहों दिवसांआड अथवा तीन दिवसा आड अथवा पांचवे दिवशीं अथवा सातवे दिवशीं घालावी.

मर्शसंज्ञक नस्य व विरेचनसंज्ञक नस्य यांचें आधिक्य होऊन जे रोग होतात त्यांजवर उपाय.

मर्शेशिरोविरेकेचस्यापदोविविधाःस्मृताः॥ दोषोत्क्लेशात्क्षयाच्चैवविज्ञेयास्तायथाक्रमम् ॥ ८१ ॥ दोषोत्क्लेशनिमित्तासुयुंज्याद्वमनशोधनम् ॥ अथक्षयनिमित्तासुपथास्वंबृं- हणंमतम् ॥ ८२ ॥

मर्शनस्याची मात्रा धात्वादिकाची तृप्ति करणारी आहे. तिचें आधिक्य होऊन दोषांचा उत्कर्ष झाला असतां व मस्तकाच्या विरेचनाविषयीं विरेचनसंज्ञक नस्याची मात्रा आहे, तिचें आधिक्य होऊन मस्तकातील मेदादिकांचा क्षय झाला असता त्यापासून अनेक प्रकारच्या पीडा होतात त्यामध्यें ज्या दोषाचे उत्कर्षनिमित्त पीडा होतात त्या दूर होण्याविषयीं ओकारीचें व ढाळकाचें औषध द्यावें. व क्षय निमित्त ज्या पीडा होतात त्या दूर होण्या- विषयीं बृंहण ह्मणजे धातुवृद्धि करणारें औषध नाकांत अथवा पोटांत द्यावें.

जे बृंहणनस्याविषयीं योग्य ते.

शिरोनाशाक्षिरोगेषुसूर्यावर्तार्धभेदके ॥ दंतरोगबलेहीनेमन्याबाव्हंसजेगदे ॥ ८३ ॥ मुखशोषेकर्णनादेवातपित्तगदेतथा ॥ अकालपलितेचैवकेशश्मश्रुप्रपातने ॥ ८४ ॥ युज्यतेबृंहणंनस्यंस्नेहैर्वामधुरद्रवैः ॥

मस्तकरोग व नासारोग व नेत्ररोग व सूर्यावर्तरोग व अर्धभेदकरोग ह्मणजे अर्धशिशी व दंतरोग व दुर्बळ मनुष्य व मान व खादे व बाहू यांचे ठायीं ज्या पीडा होतात त्या व मुखशोष व कर्णनादरोग व वातपित्तसंबंधीं विकार व अवकाळीं मनुष्याचे पांढरे केंस होतात तो पलितरोग व मस्तकाचे केंस व मिशाचे केंस गळून पडतात तो इंद्रलुप्तरोग या सर्व रोगांचे ठायीं तूप आदिकरून स्निग्धपदार्थ व साखर आदिकरून जे मधुर पदार्थ आहेत इहींकरून बृंहणनस्याची योजना करावी ह्मणजे धातुवर्धन असें नस्य द्यावें.

पक्षघातादिक रोगांवर नस्य

माषात्मगुप्तारास्नभिबलाऋबुकरोहिषैः ॥८५॥ कृतोष्णंगंधयाक्वाथोहिंगुसैंधवसंयुतः ॥ कोष्णोनस्यप्रयोगेणपक्षाघातंसकंपनं ॥ ८६ ॥ जयेदर्दितवातंचमन्यास्तंभापबाहुकौ ॥

उडीद १ कवचबीज २ रास्ना ३ चिकणामूळ ४ एरंडमूळ ५ रोहिसतृण ६ आसंध ७ या सात औषधाचा काढा करून त्यांत भाजलो हिंग व सैंधव घालून कोमट कोमट त्या काढ्याचें नस्य द्यावें; तेणेंकरून कंपादित पक्षघात वायु व अर्दितवायु व मन्या.स्तंभवायु व अपबाहुकवायु हे दूर होतात.

प्रतिमर्शनस्याची दोन बिंदुरूप मात्रा

प्रतिमर्शनस्यमात्रातुद्विद्विबिंदुमितामता॥८७॥प्रत्येकशोनरतकयोःस्नेहेनेतिविनिश्चितं॥

तूप आदिकरून जे स्निग्ध पदार्थ त्यांचे दोन दोन बिंदु एका एका नाकपुडींत घातले असतां ती प्रतिमर्शनस्याची दोन बिंदुरूप मात्रा जाणावी.

बिंदुसंज्ञक मात्रा.

स्नेहेग्रंथिद्वयंयावन्निमग्नाचोधृताततः ॥८८॥ तर्जनीयंस्रवेत्बिंदुंसामात्राबिंदुसंज्ञिता ॥
एवंविधैर्बिंदुसंज्ञैरष्टभिःशाणउच्यते ॥ ८९ ॥ सदेयोमर्शनस्येतुप्रतिमर्शोद्विबिंदुकः ॥

तूप व तेल आदिकरून जे स्नेह पदार्थ त्यांमध्ये तर्जनीचीं दोन पेरें बुडत अशी तर्जनी बुडवून बाहेर काढून त्या पेरांपासून जो बिंदु पडतो त्याला बिंदुमात्रा ह्मणतात. याप्रकारें बिंदुसंज्ञक आठ मात्रा ज्या त्याचा एक शाण होतो. ती एक शाण मात्रा मर्शनस्याचे ठायीं द्यावी आणि प्रतिमर्शनस्याचे ठायीं दोन बिंदूंची मात्रा द्यावी. इतका मर्शनस्य व प्रतिमर्शनस्य यांचा विशेष जाणावा.

प्रतिमर्शनस्याचे समय.

समयाःप्रतिमर्शस्यतुयैःप्रोक्ताश्चतुर्दश ॥९०॥ प्रभातेदंतकाष्ठांतेगृहान्निर्गमनेतथा ॥
व्यायामाध्वव्यवायांतेविण्मूत्रांतेंजनेकृते ॥ ९१ ॥ कवलांतेभोजनांतेदिवास्वप्नोत्थि-
तेतथा ॥ वमनांतेतथासायंप्रतिमर्शःप्रयुज्यते ॥ ९२ ॥

प्रतिमर्शनस्याचे समय ह्मणजे वेळा त्या चौदा आहेत. एक प्रभातकाळ व तोंड धुतल्यावर व घरांतून बाहेर निघत असता व परिश्रमाचे अंतीं व मार्ग चालून आल्यावर व मैथुनाचे अंतीं व मळ व मूत्र याचे अंतीं व डोळ्यात अंजन केल्यावर व ग्रासाचे व भोजनाचे अंतीं व दिवसास निजून उठल्यावर व ओकारीच्या अंतीं व सायंकाळीं प्रतिमर्शसंज्ञक नस्य द्यावें.

प्रतिमर्शनस्येंकरून जो तृप्त झाला त्याचे लक्षण.

ईषदुच्छिंघनात्स्नेहोयदावक्त्रंप्रपद्यते ॥नस्येनिषिक्तंतंविद्यात्प्रतिमर्शप्रमाणतः॥९३॥
उच्छिंघनंपिबेचेतन्निष्ठीवेन्मुख्यमागतम् ॥

मनुष्याला नस्य दिलें असता इषत ह्मणजे अल्प शिंक येऊन तो स्नेह तोंडांत उतरला असता तो मनुष्य प्रतिमर्शनस्येंकरून तृप्त झाला असें जाणावें. त्या मनुष्यानें तोंडात उतरला जो स्नेह तो गिळूं नये; थुंकून बाहेर टाकावा.

प्रतिमर्शनस्याचे ठायीं योग्य ते.

क्षीणेतृष्णास्यशोषार्तेबालेवृद्धेचयुज्यते ॥ ९४ ॥ प्रतिमर्शेनशाम्यंतिरोगाश्चोर्ध्व-
जत्रुजाः ॥ वलीपलितनाशश्चबलमिंद्रियजंभवेत् ॥ ९५ ॥

धातुक्षीण मनुष्य व तृष्णेंकरून व मुखशोषेंकरून पीडित मनुष्य व बाल व वृद्ध याचे ठायीं प्रतिमर्शसंज्ञक नस्य द्यावें. येणेंकरून उपयोग होतो आणि ऊर्ध्वजत्रुज रोग ह्मणजे मानेच्या मूळाचे ऊर्ध्वमार्गी जे रोग होतात ते व त्वचेला शिथिलपणा येतो तो व अकाळीं पांढरे केंस होतात तो पलितरोग हे सारे रोग हे प्रतिमर्शनस्येंकरून दूर होतात व चक्षुरादिक इंद्रियांना बळ येतें.

अकाळीं पांढरे केंस होतात ते काळे होण्याविषयीं नस्य.

बिभीतनिंबगंभारीशिवाशेलुश्रफाकिनी॥ एकैकंतैलनस्येनपलितंनश्यतिध्रुवम् ॥९६॥

वेहळा, कडुनिंब, शिवण, हर्तकी, भोंवरी, कावळी इतक्या बियांचे आंतले मज्जेचें तेल
वेगळें वेगळें काढून एकेकाची वेगळीं वेगळीं नस्यें द्यावीं. तेणेंकरून मनुष्याचे अवकाळीं
जे पांढरे केंश होतात ते तरुणावस्थेसारखे काळे निश्चयेंकरून होतात.

नस्याचा विधि.

अथनस्यविधिंवक्ष्येनस्यग्रहणहेतवे॥देशेवातरजोमुक्तेकृतदंतनिघर्षणं ॥ ९७ ॥ विशु-
द्धधूमपानेनस्विन्नभालगलंतथा ॥ उत्तानशायिनंकिंचित्प्रलंबशिरसंनरं ॥ ९८ ॥
आस्तीर्णहस्तपादंचवस्त्राच्छादितलोचनम् ॥ समुन्नमितनासाग्रंवैद्योनस्येनयोजयेत्
॥ ९९ ॥ कोष्णमुच्छिन्नधारंचहेमतारादिशुक्तिभिः ॥ शुक्त्यावापत्रयुक्त्यावाप्लोतै-
र्वानस्यमाचरेत् ॥ २०० ॥

नस्य द्यावयाविषयीं नस्याचा विधि सांगतों. ज्या स्थानीं वायु व धुरळा नसेल त्या
स्थानाचे ठायीं मनुष्यानें दंतधावन करून आणि धूमपान करून कपाळ व गळा हे शुद्ध
करून घर्मयुक्त करावे. नंतर उताणें निजवून मस्तक लोंबतें ठेवून हात पाय लांब पसरून
वस्त्रांनीं डोळे झांकावे आणि वैद्यांनीं हस्तेंकरून मनुष्याचें नाक उंच उचलून धरून जें नस्य
घालावयाचें तें कोमट असून त्याची धार एकसारिखी आणि तें नस्य सोनें व रुपें यांचे
पात्रेंकरून व शिंपी व कवडी अथवा पोतेंडी इत्यादिकें करूननाकांत घालावें.

नस्य घातल्यावर कसें असावें तें.

नस्येष्वासिच्यमानेषुशिरोनैवप्रकंपयेत् ॥ नकुप्येन्नप्रभाषेतनोच्छिंदेन्नहसेत्तथा ॥ १ ॥
एतैर्हिविहितःस्नेहोनैवांतःसंप्रपद्यते ॥ ततःकासप्रतिश्यायशिरोक्षिगदसंभवः ॥ २ ॥

मनुष्यानीं नस्य घेतलें असतां मस्तक कांपवूं नये व कोप करूं नये व कोणाशीं भाषण
करूं नये व कांहीं एक पदार्थाचें सेवन करूं नये व हसूं नये. जर याप्रमाणें आचरण केलें
नाहीं तर तो स्नेह मस्तकाचे अभ्यंतरीं चांगला जात नाहीं आणि त्यापासून खोंकला व
पडसें व मस्तक व नेत्र यांना पीडा इत्यादि उपद्रव होतात.

नस्याचे संधारणाचा प्रकार.

शृंगाटकमभिप्लाव्यस्थापयेन्नगिलेद्द्रवम् ॥ पंचसप्तदशैवस्युर्मात्रानस्यस्यधारणे ॥ ३ ॥
उपविश्यायनिष्ठीवेन्नासावक्त्रगतंद्रवम् ॥ वामदक्षिणपार्श्वाभ्यांनिष्ठीवेत्सन्मुखेनहि॥४॥

मनुष्याला नस्य देऊन शृंगाटक ह्मणजे नासावंशाचीं पुढें भ्रूमध्यदेशीं चतुष्पथ
आहे त्यानें त्या नस्यातें भिजवून तें नस्य ठेवावें. त्याचें धारण पांच मात्रा सात
मात्रा अथवा दहा मात्रा काळपर्यंत करविं. नंतर बसलें राहून नाकांतून तोंडांत उतरला
जो द्रव तो डावेकडे अथवा उजवेकडे थुंकावा, समोर थुंकूं नये.

नस्यकर्म जाहल्यानंतर जे वर्जावयाचे ते.

नस्येनीतेमनस्तापंरजःक्रोधंचसंत्यजेत् ॥ शयीतनिद्रांत्यक्त्वाचउत्तानोवाक्शतंनरः
॥ ५ ॥ तथाविरेचनस्यांतेधूमोवाकवलोहितः ॥

नस्याचें कर्म जाहल्यानंतर मनाला संताप येऊं देऊं नये व रज ह्मणजे धूळ जेथें उधळत असेल तेथें बसूं नये व क्रोध करूं नये व झोंप येऊं न देतां शंभर आंख होत तों काळपर्यंत उताणें निजावें. याप्रकारें विरेचननस्याचे अंतीं धूर व ग्रास हे घेऊं नये.

नस्याचे ठायीं शुद्ध्यादिक भेद.

नस्येत्रीण्युपदिष्टानिलक्षणानिसधाम्ततः ॥ ६ ॥ शुद्धिहीनातियोगानिविशेषाच्छास्त्रचिंतकैः ॥

नस्याचे ठायीं शुद्धिलक्षण व हीनयोगलक्षण हीं तिन्हीं लक्षणें विशेषेंकरून शास्त्रवैद्यांनीं सांगितलीं आहेत तीं वक्ष्यमाणलक्षणें संक्षेपेंकरून सांगतों.

उत्तमशुद्धीचें लक्षण.

लाघवंमनसःशुद्धिःस्रोतसांव्याधिसंक्षयः ॥७॥ चित्तेंद्रियप्रसादश्चशिरसःशुद्धिलक्षणम् ॥

नस्येंकरून मस्तकाची चांगली शुद्धि जाहली असतां शरीर हलकें होतें व मनाची शुद्धि व स्रोतस ह्मणजे मुख, नासा, कर्ण, गुद इत्यादिक बहिर्द्वारक मार्ग जे यांचें शोधन होतें व शिरोरोगादिक रोग दूर होतात. व अंतःकरण व चक्षुरादिक इंद्रियें हीं प्रसन्न राहतात.

हीनशुद्धीचें लक्षण.

कंडूपदेहोगुरुतास्रोतसांकफसंस्रवः ॥ ८ ॥ मूर्ध्निहीनविशुद्धेतुलक्षणंपरिकीर्तितं ॥

नस्येंकरून मस्तकाची अल्पशुद्धी जाहली असतां देहाचे ठायीं कंडू व चिकटपणा हीं लक्षणें होतात. व स्रोतस ह्मणजे मुख नासादिक बहिर्द्वारक मार्ग जे त्यांतून कफाचा स्राव होतो.

अतिशुद्धीचें लक्षण.

मस्तुलुंगागमोवातवृद्धिरिंद्रियविभ्रमः ॥९॥ शून्यताशिरसश्चापिमूर्ध्निगाढंविरेचिते ॥

नस्येंकरून मस्तकाची फार शुद्धि जाहली असतां मस्तुलुंग ह्मणजे मस्तकाचे आंतला मगज त्याचा आगम होतो ह्मणजे नासिकादिकांवाटें स्राव होऊं लागतो; व वायूची वृद्धि होते व इंद्रियांना विभ्रम होतो व मस्तकाला शून्यपणा येतो.

हीनशुद्ध्यादिकांचे ठायीं चिकित्सा.

हीनातिशुद्धेशिरसिकफवातघ्नमाचरेत् ॥१०॥ सम्यक्विशुद्धेशिरसिसर्पिर्नस्यंनिषेचयेत्॥

नस्येंकरून मस्तकाची अल्पशुद्धि व फार शुद्धि जाहली असतां कफ व वायुहारक औषधीं नस्यें द्यावीं; व चांगली शुद्धि जाहली असतां त्याचे नाकांत तुपाचें नस्य द्यावें.

अतिस्निग्धलक्षण.

कफप्रसेकःशिरसोगुरुतेंद्रियविभ्रमः ॥ ११ ॥ लक्षणंतदतिस्निग्धेरूक्षंतत्रप्रदापयेत् ॥

नस्येंकरून मनुष्याचा मस्तक फार स्निग्ध जाहला असता कफाचा स्राव व मस्तकाला जडपणा व इंद्रियांना भ्रांति हीं लक्षणें होतात. यांचे ठायीं रूक्षपदार्थाचें नस्य द्यावें.

नस्याचेठायीं पथ्य.

भोजयेच्चानभिष्यंदिनस्याचारिकमादिशेत् ॥ १२ ॥

अभिष्यंदि पदार्थ ह्मणजे प्रशीचें दहीं आदिकरून कफकारक पदार्थ हे भक्षण करूं नयेत; आणि नस्याचे ठायीं जसें शिष्ट आचरण करीत आले तसें आचरण करावें.

पंचकर्माची संख्या

वमनंरेचनंनस्यंनिरूहमनुवासनम् ॥ एतानिपंचकर्माणिकथितानिमुनीश्वरैः ॥१३॥ वमन १ रेचन २ नस्य ३ निरूहबस्ति ४ अनुवासनबस्ति ५ या पांचाना पंचकर्म असें ह्मणतात.

# नवमोऽध्यायः ।

धूमपान विधी

धूमस्तुषड्विधःप्रोक्तःशमनोबृंहणस्तथा ॥ रेचनःकासहाचैववामनोव्रणधूपनः ॥१४॥ धूम सहा प्रकारचे त्यांची नांवें, शमन १ बृंहण २ रेचन ३ कासहा ४ वामन ५ व्रणधूपन ६ याप्रकारें सहा प्रकारचे धूम जाणावे.

शमनादिकधूमाचे पर्यायशब्द

शमनस्यतुपर्यायौमध्यःप्रायोगिकस्तथा ॥ बृंहणस्यापिपर्यायौस्नेहनोमृदुरेवच ॥१५॥

रेचनस्यापिपर्यायौशोधनस्तीक्ष्णएवच ॥

त्या शमनधूमाचे पर्याय शब्द मध्य आणि प्रयोगिक असे दोन जाणावे, व बृंहण धूमाचे पर्याय शब्द स्नेहन आणि मृदु जाणावे व रेचनधूमाचे पर्याय शब्द शोधन आणि तीक्ष्ण जाणावे

धूमाचे सेवनाविषयीं योग्य नाहींत ते.

अधूमार्हाश्चखल्वेतेश्रांताभीतश्चदुःखितः ॥ १६ ॥ दत्तबस्तिर्विरिक्तश्चरात्रौजागरितस्तथा ॥ पिपासितश्चदाहार्तस्तालुशोषीतथोदरी ॥ १७ ॥ शिरोभितापीतिमिरीछर्द्याध्मानप्रपीडितः ॥ क्षतोरस्कप्रमेहार्तःपांडुरोगीचगर्भिणी ॥ १८ ॥ रूक्षःक्षीणोभ्यवहृतःक्षीरक्षौद्रघृतासवः ॥ भुक्तान्नदधिमत्स्यश्चबालोवृद्धःकृशस्तथा ॥ अकालेचातिपीतश्चधूमःकुर्यादुपद्रवान् ॥ १९ ॥

श्रमित मनुष्य व भित्रा व दुःखेंकरून पीडित मनुष्य व ज्याला बस्तिप्रयोग केला आहे तो व ज्याचा कोठा ढाळेंकरून तिक्त जाहला आहे तो व रात्रीचे ठायीं जागरण करणारा मनुष्य व तृषेंकरून व दाहेंकरून पीडित मनुष्य व तालुशोषी व उदररोगी व शिरोभितापेंकरून पीडित व तिमिररोगी व ओकारी व आध्मान ह्मणजे वायूनें पोट फुगतें तो रोग व उरक्षतरोग व परमा व पांडुरोग इहींकरून पीडित मनुष्य व गर्भिणी स्त्री व रूक्ष व क्षीण मनुष्य व दूध मध तूप व आसव ह्मणजे मद्य व अन्न व दहीं व मासळी यांतें भक्षण केलेला मनुष्य व बाल व वृद्ध व दुर्बळ मनुष्य हे धूमपानाविषयीं योग्य नाहींत व अवकाळीं फार धूमपान केलें असता त्यापासून उपद्रव होतात असें जाणावें.

धूमेंकरून उपद्रव जाहले असता त्याजवर काय घ्यावें तें

तत्रेष्टंसर्पिषःपानंनावनांजनतर्पणम् ॥ सर्पिःक्षुरसद्राक्षापयोवाइक्षुशर्करांबुवा ॥ २० ॥ मधुराम्लौरसौवापिशमनायप्रदापयेत् ॥

धूमपानेंकरून उपद्रव झाला असतां त्या मनुष्याला तूप प्यावयास द्यावें, व नाकांत नस्य द्यावें व डोळ्यांत अंजन घालावें. व तर्पण ह्मणजे देहाचे ठायीं तृप्ती करणारा असा द्राक्षादि मंड आहे तो द्यावा व तूप व उसांचा रस व द्राक्ष व दूध साखरेचें पाणी अथवा पाणी अथवा मधुर आणि आंबट पदार्थ हे भक्षणास घावे तेणेंकरून धूमसंबंधी उपद्रव दूर होतात.

धूमाचें सेवन कोणत्या काळीं करावें तें व त्याचे गुण.

धूमश्चद्वादशाद्वर्षात्गृह्यतेऽशीतिकान्नच ॥२१॥ कासश्वासप्रतिश्यायन्मन्याहनुशिरोरुजः ॥ वातश्लेष्मविकाराश्चहन्याद्धूमःसुयोजितः ॥ २२ ॥

धूमाचें सेवन बारा वर्षांपासून ऐंशीं वर्षांपर्यंत करावें. नंतर करूं नये. आणि धूमाची योजना चांगली झाली असतां श्वास व खोकला व पडसें व मान हनवटी व मस्तक यांचे ठायीं पीडा होतात त्या व वातकफसंबंधी विकार हे सारे रोग दूर होतात.

धूमाचा उपयोग झाला असतां प्रकृति कशी होते ती.

धूमोपयोगात्पुरुषःप्रसन्नेंद्रियवाङ्मनः ॥ दृढकेशद्विजःश्मश्रुःसुगंधिवदनोभवेत् ॥२३॥

धूमाचा उपयोग जाहला असतां मनुष्य चक्षुरादिक इंद्रियें व वाचा व अंतःकरण इहींकरून प्रसन्न राहतो. आणि केंस व दांत व श्मश्रु ह्मणजे मिशा व दाढी यांना बळ येतें.

धूमाचेठायीं नळीचें विधान.

धूमनाडीभवेत्तत्रत्रिस्कंधाचत्रिपर्विका ॥ कनिष्ठिकापरीणाहाराजमाषागमांतरा ॥२४॥ धूमनाडीभवेद्दीर्घाशमनेरोगिणोंगुलैः ॥ चत्वारिंशन्मितैस्तद्वत्द्वात्रिंशद्भिर्मृदौस्मृता ॥ २५ ॥ तीक्ष्णेचतुर्विंशतिभिःकासघ्नेषोडशोन्मितैः ॥ दशांगुलैर्वामनीयेतथास्याद्व्रणनाडिका ॥ २६ ॥ कलायमंडलस्थूलाकुलित्थागमरंध्रिका ॥

धूमसेवनाविषयीं नळी तिहीं खंडेंकरून व तीन ग्रंथींकरून युक्त आणि कनिष्ठिका ह्मणजे करंगळी तिचे एवढी जाडी व तिचें छिद्र चवळीचा दाणा आंत जाई असें पोकळ असावें. अशा प्रकारची नळी सामान्य धूमसेवनाविषयीं, ती नळी रोग्याचे चाळीस अंगुळ प्रमाण लांब घ्यावी, व मृदुसंज्ञक जो धूम त्याचे सेवनाविषयीं बत्तीस अंगुळ प्रमाण लांबी घ्यावी व कासंसंज्ञक धूम जो त्याचे सेवनाविषयीं सोळा अंगुळ प्रमाण घ्यावी, व वामनीयसंज्ञक धूम जो त्याचे सेवनाविषयीं दहा अंगुळ प्रमाण घ्यावी. त्या प्रमाणें व्रणाचे धुरीविषयीं जी नळी ती दहा अंगुळें लांब घ्यावी आणि ती नळी लाकेचे दाण्याप्रमाणें जाडी व तिचें छिद्र कुळिथाचा दाणा आंत जाई इतकें बारीक असावें. या प्रकारची नळी व्रणाचे धुरीविषयीं जाणावी.

धूमपानार्थ ईषिकेचें विधान.

अथेषिकांप्रलिंपेचतुश्लक्ष्णांद्वादशांगुलाम् ॥२७॥ धूमद्रव्यस्यकल्केनलेपश्चाष्टांगुलः स्मृतः ॥ कल्ककर्षमितंलिप्त्वाछायाशुष्कंचकारयेत् ॥ २८ ॥ ईषिकामपनीयाथस्नेहाक्तांवर्तिमादरात् ॥ अंगारैर्दीपितांकृत्वाधृत्वानेत्रस्यरंध्रके ॥ २९ ॥ वदनेनपिबेद्धूमंवदनेनैवसंत्यजेत् ॥ नासिकाभ्यांततःपीत्वामुखेनैववमेत्सुधीः ॥ ३० ॥

शरावसंपुटेक्षिप्त्वावल्कंमगारादिपितम् ॥ छिद्रेनेत्रस्रुवेश्याधव्रणांतेनैवधूपयेत् ॥ ३१ ॥

ईषिका ह्मणजे लाव्हयाची कांडी ती बारा अंगुळ प्रमाण घ्यावी आणि धूम घ्यावयाचीं औषधें असतील त्याचा कल्क करून तो कल्क एक कर्ष प्रमाण घेऊन त्या कांडीचे ठायीं आठ अगुळ पर्यंत लेप करावा लेप वाळल्यावर त्या कल्कातून ती कांडी काढून घ्यावी आणि त्या कल्काचे छिद्रात दुसरी स्नेहयुक्त वात घालून अंगारेंकरून पेटवून नळीचे छिद्राशीं धरावी मग त्या नळीकरून तोंडात धूर घेऊन तोंडावाटेंच सोडावा. आणि नासिकेंकरुन धूर घेतला असता तोही तोंडावाटे सोडावा, व शरावसंपुटाचे वरले अंगीं छिद्र पाडून त्यात जळजळीत निखारे घालून त्याजवर व्रणाचे धुरीविषयीं कल्क केला असेल तो घालावा आणि त्या छिद्राचे तोंडावर नळीचें छिद्र ठेवून व्रणाचे ठायीं धुरी द्यावी.

कोणत्या औषधाचा कल्क कोणत्या धूमाचेठायीं द्यावा तो प्रकार

एलादिवल्कशमनेस्निग्धसर्जरसमृदौ ॥ रेचनेतीक्ष्णवल्कंचकासघ्नेक्षुद्रकोषणम् ॥३२॥
वामनेस्नायुचर्माद्यदद्याद्धूमस्यपानवम् ॥ व्रणेनिंबवचाद्यंचधूपनसम्प्रचक्षते ॥ ३३ ॥

शमनसंज्ञक धूम जो त्याचे ठायीं एलादिक औषधाचा गण आहे त्याचा कल्क करून तो द्यावा व मृदुसंज्ञक धूमाचे ठायीं स्निग्ध ह्मणजे घृतादिक जे स्नेह पथार्थ त्यात शिलारस घालून कल्क करून तो द्यावा व रेचनसंज्ञक धूमाचे ठायीं तीक्ष्ण औषध ह्मणजे शिरिष मोहऱ्या इत्यादिक जीं औषधें त्याचा कल्क करून द्यावा. व कासघ्नधूमाचे ठायीं रिंगणी, मिर्च्ये इत्यादिक औषधाचा कल्क करून द्यावा व वामनधूम ह्मणजे ओकारी करविण्याविषयीं जो धूम त्याचे ठायीं स्नायु आणि चर्मादिक याचा कल्क करून तो धूमपानार्थ द्यावा व व्रणाचे ठायीं निंब आणि वेखंड इत्यादिकाचा कल्क करून त्याचा धूम द्यावा.

बालग्रहादिक रोग दूर होण्याविषयीं धुरी

अन्येविधूमागेहेषुवर्तंयारोगशांतये ॥ स्यधामयूरपिच्छनिंबरयदलाणिबृहतीफलम् ॥३४॥ मरिचाहिंगुमांसीचबीजकार्पासंसभवम् ॥ छागरोमाहिनिर्मोकविष्ठाबैडालिकी तथा ॥३५॥ गजदंतश्चतच्चूर्णंकिंचित्घृतविमिश्रितम् ॥ गेहेषुधूपनदत्तसर्वान्बालग्रहान्त्यजेत् ॥ ३६ ॥ पिशाचान्राक्षसान्जित्वासर्वज्वरहरभवेत् ॥

ग्रहाचे ठायीं बालग्रहादि रोग दूर होण्याविषयीं आणखीही धूम करावे त्यामध्यें मयूरपिच्छादि धूम सागतों मोराचें पीस १ निंबाचा पाला २ रिंगणीचें फळ ३ मिर्च्ये ४ हिंग ५ जटामासी ६ कापशीचें बीज ७ बोकडाचे केंस ८ सापाची मेंग ह्मणजे वात ९ माजराची विष्ठा १० हत्तीचा दात ११ या अकरा औषधाचें चूर्ण करून त्यात किंचित् तूप मिश्रित करून घरामध्यें त्या चूर्णाची धुरी दिली असता सपूर्ण बालग्रह व पिशाच्च व राक्षस याचे सर्व उपद्रव दूर होतात व सपूर्ण ज्वर दूर होतात

धूमाचे ठायीं परिहार

परिहारस्तुसंदेहकार्योरेचननस्यवत् ॥३७॥ नेत्राणिधातुजान्याहुर्नलवंशादिजान्यपि ॥

रेचकसंज्ञक नस्याचे ठायीं रोगांचे परिहाराविषयीं जे उपाय सांगितले तेच उपाय या धूमाचे ठायीं करावे व नळीचें तोंड सुवर्णादि धातूचें अथवा देवनळ व बांबू इत्यादिकांचें करावें.

---

# दशमोऽध्यायः ।

गंडूष व कवल व प्रतिसारण यांचा विधि

चतुर्विधःस्याद्गंडूषःस्नैहिकःशमनस्तथा ॥३८॥ शोधनोरोपणश्चैवकवलश्चापितद्विधः ॥

गंडूष चार प्रकारचा. एक स्नैहिक व शमन व शोधन व रोपण या भेदेंकरून जाणावा. व कवलही याच भेदेंकरून चार प्रकारचा जाणावा.

स्नेहिकादिक गंडूषांची दोषभेदेंकरून योजना.

स्निग्धोष्णैःस्नैहिकोवातेस्वादुशीतैःप्रसादनः ॥३९॥ पित्तेकट्वम्ललवणैरुष्णैःसंशोधनःकफम् ॥

कषायतिक्तमधुरैःकटूष्णोरोपणंव्रणे ॥ ४० ॥ चतुःप्रकारोगंडूषःकवलश्चापिकीर्तितः ॥

स्निग्ध आणि उष्ण या पदार्थेंकरून जी चूळ भरणें ती स्नैहिकगंडूष जाणावा, तो वायूचे ठायीं योजावा. व मधुर आणि शीतळ या पदार्थेंकरून प्रसादन म्हणजे शमनगंडूष जाणावा. तो पित्ताचे ठायीं योजावा. व तिखट, आंबट, खारट, उष्ण या पदार्थेंकरून शोधनगंडूष तो कफाविषयीं योजावा. व तुरट कडू व मधुर या पदार्थेंकरून रोपणगंडूष जाणावा, तो कोमट असतां व्रणाचे ठायीं योजावा. याप्रकारें कवलही चार प्रकारचा जाणावा.

असंचारीमुखेपूर्णेगंडूषःकवलश्चरः ॥ ४१ ॥ तत्रद्रवेणगंडूषःकल्केनकवलःस्मृतः ॥

काढे आदिकरून जे द्रव पदार्थ त्या पदार्थेंकरून तोंड भरून येई असा आणि इकडे तिकडे फिरवता येईना अशी चूळ भरून टाकणें त्याला गंडूष म्हणतात व कल्कादि पदार्थ तोंडामध्यें इकडून तिकडे फिरत असे धरणें त्याला कवल म्हणतात.

गंडूष व कवल यांचें औषधाचें प्रमाण.

दद्यात्द्रवेषुचूर्णंचगंडूषेकोलमात्रम् ॥ ४२ ॥ कर्षप्रमाणःकल्कश्चदीयतेकवलेबुधैः ॥

गंडूषाविषयीं जे काढे आदिकरून द्रव द्रव्यें त्यांचे ठायीं चूर्ण एक कोल प्रमाण घालावें. व कवलाचे ठायीं कल्क कर्षप्रमाण योजावा.

रोग्यानें वर्षांत गंडूष धारण करावें व किती करावे त्याचें प्रमाण

धार्यतेपंचमाद्वर्षाद्गंडूषःकवलादयः ॥४३॥ गंडूषान्सुस्थितःकुर्यात्सिन्नमन्यागलादिकः ॥

मनुष्यस्त्रीनथवापंचसप्तवादोषनाशनात् ॥ ४४ ॥

गंडूष व कवलादिक यांचें पांच वर्षांनंतर ग्रहण करावें व मनुष्यांनीं स्वस्थचित्तेंकरून बसून रोग दूर होण्याविषयीं कपाळ व गळा व आदिकरून मुख यांचे ठायीं थोडा घाम येई तावपर्यंत तीन, पांच अथवा सात गंडूष करावे. अथवा दोष दूर होत तोंपर्यंत करावे.

दुसरें गंडूषधारणाविषयीं प्रमाण

कफपूर्णास्यतांयावत्छेदोदोषस्यवाभवेत् ॥ नेत्रघ्राणस्रुतिर्यावत्तावद्गंडूषधारणे ॥४५॥

कफानें तोंड भरून येई तोंपर्यंत अथवा दोषाचें छेदन होईपर्यंत, व नेत्र व नाक यांना पाणी सुटे तोंपर्यंत गंडूष धारण करावें.

वातरोगाचे ठायीं स्नैहिकगंडूष.

तिलकल्कोदकंक्षीरंस्नेहोवास्नैहिकेहितः ॥

तिळाचा कल्क व पाणी व दूध व तेल आदिकरून स्नेहपदार्थ हे स्नैहिकगंडूषाचे ठायीं घ्यावे.

पित्तरोगावर शमनसंज्ञक गंडूष

तिलानीलोत्पलंसर्पिःशर्कराक्षीरमेवच ॥ सक्षौद्रोदनुवक्त्रस्थोगंडूषोदाहनाशनः॥४६॥

तीळ व निळें कमळ व तूप व साखर व दूध हे पदार्थ एका जागीं करून त्यांत मध घालून गंडूष करावें, तेणेंकरून पित्तसंबंधीं हनुवटी व मुख यांचे ठायीं जो दाह होतो तो दूर होतो.

व्रणादिकरोगांवर मधुगंडूष.

वैशद्यंजनयत्यास्येसंदधातिमुखव्रणान् ॥ दाहतृष्णाप्रशमनंमधुगंडूषधारणम् ॥४७॥

मधाचें गंडूष धारण करावें. तेणेंकरून तोंडांत व्रण व चट्टे पडतात व दाह, तृषा हे रोग दूर होऊन मुखाला स्वच्छता येते.

विषादिकाचे ठायीं गंडूष

विषक्षाराग्निदग्धेषुसर्पिर्धार्यंपयोऽथवा ॥

विषदोष व सोमल क्षारादिजन्यविकार व अग्निदग्धजन्यविकार याचे ठायीं तूप अथवा दूध यांचे गंडूष करावें.

दंत हालत असता गंडूष.

तैलसैंधवगंडूषोदंतचालेप्रशस्यते ॥ ४८ ॥

तिळाचें तेल व सैंधव हीं एकत्र करून गंडूष करावें. तेणेंकरून दांत हालत असतात ते घट्ट होतात.

मुखदोषावर गंडूष.

शोषंमुखस्यवैरस्यंगंडूषःकांजिकोजयेत् ॥

मुखशोष व मुखाला विरसपणा याचे ठायीं कांजीचें गंडूष करावें.

कफावर गंडूष.

सिंधुत्रिकटुराजीभिरार्द्रेणकफेहितः॥ ४९ ॥

सैंधव आणि त्रिकटु म्हणजे सुंठ मिऱ्यें पिंपळी व मोहोऱ्या यांचें चूर्ण करून आल्याचे रसांत मेळवून त्याचें गंडूष केलें असता कफदोष दूर होतो.

कफावर व रक्तपित्त यांजवर गंडूष.

त्रिफलामधुगंडूषःकफासृक्पित्तनाशनः ॥

त्रिफळेचें चूर्ण मधांत मेळवून त्याचे गंडूष केले असतां कफ व रक्तपित्त हे दूर होतात.

मुखपाकावर गंडूष.

दार्वीगुडूचीत्रिफलाद्राक्षाजात्यास्त्रपल्लवाः॥ ५० ॥ यवासश्चैतितत्काथःपष्ठांशःक्षौद्रसंयुतः ॥ शीतोन्मुखेधृतोहन्यामुखपाकंत्रिदोषजम् ॥ ५१ ॥

दारुहळद, गुळवेल, त्रिफळा, द्राक्षें, जाईचा पाला, धमासा, हीं औषधें समभाग घेऊन यांचा काढा करून त्या काढ्याचा सहावा भाग मध घालून काढा थंड करून त्याचे गंडूष करावे. तेणेंकरून त्रिदोषजन्य जो मुखपाक तो दूर होतो.

यस्यौषधस्यगंडूपस्तस्यैवमतिसारणम् ॥ कवलश्चापितस्यैवज्ञेयोऽत्रकुशलैर्नरैः ॥ ५२ ॥

ज्या औषधांचा गंडूष त्याच औषधांचें प्रतिसारण जाणावें व कवलही त्याच औषधांचा कुशल वैद्यांनीं जाणावा.

कवलाचा प्रकार.

केशरंमातुलिंगस्यसैंधवव्योपसंयुतम्॥हन्यात्कवलतोजाड्यमरुचिंचकफवातजाम् ॥ ५३ ॥

महाळुंगाचे फळाचे आंतलें केशर व सैंधव व त्रिकटु म्हणजे सुंठ, मिऱ्यें, पिंपळी हीं औषधें एकत्र करून याचा कवल केला असतां तोंड जड होतें तें व कफवातजन्य अरोचक हीं दूर होतात.

प्रतिसारणाचे भेद.

कल्कोवलेहश्चूर्णंचत्रिविधंमतिसारणम् ॥ अंगुल्यग्रगृहीतंचयथास्वंमुखरोगिणाम् ॥५४॥

कल्क व अवलेह व चूर्ण या भेदेंकरून प्रतिसारण तीन प्रकारचें तें मुखरोगी मनुष्यें जीं त्यांस जसा दोष असेल तसें बोटाचे अग्रानें घेऊन जिभेला व सगळ्या तोंडभर चोळावें.

प्रतिसारण चूर्ण.

कुष्ठंदार्वीसमंगाचपाठातिक्ताचपीतिका ॥ तेजनीमुस्तलोध्रंचचूर्णंस्यात्मतिसारणम् ॥५५॥ रक्तस्रुतिंदंतपीडांशोथंदाहंचनाशयेत् ॥

कोष्ठ १ दारुहळद २ धायटीफूल ३ पहाडमूळ ४ कटुकी ५ हळद ६ तेजवळ ७ नागरमोथे ८ लोध्र ९ या नऊ औषधांचें चूर्ण करून जिभेला व सारे तोंडांत बोटाचे अग्रानें घेऊन चोळावें. तेणेंकरून दांतांचे हिरड्यांतून रक्त पडतें तें व दांतांचे ठायीं पीडा होते ती, सूज व दाह हे रोग दूर होतात. या चूर्णाला प्रतिसारण म्हणतात.

गंडूषादिकांचा हीनयोग जाहला असतां लक्षण.

हीनयोगात्कफोत्क्लेशोरसाज्ञानारुचीतथा ॥ ५६ ॥ अतियोगान्मुखेपाकःशोषतृष्णाक्लमोभवेत् ॥

गंडूषादिकांचा हीनयोग म्हणजे अल्पयोग जाहला असतां कफाचें आधिक्य होतें व मधुरादिक रसाचें ज्ञान होत नाहीं म्हणजे यथार्थ स्वाद कळत नाहीं व अन्नादिकांवर अरुचि

व गंडूषादिकांचा फार योग जाहला असतां मुखाचा पाक होतो ह्मणजे तोंड पिकण्या-
खें उतून येतें व शोष व तहान हीं लक्षणें होतात.

शुद्ध गंडूष लक्षणें.

व्याधेरपचयस्तुष्टिर्वैशद्यंवक्त्रलाघवम् ॥५७॥ इंद्रियाणांप्रसादश्चगंडूषेशुद्धिलक्षणम् ॥

गंडूषादिकांचा चांगला योग जाहला असतां व्याधीचा नाश व अंतःकरणाचे ठायीं तोष व मुखाचे ठायीं निर्मळपणा व हलकेपणा व रसनादिक इंद्रियांचे ठायीं प्रसन्नता हीं लक्षणें होतात असें जाणावें.

इति श्रीदामोदरसुनु शार्ङ्गधरेण विरचितायां चिकित्सास्थाने उत्तरखंडे
गंडूषादिविधिर्नाम दशमोऽध्यायः

# एकादशोऽध्यायः

लेपाचा विधि.

आलेपस्यचनामानिलिप्तोलेपश्चलेपनम् ॥५८॥ दोषघ्नोविषहावर्ण्योमुखलेपस्त्रिधामतः ॥
त्रिप्रमाणश्चतुर्भागास्त्रिभागार्धांगुलोन्नतः ॥ ५९ ॥ आर्द्रोव्याधिहरःस्यात्छुष्येद्-
षयतिछविम् ॥

आलेप जो त्याचीं जाणावीं. तो आलेप दोषघ्न लिप्त व लेप व लेपन हीं तीन नामें आलेप जो त्याचीं जाणावीं. तो आलेप दोषघ्न व विषघ्न व वर्ण्य या भेदेंकरून मुखलेप ह्मणजे मुखास लेप तो तीन प्रकारचा जाणावा व त्या लेपांचीं प्रमाणें तीन. एक अंगुळ प्रमाण जो उंच लेप तो दोषघ्न जाणावा व पाऊण अंगुळ प्रमाण उंच लेप तो विषघ्न जाणावा व जो अर्धे अंगुळ प्रमाण उंच लेप तो वर्ण्य जाणावा. अशीं तीन प्रमाणें जाणावीं व जो आर्द्र ह्मणजे ओला लेप तो रोग हरण करणारा जाणावा व जो शुष्क ह्मणजे कोरडा लेप तो शरीराचे कांतीला दूषण देणारा जाणावा.

दोषघ्नलेप.

पुनर्नवादारुशुंठीसिद्धार्थशिग्रुमेवच ॥ ६० ॥ पिष्टावैरनालेनप्रलेपःसर्वशोथहा ॥

पुनर्नवा १ देवदार २ सुंठ ३ शिरिस ४ शेवग्याची साल ५ हीं पाच औषधें सम भाग घेऊन कांजींत वांटून सुजीवर लेप करावा. तेणेंकरून नवां प्रकारची सूज दूर होते.

दाहदाहनाशविषयीं लेप.

बिभिनफलमज्जापालेपोदाहार्तिनाशनः ॥ ६१ ॥

बेहड्याचे फळाचे आंतली मज्जा ह्मणजे मगज तो बारीक वांटून अंगाला लेप केला असता दाहसंबंधी पीडा दूर होते.

वर्ण्यलेप.

शिरीषंमधुयष्टीचतगरंरक्तचंदनम् ॥ एलामांसीनिशायुग्मंकुष्ठंबालुकमेवच ॥ ६२ ॥

इतिसंचूर्ण्यलेपोयंपंचमांशघृतप्लुतः ॥ जलेनक्रियतेसुद्भिर्देशांगइतिसंज्ञितः ॥ ६३ ॥
विसर्पान्विषविस्फोटान्शोथदुष्टव्रणान्जयेत् ॥

शिरिस १ ज्येष्ठमध २ तगर ३ रक्तचंदन ४ इलायची ५ जटामांसी ६ हळद ७ दारुहळद ८ कोष्ठ ९ वाळा १० हीं दाहा औषधें समभाग घेऊन बारीक चूर्ण करून पाण्यांत कालवून रोगस्थलावर लेप करावा. तेणेंकरून विसर्परोग व विषदोष व विस्फोट व सूज व दुष्टव्रण हे रोग दूर होतात आणि या लेपाला दशांगलेप ह्मणतात.

विषघ्नलेप.

अजादुग्धतिलैर्लेपोनवनीतेनसंयुतः ॥ ६४ ॥शोथमारुष्करंहंतिलेपोवाकृष्णमृत्तिकैः॥

शेळीचे दुधांत तीळ वांटून त्यांत लोणी मिश्रित करून लेप करावा अथवा काळी माती व तीळ हीं दोन्ही एकाजागीं वाटून त्यांत लोणी मिश्रित करून लेप करावा. तेणेंकरून भिलावा ह्मणजे बिबवा तत्संबंधीं जी ती सूज दूर होते.

दुसरा प्रकार.

*लांगल्यातिविषालाबूजालिनीबीजमूलकैः ॥ ६५ ॥ लेपोधान्यांबुनापिष्टःकीटविस्फोटनाशनः ॥

कळलांवी १ अतिविष २ कडुदुधी भोंपळीचें बीज ३ कडुदोडकीचें बीज ४ मुळ्याचें बीज ५ हीं पाच औषधें समभाग घेऊन धान्यांबु ह्मणजे कांजी त्यांत वांटून कीटविशेषापासून जाहला जो दंश त्याजवर हा लेप करावा व विस्फोट रोगावर करावा तेणेंकरून विकार दूर होतात.

मुखाचेठायीं कांति करणारा लेप.

रक्तचंदनमंजिष्ठालोध्रकुष्ठप्रियंगवः ॥ ६६ ॥ वटांकुरामसूराश्चव्यंगघ्नामुखकांतिदाः ॥

रक्तचंदन १ मंजिष्ठ २ लोध ३ कुष्ठ ४ कांग ५ वडाचे पारंब्याचे अंकुर ६ मसूरा ७ हे सात वाने समभाग घेऊन पाण्यांत वाटून लेप करावा तेणेंकरून वांगरोग दूर होतो आणि हा लेप मुखाचे ठायीं कांति देतो.

दुसरा प्रकार

मातुलिंगजटासर्पिःशिलागोशकृतोरसः ॥ ६७ ॥ मुखकांतिकरोलेपःपिटिकाव्यंगकालजित् ॥

महाळुंगीचें मूळ व तूप व मनशीळ व गाईचे शेणाचा रस हीं चार औषधें एकत्र करून मुखाचे ठायीं लेप करावा, तेणेंकरून मुखाला कांति येते आणि पुटकुळ्या व वांग व नीलिका हे रोग दूर होतात.

तारुण्यपिटिकेवर लेप.

लोधधान्यवचालेपस्तारुण्यपिटिकापहः ॥६८॥ तद्वद्गोरोचनायुक्तंमरिचंमुखलेपनात् ॥
सिद्धार्थकवचालोधसैंधवैश्चप्रलेपनम् ॥ ६९ ॥

लोध्र व धणे व वेखंड हीं तीन औषधें समभाग घेऊन पाण्यांत वांटून लेप करावा व
रोचन व मिऱ्यें हीं दोन औषधें पाण्यांत वांटून लेप करावा. व शिरिस ह्मणजे मोहऱ्या
वेखंड व लोध्र व सैंधव हीं चार औषधें पाण्यांत वांटून लेप करावा. असे हे तीन
प्रकारचे लेप मुखाचे ठायीं तारुण्यपिटिका ह्मणजे मुरुमाच्या पुटकुळ्या होतात त्या दूर
होण्याविषयीं जाणावें.

वांगरोगावर औषध.

व्यंगेषुचार्जुनत्वग्वामंजिष्ठावासमाक्षिकः ॥ लेपःसनवनीतोवाश्वेताश्वखुरजामषी ॥ ७० ॥

अर्जुनवृक्षाचे सालीचें चूर्ण अथवा मंजिष्ठाचें अथवा पांढरे घोड्याचे खुरसंबंधीं हाडाची
राख हीं तीन औषधें वेगळीं वेगळीं मध व लोणी यांत कालवून वेगळे वेगळे लेप करावे
तेणेंकरून वांगरोग दूर होतात.

तोंडावर काळेपणा असतो त्याजवर लेप.

अर्कक्षीरहरिद्राभ्यांमर्दयित्वाविलेपनात् ॥ मुखकार्ष्ण्यंशमंयातिचिरकालोद्भवंध्रुवम् ॥७१॥

रुईचे दुधांत हळद वांटून लेप करावा तेणेंकरून मुखाचे ठायीं बहुत दिवसाची काळिमा
असते ती दूर होते.

तारुण्यपिटिकादिकांवर लेप.

वटस्यपांडुपत्राणिमालतीरक्तचंदनम् ॥ कुष्ठंकालियकंलोध्रमेभिर्लेपं प्रयोजयेत् ॥७२॥
तारुण्यपिटिकाव्यंगनीलिकादिविनाशनम् ॥

वडाचीं पिकलेलीं पानें व चमेली व रक्तचंदन व कोष्ठ व दारुहळद व लोध्र हीं औषधें
एका जागीं वांटून लेप करावा; तेणेंकरून तारुण्यपिटिका व वांग व नीलिकादिक रोग हे
दूर होतात.

अरूंषिकारोगावर लेप

पुराणमथपिण्याकंपुरीषंकुक्कुटस्यच ॥७३॥ मूत्रपिष्टःप्रलेपोयंशीघ्रंहन्यादरूंषिकाम् ॥

जुनी तिळांची पेंड व कोंबड्याची विष्ठा हीं दोन औषधें गोमूत्रात वाटून लेप करावा
तेणेंकरून अरूंपिका ह्मणजे व्रणविशेष रोग आहे तो दूर होतो.

दुसरा प्रकार

खदिरारिष्टजंबूनांत्वग्भिर्वामूत्रसंयुतैः ॥७४॥ कुटजत्वक्सैंधवंवालेपोहन्यादरूंपिकां ॥

खैर व कडुनिंब व जांभूळ या तिहींच्या सालीचें चूर्ण करून गोमूत्रांत वाटून लेप करावा,
तेणेंकरून अरूंपिका रोग दूर होतो; अथवा कुडेसाल व सैंधव हीं दोन औषधें गोमूत्रांत
वाटून लेप करावा ह्मणजे तो रोग दूर होतो.

दारुणरोगावर लेप

प्रियालबीजमधुरकुष्ठमाषैःससैंधवैः ॥ ७५ ॥ कार्योदारुणकेमूर्ध्निप्रलेपोमधुसंयुतः ॥

चारोळ्या १ ज्येष्ठीमध २ कोष्ठ ३ उडीद ४ सैंधव ५ हीं पाच औषधें समभा-

घेऊन बारीक चूर्ण करून मधांत कालवून मस्तकाचे ठायीं दारुण ह्मणजे दारुणा रोग तो रोग दूर होण्याविषयीं लेप करावा.

दुसरा प्रकार.

दुग्धेनखाखसंबीजंप्रलेपाद्दारुणंजयेत् ॥ ७६ ॥ आम्रबीजस्यचूर्णंतुशिवाचूर्णसमं-द्वयम् ॥ दुग्धपिष्टःप्रलेपोयंदारुणंहंतिदारुणम् ॥ ७७ ॥

खसखस दुधांत वांटून मस्तकाचे ठायीं लेप करावा व आंब्याची कोय व बाळहिरडे हीं दोन्हीं समभाग घेऊन चूर्ण करून दुधांत वांटून लेप करावा तर्णेकरून मोठा दुर्धर असा जो दारुण रोग तो दूर होतो.

इंद्रलुप्तरोगावर लेप.

रसस्तिक्तपटोलस्यपत्राणांतद्विलेपनात् ॥ इंद्रलुप्तंशमंयातित्रिभिरेवदिनैर्ध्रुवम् ॥ ७८ ॥

कडू पडवळाचे पानांचा रस काढून त्याचे तीन लेप करावे तेणेंकरून इंद्रलुप्तरोग निश्चयेंकरून दूर होतो. इंद्रलुप्त ह्मणजे ज्या जाग्यावरील केंस जातात तो रोग.

दुसरा प्रकार.

इंद्रलुप्तापहोलेपोमधुनाबृहतीरसः ॥ गुंजामूलफलंवापिभल्लातकरसोपिवा ॥ ७९ ॥

रिंगणीचा रस काढून त्यांत मध घालून लेप करावा अथवा गुंजेचे मुळाचा अथवा फळाचा रस काढून त्यांत मध घालून लेप करावा अथवा भिलाव्याचे पानाचा रस काढून त्यांत मध घालून लेप करावा, तेणेंकरून इंद्रलुप्तरोग दूर होतो.

केसांची वृद्धि होण्याविषयीं लेप.

गोक्षुरस्तिलपुष्पाणितुल्येचमधुसर्पिषी ॥ शिरःप्रलेपनंतेनकेशसंवर्धनंपरम् ॥ ८० ॥

गोखरूं व तिलपुष्पी हीं दोन औषधें समभाग घेऊन चूर्ण करावें आणि मध व तूप हीं दोन्ही सारखीं घेऊन त्यांत तें चूर्ण कालवून मस्तकाचे ठायीं लेप करावा तेणेंकरून केंस वाढतात.

केस आणण्याविषयीं लेप.

हस्तिदंतमषींकृत्वाछागीदुग्धंरसांजनम्॥रोमाण्येनेनजायंतेलेपात्पाणितलेष्वपि ॥८१॥

हस्तिदंत जाळून त्याची राख व रसांजन हीं दोन्हीं शेळीचे दुधांत वांटून ज्या जाग्यावरचे केंस गेले असतील तेथें लेप करावा, तेणेंकरून केंस येतात, हा लेप हाताचे तळव्यावर केला असतां केस येतात.

इंद्रलुप्तरोगावर लेप.

यष्टींदीवरमृद्वीकातैलाज्यक्षीरलेपनैः ॥ इंद्रलुप्तःशमंयातिकेशाःस्युःसघनादृढाः ॥ ८२ ॥

ज्येष्ठीमध व कमळ व द्राक्षें हीं तीन औषधें तिळाचें तेल व गाईचें दूध व तूप यांत वाटून लेप करावा, तेणेंकरून इंद्रलुप्तरोग दूर होतो आणि केंश घण व बळकट होतात

केश आणण्याविषयीं दुसरा प्रकार.

चतुष्पदानांत्वग्रोमनखशृंगास्थिभस्मभिः ॥ तैलेनसहलेपोयंरोमसंजननःपरः॥ ८३ ॥

शेळी आदिकरून जीं चतुष्पदें यांची त्वचा व केंश व नखें व शिंगें व हाडें यांचें
म करून तिळांचे तेलांत कालवून लेप करावा. हा लेप नवे केंश येण्याविषयीं फार
गला आहे असें जाणावें.

केंश काळे होण्याविषयीं लेप.

इंद्रवारुणिकाबीजतैलेनाभ्यंगमाचरेत् ॥ प्रत्यहंतेनकालाभ्रसन्निभाःकुंतलाअलम् ॥८४॥

कंवडळीचे बियांचें तेल पातळयंत्रेंकरून काढून पांढरे केंशांचे ठायीं नित्य लेप करावा
णेंकरून केंश फार चांगले काळे होतात.

दुसरा प्रकार.

अयोरजोभृंगराजत्रिफलाकृष्णमृत्तिका ॥ स्थितमिक्षुरसेमासंलेपनात्पलितंजयेत् ८५

लोहाचें चूर्ण १ माका २ त्रिफला ह्मणजे हिरडे ३ बेहडा ४ आंवळकठी ५ काळी
माती ६ हीं सहा औषधें समभाग घेऊन चूर्ण करून उसाचे रसांत घालून एक महिनापर्यंत
ठेवावें. नंतर अकाळीं जे पांढरे केंश होतात त्यांचे ठायीं हा लेप करावा, तेणेंकरून काळे
केंश होतात.

तिसरा प्रकार.

धात्रीफलत्रयंपथ्येद्वेतथैकंविभीतकम् ॥ पंचाम्रज्जालोहस्यकर्षैकंचप्रदीयते ॥ ८६ ॥
पिष्ट्वालोहमयेभांडेस्थापयेदुषितंनिशि ॥ लेपोयंहंतिनचिरादकालपलितंमहत् ॥८७॥

आवळीचीं फळें तीन, हिरडे दोन, बेहड्याचें फळ एक, आंब्याचे बाठ्यांतील कोया
च, लोहचूर्ण एक कर्ष प्रमाण, हीं सारीं औषधें लोखंडाचे कढईंत बारीक वांटून सारी-
त्र तशींच ठेवून दुसऱ्ये दिवशीं लेप करावा, तेणेंकरून ज्या मनुष्याचे अकाळीं फार पांढरे
श होतात ते या लेपेंकरून लवकर काळे होतात.

चवथा प्रकार.

त्रिफलानीलिकापुष्पंलोहंभृंगरजःसमम् ॥ अजामूत्रेणसंपिष्टंलेपात्कृष्णीकरंस्मृतम् ॥८८॥

त्रिफळा व निळीचीं पानें व लोहचूर्ण व माका हीं सारीं औषधें समभाग घेऊन शेळीचे
मुतांत वांटून लेप करावा, हा लेप पांढरे केंशाचे काळे केंश होण्याविषयीं उत्तम जाणावा.

पांचवा प्रकार.

त्रिफलालोहचूर्णंचदाडिमवल्कबिसंतथा ॥ प्रत्येकंपंचपलिकंचूर्णंकुर्याद्विचक्षणः ॥८९॥
त्रिफलालोहमयेपात्रेभूमिमध्येनिधापयेत् ॥ क्षिप्त्वालोहमयेपात्रेभूमिमध्येनिधापयेत् ॥
भृंगराजरसस्यापिप्रस्थपट्कंप्रदापयेत् ॥ कूर्चेशिरसिरात्रौचसंवेष्टचैरंडपत्रकैः
॥९०॥ मासमेकंततःकुर्याच्छागीदुग्धेनलेपनम् ॥ पलितस्यविनाशश्चत्रिभिर्लेपैर्नसं-
॥ ९१ ॥ स्वपेत्प्रातस्ततःकुर्यात्स्नानंतेनचजायते ॥
शयः ॥ ९२ ॥

त्रिफळा, लोहचूर्ण, डाळिंबसाल व कमळाचा देट हीं औषधें एकेक पांच पांच पळें

घेऊन बारीक चूर्ण करून माक्याचा रस सहा प्रस्थ प्रमाण काढून लोखंडाच्या पात्रामध्यें तो रस व तें चूर्ण घालून एक महिनापर्यंत जमिनीमध्यें पुरून ठेवावें. नंतर बाहेर काढून तें औषध शेळीचे दुधांत कालवून मस्तकाचे केशांचे ठायीं लेप करावा. त्या लेपावर मुरती एरंडाचीं पानें बांधून निद्रा करावी. प्रातःकाळीं उठोन स्नान करावें. याप्रमाणें तीन लेप करावे, तेणेंकरून ज्या मनुष्याचे अकाळीं पांढरे केश होतात ते निश्चयेंकरून लवकर काळे होतात.

केश जाण्याविषयीं लेप.

शंखचूर्णस्यभागौद्वौहरितालंचभागिकम् ॥ मनःशीलाचार्धभागास्वर्जिकाचैकभागिका ॥ ॥ ९३ ॥ लेपोयंवारिपिष्टस्तुकेशानुत्पाट्यदीयते ॥ अनयालेपयुक्त्याचसप्तवारंप्रयुक्तया ॥ ९४ ॥ निर्मूलकेशस्थानंस्यात्क्षणस्पर्शिरोयथा ॥

शंखचूर्ण दोनभाग व हरताळ एकभाग व मनशील अर्धभाग व साजीखार एकभाग हीं औषधें पाण्यांत वांटून ज्या जाग्यावरचे केश निर्मूळ करावयाचे त्या जाग्यावरील वस्तऱ्यानें केश काढून लेप करावा. याप्रमाणें युक्तीनें सात लेप करावे, तेणेंकरून केश येण्याचें स्थान निर्मूळ होतें ह्मणजे फिरोन केश येतच नाहींत. याविषयीं दृष्टांत जसें हजामत केल्यानें मस्तक गुळगुळीत होतें तसें या लेपेंकरून होतें असें जाणावें.

दुसरा प्रकार.

तालकंशाणयुग्मंस्यात्पट्शाणंशंखचूर्णकम् ॥ ९५ ॥ द्विशाणिकंपलाशस्यक्षारंदत्वाप्रमर्दयेत् ॥ कदलीदंडतोयेनरविपत्ररसेनवा ॥ ९६ ॥ अस्यापिसप्तभिर्लेपैर्लोमशातनमुत्तमम् ॥

हरताळ दोनशाण प्रमाण व शंखाचें चूर्ण सहा शाण प्रमाण व पळसाचा खार दोन शाण प्रमाण हीं औषधें केळीचे सोपाचे रसांत अथवा रुईचे पानाचे रसांत खलून केश काढण्याचे जाग्यावर सात वेळ लेप करावा. हा लेप केश जाण्याविषयीं उत्तम आहे, असें जाणावें.

श्वेतकुष्ठ दूर होण्याविषयीं लेप.

सुवर्णपुष्पिकाकासीसंविडंगानिमनःशिला ॥ ९७ ॥ रोचनासैंधवंचैवलेपनात्श्वित्रनाशनम् ॥

पिंवळी जाई १ हिराकशी २ वावडिंग ३ मनशीळ ४ गोरोचन ५ सैंधव ६ हीं औषधें समभाग घेऊन गोमूत्रांत वांटून लेप करावा, तेणेंकरून श्वित्रकुष्ट दूर होतें. श्वित्रकुष्ठ ह्मणजे श्वेतकुष्ठ.

दुसरा प्रकार.

वायस्पेडगजाकुष्ठकृष्णाभिर्गुटिकाकृता ॥ ९८ ॥ वस्तमूत्रेणसंपिष्टामलेपात्श्वित्रनाशनी ॥

कावळी १ टाकळ्याचें बीज २ कोष्ठ ३ पिंपळी ४ हीं औषधें समभाग घेऊन बोकडाचे मुतांत वाटून लेप करावा, तेणेंकरून श्वित्रकुष्ठ दूर होतें

तिसरा प्रकार

बाकुचीवेतसोलाक्षाकाकोदुंबरिकावणा ॥ ९९ ॥ रसांजनमयश्चूर्णंतिलाःकृष्णास्तदेक्तः ॥ चूर्णयित्वागवांपित्तैःपिष्टाचगुटिकाकृता ॥ ४०० ॥ अस्याःप्रलेपात्श्वित्राणिप्रणश्यंत्यतिवेगतः ॥

बावच्या १ आम्लवेतस २ लाख ३ काळाउंबरा ४ पिंपळी ५ सुरमा ६ लोहाचें चूर्ण ७ काळे तीळ ८ हीं आठ औषधें समभाग घेऊन चूर्ण करून गाईचें पित्तांत वाटून गोळ्या करून लेप करावा, या लेपाच्या प्रभावेंकरून श्वित्रकुष्ठ तें फार लवकर दूर होतें.

शिध्म्यांवर लेप

धात्रीसर्जरसश्चैवयवक्षारश्चचूर्णितैः ॥ १ ॥ सौवीरेणप्रलेपोयंप्रयोज्यःसिध्मनाशने ॥

आवळकाठी १ राळ २ जवखार ३ हीं तीन औषधें सौवीरात अथवा कांजींत वाटून सिध्म ह्मणजे शिबें तीं दूर होण्याविषयीं हा लेप योजावा

दुसरा प्रकार

दार्वीमूलकबीजानितालकंसुरदारुच ॥२॥ ताम्बूलपत्रंसर्वाणिकार्षिकाणिपृथक्पृथक् ॥ शंखचूर्णंशाणमात्रंसर्वाण्येकत्रचूर्णयेत् ॥३॥ लेपोयंवारिणापिष्टःसिध्मनांनाशनःपरः॥

दारुहळद १ मुळ्याचें बीज २ हरताळ ३ देवदार ४ विड्याचीं पानें ५ हीं पांच औषधें कर्ष कर्षप्रमाण व शंखाचें चूर्ण शाणप्रमाण या सर्वांच्या औषधांचें चूर्ण करून पाण्यात वांटून लेप करावा, तेणेंकरून सिध्मरोग दूर होतो

नेत्ररोगावर लेप.

हरीतकीसैंधवंचगैरिकंचरसांजनम् ॥ ४ ॥ बिडालकोजलेपिष्टःसर्वनेत्रामयापहः ॥

हरीतकी १ सैंधव २ गेरु ३ रसांजन ४ हीं चार औषधें समभाग घेऊन पाण्यात वांटून डोळ्याचे बाहेरले आंगीं लेप करावा याला बिडालक ह्मणतात, या बिडालक करावा ह्मणजे डोळ्याचे बाहेरले आंगीं लेप करावा याला बिडालक ह्मणतात, या तेणेंकरून सारे नेत्ररोग दूर होतात.

दुसरा प्रकार

रसांजनंत्र्यूषणयुक्तंपिष्टंवटकीकृतम् ॥ कंडूपाकान्वितांहंतिलेपादंजननामिकां ॥ ५ ॥

रसांजन १ त्र्यूषण ह्मणजे सुंठ २ मिरें ३ पिंपळी ४ हीं चार औषधें समभाग घेऊन पाण्यात वाटून गोळी करून कंडूयुक्त व पाकयुक्त अशी अंजननामिका ह्मणून अंजनी डोळ्याचे कोरेला होते ती दूर होण्याविषयीं ती गोळी पाण्यांत उगाळून लेप करावा.

कडवादिकांवर लेप

प्रपुन्नाटस्यबीजानिवाकुचीसर्षपास्तिलाः ॥ कुष्ठनिशाद्वयंमुस्तंपिष्टातत्रैर्लेपतः ॥ ६ ॥ प्रलेपादस्यनश्यंतिकंडूदद्रुविचर्चिकाः ॥

टाकळ्याचें बीज १ बावच्या २ शिरीष ३ तीळ ४ कोष्ट ५ हळद ६ दारुहळद ७ नागरमोथे ८ हीं आठ औषधें समभाग घेऊन चूर्ण करून ताकांत वांटून लेप करावा. तेणेंकरून कंडू व दाद व विचर्चिका म्हणजे पादस्फोट रोग हे दूर होतात.

खरूज दाह इत्यादिकांवर लेप

हेमक्षीरीविडंगानिदंरदंगंधकस्तदा ॥ ७ ॥ दद्रुघ्नःकुष्ठसिंदूरंसर्वाण्येकत्रमर्दयेत् ॥ धत्तूरनिंबतांबूलीपत्राणांस्वरसैःपृथक् ॥ ८ ॥ अस्यप्रलेपमात्रेणपामादद्रूविचर्चिकाः॥ कंडूश्चरकसश्चैवमशमंयांतिवेगतः ॥ ९ ॥

पिसोळा अथवा पिंवळेफुलाचा काटेधोत्रा १ वावडिंग २ हिंगूळ ३ गंधक ४ टाकळ्याचें बीज ५ कोष्ट ६ शेंदूर ७ हीं सात औषधें समभाग घेऊन धोतऱ्याचीं पानें व कडुनिंबाचीं पानें व विड्याचीं पानें या तिहींचे वेगळे वेगळे रस काढून त्या एकेकात तीं सारीं औषधें वांटून लेप करावा. तेणेंकरून खरूज व दाद व विचर्चिका म्हणजे पाय फुटून भेगा पडतात तो रोग कंडू व चरकस रोग कुष्ठाचा भेद आहे तो हे सारे रोग दूर होतात.

दुसरा प्रकार

दूर्वाभयासैंधवंचचक्रमर्दःकुठेरक ॥ एभिस्तक्रयुतोलेपःकंडूदद्रूविनाशनः ॥ ४१० ॥

दूर्वा १ बाळहिरडे २ सैंधव ३ टाकळ्याचें बीज ४ रानतुळस ५ हीं पांच औषधें समभाग घेऊन ताकात वांटून लेप करावा. तणेंकरून कंडू व दाद हे रोग दूर होतात.

रक्तपित्तादिकांवर लेप

चंदनोशीरयष्ट्याव्हबलाव्याघ्रनखोत्पलैः ॥ क्षीरपिष्टैःप्रलेपःस्याद्रक्तपित्तशिरोरुजि ॥ ११ ॥

रक्तचंदन १ वाळा २ ज्येष्ठीमध ३ चिकणामूळ ४ वाघाचीं नखें ५ कमळ ६ हीं सहा औषधें समभाग घेऊन दुधांत वांटून लेप करावा, तेणेंकरून रक्तपित्तसंबंधी मस्तकपीडा दूर होत्ये.

उदर्दरोगावर लेप

सिद्धार्थरजनीकुष्ठप्रपुन्नाटतिलैःसह ॥ कटुतैलेनसंमिश्रमुदर्दघ्नंप्रलेपनम् ॥ १२ ॥

शिरिस १ हळद २ कोष्ठ ३ टाकळ्याचें बीज ४ तीळ ५ हीं पांच औषधें समभाग घेऊन बारीक चूर्ण करून शिरसेल तेलांत कालवून लेप करावा. तेणेंकरून शीतपित्ताचा भेद उदर्दरोग आहे तो दूर होतो.

वातविसर्पावर लेप

रास्नानीलोत्पलंदारुचंदनंमधुकंबला ॥ घृतक्षीरयुतोलेपोवातवीसर्पनाशनः ॥ १३ ॥

रास्ना १ निळें कमळ २ देवदार ३ रक्तचंदन ४ ज्येष्ठीमध ५ चिकणामूळ ६ हीं

इरा औषधे समभाग घेऊन बारीक चूर्ण करून दुधांत तुपांत कालवून लेप करावा, तेणेंकरून वातविसर्परोग दूर होतो.

पित्तविसर्परोगावर लेप.

मृणालचंदनलोध्रमुशीरंकमलोत्पलं ॥ सारिवामलकीपथ्यालेपःपित्तविसर्पनुत् ॥१४॥

कमळाचा देठ १ रक्तचंदन २ लोध्र ३ वाळा ४ कमळ ५ लहान कमळ ६ उपटसुळेचें मूळ ७ आंवळकाठी ८ बाळहिरडे ९ हीं औषधें समभाग घेऊन पाण्यांत वांटून लेप करावा, तेणेंकरून पित्तविसर्प दूर होतो.

कफविसर्पावर लेप.

त्रिफलापद्मकोशीरंसमंगाकरवीरकम् ॥ नलमूलमनंताचलेपःश्लेष्मविसर्पहा ॥ १५ ॥

त्रिफळा म्हणजे हिरडे बेहडे आंवळकाठी ३ पद्मकाष्ठ ४ वाळा ५ धायटीफूल ६ ...ती ७ देवनळाचें फूल ८ धमासा ९ हीं नऊ औषधें समभाग घेऊन पाण्यांत वांटून ...प करावा, तेणेंकरून कफविसर्प दूर होतो.

पित्तवातरक्तावर.

मूर्वानीलोत्पलंपद्मंशिरीषकुसुमैःसह ॥ प्रलेपःपित्तवातास्रेशतधौतघृतप्लुतः ॥ १६ ॥

मोरवेल १ निळें कमळ २ पद्मकाष्ठ ३ शिरसाचीं फुलें ४ हीं चार औषधें समभाग घेऊन चूर्ण करावें आणि शंभर वेळ पाण्यानें तूप धुवोन त्यांत तें चूर्ण कालवून लेप करावा, तेणेंकरून पित्तवातरक्त दूर होतें.

नाकांतून रक्त पडतें त्याजवर लेप.

आमलंघृतभृष्टंतुपिष्टंकांजिकवारिभिः । जयेन्मूर्धिप्रलेपेनरक्तंनासिकयास्रुतं ॥ १७ ॥

आंवळकाठी तुपांत भाजून कांजींत वांटून मस्तकावर लेप करावा तेणेंकरून नाकांतून जें रक्त पडतें तें दूर होतें.

वातसंबंधी मस्तकपीडेवर लेप.

कुष्ठमेरंडतैलेनलेपात्कांजिकपेषितम् ॥ शिरोवार्तिवातजांहन्यात्पुष्पंवामुचुकुंदजम् ॥१८॥

कोष्ठ अथवा मुचुकुंदाचें फूल कांजींत वांटून त्यांत एरंडेल तेल मेळवून वायुसंबंधी मस्तकपीडा दूर होण्याविषयीं लेप करावा.

दुसरा प्रकार.

देवदारुनतंकुष्ठंनलदंविश्वभेषजम् ॥ सकांजिकःस्नेहयुक्तोलेपोवातशिरोर्तिनुत् ॥१९॥

देवदार १ तगर २ कोष्ठ ३ वाळा ४ सुंठ ५ हीं पांच औषधें समभाग घेऊन कांजींत वांटून त्यांत एरंडेल तेल मेळवून लेप करावा, तेणेंकरून वायुसंबंधी मस्तकपीडा दूर होते.

पित्तशिरोरोगावर लेप.

धात्रीकसेरुन्हीबेरपद्मपद्मकचंदनैः ॥ दूर्वाशीरनलानांचमूलैःकुर्यात्प्रलेपनं ॥ २० ॥

शिरोर्तिपित्तजांहन्याद्रक्तपित्तरुजंतथा ॥

आंवळकाठी १ भद्रमुस्ता २ वाळा ३ कमळ ४ पद्मकाष्ठ ५ रक्तचंदन ६ दूर्वेची मुळें ७ वाळा ८ देवनळाचें मूळ ९ हीं नऊ औषधें समभाग घेऊन पाण्यांत वांटून मस्तकाचे ठायीं जी पित्तसंबंधी पीडा होते तिजवर व रक्तपित्तसंबंधी पीडेवर हा लेप करावा.

कफसंबंधी मस्तकपीडेवर लेप.

हरेणुनतशैलेयमुस्तैलागरुदारुभिः ॥ २१ ॥ मांसीरास्नावूकैश्चकोष्णेलेपःकफार्तिनुत् ॥

रेणुका १ तगर २ पत्थरफूल ३ नागरमोथा ४ वेलची ५ अगरु ६ देवदार ७ जटामांसी ८ रास्ना ९ एरंडमूळ १० हीं दहा औषधें समभाग घेऊन कोमट पाण्यांत वांटून कफसंबंधी मस्तकपीडेवर लेप करावा.

दुसरा प्रकार.

शुंठीकुष्ठमपुन्नाटदेवकाष्ठैःसरोहिषैः ॥ २२॥ मूत्रपिष्टैःसुखोष्णैश्चलेपःकफशिरोर्तिनुत् ॥

सुंठ १ कोष्ठ २ टाकळ्याचें बीज ३ देवदार ४ रोहिसगवत ५ हीं पांच औषधें समभाग घेऊन गोमूत्रांत वांटून सुखोष्ण ह्मणजे किंचित् गरम करून लेप करावा, तेणेंकरून कफसंबंधी पीडा दूर होत्ये.

सूर्यावर्त व अर्धभेदकरोग यांजवर.

सारिवाकुष्ठमधुकंवचाकृष्णोत्पलैस्तथा ॥ २३ ॥ लेपःसकांजिकःस्नेहःसूर्यावर्तार्धभेदयोः ॥

उपटसुळी १ कोष्ठ २ ज्येष्ठीमध ३ वेखंड ४ पिंपळी ५ निळें कमळ ६ हीं सहा औषधें समभाग घेऊन कांजींत वांटून त्यांत एरंडेल तेल मेळवून लेप करावा, तेणेंकरून सूर्यावर्तरोग व अर्धशिशी हे रोग दूर होतात.

शंखक अनंतवात व सर्व शिरोरोग यांजवर लेप.

वरीनीलोत्पलंदूर्वातिलाःकृष्णापुनर्नवा ॥ २४ ॥ शंखकेऽनंतवातेचलेपःसर्वशिरोर्तिजित् ॥

शतावरी १ निळें कमळ २ दूर्वा ३ काळे तीळ ४ पुनर्नवा ५ हीं पांच औषधें समभाग घेऊन पाण्यांत वांटून लेप करावा, तेणेंकरून शंखक व अनंतवात व सर्व शिरोरोग हे दूर होतात.

दुसरा प्रकार.

अथलेपविधिश्चान्यःप्रोच्यतेसुज्ञसंमतः ॥२५॥ द्वौतस्यकथितौभेदाप्रलेपाख्यप्रदेहकौ ॥

यानंतर सुज्ञांस मान्य असा दुसरा लेपाचा विधि आहे, त्याचे एक प्रलेपाख्य व एक प्रदेहक असे दोन भेद जाणावे.

त्या दोहों लेपांचे उंचीविषयीं प्रमाण.

चर्माद्रैमाहिषंपद्धत्प्रोक्तंतामितिस्तयोः ॥ २६ ॥ शीतस्तनुर्निर्विषीचप्रलेपः परिकीर्तितः ॥ आर्द्रोघनस्तथोष्णःस्यात्प्रदेहःश्लेष्मवातहा ॥ २७ ॥

ते प्रलेपक व प्रदेहक हे दोन लेप ह्मशीची ओली कातडी जितकी उंच असते तितके मिती ह्मणजे मर्यादारूप उंच असावे व त्याचे गुण, शीतवीर्य व तनु ह्मणजे

सूक्ष्मरूपें स्रोतसांमध्यें प्रवेश करणारा व बाधरहित असा प्रलेपक जाणावा व आर्द्र ह्मणजे द्रवयुक्त आणि जड व उष्ण व कफवायु दूर करणारा असा प्रदेहक लेप जाणावा.

ते दोन्ही प्रकारचे लेप कोठें तो प्रकार.

रोमाभिमुखमादेयौप्रलेपाख्यप्रदेहकौ ॥ वीर्यंसम्यक्प्रविशत्याशुरोमकूपैःशिरामुखैः ॥२८॥

ते प्रलेपाख्य व प्रदेहक हे दोन लेप रोम सन्मुख करून द्यावे ह्मणजे रोम समोर उभे करून लेप करावे, कारण शिरोमुखरूप जीं रोमरंध्रें त्या द्वारेंकरून त्या लेपांचें वीर्य उत्तमप्रकारें शरीरांत प्रवेश करितें.

साधारण लेपाविषयीं निषेध.

नरात्रौलेपनंकुर्याच्छुष्यमाणंनधारयेत् ॥ शुष्यमाणमुपेक्षेतप्रदेहंपीडनंप्रति ॥ २९ ॥

रात्रीचे ठायीं लेप करूं नये आणि तो लेप वाळल्यावर त्याचें धारण करूं नये, कारण लेप वाळल्यावर ठेविला असतां देहास फार पीडा करतो.

रात्रीस लेपाचे निषेधाविषयीं हेतु.

तमसापिहितोत्सूष्मारोमकूपमुखेस्थितः ॥ विनालेपेननिर्यातिरात्रौनोलेपयेत्ततः ॥३०॥

रात्रीचे ठायीं तमोगुणेंकरून शरीरसंबंधीं उष्मा आच्छादित होऊन रोमरंध्र मुखाचे ठायीं येऊन राहतो आणि लेप केल्यावांचून बाहेर निघतो यास्तव रात्रीस लेप करूं नये.

रात्रीचे ठायीं प्रलेपादिकाचा विधि व जे योग्य ते

रात्रावपिप्रलेपादिविधिःकार्योविचक्षणैः ॥ अपाकिशोथेगंभीरेरक्तश्लेष्मसमुद्भवे ॥३१॥

त्या सुजेचा पाक झाला नाहीं तिचे ठायीं व गंभीरसंज्ञक जो व्रण त्याचे ठायीं व रक्त कफापासून उत्पन्न जी सूज तिचे ठायीं सुज्ञ वैद्यांनीं रात्रीस प्रलेपादिकांचा विधि करावा ह्मणजे लेप करावा.

व्रण दूर होण्याविषयीं सात प्रकारचा क्रम.

आदौशोथहरोलेपोद्वितीयोरक्तसेचनः ॥ तृतीयस्योपनाहःस्याच्चतुर्थःपाटनक्रमः ॥३२॥
पंचमःशोधनोभूयात्पष्ठोरोपणइष्यते ॥ सप्तमोवर्णकरणोव्रणस्यैतेक्रमामताः ॥ ३३ ॥

प्रथम व्रणसंबंधीं जी सूज येते ती दूर होण्याविषयीं लेप करावा व दुसरा लेप व्रणाचे ठायीं जें रक्त जमून राहतें तें विरळ होईं असा लेप करावा व तिसरा लेप उपनाह ह्मणजे घाम काढावयाचा प्रयोग आहे तशीं औषधें घेऊन व्रण पिके असा लेप करावा व चवथा लेप व्रण फुटे असा करावा पांचवा लेप पुवादिकांचें शोधन होईं असा करावा व सहावा लेप रोपण ह्मणजे व्रण भरून येईं असा करावा व सातवा लेप व्रणाला कांति येईं असा करावा याप्रकारें व्रण बरा होण्याविषयीं सात क्रम जाणावे, तीं औषधें पुढील ग्रंथांत सांगतों.

व्रणसंबंधी जी वायूची सूज त्यांजवर लेप.

बीजपूरजटाहिंस्रादेवदारुमहौपधम् ॥ रास्नाग्निमंथोलेपोयंवातशोथविनाशनः ॥ ३४ ॥

महाळुंगीचें मूळ १ जटामांसी २ देवदार ३ सुंठ ४ रास्ना ५ ऐरणीचें मूळ ६ हीं

सहा औषधें समभाग घेऊन पाण्यांत वांटून व्रणसंबंधीं जी वायुची सूज येते ती दूर होण्याविषयीं हा लेप करावा.

साधारण लेपाविषयीं निषेध.

मधुकंचंदनंमूर्वानलमूलंचपद्मकम् ॥ उशीरंवालकंपद्मंपित्तशोथेप्रलेपनम् ॥ ३५ ॥

ज्येष्ठीमध १ रक्तचंदन २ मोरवेल ३ देवनळाचें मूळ ४ पद्मकाष्ठ ५ वाळ ६ नेत्रवाळा ७ पद्मकमळ ८ हीं आठ औषधें समभाग घेऊन पाण्यांत वांटून व्रणसंबंधी पित्तसुजेवर लेप करावा.

यावीस लेपाचे निषेधाविषयीं हेतु.

कृष्णापुराणपिण्याकंशिग्रुत्वक्सिकताशिवा ॥ मूत्रपिष्टःसुखोष्णोयंप्रदेहःश्लेष्मशोथहृत् ३६

पिंपळी १ जुनीं पेंड २ शेगव्याची साल ३ वाळू अथवा साखर ४ हर्तकी ५ हीं पाचं औषधें समभाग घेऊन गोमूत्रांत वांटून थोडीं गरम करून कफसंबंधी सूज दूर होण्याविषयीं हा प्रदेहसंज्ञक लेप करावा.

आगंतुक सूज व रक्तजन्यसूज यांजवर लेप

द्वेनिशेचंदनेद्वेचशिवादूर्वापुनर्नवा ॥ उशीरपद्मकंलोध्रंगैरिकंचरसांजनम् ॥ ३७ ॥
आगंतुजेरक्तजेचशोथेकुर्यात्प्रलेपनम् ॥

हळद १ दारुहळद २ चंदन ३ रक्तचंदन ४ हर्तकी ५ दुर्वा ६ पुनर्नवा ७ लोध्र ८ पद्मकाष्ठ ९ वाळा १० गेरु ११ रसांजन १२ हीं बारा औषधें समभाग घेऊन पाण्यांत वांटून आगंतुक सूज व रक्तजन्य सूज ह्या दोन सुजी दूर होण्याविषयीं हा लेप करावा.

व्रण पिकण्याविषयीं लेप.

शणमूलकशिग्रूणांफलानितिलसर्षपाः॥३८॥सक्तवःकिण्वमतसी प्रदेहःपाचनःस्मृतः॥

तागाचें बीज १ मुळ्याचें बीज २ शेगव्याचें बीज ३ तीळ ४ शिरिस ५ जव ६ लाहकीट ७ अळशीचें बीज ८ हीं आठ औषधें समभाग घेऊन पाण्यांत वाटून व्रण पिकण्यासाठीं हा प्रदेहसंज्ञक लेप करावा.

पिकला व्रण जो तो फोडण्याविषयीं लेप.

दंतीचित्रकमूलत्वक्स्नुह्यर्कपयसीगुडः ॥ ३९ ॥ भल्लातकास्थिकासीसंसैंधवंदारुणेस्मृतः ॥

दांतुणीचेंमूळ १ चित्रकाचे मुळाची साल २ निवडुंगीचें दूध ३ रुईचें दूध ४ गूळ ५ बिबवा ६ हिराकस ७ सेंधव ८ या आठ औषधांतून सहा औषधाचें चूर्ण करून निवडुंगाचे व रुईचे दुधांत कालवून पिकला जो व्रण त्याला फोटण्याविषयीं हा लेप करावा.

दुसरा प्रकार.

चिरबिल्वोग्निकोदंतीचित्रकोहयमारकः ॥ ४० ॥ कपोतकंकगृध्राणांमलंलेपनदारणम् ॥

करंजबीज १ बिबवा २ दातुणीचें मूळ ३ चित्रक ४ कण्हेरीचें मूळ ५ या पांच

औषधांचें चूर्ण करावें आणि कपोतपक्षी व कंकपक्षी गिधाड या तिघांचे मळ समान घेऊन त्यात तें चूर्ण कालवून जो व्रण पिकला आहे तो फुटावयाकरिता हा लेप करावा

तिसरा प्रकार

स्वर्जिकायावशूकाढ्याःक्षारलेपेनदारणाः ॥ ४१ ॥ हेमक्षीर्य्यास्तथालेपोव्रणेपरमदारणः ॥

साजीखार व जवखार याचा लेप व्रण फोडण्याविषयीं करावा, तसाच हेमक्षीरी म्हणजे पिसोळा त्याचा लेप व्रण फोडण्याविषयीं परम उत्तम जाणावा.

व्रण शोधनाविषयीं लेप

तिलसैंधवयष्ट्याह्वनिंबपत्रनिशायुगे. ॥ ४२ ॥ त्रिवृत्घृतयुतैःपिष्टैःमलेपोव्रणशोधनः ॥

तिळ १ सैंधव २ ज्येष्ठीमध ३ कडुनिंबाचीं पानें ४ हळद ५ दारुहळद ६ निसोत्तर ७ हीं सात औषधें समभाग घेऊन बारीक चूर्ण करून तुपात कालवून लेप करावा तेणेंकरून व्रणाचें शोधन होतें

व्रणाचें शोधन आणि रोपण याविषयीं लेप.

निंबपत्रघृतक्षौद्रदार्वीमधुकसंयुतः ॥ ४३ ॥ तिलैश्चसहसंयुक्तोलेपःशोधनरोपणः ॥

कडुनिंबाचीं पानें १ तूप २ मध ३ ज्येष्ठमध ४ तीळ ५ या पाच औषधातून तीन औषधाचें चूर्ण करून तें तुपामधात कालवून व्रणाचें शोधन करावें व रोपण म्हणजे व्रण भरून येणें याविषयीं हा लेप करावा.

व्रणसंबधी कृमि दूर होण्याविषयीं लेप

करंजारिष्टनिर्गुंडीलेपोहन्यात्व्रणकृमीन् ॥४४॥ लशुनस्याथवालेपोहिंगुनिंबभवोथवा ॥

करंज १ कडुनिंब २ निर्गुंडी ३ या तिहींचीं पानें वाटून व्रणसंबधीं कृमि म्हणजे किडे दूर होण्याविषयीं हा लेप करावा अथवा एकलीच लसूण वाटून लेप करावा, अथवा हिंग व कडुनिंबाचीं पानें हीं दोन्ही एकाजागीं वाटून लेप करावा

व्रणाचें शोधन व रोपण याविषयीं दुसरा लेप

निंबपत्रतिलादंतीत्रिवृत्सैंधवमाक्षिकम् ॥ ४५ ॥ दुष्टव्रणप्रशमनोलेपःशोधनरोपणः ॥

कडुनिंबाचा पाला १ तीळ २ दांतुणीचें मूळ ३ निसोत्तर ४ सैंधव ५ हीं पाच औषधें समभाग घेऊन बारीक चूर्ण करून मधात कालवून दुष्ट व्रण जो त्याचे शमना-विषयीं व शोधन रोपण म्हणजे व्रण भरून येणें याविषयीं हा लेप करावा

पोटशूळावर नाभीचे ठायीं लेप

मदनस्यफलंतिक्तापिष्ट्वाकांजिकवारिणा ॥ कोष्णंकुर्यान्नाभिलेपशूलशांतिर्भवेत्ततः ४६

गेळीचें फळ १ कटुकी २ हीं दोन औषधें समभाग घेऊन कांजींत वाटून किंचित् ग-रम करून नाभीचे ठायीं लेप करावा. तेणेंकरून पोटशूळ दूर होतो

वातविद्रधिरोगावर लेप

शिग्रुशेफालिकैरंडयवगोधूमसर्षपकैः ॥ सुखोष्णोबहलोलेपःप्रयोज्योवातविद्रधौ ॥

शेवग्याची साल १ निर्गुडीचा पाला २ एरंडमूळ ३ जव ४ गहूं ५ मूग ६ हीं सहा औषधें समभाग घेऊन पाण्यांत वांटून वातविद्रधिरोग दूर होण्याविषयीं हा दाट लेप सहन होई असा गरम करून लावावा.

पित्तविद्रधीवर लेप.

पैत्तिकेसर्पिषालाजामधुकैःशर्करान्वितैः ॥४७॥ प्रलेपःक्षीरपिष्टैर्वापयस्योशीरचंदनैः ॥

साळीच्या लाह्या व ज्येष्ठमध या दोहोंचें चूर्ण व साखर हीं तुपांत कालवून लेप करावा अथवा पयस्या ह्मणजे क्षीरकांकोली तिचे अभावीं आसंध व वाळा व रक्तचंदन हीं तीन औषधें दुधांत वांटून लेप करावा तेणेंकरून पित्तविद्रधि दूर होतो.

कफविद्रधीवर लेप.

इष्टिकासिकतालोहकीटंगोशकृतासह ॥ ४८ ॥ मूत्रोष्णश्चप्रदेहोयंमूत्रैःस्यात्श्लेष्म-विद्रधौ ॥

विटकर १ वाळू २ लोहकीट ३ गाईचें शेण ४ हीं चार औषधें गोमूत्रांत वांटून हा प्रदेहसंज्ञक लेप कफविद्रधि दूर होण्याविषयीं करावा.

आगंतुकविद्रधीवर लेप.

रक्तचंदनमंजिष्ठानिशामधुकगैरिकैः ॥ ४९ ॥क्षीरेणविद्रधौलेपोरक्तागंतुनिमित्तजे ॥

रक्तचंदन १ मंजिष्ठ २ हळद ३ ज्येष्ठमध ४ गेरू ५ हीं पांच औषधें समभाग घेऊन दुधांत वाटून अभिघात निमित्तेंकरून रक्त दुष्ट होऊन जाहला जो विद्रधि त्याजवर हा लेप करावा.

वातगलगंडावर लेप.

निचुलःशिग्रुबीजानिदशमूलमथापिवा ॥ ५० ॥ प्रदेहोवातगंडेषुसुखोष्णःसंप्रदीयते ॥

जलवेतस १ शेवग्याचें बीज २ हीं दोन औषधें पाण्यांत वांटून वातगलगंडावर दूर होण्याविषयीं हा प्रदेहसंज्ञक लेप सहन होई असा थोडा गरम करून करावा. दशमूळ वांटून लेप करावा.

कफगलगंडावर लेप.

देवदारुविशालाचकफगंडप्रदेहकः ॥ ५१ ॥

देवदार १ मांवरळीचें मूळ २ हीं दोन औषधें पाण्यांत वाटून कफगलगंड दूर होण्याविषयीं हा प्रदेहसंज्ञक लेप करावा.

अपचीरोगावर लेप.

सर्षपारिष्टपत्राणिदग्ध्वाभल्लातकैःसह ॥ छागमूत्रेणसंपिष्टमपचिघ्नंप्रलेपनम् ॥ ५२ ॥

शिरस १ कडुनिंबाचीं पानें २ बिबे ३ हीं तीन औषधें समभाग घेऊन जाळून राख करून बोकडाचे मुतात वांटून अपचीरोगावर गंडमाळ्याचा भेद आहे तो दूर होण्याविषयीं हा लेप करावा.

गंडमाळा व अर्बुद व गलगंड यांजवर लेप.

सर्षपाःशिग्रुबीजानिशणबीजातसीयवा, ॥ मूलकस्यचबीजानितक्रेणाम्लेनपेषयेत्
॥ ५३ ॥ गंडमालार्बुदंगंडंलेपेनानेनशाम्यति ॥

शिरिस १ शेवग्याचें बीज २ तागाचें बीज ३ जवसाचें बीज ४ जव ५ मुळ्याचें बीज ६ हीं सहा औषधें समभाग घेऊन आंबट ताकांत वांटून गंडमाळा व अर्बुद व गलगंड हे रोग दूर होण्याविषयीं हा लेप करावा.

अपबाहुकादिक जे वातरोग त्यांजवर लेप.

तक्षयित्वाक्षुरेणांगंकेवलानिलपीडितम् ॥ ५४ ॥ तत्रप्रदेहंदद्याच्च पिष्टंगुंजाफलैःकृतं ॥
तेनापबाहुजापीडाविश्वाचीगृध्रसीतथा ॥५५॥ अन्यापिवातजापीडाप्रशमंयातिवेगतः ॥

केवळ वायूनें पीडित मनुष्य जो त्याचे अंगाचे ठायीं जिकडचे अंगीं वायूचा काप असेल तीं जागा वस्तऱ्यानें खरवडून केश काढून त्या जाग्यावर गुंजा पाण्यांत वांटून लेप करावा. तेणेंकरून अपबाहुकवायु व विश्वाची वायु बाहूचे ठायीं होतो तो व गृध्रसीवायु जंघारोग विशेष आहे तो, हे वायू दूर होतात; व आणखीही दुसऱ्या वायुसंबंधीं ज्या पीडा होतात त्या याच लेपेंकरून लवकर दूर होतात.

श्लीपदरोगावर लेप.

धत्तूरैरंडनिर्गुंडीवर्षाभूशिग्रुसर्षपैः ॥ ५६ ॥ प्रलेपःश्लीपदंहंतिचिरोत्थमपिदारुणम् ॥

धोतऱ्याचा पाला १ एरंडाचा पाला २ निर्गुडीचा पाला ३ पुनर्नवामुळासुद्धां ४ शेवग्याची साल ५ शिरिस ६ हीं सहा औषधें वांटून बहुत दिवसांचा व दारुण असा जो श्लीपदरोग तो दूर होण्याविषयीं हा लेप करावा.

कुरंडरोगावर लेप.

अजाजीहपुपाकुष्ठमेरंडबदरान्वितम् ॥ ५७ ॥ कांजिकेनतुसंपिष्टंकुरंडघ्नंप्रलेपनम् ॥

जिरें १ शेरणी २ कोष्ठ ३ एरंडमूळ ४ बोरीची साल ५ हीं पांच औषधं समभाग घेऊन कांजींत वांटून कुरंड ह्मणजे अंडवृद्धि रोग तो दूर होण्याविषयीं हा लेप करावा.

उपदंशावर लेप.

करवीरस्यमूलेनपरिपिष्टेनवारिणा ॥५८॥ असाध्यापिजरत्याशुलिंगोत्थारुक्प्रलेपनात् ॥

कण्हेरीचें मूळ, १ पाण्यांत वांटून लेप करावा तेणेंकरून शिश्नाचे ठायीं उपदंशसंबंधीं पीडा होते ती असाध्य असतांही लवकर दूर होते.

उपदंशावर दुसरा लेप.

दहेत्कटाहेत्रिफलांतामषीमधुसंयुता ॥ ५९ ॥ उपदंशेप्रलेपोयंसद्योरोपयतिव्रणम् ॥

त्रिफळा कढईंत जाळून तिची राख मधांत कालवून लेप करावा तेणेंकरून शिश्नाचे ठायीं उपदंशसंबंधीं जे व्रण होतात त्याचें सद्यःरोपण होतें ह्मणजे व्रण भरून येतो

तिसरा लेप.

रसांजनंशिरीषेणपथ्ययाचसमन्वितम् ॥ ६० ॥ सक्षौद्रंलेपनंयोज्यमुपदंशगदापहम् ॥

रसांजन १ शिरिस २ हर्तकी ३ हीं तीन औषधें समभाग घेऊन चूर्ण करून मधेत कालवून शिश्नाचे ठायीं उपदंशसंबंधी जे व्रणादिक उपद्रव होतात त्यांजवर हा लेप करावा.

अग्नीनें शरीर भाजतें त्याजवर लेप.

अग्निदग्धेतुगाक्षीरीप्लक्षचंदनगैरिकैः॥६१॥सामृतैःसर्पिषास्निग्धैरालेपंकारयेद्भिषक् ॥ तंदुलीयकपर्यायैर्वाघृतमिश्रैःप्रलेपयेत् ॥ ६२ ॥

वंशलोचन १ पायरी २ रक्तचंदन ३ गेरु ४ गुळवेल ५ हीं पांच औषधें समभाग घेऊन चूर्ण करून तुपांत कालवून ज्या मनुष्याचें शरीर अग्नीनें भाजतें त्याजवर हा लेप करावा अथवा तांदुळजाचा काढा करून त्यांत तूप घालून त्यांचा लेप करावा.

दुसरा लेप.

यवान्दग्ध्वामषीकार्यातैलेनयुतयातया ॥ दद्यात्सर्वाग्निदग्धेषुप्रलेपोव्रणरोपणः ॥६३॥

जव जाळून राख करून तिळाचे तेलात कालवून मनुष्याचें शरीर अग्नीनें भाजतें त्याचे चार प्रकारचे निदानोक्त भेद आहेत त्याजवर हा लेप करावा तेणेंकरून भाजल्या-संबंधीं जे व्रण होतात ते भरून येऊन शरीर पूर्ववत् होतें.

योनी घट्ट होण्याविषयीं लेप

पलाशोदुंबरफलैस्तिलतैलसमन्वितैः ॥ मधुनायोनिमालिपेद्गाढीकरणमुत्तमम् ॥६४॥

पळसाचीं फळें १ उंबराचीं फळें २ या दोहोंचें चूर्ण करून तिळाचे तेलात कालवून त्यात मध मेळवून योनीचे ठायीं लेप करावा तेणेंकरून जी योनी शिथिल झाली असते ती या लेपेंकरून घट्ट होते.

दुसरा लेप

मा[illegible]फलसंयुक्तंमधुकर्पूरलेपनात् ॥ गतेपियौवनेस्त्रीणांयोनिर्गाढातिजायते ॥ ६५ ॥

मा[illegible] फळ व कापूर या दोहोंचें चूर्ण करून मधात कालवून योनीचे ठायीं लेप करावा. तेणेंकरून स्त्रियांचें यौवन गेलें असताही योनी घट्ट होते.

लिंग व स्तनादिक यांचे वृद्धीविषयीं लेप

मरीचसैंधवकृष्णातगरंबृहतीफलम् ॥ अपामार्गस्तिलाःकुष्ठंयवामाषाश्वसर्षपाः ॥६६॥ अश्वगंधाचतच्चूर्णमधुनासहयोजयेत् ॥ अस्यसंततलेपेनमर्दनाच्चप्रजायते ॥ ६७ ॥ लिंगवृद्धिःस्तनोत्सेधःसंहतिर्भुजकर्णयोः ॥

मिऱ्यें १ सैंधव २ पिपळी ३ तगर ४ रिंगणीचीं फळें ५ आघाड्याचें बीज ६ काळे तीळ ७ कोष्ठ ८ जव ९ उडीद १० शिरिस ११ आसंध १२ हीं बारा औषधें समभाग घेऊन चूर्ण करून मधात कालवून शिश्नाचे ठायीं संतत ह्मणजे दररोज लेप करून मर्दन करावें तेणेंकरून शिश्न मोठें होतें. याप्रकारें स्त्रियाचे स्तनाचे ठायीं व भुज आणि कर्ण याचे ठायीं हा लेप करून मर्दन केलें असतां त्याची वृद्धि होते.

लिंगवृद्धीवर दुसरा लेप.

अश्वगंधाशिरस्याख्यगर्भीरैर्घृतंपचेत् ॥६८॥तल्लेपान्मर्दनाल्लिंगवृद्धिःसंजायतेपरा ॥

पांढरे फुलांचें आसंध व सैंधव हीं दोन औषधें बारीक करून यांचे चौपट तूप व तुपाचे चौपट मेंढीचें दूध घेऊन सारीं एकत्र करून चुलीवर ठेऊन खालीं आं॰ लावून पाक करून त्यांतील त्या जाळल्यावर तूप राहिलें ह्मणजे तें तूप घेऊन शिश्नाचे ठायीं लेप करून मर्दन करावें तणेंकरून शिश्न फार मोठें होतें.

योनि-द्रवण्याविषयीं लेप.

इंद्रवारुणिकापत्ररसैःसूतंविमर्दयेत् ॥ ६९ ॥ रक्तस्यकरवीरस्यकाष्ठेनचमुहुर्मुहुः ॥
तल्लिप्तलिंगसंयोगात्योनिद्रावोभिजायते ॥ ४७० ॥

कांवडळीचे पानाचा रस काढून त्या रसांत पारा घालून तांवडे फुलांची जी कण्हेर असेल तिचे लांकडानें खल करावा आणि मुहुर्मुहु ह्मणजे तो रस आटल्यावर पुनः पांच सात वेळ पाऱ्यावर घालून जाखून शिश्नाचे ठायीं लेप करावा. नंतर शिश्नाचा व योनीचा संयोग झाला असतां पुरुषापेक्षां स्त्रियेचें वीर्य लवकर पतन होऊन स्त्री हतवीर्य होते.

गात्रसंबंधी दुर्गंधी दूर होण्याविषयीं लेप.

तांबूलपत्रचूर्णंतुचूर्णंकुष्ठशिवाभवम् ॥ वारिणालेपनंकुर्याद्गात्रदौर्गंध्यनाशनम् ॥ ७१ ॥

विड्याचीं पानें १ कोष्ठ २ हर्तकी ३ या तिहींचें चूर्ण करून पाण्यांत कालवून शरीराचे ठायीं लेप करावा तेणें करून गात्रसंबंधी दुर्गंध दूर होतो.

दुसरा लेप.

कुलित्थसक्तवःकुष्ठंमांसीचंदनजंरजः ॥ सक्तवश्चणकस्यैवत्वक्चैवैकत्रकारयेत् ॥७२॥
स्वेददौर्गंध्यनाशश्चजायतेस्यावधूलनात् ॥

कुळिथ भाजून त्यांचा सत्तु ह्मणजे पीठ १ व कोष्ठ २ जटामांसी ३ पांढराचंदन ४ हरभरे भाजून त्यांचा सत्तु ५ या साऱ्यांचें चूर्ण करून शरीराचे ठायीं त्या चूर्णाचें अवधूलन करावें ह्मणजे अंगाला चोळावें. तेणेंकरून अंगाचा घाम व दुर्गंध दूर होतात.

वशीकरणाविषयीं लेप.

वचासौवर्चलंकुष्ठंरजन्यौमरिचानिच ॥ ७३ ॥ एतल्लेपप्रभावेनवशीकरणमुत्तमम् ॥

वेखंड १ संचळ २ कोष्ठ ३ हळद ४ दारुहळद ५ मिऱ्यें ६ हीं सहा औषधें समभाग घेऊन पाण्यांत वांटून शरीराचे ठायीं लोक वश होण्याविषयीं हा लेप करावा. उत्तम आहे असें जाणावें.

मस्तकाचे ठायीं तेल धारण करण्याचे चार प्रकार.

अभ्यंगःपरिषेकश्चपिचुर्बस्तिरितिक्रमात् ॥७४॥ मूर्धतैलंचतुर्धास्याद्बलवच्चयथो त्तरम् ॥

अभ्यंग ह्मणजे मस्तकाचे ठायीं तेलाचें मर्दन व परिषेक ह्मणजे मस्तकाचे ठायीं तेलाचा चोंपड करणें व पिचु ह्मणजे कापसाची पेळी अथवा फडका तेलांत भिजवून मस्तकाचे ठायीं धारण करणें व बस्ति ह्मणजे कातड्याचा बस्ति करून मस्तकाचे ठायीं तेल धारण करण्याचा प्रयोग आहे तो पुढील श्लोकांत सांगेल. याप्रकारें मूर्ध तैलाचे ह्मणजे मस्तकाचे ठायीं तेल धारण करण्याचे भेद चार जाणावे. ते क्रमेंकरून एकापुढें एक बलवान् आहेत.

शिरोवस्तीचा विधि

प्रायोऽभ्यंगादयःपूर्वंप्रसिद्धाःसर्वतःस्मृताः ॥७५॥ शिरोवस्तिविधिश्चात्रप्रोच्यतेसुज्ञसंमतः॥

मागील श्लोकांत सांगितले जे अभ्यंग परिषेकादिक तीन प्रकार ते सर्वत्र स्थळाचे ठायीं प्रसिद्ध आहेत आणि शिरोबस्तीचा विधि मात्र सांगितला नाहीं तो सुज्ञांस मान्य असा सांगतों

शिरोवस्तीचा प्रकार.

शिरोवस्तिश्चर्मणःस्यात्द्विमुखोद्वादशांगुलः ॥ ७६ ॥ शिरःप्रमाणंतंबध्वामस्तके-
मापपिष्टकैः संधिरोधंविधायादौस्नेहैःकोष्णैःप्रपूरयेत् ॥ ७७ ॥

ठस्तकाचे ठायीं धारण करावयाचा जो बस्ती त्याला शिरोबस्ति ह्मणतात. तो हरिणादिकांचे कातड्याचा करावा आणि त्याचा आकार बारा अंगुळ प्रमाण उंच टोपीसारिखा करून त्याला दोन मुखें करावीं. त्यांतून खालचें तोंड मस्तकावर मावे असें मोठें करून वरचें तोंड बारीक करावें आणि तो बस्ती मस्तकावर बांधून त्याचे भंवता प्रथम उडदाचे पिठाचा संधिरोध करून नंतर स्नेह सहन होईं असा थोडा गरम करून बस्तीचे वरचे मुखावाटे तो स्नेह मस्तकावर सोडावा.

शिरोवस्तीचे धारणाविषयीं प्रमाण

तावद्धार्यस्तुयावत्स्यान्नासानेत्रमुखस्रुतिः ॥ वेदनोपशमोवापिमात्राणांवासहस्रकम् ॥७८॥

नाक व नेत्र व मुख यातुन स्राव येई तोंपर्यंत अथवा मस्तकसंबंधीं पीडा दूर होईतोंपर्यंत अथवा बस्तीचे अध्यायीं अनुवासन बस्तीची मात्रा काळ या प्रमाणेंकरून सांगितली आहे तशा मात्रा एक सहस्र होत तोंपर्यंत मस्तकाचे ठायीं बस्ती धारण करावा.

शिरोवस्तीचा धारणाविषयीं काळ.

विनाभोजनमेवात्रशिरोवस्तिःप्रशस्यते ॥ प्रयोज्यस्तुशिरोबस्तिःपंचसप्ताहमेववा ॥७९॥

ज्या मनुष्याला शिरोबस्ति योजावयाचा त्याला भोजन दिल्यावांचून योजावा प्रशस्त आहे आणि हा शिरोबस्ती पांचवे दिवशीं अथवा सातवे दिवशीं योजावा.

शिरोवस्तीचें कर्म आहल्यावरची क्रिया

विमोच्यशिरसोवस्तिगृण्हीयाद्यमर्मततः ॥ ऊर्ध्वकायेततःकोष्णनीरैःस्नानंसमाचरेत्॥८०॥

मस्तकाचे ठायीं धारण केला जो बस्ति त्यातें आसमंतात् भागाचे ठायीं ग्रहण करून ह्मणजे सारखा उचलून धरून काढून टाकावा नंतर ऊर्ध्वकाय ह्मणजे मस्तक त्याजवर कोमट पाणी घालून स्नान करावें.

शिरोवस्ती दिल्यानें जे रोग दूर होतात ते

अनेनदुर्जयारोगावातजायांतिसंक्षयम् ॥ शिरःकंपादयस्तेनसर्वकालेप्रयुज्यते ॥ ८१ ॥

दुर्जेय ह्मणजे दूर करावयास अशक्य असे शिरःकंपादिक जे वातरोग ते या बस्तिदानेंकरून दूर होतात. यास्तव याचे ठायीं हा बस्ति सर्वकाळ योजावा

कानात औषध घालावयाचा विधि

स्वेदयेत्कर्णदेशंतुनिचिन्तुःपार्श्वशायिनः ॥ मूत्रैःस्नेहैरसैःकोष्णैस्ततःकर्णंप्रपूरयेत् ॥८२॥

मनुष्याला किंचित् कुशीस निजवून कानाचा आसमंतात् भाग घामयुक्त करावा. नंतर गोमूत्रादिक व तैलादिक व औषधाचे रस हे सहन होत असे थोडे गरम करून कानात घालावे.

कानांत औषध घालून किती वेळ ठेवावें तो काळ

कर्णेतुपूरितंरक्षेत्तंशपंचशतानिवा ॥ सहस्रवापिमात्राणांश्रोत्रवंठशिरोगदे ॥८३॥

कर्णरोग व कंठरोग व मस्तकरोग हे दूर होण्याविषयीं कानामध्यें जें औषध घातलें तें भर मात्रा अथवा पाचशें मात्रा अथवा सहस्र मात्रा होत तों काळपर्यंत ठेवावें मात्रेचें लक्षण पुढील श्लोकात सांगितलें आहे त्याजवरून जाणावें.

मात्रेचें लक्षण.

स्वजानुनःकरावर्तंकुर्याच्छोटिकयायुतम् ॥ एषामात्राभवेदेकासर्वत्रैवैषनिश्चयः ॥८४॥

आपल्या गुडघ्यामोंवता स्पर्श लागे असा हाताचा फेरा फिरवून टिचकी मारावी इतक्या काळाची एक मात्रा जाणावी. असा निश्चय सर्वत्र आहे असें जाणावें.

रसादिक व तैलादिक याचा कानात घालावयाचा काळ

रसाद्यैःपूरणंकर्णेभोजनात्प्राक्प्रशस्यते ॥ तैलाद्यैःपूरणंकर्णेभास्करेअस्तमुपागते॥ ८५ ॥

रस आदिकरून जीं औषधें कानांत घालावयाचीं तीं भोजनाचे पूर्वीं घालावीं व तेल आदिकरून जीं औषधें कानांत घालावयाचीं तीं दिवस मावळल्यानंतर घालावीं.

कर्णशूळावर औषध.

पीतार्कपत्रमाज्येनलिप्तमग्नौप्रतापयेत् ॥ तद्रसःश्रवणेक्षिप्तःकर्णशूलहरःपरः ॥ ८६ ॥

रुईचें पिकलें पान आणून त्याला तूप लावून अग्निवर तापवून त्या पानाचा रस काढून कानात घालावा तेणेंकरून कर्णशूळ दूर होतो.

कर्णशूळादिकांवर मूत्रप्रयोग

कर्णशूलातुरेकोष्णंवस्तमूत्रससैंधवम् ॥ निक्षिपेत्तेनशाम्यतिशूलपाकादिकारुजः ॥८७॥

बोकडाचें मूत आणून त्यात सैंधव घालून किंचित् गरम करून कानात घालावें तेणेंकरून कर्णशूळ व व्रणसंबंधीं पाकादिक उपद्रव हे दूर होतात

कर्णशूळावर तिसरा प्रयोग

शृंगवेरंचमधुकंमधुसैंधवमामलम् ॥ तिलपर्णीरसस्तैलटंकणनिंबुकद्रवम् ॥ ८८ ॥
कदुष्णंकर्णयोर्देयमेतद्वावेदनापहम् ॥

आल्याचा रस १ ज्येष्ठीमध २ मध ३ सैंधव ४ आंवळकाठी ५ तिलपर्णीचा रस ६ शिरसेल तेल ७ टाकणखार ८ निंबूचा रस ९ हीं नऊ औषधें एकत्र करून किंचित् उष्ण करून कानात घालावीं तेणेंकरून कर्णसंबंधी वेदना दूर होतात.

कर्णशूळावर चवथा प्रयोग

कपित्थमातुलुंगाम्लशृंगवेररसैःशुभैः ॥ ८९ ॥ सुखोष्णैःपूरयेत्कर्णंकर्णशूलोपशांतये ॥

कंवठीचे फळाचा रस १ महाळुंगीचे फळाचा रस २ आम्लवेतसाचा रस ३ आल्याचा रस ४ हे चार रस एकत्र करून आणि सुख वाटे असे किंचित् उष्ण करून कर्णशूळ दूर होण्याविषयीं कानांत घालावे.

### कर्णशूळावर पांचवा प्रयोग.

अर्कांकुरानाम्लपिष्टान्तैलाक्तान्लवणान्वितान् ॥ ९० ॥ सन्निदध्यात्स्नुहीकांडेकोरितेतच्छदावृते ॥ पुटपाकक्रमेंकृत्वारसैस्तच्चमपूरयेत् ॥ ९१ ॥ सुखोष्णैस्तेनशाम्यंतिकर्णपीडाःसुदारुणाः ॥

रुईचे अंकुर ह्मणजे पुढच्या कोंवळ्या बारीक बारीक बोंड्या आणून निंबूचे रसांत वांटून त्यांत थोडें तिळांचें तेल व सैंधव घालून गोळा करावा. नंतर निवडुंगाचें ओलें कांडें आणून कोरून त्यांत तो गोळा घालून त्याचे भोंवतीं त्या निवडुंगाचीं पानें गुंडाळून बांधून त्याजवर थोडी माती लावून पुटपाकाचे रीतीनें त्या औषधांचा पाक होई असा हलका अग्नि द्यावा. नंतर तो गोळा बाहेर काढून पानें दूर करून तें कांडें औषधांसुद्धां पिळून रस काढून सुख वाटे असा किंचित् ऊष्ण करून कानांत घालावा, तेणेंकरून कर्णाचे ठायीं ज्या मोठ्या दारुण पीडा असतात त्या दूर होतात.

### कर्णशूळावर दीपिका तेल.

महतःपंचमूलस्यकांडान्यष्टांगुलानितु ॥९२॥ क्षौमेणावेष्ट्यसंसिच्यतैलेनादीपयेत्ततः ॥ यत्तैलंच्यवतेतेभ्यःसुखोष्णंतेनपूरयेत् ॥९३॥ ज्ञेयंतद्दीपिकातैलंसद्योगृह्णातिवेदनाम् ॥ एवंस्याद्दीपिकातैलंकुष्ठेदेवतरौतथा ॥ ९४ ॥

महत् मोठें असें पंचमूळ ह्मणजे पांचा औषधींचीं मुळें तीं आठ अंगुळ प्रमाण घेऊन त्या मुळांना सोवळ्याचें फडकें अथवा कापूस गुंडाळून तेलांत भिजवून अग्नीनें चेतवावीं आणि तीं मुळीं उभीं धरून त्यांपासून जें तेल खालीं गळेल तें सुख वाटे असें किंचित् ऊष्ण कानांत घालावें. येणेंकरून कानाची तिडीक तत्काळ दूर होते याला दीपिकातेल ह्मणतात. याप्रकारें कोष्ठ व देवदार यांना वेगळें फडकें गुंडाळून याच रीतीनें तेल काढून कानांत घालावें. येणेंकरूनही कर्णशूळ दूर होतो.

### कर्णशूळावर स्योनाक तेल.

तैलंस्योनाकमूलेनमंदेग्नौपरिपाचितम् ॥ हरेदाशुत्रिदोषोत्थंकर्णशूलंमपूरणात् ॥ ९५ ॥

टेटूचें मूळ आणून वाटून कल्क करावा आणि त्या कल्काचे चौपट तिळाचें तेल घेऊन दोन्ही एकत्र करावीं आणि त्या तेलाचा पाक होण्याविषयीं त्यांत पाणी कल्काचे चौपट घालून चुलीवर ठेवून हलका हलका अग्नि देऊन पाक करून शुद्ध तेल राहिलें ह्मणजे तें तेल घेऊन कानांत घालावें तेणेंकरून त्रिदोषापासून उत्पन्न जाहला जो कर्णशूळ तो लवकर दूर होतो.

कर्णनादावर तेल.

कल्काक्कथनयष्ट्याह्वकाकोलीमाषधान्यकैः ॥ सूकरस्यवसांपक्त्वाकर्णनादार्तिहारिणी ९६
ज्येष्ठीमध १ काकोलीचे अमावी आसंघ २ उडीद ३ धणे ४ या चार औषधांचा काढा करून त्यांत याच औषधांचा कल्क करून घालावा आणि डुकराची वसा ह्मणजे त्याचे मांसाचा स्नेह तो त्या काढ्यांत घालून चुलीवर ठेऊन स्नेह राही तोंपर्यंत पाक करावा. नंतर कांनात घालावा येणेंकरून कर्णनाद दूर होतो.

कर्णनादादिकांवर तेल.

सर्जिकामूलकंशुष्कंहिंगुकृष्णासमन्वितम् ॥ शतपुष्पाचतैस्तैलंपक्वंसूक्तंचतुर्गुणम् ॥९७॥
प्रणादंशूलबाधिर्यंस्रावंकर्णस्यनाशयेत् ॥
साजीखार १ वाळलेला मुळा २ हिंग ३ पिंपळी ४ बडीशोप ५ हीं पांच औषधें समभाग घेऊन वांटून कल्क करावा आणि त्या कल्काचे चौपट तिळांचें तेल घेऊन त्या कल्कांत घालावें आणि सूक्त ह्मणजे आम्लविशेष पदार्थ आसवाचा भेद आहे त्याची कृती मध्यम खंडीं आसवाचे अध्यायीं लिहिली आहे तें सूक्त त्या कल्काचे चौपट घेऊन त्या तेलात मेळवून चुलीवर ठेऊन खालीं अग्नि देऊन तेल राही तोंपर्यंत पाक करावा आणि तें तेलांत घेऊन कानांत घालावें. तेणेंकरून कर्णप्रणाद व कर्णशूळ व बैन्हेपणा व पुवादिकांचा स्राव हे रोग दूर होतात.

बैन्हेपणावर अपामार्गक्षार तेल.

अपामार्गक्षारजलेतत्क्षारंकल्कितंक्षिपेत् ॥९८॥ तेनपक्वंजयेत्तैलंबाधिर्यंकर्णनादकम् ॥
आघाड्याची राख करून मडक्यांत घालून त्यांत पाणी त्या राखेचे चौपट घालून रात्रीचे चार प्रहर ठेवून प्रातःकाळीं तें वरचें पाणी निवळ असेल तें लोखंडाचे कढईत गाळून घेऊन त्यांत तिळांचें तेल पाण्याचा चवथा हिस्सा घालून तेल राही तोंपर्यंत पाक करून तें तेल कानांत घालावें. तेणेंकरून कानाचा बधिरपणा व कर्णनाद हे रोग दूर होतात.

कर्णनाडीवर शंबुक तेल.

शंबूकस्यतुमांसेनपचेत्तैलंतुसार्षपम् ॥ ९९ ॥ तस्यपूरणमात्रेणकर्णनाडीमशाम्यति ॥
शंबूक ह्मणजे शिंपी अथवा काळ व त्यांतील मास व शिरसेल तेल त्या मांसाचे चौपट घेऊन त्या तेलात तें मास घालून तळावें, नंतर तें तेल कर्णनाडी ह्मणजे कर्णसंबंधी व्रण तो दूर होण्याविषयीं कानांत घालावें.

कर्णस्रावावर औषध.

चूर्णंपंचकषायाणांकपित्थरसमेवच ॥ ५०० ॥ कर्णस्रावेप्रशंसंति पूरणंमधुनासह ॥
पंच कषायसंज्ञक पाच औषधें आहेत त्यांचीं नावें पुढील श्लोकांत सांगेल. त्यांचें चूर्ण करावें आणि कंवठीचा रस काढून त्यांत तें चूर्ण व थोडी मध घालून पुवादिकांचा स्राव दूर होण्याविषयीं कानांत घालावें.

कंवठीचे फळाचा रस १ महाळुंगाचे फळाचा रस २ आम्लवेतसाचा रस ३ आल्याचा रस ४ हे चार रस एकत्र करून आणि सुख वाटे असे किंचित् उष्ण करून कर्णशूळ दूर होण्याविषयीं कानांत घालावे.

कर्णशूळावर पांचवा प्रयोग.

अर्कांकुरानाम्लपिष्टान्तैलाक्तान्लवणान्वितान् ॥ ९० ॥ सन्निदध्यात्स्नुहीकांडेकोरितेतच्छदावृते ॥ पुटपाकक्रमंकृत्वारसैस्तश्चमपूरयेत् ॥ ९१ ॥ सुखोष्णैस्तेनशाम्यंतिकर्णपीडाःसुदारुणाः ॥

रुईचे अंकुर ह्मणजे पुढच्या कोंवळ्या बारीक बारीक बोंण्या आणून निंबूचे रसांत वांटून त्यांत थेंडें तिळांचें तेल व सैंधव घालून गोळा करावा. नंतर निवडुंगाचें ओलें कांडें आणून कोरून त्यांत तो गोळा घालून त्याचे भोंवतीं त्या निवडुंगाचीं पानें गुंडाळून बांधून त्याजवर थोडी माती लावून पुटपाकाचे रीतीनें त्या औषधांचा पाक होई असा हलका अग्नि द्यावा. नंतर तो गोळा बाहेर काढून पानें दूर करून तें कांडें औषधांसुद्धां पिळून रस काढून सुख वाटे असा किंचित् ऊष्ण करून कानांत घालावा. तेणेंकरून कर्णाचे ठायीं ज्या मोठ्या दारुण पीडा असतात त्या दूर होतात.

कर्णशूळावर दीपिका तेल.

महतःपंचमूलस्यकांडान्यष्टांगुलानितु ॥९२॥ क्षौमेणावेष्ट्यसंसिच्यतैलेनादीपयेत्ततः ॥ यत्तैलंच्यवतेतेभ्यःसुखोष्णंतेनपूरयेत् ॥९३॥ ज्ञेयंतद्दीपिकातैलंसद्योगृह्णातिवेदनाम् ॥ एवंस्याद्दीपिकातैलंकुष्ठेदेवतरौतथा ॥ ९४ ॥

महत् मोठें असें पंचमूळ ह्मणजे पांचा औषधींचीं मुळें तीं आठ अंगुळ प्रमाण घेऊन त्या मुळांना सोवळ्याचें फडकें अथवा कापूस गुंडाळून तेलांत भिजवून अग्नीनें पेतवावीं आणि तीं मुळीं उभीं धरून त्यांपासून जें तेल खालीं गळेल तें सुख वाटे असें किंचित् ऊष्ण कानांत घालावें. येणेंकरून कानाची तिडीक तत्काळ दूर होते याला दीपिकातेल ह्मणतात. याप्रकारें कोष्ठ व देवदार यांना वेगळें फडकें गुंडाळून याच रीतीनें तेल काढून कानांत घालावें. येणेंकरूनही कर्णशूळ दूर होतो.

कर्णशूळावर स्योनाक तेल.

तैलंस्योनाकमूलेनमंदाग्नौपरिपाचितम् ॥ हरेदाशुत्रिदोषोत्थंकर्णशूलंमपूरणात् ॥ ९५ ॥

टेटूचें मूळ आणून वाटून कल्क करावा आणि त्या कल्काचे चौपट तिळांचें तेल घेऊन दोन्हीं एकत्र करावीं आणि त्या तेलाचा पाक होण्याविषयीं त्यांत पाणी कल्काचे चौपट घालून चुलीवर ठेवून हलका हलका अग्नि देऊन पाक करून शुद्ध तेल राहिलें ह्मणजे तें तेल घेऊन कानांत घालावें तेणेंकरून त्रिदोषापासून उत्पन्न जाहला जो कर्णशूळ तो लवकर दूर होतो.

# द्वादशोऽध्यायः ।

रक्तस्रावाचा विधि

शोणितंस्रावयेज्जंतोरामयप्रसमीक्ष्यच ॥ प्रस्थंप्रस्थार्धंवापिप्रस्थार्धार्धमथापिवा ॥ ७ ॥

मनुष्याचे शरीराचे ठायीं आमय ह्मणजे रक्तजन्य कुष्ठादिक जे रोग त्यातें अवलोकन करून रक्तस्राव करावा ह्मणजे शरीरातील रक्त काढावें. त्याचें प्रमाण एक प्रस्थ अथवा अर्धा प्रस्थ अथवा अर्धाचे अर्धा प्रस्थ ह्मणजे कुडवप्रमाण जणावें.

रक्तस्रावाचा सामान्य काल

शरत्कालेस्वभावेनकुर्याद्रक्तस्रुतिंनरः ॥ त्वग्दोषग्रंथिशोथाद्यानस्युरक्तस्रुतेर्यतः ॥ ८ ॥

शरत्कालाचे ठायीं स्वभावेंकरून मनुष्यानीं रक्तस्राव करावा. शरीरातील रक्त काढिलें असता त्वचेसंबंधीं दाप व व्रणादिक ग्रंथि व सूज इत्यादिक रोग दूर होतात, यास्तव

रक्ताचे रसादिकाचें स्वरूप.

मधुरंवर्णतोरक्तमशीतोष्णंतथागुरु ॥ शोणितंस्निग्धविस्रस्याद्विदाहश्चास्यपित्तवत् ॥ ९ ॥

रक्तरसेंकरून मधुर ह्मणजे गोडिळ आहे व वर्णेंकरून तांबडें व गुणेंकरून अशीतोष्ण ह्मणजे मंदोष्ण व जड व चिकण व आमगंधि आहे व त्या रक्ताची दाहशक्ति पित्तासारखी आहे याप्रकारें रक्ताचे रस व वर्ण व गुण जाणावे.

रक्ताचे ठायीं पृथिव्यादिभूताचे गुण आहेत ते

विस्रताद्रवतारागश्चलनंविलयस्तथा ॥ भूम्यादिपंचभूतानामेतेरक्तगुणाःस्मृताः ॥ १० ॥

विस्रता ह्मणजे आमगंधता हा पृथ्वीचा गुण व द्रवता उदकाचा गुण व राग ह्मणजे रक्तता अग्नीचा गुण व चलनवायूचा गुण व लीनता आकाशाचा गुण याप्रकारें पृथिव्यादि पंचभूताचे पांच गुण रक्ताचे ठायीं आहेत असें जाणावें.

रक्त दुष्ट जाहलें असता लक्षण.

रक्तेदुष्टेवेदनास्यात्पाकोदाहश्चजायते ॥ रक्तमंडलताकंडूःशोथश्चपिटिकोद्गमः ॥ ११ ॥

मनुष्याचें रक्त दुष्ट जाहलें असता शरीराला वेदना होतात व अंग पिकल्या सारिखें होऊन दाह होतो आणि शरीराचे ठायीं रक्ताचीं मंडळें, कंडू, सूज व पुटकुळ्या होतात असें जाणावें.

रक्त वृद्ध जाहलें असता लक्षण

वृद्धेरक्तांगनेत्रत्वंशिराणांपूरणंतथा ॥ गात्राणांगौरवंनिद्रामदोदाहश्चजायते ॥ १२ ॥

रक्त वृद्धीप्रत गेलें असता शरीर व नेत्र आरक्तवर्ण होतात व धमन्यादिक शिरांचें पूरण होतें ह्मणजे फुगतात व गात्राला जडपणा व निद्रा व मद व दाह हे उपद्रव होतात.

क्षीण रक्त जाहलें असता लक्षण.

क्षीणेम्लमधुराकांक्षामूर्छाचत्वचिरूक्षता ॥ शैथिल्यंचशिराणांस्याद्रातादुन्मार्गगामिता ॥ १३ ॥

मनुष्याचें क्षीण रक्त जाहलें असता आंबट व गोड या पदार्थांवर इच्छा होत्ये व

### पंचकषायसंज्ञक वृक्षांचीं नावें.

तिंदुकान्यभयालोध्रःसमंगाचामलक्यपि ॥१॥ ज्ञेयाःपंचकषायास्तुकर्मण्यस्मिन्भिषग्वरैः ॥

तेंदु १ हर्तकी २ लोध्र ३ मंजिष्ठ ४ आवळी ५ हे कर्णस्राव दूर होण्याविषयीं पंचकषायसंज्ञक वृक्ष जाणावे. यांमध्यें ज्याची साल घ्यावयाची त्यांची साल घ्यावी आणि ज्यांचीं फळें घ्यावयाचीं त्यांचीं फळें घ्यावीं. हा विचार प्रथमखंडीं परिभाषेचे अध्यायीं आहे त्याजवर जाणावा.

### कर्णस्रावावर औषध.

सर्जिकाचूर्णसंयुक्तंबीजपूररसंक्षिपेत् ॥ २ ॥ कर्णस्रावरुजादाहाःप्रणश्यंतिनसंशयः ॥

साजीखाराचें चूर्ण महाळुंगाचे रसांत घालून कानांत घालावें, तेणेंकरून कर्णस्रावसंबंधीं पीडा व दाह, हे निश्चयेंकरून दूर होतात.

### कानांतून पू वाहतो त्यावर औषध.

आम्रजंबूप्रवालानिमधुकस्यवटस्यच ॥ ३ ॥ एभिःसंसाधितंतैलंपूतिकर्णोपशांतिकृत् ॥

आंबा व जांभूळ व मोह आणि वड या चौहोंचीं कोंवळीं पानें आणून वांटून कल्क करून त्यांत तिळांचें तेल त्या कल्काचे चौपट घालून अग्नीवर पाक करावा. नंतर तें तेल कानांतून जो पुवाचा स्राव होतो तो दूर होण्याविषयीं कानांत घालावें.

### कर्णकीट दूर होण्याविषयीं तेल.

पूरणंहरितालेनगवांमूत्रयुतेनच ॥ ४ ॥ अथवासार्षपंतैलंकर्णकीटहरंपरम् ॥

हरताळ गोमूत्रांत उगाळून कानांत घालावा अथवा शिरसेल तेल कानांत घालावें, तेणेंकरून कर्णसंबंधीं कीट ह्मणजे कृमि हे दूर होतात.

### कर्णकीट दूर होण्याविषयीं दुसरा प्रयोग.

स्वरसैःशिग्रुमूलस्यसूर्यावर्तरसेनवा ॥ ५ ॥ त्र्यूषणेनूर्णितंचैवरपिरुन्दुरसंतथा ॥ कृत्वैवं त्रक्षिपेत्कर्णेकर्णकीटहरंपरम् ॥ ६ ॥

शेवग्याचे सालीचा रस व सूर्यफुलाचा रस, त्र्यूषण ह्मणजे सुंठ, मिर्चे, पिंपळी यांचें चूर्ण व ग्वाजकुइलीचे मुळाचा रस हे सारे रस एकाजागीं करून त्यांत तें चूर्ण घालून कर्णसंबंधीं कृमि दूर होण्याविषयीं कानांत घालावें.

इति श्री दामोदरसूनु शार्ङ्गधरेण विरचितायां संहितायां चिकित्सास्थाने उत्तरखंडे लेपादिकर्णपूरणविधिर्नाम एकादशोऽध्यायः ॥

---

पाणिरोगेश्लीपदेचविषदुष्टेचशोणिते ॥२०॥ ग्रंथ्यर्बुदापचीक्षुद्ररोगरक्ताधिमंथिषु ॥ विदारीस्तनरोगेषुगात्राणांसादगौरवे॥२१॥ रक्ताभिष्यंदतंद्रायांपूतिघ्राणास्यदेहके॥ यकृत्प्लीहविसर्पेषुविद्रध्यौपीटकोद्गमे ॥ २२ ॥ कर्णौष्ठघ्राणवक्त्राणांपाकेदाहेशिरोरुजि ॥ उपदंशेरक्तपित्तेरक्तस्रावःप्रशस्यते ॥ २३ ॥

दाह व सूज व ज्याचे अंगाचा पाक व शरीरही रक्तवर्ण असा मनुष्य व ज्याचे नासिकादिकावाटे रक्तस्राव होतो तो मनुष्य व वातरक्त व कुष्ठ व पीडायुक्त असून जिंकावयास अशक्य असा वायु व पाणीरोग व श्लीपद रोग व विषानें दुष्ट झालें असें रक्त व ग्रंथिरोग व अर्बुद व गंडमालेचा भेद अपचीरोग व क्षुद्ररोग व रक्ताधिमंथरोग नेत्रांमध्यें आहे तो व विदारीरोग व स्तनरोग व गात्रांना शिथिलपणा व शरीराला जडपणा येतो तो व रक्ताभिष्यंद नेत्ररोगांमध्यें आहे तो रोग व तंद्रा ह्मणजे डोळ्यावर झांपड पडते ती व दुर्गंधयुक्त आहेत नाक व मुख व देह ज्याचे तो मनुष्य व यकृत् ह्मणजे कालखंडरोग काळजाचे उजवेकडे होतो तो व प्लीहा ह्मणजे क्वलु व विसर्प व विद्रधि व अंगावर पुटकुळ्यांची प्राप्ती व कान व ओंठ नाक व तोंड यांचा पाक व दाह व मस्तकपीडा व उपदंश व रक्तपित्त हे इतके रक्त काढण्याविषयीं योग्य जाणावे.

कोणत्या प्रकारानें रक्त काढावयाचें तो प्रकार सांगतो

एषुरोगेषुशृंगैर्वाजलौकालाबुकैरपि॥ अथवापिशिरामोक्षैःकुर्याद्रक्तस्रुतिंनरः ॥२४॥

रक्त काढण्याविषयीं जे योग्य रोग त्यांचे शिंगानें अथवा जळवानीं अथवा तुंबडीनें अथवा शिरा देऊन रक्त काढावें.

जे शिरा देण्याविषयीं योग्य नाहींत ते.

नकुर्वीतशिरामोक्षंकृशस्यातिव्यवायिनः॥ क्लीबस्यभीरोर्गर्भिण्यासूतिकापांडुरोगिणाम् ॥२५॥ पंचकर्मविशुद्धस्यपीतस्नेहस्यचार्शसाम् ॥ सर्वांगशोथयुक्तानामुदरिश्वासकासिनाम् ॥२६॥ छर्द्यतीसारयुक्तानामतिस्विन्नतनोरपि ॥ ऊनषोडशवर्षस्यगतसप्ततिकस्यच ॥ २७ ॥ आघातस्रुतरक्तस्यशिरामोक्षोनशस्यते ॥ एषांचात्ययिकेयोगे जलौकाभिस्तुनिर्हरेत् ॥ २८ ॥ तथापिविषयुक्तानांशिरामोक्षोविशस्यते ॥

कृश मनुष्य व स्त्रीचे ठायीं फार विषयासक्त मनुष्य व नपुंसक व भित्रा व गर्भिणी स्त्री व बाळंत झालेली पांडुरोगी व वमनादिक पंचकर्में जीं तिहींकरून शुद्ध झाला असा मनुष्य व ज्यानें स्नेहपान केलें तो मनुष्य व अर्शोरोगी व ज्याचें सुजेनें सर्वांग व्यान असा मनुष्य व उदररोगी व श्वास व खोकला व ओकारी व अतिसार इहींकरून पीडित मनुष्य व ज्याचे अंगाचा घाम फार निघाला आहे तो मनुष्य व ज्याचें वय सोळा वर्षांआंतीकडे आहे तो मनुष्य व ज्याचे वयाला सत्तर वर्षें झालीं असा मनुष्य व आघातेंकरून नासिकादिकावाटे झाला आहे रक्तस्राव ज्याचे असा मनुष्य इतक्या रोग्यांस शिरा देऊन

मूर्छा आणि वायूकरून त्वचेला रुक्षपणा व शिराचे ठायीं शिथिलपणा येतो व वायु ऊर्ध्वमार्गीं गमन करितो.

वायूनें दुष्ट रक्त जाहलें असतां लक्षण.

अरुणंफेनिलंरूक्षंपरुषंतनुशीघ्रगम् ॥ अस्कंदिसूचिनिस्तोदंरक्तंस्याद्वातदूषितम् ॥१४॥

वायूकरून दुष्ट रक्त जाहलें असता तें रक्त अरुणवर्ण व फेंसासारिखें व रुक्ष व कर्कश व हलकें शीघ्र वमन करणारें व पातळ असें होतें आणि सुया टोंचल्यासारिखी पीडा देतें असें जाणावें.

पित्तेंकरून दुष्ट रक्त जाहलें असतां लक्षण.

पित्तेनपीतंहरितंनीलश्यावंचविस्रकम्॥अस्कंद्युष्णंमक्षिकाणांपिप्पलीनामनिष्टकम् ॥१५॥

पित्तेंकरून रक्त दुष्ट जाहलें असतां तें रक्त पीतवर्ण व हरितवर्ण व नीलवर्ण व श्यामवर्ण व आमगंधि व ऊष्ण आणि चाचल्यरहित असें होतें व माशा आणि मुंग्या यास भक्षणाविषयीं उपयोगीं पडत नाहीं असें होतें.

कफानें दुष्ट रक्त जाहलें असतां लक्षण.

शीतंचबहलंस्निग्धंगैरिकोदकसंन्निभम् ॥ मांसपेशीप्रभंस्कंदिमंदगंकफदूषितम् ॥१६॥

कफेंकरून दुष्ट रक्त झालें असता तें रक्त स्पर्शेंकरून फार शीतळ भासतें व स्निग्ध असून गेरूचे रंगासारखें दिसतें व मांसपेशी ह्मणजे मासाचे बारीक बारीक ग्रंथि त्याचेसारखें होतें व स्कदि ह्मणजे घण व मंद गमन करणारें असें होतें.

द्विदोष व त्रिदोष इहींकरून रक्त दुष्ट झालें असतां लक्षण

द्विदोषदुष्टंसंसृष्टंत्रिदोषपूतिगंधकम् ॥ सर्वलक्षणसयुक्तंकांजिकाभंचजायते ॥ १७ ॥

दोहों दोषेंकरून दुष्ट झालें जें रक्त तें दोषांचे लक्षणेंकरून युक्त असतें व त्रिदोषेंकरून दुष्ट झालें जें रक्त त्याला पुवाचा गंध येतो आणि तिहीं दोषाचें लक्षणें करून युक्त असतें व कांजीसारखें दिसतें.

विषेंकरून दुष्ट रक्त झालें असतां लक्षण.

विषदुष्टंभवेत्कृष्णंनासिकोर्ध्वमार्गगंतथा ॥ विस्रंकांजिकसंकाशंसर्वकुष्ठकरंचहु ॥१८॥

विषेंकरून दुष्ट रक्त झालें असतां तें रक्त कृष्णवर्ण होतें आणि ऊर्ध्वमार्गी होऊन नाकांतून पडतें व आमगंधि असून कांजीसारखें दिसतें व अतिशयेंकरून सर्व कुष्ठाला उत्पन्न करितें.

विकाररहित जें रक्त त्याचें लक्षण.

इंद्रगोपप्रभंप्रेषंकंनिस्थपसंहतम् ॥

काहींएक विकार नसतां जें रक्त प्रकृतीचे ठायीं राहतें तें रक्त इंद्रगोप ह्मणजे चिरबोटी या नावेंकरून तांबडा किडा आहे त्याचेसारखें आरक्त असून पातळ असतें असें जाणावें

रक्तस्रावविषयीं योग्य ते.

प्वर्णेंप्रजःसुती ॥ १९ ॥ वातरक्तेतथाकुष्ठेसमीढेदुर्जयेनिले ॥

विळीं शीर फार टोंचली असतां आगातून रक्त फार येऊं लागतें तें बंद होण्याविषयीं
पाय पुढील श्लोकांत सांगेल.

रक्त फार निघूं लागलें असतां उपाय.

अतिप्रवृत्तेरक्तेचलोध्रसर्जरसांजनैः ॥ यवगोधूमचूर्णैर्वाधवधन्वनगैरिकैः ॥ ३७ ॥
सर्पनिर्मोकचूर्णैर्वाभस्मनाक्षौमवस्त्रयोः॥ मुखंव्रणस्यबध्वाचशीतैश्चोपचरेद्व्रणम् ॥३८॥
विध्येदूर्ध्वंशिरांतांवादहेत्क्षारेणवाग्निना ॥ व्रणंकषायःसंधत्तेरक्तंस्कंदयतेहिमम् ॥३९॥
वृणास्यंपाचयेत्क्षारोदाहःसंकोचयेच्छिराम् ॥

शिरांतून रक्त फार येऊं लागलें असतां तें बंद होण्याविषयीं लोध्र व राळ व रसांजन या
त्रा तिहींचें चूर्ण अथवा जव आणि गहूं यांचें चूर्ण अथवा धावडा व धमासा व गेरु या
तिहींचें चूर्ण अथवा सापाचे मेंगेचें चूर्ण अथवा सोंवळें व चिरगूट या दोहोंची राख यां-
तून समयीं जें औषध असेल तें व्रणमुखाचे ठायीं दडपून बांधून त्या व्रणावर चंदना-
दिक शीतळ लेपादिक उपचार करावे. तेणेंकरून रक्त बंद होतें. जर इतक्या उपायानें बंद
होईना तर तीच शीर वरले अंगीं पुनः घ्यावी अथवा त्या व्रणमुखाचे ठायीं टांकणखा-
रादिक अग्निस्वरूप जे खार त्या खारांचा लेप करावा अथवा तें मुख अग्नीनें डागावें. इ-
तक्या उपायेंकरून रक्त बंद होतें. कसें बंद होतें तें सांगतों. कषाय म्हणजे तें लोध्रादिक
चूर्ण व्रणाचें तोंड आंवळून धरितें व शीतोपचारेंकरून रक्त थांबतें व क्षारेंकरून व्रणाचें पा-
चन होतें व अग्न्यादिक दाहेंकरून शिरांचा संकोच होतो.

दाहेंकरून जे रोग दूर होतात ते.

दहेच्छिरांव्यत्ययेतुवामांगुष्ठशिरादहेत् ॥
वामांडशोथेदक्षस्यकरस्यांगुष्ठमूलजा॥४०॥
शिरादाहप्रभावेनमुष्कशोथःप्रशाम्यति॥४१॥विपूच्यांपाददाहेनजायतेग्नेःप्रदीपनम् ॥
संकुचंतिपतस्तेनरसश्लेष्मवहाःशिराः ॥ ४२ ॥ यदावृद्धियेकृत्प्लीहोःशिशोःसंजा-
यतेसृजः ॥ तदातत्स्थानदाहेनसंकुचंत्यसृजःशिराः ॥ ४३ ॥

मनुष्याचे डावे वृषणाला सूज आली असतां उजव्ये हाताचे आंगठ्याची शीर डागावी.
उजव्ये वृषणाला सूज आली असतां डाव्ये हाताचे मुळाची शीर डागावी. तेणेंकरून वृष-
णाची सूज दूर होत्ये. मोडशी झाली असतां लोखंडाची कोयती अथवा पळी तापवून
पायांचे तळवे ओरपावे म्हणजे शेकावे. तेणेंकरून रसवाहिनी व कफवाहिनी ज्या शिरा त्यांचा
संकोच होऊन अग्नि प्रदीप्त होतो; आणि मोडशी दूर होत्ये. ज्याकाळीं बाळकाचे पोटांत
उजव्येकडे यकृत् म्हणजे काळखंड व डाव्येकडे प्लीहा म्हणजे वरळ यांची वृद्धि होत्ये त्या-
काळीं त्या जाग्यावर डाग द्यावे तेणेंकरून ते यकृत् व प्लीहा हे मार्ग सरतात.

दुष्ट रक्त काढून किंचित् अवशिष्ट राहिलें असतां त्याचे गुण

अतःस्राव्यंसावशेषंरक्तंनातिक्रमोदितः ॥
रक्तेदुष्टेवशिष्टेपिव्याधिर्नैवप्रकुप्यति ॥
आंध्यमाक्षेपकंतृष्णांतिमिरंशिरसोरुजम् ॥४४॥ पक्षाघातंचाप्यंगमौरिकांदाहंचपां-
डुताम् ॥ कुरुतेविस्रुतंरक्तंमरणंवाकरोतिच ॥ ४५ ॥

रक्त काढूं नये. समयीं अगत्यच पडल्यास जळवांनीं रक्त काढावें कदाचित् हे रोगी विषप्रयोगानें व्याप्त झाले असतां शिरा देऊन रक्त काढावें.

*वातादिकांनीं दुष्ट रक्त झालें असतां काढावयाचा प्रकार.*

गोशृंगेणजलौकाभिरलाबुभिरपित्रिधा ॥ २९ ॥ वातपित्तकफैर्दुष्टंशोणितंस्रावयेद्बुधः ॥ द्विदोषाभ्यांतुसंसृष्टंत्रिदोषैरपिदूषितम् ॥ ३० ॥ शोणितंस्रावयेद्युक्त्याशिरामोक्षैःपदैस्तथा ॥

वायूनें दुष्ट जाहलें जें रक्त तें गाईचे शिंगानें काढावें व पित्तानें दुष्ट जाहलें जें रक्त तें जळवांनीं काढावें व कफेंकरून दुष्ट जाहलें जें रक्त तें तुंबडीनें काढावें व दोहों दोषेंकरून अथवा तिहीं दोषेंकरून दुष्ट जाहलें जें रक्त तें युक्तीनें शिरा देऊन अथवा फांसण्या मारून काढावें.

*शिंगादिकांचें रक्त घेण्याविषयीं प्रमाण.*

गृह्णातिशोणितंशृंगंदशांगुलमितंबलात् ॥ ३१ ॥ जलौकाहस्तमात्रंचतुंबीचद्वादशांगुलम् ॥ पदमंगुलमात्रेणशिरासर्वांगशोधिनी ॥ ३२ ॥

शिंग लाविलें असता आपल्या बळेंकरून दाहा अंगुळप्रमाण रक्त ओढून घेतें व जळू लाविली असतां एक हस्त प्रमाण व तुंबडी बारा अंगुळप्रमाण व फांसणी एक अंगुळप्रमाण रक्त ओढून घेतात व शीर दिल्ही असतां सर्वांगाचे रक्ताचें शोधन होतें.

*ज्यांचे अंगांतून रक्त निघत नाहीं त्यांचें कारण.*

शीतेनिरन्नेमूर्छाचतंद्राभीतिमदश्रमैः ॥ युतानांनस्रवेद्रक्तंतथाविण्मूत्रसंगिनाम् ॥३३॥

शीतकाळ असतां व मनुष्य उपोषित असता व मूर्छा व डोळ्यांवर झांपड व भीति व मद व श्रम इहींकरून युक्त असतां व मळ व मूत्र हे साफ जाहले नसता मनुष्याचे शरीरातून रक्त निघत नाहीं.

*शिरादिक देऊन रक्त निघालें नसतां उपाय.*

अप्रवर्तिनिरक्तेचकुष्ठंचित्रकसैंधवैः ॥ मर्दयेद्व्रणवक्त्रंचतेनसम्यक्प्रवर्तते ॥ ३४ ॥

शिरादिक देऊन रक्त बाहेर आलें नसतां कोष्ठ व चित्रक व सैंधव या तीन पदार्थांचें चूर्ण करून व्रणाचे तोंडावर चोळावें, तेणेंकरून उत्तम प्रकारें रक्त बाहेर येतें

*रक्त काढण्याविषयीं काळाचें विधान*

तस्मान्नशीतेनात्युष्णेनस्विन्नेनातितापिते ॥ पीत्वायवागूंतृप्तस्यशोणितंस्रावयेद्बुधः ॥३५॥

शीतकाळ व फार ऊष्णकाळ हे नसतां व मनुष्याचे अंगाचा घाम काढिला नसतां आणि शरीर फार तप्त जाहलें नसता अशा मनुष्यानें यवाचा यवागू पिऊन तृप्त जाहला जो त्याचें वैद्यांनीं रक्त काढावें.

*जेणेंकरून रक्त फार येऊं लागतें तो प्रकार.*

अतिस्विन्नस्योष्णकालेनचैवातिशिराव्ययात् ॥ अतिप्रवर्तनेरक्तंतत्रकुर्यात्प्रतिक्रियाम् ॥३६॥

मनुष्याचे अंगाचा फार घाम काढून उष्णकाळाचे ठायीं रक्त काढिलें असतां व शीर

# त्रयोदशोऽध्यायः ।

डोळे चांगले होण्याविषयीं उपचार.

सेकश्चाश्चोतनंपिंडीविडालस्तर्पणंतथा ॥ ५१ ॥ पुटपाकोंजनंचैभिःकल्कैर्नेत्रमुपाचरत् ॥ सेक १ आश्चोतन २ पिंडी ३ विडाल ४ तर्पण ५ पुटपाक ६ अंजन ७ हे सात प्रकार नेत्ररोगाविषयीं सांगितले याचे कल्क करून ज्या रीतीनें नेत्ररोगावर उपचार करावयास सांगेल तसें करावें.

सेकाचें लक्षण.

सेकस्तुसूक्ष्मधाराभिःसर्वस्मिन्नयने हितः॥५२॥मीलिताक्षस्यमर्त्यस्यप्रदेहश्चतुरंगुलात् ॥ मनुष्याचे डोळे मिटवून दूध तूप रस इत्यादिकांची सारे डोळ्यांवर चार अंगुळाचे अंतरानें बारीक धार धरावी याला सेक ह्मणतात.

त्या सेकाचे स्नेहनादि भेदेंकरून तीन प्रकार.

सचापिस्नेहनेवातेरक्तेपित्तेचरोपणः ॥५३॥ लेखनश्चकफेकार्यस्तस्यमात्राधुनोच्यते ॥ वातरोग असतां स्नेहन सेक योजावा व रक्तपित्ताचा कोप असता रोपण सेक योजावा व कफरोग असतां लेखन सेक योजावा

सेकाची मात्रा.

षड्वाक्शतैःस्नेहनेषुचतुर्भिश्चैवरोपणे॥५४॥वाक्शतैश्चत्रिभिःकार्यःसेकोलेखनकर्मणि ॥ स्नेहनकर्म असता सहाशें आख होत तोंपर्यंत डोळ्यांवर धार ज्या औषधांची सांगेल त्याची धरावी, रोपणकर्म असतां चारशें आख होत तोंपर्यंत धार धरावी, लेखनकर्म असतां तीनशें आंख होत तोंपर्यंत धार धरावी.

सेक केव्हां करावा तो काळ

कार्यस्तुदिवसेसेकोरात्रौचात्ययिकेगदे ॥ ५५ ॥ जो डोळ्यांवर सेक करावयाचा तो दिवसासच करावा. जर रोगाचें आधिक्य आहे तर रात्रीसही करावा.

वाताभिष्यंद रोगावर सेक.

एरंडत्वक्पत्रमूलैःशृतमाजंपयोहितम्॥ सुखोष्णंसेचनंनेत्रेवाताभिष्यंदनाशनम् ॥५६॥ एरंडाची साल व पानें व मुळें हीं सर्वांशी बोळीचे दुधात कढवून नंतर तें दूध सहन होई असें कोमटकोमट असून त्याची धार वाताभिष्यंद रोग दूर होण्याविषयीं डोळ्यावर धरावी.

शरीरांतील दुष्ट रक्त काढून थोडें अवशिष्ट राहिलें असतां रोगाचा प्रकोप होत नाहीं यास्तव जें रक्त काढणें तें थोडें राखून काढावें हितावह होतें; आणि सारें रक्त काढिलें असतां, अंधता आक्षेपकवायु, तृष्णा, तिमिर, मस्तकपीडा, पक्षघातवायु, श्वास, कास म्हणजे खोकला, उचकी, दाह व पांडुरोग हे उपद्रव होतात, आणि मनुष्य मरणावस्थेप्रत जातो, यास्तव सारें रक्त काढूं नये.

रक्तापासून देहाचे उत्पत्त्यादिकांचा प्रकार.

देहस्योत्पत्तिरसृजादेहस्तेनैवधार्यते ॥ विनातेनव्रजेज्जीवोरक्षेद्रक्तमतोबुधः ॥ ४६ ॥

रक्तापासून देहाची उत्पत्ति आहे व त्या रक्तेंकरूनच देहाचें धारण होतें आणि रक्तावाचून जीव रहात नाहीं. यास्तव सूज्ञानीं रक्ताचें रक्षण करावें.

रक्त काढिल्यावर दोषप्रकोप झाला असतां उपाय.

शीतोपचारैःकुपितेस्रुतरक्तस्यमारुते ॥ कोष्णेनसर्पिषाशोथसव्यथंपरिषेचयेत् ॥ ४७ ॥

रक्त काढिल्यावर व्रणस्थानाचे ठायीं पित्ताचा प्रकोप झाला असता चंदनादिक शीतळ उपचार करावा. वायूचा प्रकोप होऊन त्यापासून त्या व्रणस्थानीं पीडायुक्त अशी सूज आली असतां तिचे ठायीं तूप थोडें गरम करून लावावें.

रक्त काढिलें असतां पथ्य.

क्षीणस्यैणशशोरभ्रहरिणच्छागमासजः ॥ रसःसमुचितःपानेक्षीरंवाषष्ठिकाहिता ॥ ४८ ॥

शरीरातील रक्त काढिलें असतां त्यापासून क्षीण झाला असतां मनुष्य जो त्यानें हरिण, ससा, मेंढा, काळा हरिण, बोकड याचे मासाचा रस प्यावा आणि साठी तांदूळ गाईचे दुधात घालून खीर करून खावी. अथवा गाईचें दूध प्यावें आणि साठी तांदुळांचा भात खावा. याप्रमाणें हे पदार्थ सेविले असता हितकारक होतात.

रक्त चांगलें जाहलें असतां लक्षण.

पीडाशांतिर्लघुत्वंचव्याधेरुद्रेकसंक्षयः ॥ मनःस्वास्थ्यंभवेचिन्हंसम्यक्‌विस्राविते‌ऽसृजि ॥ ४९ ॥

पीडेचा नाश व देहाचे ठायीं हलकेपणा व रोगाचा जो उत्कर्ष त्याचा उत्तम प्रकारें करून नाश व मनाचे ठायीं प्रसन्नता हीं लक्षणें उत्तमप्रकारें रक्त निघालें असतां जाणावीं

रक्त काढिलें असतां निषेध

व्यायाममैथुनक्रोधशीतस्नानप्रवातकान् ॥ एकाशनंदिवानिद्रांक्षाराम्लकटुभोजनम् ॥ ५० ॥
शोकंवादमजीर्णंचत्यजेदाबलदर्शनात् ॥

परिश्रम, मैथुन, क्रोध, थंड पाण्यानें स्नान करणें, बहुत वारा घेणें, एकच धान्य खाणें, दिवसास निजणें, जवखारादिक खार, आंबट व तिखट हे पदार्थ भक्षण करणें, शोक आणि वाद हे करणें, बहुत भोजनजन्य अजीर्ण करून घेणें, असे जोंपर्यंत शरीरात बळ येई तोंपर्यंत वर्ज्य करावें.

इति श्री दामोदरसूनु शार्ङ्गधरेण विरचितायां संहितायां चिकित्सास्थाने उत्तरखंडे रक्तमोक्षविधिर्नाम द्वादशोऽध्यायः ॥ १२ ॥

---

लेखनादिक आश्चोतनाचे ठायीं किती बिंदु घा वे त्याचें प्रमाण.

बिंदवोष्टौलेखनेपुस्नेहनेदशबिंदवः ॥ रोपणेद्वादशप्रोक्तास्तेशीतेकोष्णरूपिणः ॥६४॥
उष्णेचशीतरूपाःस्युःसर्वत्रैवेपनिश्चयः ॥
लेखनकर्म असतां डोळ्यांमध्यें आठ बिंदु सोडावे व स्नेहनकर्म असतां दहा बिंदु सोडावे व रोपणकर्म असतां बारा बिंदु सोडावे आणि ते बिंदु शीतकाळ असतां डोळ्यांना सहन होत असे कोमट कोमट सोडावे. उष्णकाळ असतां शीतरूप सोडावे, हा निश्चय.

वातादिकांचे ठायीं आश्चोतन द्यावयाची योजना.

वातेतिक्ततथास्निग्धंपित्तेमधुरशीतलम् ॥६५॥ तिक्तोष्णरूक्षंचकफेक्रमादाश्चोतमंहितम् ॥
वातरोग असतां कडु आणि स्निग्ध असें आश्चोतन योजावें व पित्तरोग असतां मधुर व शीतळ असें योजावें व कफरोग असतां कडु व उष्ण असें योजावें. याप्रकारें आश्चोतन योजिलें असतां हितकारक होतें.

आश्चोतनाचे मात्रेचें लक्षण.

आश्चोतनानांसर्वेषांमात्रास्याद्वाक्शतंहितम् ॥ ६६ ॥ निमेषोन्मेषणंपुंसामंगुल्योश्छोटिकाथवा ॥ गुर्वक्षरोच्चारणंवावाङ्मात्रेयंस्मृताबुधैः ॥ ६७ ॥
मनुष्याचे डोळ्याचा निमेषोन्मेष म्हणजे पापणी मिटून उघडणें अथवा टिचकी मारणें अथवा गुरु म्हणजे मोठें असे जें अक्षर त्याचें उच्चारण करणें म्हणजे एक आंख मोजणें इतका जो काळ त्या काळाची एक वाङ्मात्रा जाणावी. अशा शंभर वाङ्मात्रा संपूर्ण आश्चोतनें जीं त्यांस हितकारक होतात.

वाताभिष्यंदावर आश्चोतन.

बिल्वादिपंचमूलेनबृहत्येरंडशिग्रुभिः ॥ क्वाथआश्चोतनेकोष्णोवाताभिष्यंदनाशनः ६८
बेल आहे आदि ज्यांना अशीं पांच औषधांचीं मुळें व रिंगणी एरंडमूळ व शेवग्याचे मुळाची साल त्या साऱ्या औषधांचा काढा करून त्या काढ्याचे सहन होई असे डोळ्यांमध्यें बिंदु सोडावे, तेणेंकरून वाताभिष्यंद रोग दूर होतो.

वायूपासून व रक्तपित्तापासून झाला जो अभिष्यंद त्याजवर आश्चोतन.

अंबुपिष्टैर्निंबपत्रैस्त्वचंलोध्रस्यलेपयेत् ॥ प्रताप्यवन्हिनापिष्ट्वातद्रसो नेत्रपूरणात् ॥ ६९ ॥ वातोत्थरक्तपित्तोत्थमभिष्यंदंविनाशयेत् ॥
कडुनिंबाचीं पानें पाण्यांत वाटून लोध्राचे सालीला त्याचा लेप करून अग्नीवर तापवून नंतर वाटून त्याचा रस काढून त्या रसाचे डोळ्यांमध्यें बिंदु सोडावे, तेणेंकरून वातजन्य रक्तपित्तजन्य जो अभिष्यंद तो दूर होतो.

संपूर्ण अभिष्यंदांवर आश्चोतन.

त्रिफलाश्चोतनंनेत्रेसर्वाभिष्यंदनाशनम् ॥ ७० ॥
त्रिफळेचा काढा करून त्या काढ्याचे कोमट कोमट बिंदु डोळ्यामध्यें सोडावे तेणेंकरून सर्वप्रकारचे अभिष्यंद दूर होतात.

वाताभिष्यंदरोगावर दुसरा सेक.

परिषेकोहितंनेत्रेपयःकोष्णंससैंधवम् ॥ रजनीदारुसिद्धंवासैंधवेनसमन्वितम् ॥५७॥
वाताभिस्पंदशमनंहितंमारुतपर्यये ॥ शुष्काक्षिपाकेचहितमिदंसेचनकंतथा ॥ ५८ ॥

शेळीचे दुधांत सैंधव घालून उष्ण करून सहन होई असा कोमट कोमट त्या दुधाचा डोळ्यांवर सेक करावा ह्मणजे त्या दुधाची धार धरावी अथवा हळद व देवदार व सैंधव यांचें चूर्ण करून त्या दुधांत घालून ऊष्ण करून कोमट कोमट डोळ्यांवर धार धरावी, तेणेंकरून वाताभिष्पंद रोग व वातविपर्यय व शुष्काक्षिपाक हे रोग दूर होतात.

पित्तरक्त व अभिघात यांजवर.

साबरंमधुकंतुल्यंघृतभृष्टंसुचूर्णितम् ॥ छागक्षीरेघृतंसेकात्पित्तरक्ताभिघातजित् ॥५९॥

लोध्र व ज्येष्ठीमध हीं दोन औषधें समभाग घेऊन तुपांत भाजून चूर्ण करून शेळीचे दुधांत घालून डोळ्यांवर सेक करावा ह्मणजे त्या दुधाची कोमट कोमट डोळ्यांवर धार धरावी. तेणेंकरून पित्तविकार व रक्तविकार व अभिघातजन्य हे विकार दूर होतात.

रक्ताभिष्पंदावर सेक.

त्रिफलालोध्रयष्टीभिःशर्कराभद्रमुस्तकैः ॥ पिष्टैःशीतांबुनासेकोरक्ताभिष्पंदनाशनः ॥६०॥

त्रिफळा ह्मणजे हिरडे, बेहडे, आंवळकाठी, लोध्र, ज्येष्ठीमध, साखर व नागरमोथ्याचा भेद भद्रमुस्ता हीं औषधें समभाग घेऊन थंड पाण्यांत वाटून त्या पाण्याचा डोळ्यांवर सेक करावा ह्मणजे डोळ्यांवर धार धरावी तेणेंकरून रक्ताभिष्पंद दूर होतो.

रक्ताभिष्पंदावर दुसरा सेक.

लाक्षामधुकमंजिष्ठालोध्रकालानुसारिवा ॥ पुंडरीकयुतःसेकोरक्ताभिष्पंदनाशनः ॥६१॥

लाख १ ज्येष्ठीमध २ मंजिष्ठ ३ लोध्र ४ उपलसरी ५ पांढरें कमळ ६ हीं सहा औषधें पाण्यांत वांटून त्या पाण्याची डोळ्यांवर धार धरावी, तेणेंकरून रक्ताभिष्पंद दूर होतो.

नेत्रशूळ दूर होण्याविषयीं सेक.

श्वेतलोध्रंघृतेभृष्टंचूर्णितंपटविस्तुतम् ॥ उष्णांबुनाविमृदितंसेकात्शूलभ्रमंदके ॥ ६२ ॥

पांढरा लोध्र तुपांत भाजून चूर्ण करून फडक्यांत गाळून ऊन पाण्यांत वांटून त्या पाण्याची डोळ्यांवर धार धरावी तेणेंकरून नेत्रशूळ दूर होतो.

आश्चोतनाचें लक्षण.

अथआश्चोतनंकार्यंनिशायांनकथंचन ॥ उन्मीलितेक्षिणदृग्मध्येबिंदुभिर्द्व्यंगुलाद्धितम् ॥६३॥

मनुष्याचे डोळे उघडून डोळ्यांमध्यें दोन अंगुळांचे अंतरानें दूध काढे इत्यादिकांचे बिंदु सोडावे याला आश्चोतन ह्मणतात. हें आश्चोतनकर्म रात्रीचे ठायीं कदापि करूं नये.

शेवग्याचा पाला वाटून वडी करून कफाभिष्यद नाशाविषयी डोळ्यावर बांधावी

कफपित्ताभिष्यदावर पिंडी

निंबपत्रकृतापिंडीश्लेष्मपित्तहराभवेत् ॥७७॥ त्रिफलापिंडिकामोक्तानाशनेश्लेष्मपित्तयो ॥

कफपित्ताभिष्यद दूर होण्याविषयीं कडुनिंबाचीं पानें वाटून वडी करून डोळ्यावर बांधावी व त्रिफळा वाटून वडी करून डोळ्यावर बांधावी

रक्ताभिष्यदावर पिंडी

पिष्ट्वावाजिकतोयेनघृतभृष्टचपिंडिका ॥७८॥ लोध्रस्यहरतिक्षिप्रमभिष्यदमसृग्दरम् ॥

लोध्र कांजींत वाटून तुपात भाजून वडी करून डोळ्यावर बांधावी, तेणेंकरून रक्ताभिष्यद दूर होतो

सूज कडू इत्यादिकावर पिंडी

शुंठीनिंबदलैःपिंडीसुखोष्णास्वल्पसैंधवा ७९ धार्याचक्षुषिसंयोगात्शोथकडूयथापहात् ॥

सुंठ व निंबाचीं पानें हीं एकत्र वाटून त्यात थोडें सैंधव घालून वडी करून सूज व कडू दूर होण्याविषयीं ती वडी किंचित् गरम डोळ्यावर बांधावी

विडालकाचें लक्षण

विडालकोबहिर्लेपोनेत्रपक्ष्मविवर्जित ॥८०॥ तस्यमात्रापरिज्ञेया मुखलेपविधानवत् ॥

डोळ्याच्या पापण्या झाकून डोळ्याचे बाहेरले अंगीं आसमतात् भागीं लेप करावा याला विडालक ह्मणतात त्याचे लेपाची मात्रा मुखलेपाचें विधान सांगितलें आहे त्याप्रमाणें जाणावी

सर्व नेत्ररोगावर लेप

यष्टीगैरिकसिंधूत्थदार्वीतार्क्षैः समांशकै ॥८१॥ जलपिष्टैर्बहिर्लेप सर्वनेत्रामयापह ॥

जेष्ठीमध १ गेरू २ सैंधव ३ दारुहळद ४ कळकापरी ५ हीं पांच औषधें समभाग घेऊन पाण्यात वाटून डोळ्याचे बाहेरल्या आगीं आसमतात् भागीं लेप करावा, तेणेंकरून सर्व अभिष्यद नेत्ररोग दूर होतो

सर्व नेत्ररोगावर दुसरा लेप

रसांजनेनवालेपःपथ्याविश्वदलैरपि ॥ ८२ ॥ कुमारिकाग्निपत्रैर्वादार्विमीपञ्चकैरपि ॥

वचाहरिद्राविश्वैर्वातथानागरगैरिकः ॥ ८३ ॥

रसांजन पाण्यात वाटून लेप करावा तसा हिरडे, सुंठ, तमालपत्र, हीं तीन औषधें पाण्यात वाटून लेप अथवा कोरफड आणि चित्रकाचीं पानें हीं दोन औषधें एकाजागीं वाटून लेप अथवा दाळिंबीचीं पानें वांटून लेप अथवा वेखंड, हळद, व सुंठ हीं तीन औषधें पाण्यात वाटून लेप तसाच सुंठ व गेरू हीं दोन औषधें पाण्यात वाटून लेप हे सहा प्रकारचे लेप डोळ्याचे बाहेरले अंगीं आसमतात् भागीं केले असतां सर्वप्रकारचे नेत्ररोग दूर होतात

रक्तपित्तादि जन्य जे अभिष्यंद त्यांजवर आश्चोतन.

स्त्रीस्तन्याश्चोतनंनेत्ररक्तपित्तानिलार्तिजित् ॥ क्षीरसर्पिर्घृतंवापिवातरक्तरुजंजयेत् ॥७१॥

स्त्रीच्या स्तनाचें दुग्ध त्या दुधाचे थेंब डोळ्यांमध्यें सोडिले असतां रक्तपित्त व वायु यांपासून जी पीडा होते ती दूर होते. तशीच दुधावरली साय व तूप याचे थेंब डोळ्यांमध्यें सोडिले असतां वातरक्तसंबंधीं पीडा दूर होते.

पिंडिकेचें लक्षण.

पिंडीकवलिकाप्रोक्तावध्यतेपट्टवस्त्रकैः ॥ नेत्राभिष्यंदयोग्यासाव्रणेष्वपिनिवध्यते ॥७२॥

औषध वांटून वडी करून डोळ्यांवर ठेवून सोंवळ्याचे पट्टीनें बांधावी हिला पिंडी अथवा कवलिका असें ह्मणतात. ही पिंडी नेत्राभिष्यंद रोगावर योग्य आहे आणि व्रणाचे ठायींही बांधितात.

नेत्राभिष्यंदरोगावर शिरोविरेचन.

अभिष्यंदेधिमंथेचसंजातेश्लेष्मसंभवे ॥ स्निग्धस्विन्नोत्तमांगस्यशिरस्तीक्ष्णैर्विरेचयेत् ॥७३॥

कफसंबंधीं अभिष्यंद व अधिमंथ हे रोग ज्या मनुष्याला आहेत त्याचें उत्तमांग ह्मणजे मस्तक त्याला स्निग्ध करून ह्मणजे तेल लावून स्निग्ध करावा ह्मणजे मस्तकाचा घाम काढावा. नंतर मस्तकाचें शोधन होण्याविषयीं तीक्ष्ण औषधें करून नाकांत नस्य द्यावें.

अधिमंथरोगावर दुसरा उपचार.

अधिमंथेषुसर्वेषुललाटेवेधयेच्छिराम् ॥ अशांतेसर्वथामंथेभ्रुवोस्तुपरिदाहयेत् ॥७४॥

संपूर्ण अभिमंथाचे ठायीं ललाटसंबंधीं शीर टोंचून रक्त काढावें आणि सर्व प्रकारें अधिमंथ शांत होत नाहीं तर भ्रुकुटीचे ठायीं डाग द्यावा.

अभिष्यंदाचे ठायीं क्रिया.

वाताभिष्यंदशांत्यर्थंस्निग्धोष्णापिंडिकोभवत् ॥

संपूर्ण अभिष्यंद रोगाचे ठायीं डोळ्यांवर जें औषध सांगेल त्याची वडी करून बांधावी आणि वाताभिष्यंद शमनाविषयीं स्निग्ध ह्मणजे चिकण असून उष्ण अशी वडी बांधावी.

वाताभिष्यंद व पित्ताभिष्यंद यांजवर पिंडी.

एरंडपत्रमूलत्वक्निर्मितावातनाशिनी ॥७५॥ पित्ताभिष्यंदनाशायधात्रीपिंडीसुखावहा ॥

सुरती एरंडाचीं पानें मुळें व साल हीं एका जागीं वांटून वडी करून वाताभिष्यंदनाशाविषयीं डोळ्यांवर बांधावी आणि पित्ताभिष्यंद नाशाविषयीं आंवळकाठी वांटून वडी करून डोळ्यांवर बांधावी.

पित्ताभिष्यंदावर दुसरी पिंडी.

महानिंबफलोद्भूतांपिंडीपित्तविनाशिनी ॥ ७६ ॥

बकाणनिंबाचीं फळें वांटून वडी करून पित्ताभिष्यंद नाशाविषयीं डोळ्यांवर बांधावी.

श्लेष्माभिष्यंदावर पिंडी.

शिग्रुपत्रकृतापिंडीश्लेष्माभिष्यंदनाशिनी ॥

तर्पणाचें विधान.

वातातपरजोहीनेदेशेचोत्तानशायिनः ॥ आधारौमाषचूर्णेनक्लिन्नेनपरिमंडलौ ॥९२॥
समौदृढावसंबाधौकर्तव्यौनेत्रकोशयोः ॥ पूरयेद्घृतमंडेनविलीनेनसुखोदकैः ॥९३॥
अथवाशतधौतेनसर्पिषाक्षीरजेनवा ॥ निमग्नान्यक्षिपक्ष्माणियावत्स्युस्तावदेवहि ॥९४॥
पूरयेन्मीलितेनेत्रेततउन्मीलयेच्छनैः ॥

वायु, उष्ण व धुरळा ज्या जाग्यांत नाहींत त्या जाग्याचे ठायीं मनुष्याला उताणें निजवून नेत्रकोशाचे ठायीं ह्मणजे डोळ्यांचे भोंवतीं, उडीद भिजवून वांटून चांगलें सारखें वाटोळें असून बळकट असें आळें करावें. नंतर डोळे मिटून धरवून त्याचे ठायीं पातळ तूप अथवा मंड ह्मणजे पेज अथवा कोमट पाणी अथवा शतधौत केलेलें तूप अथवा दूध हे पदार्थ जोंपर्यंत डोळयाच्या पापण्या बुडत तोंपर्यंत पूरण करावें ह्मणजे डोळ्यांवर सोडावें, नंतर हलके हलके नेत्र उघडावे.

तर्पणमात्रेचें प्रमाण.

धारयेद्वर्त्मरोगेषुवाङ्मात्राणांशतंबुधः॥९५॥स्वच्छेचकफेसंधिरोगेमात्रापंचशतंहितम् ॥
दृष्टिरोगेष्वष्टशतमधिमंथेसहस्रकम् ॥
शुक्लेचषट्शतंकृष्णरोगेसप्तशतंमतम् ॥ ९६ ॥
सहस्रंवातरोगेषुधार्यमेवंहितर्पणम् ॥ ९७ ॥

नेत्रसंबंधीं पापण्याचे रोग जे त्याचे ठायीं शंभर वाङ्मात्रा होत तोंपर्यंत तर्पणरूप औषध डोळ्यांवर धारण करावें एकलाच कफरोग असता डोळ्याचे संधिगतरोग असतां पांचशें, डोळ्यांचे पांढरे जाग्यावर रोग असतां सहाशें, काळे बुबुळावर रोग असतां सातशें दृष्टिरोग असतां आठशें, अधिमंथ रोग असतां एक सहस्र व वातरोग असता एक सहस्र याप्रमाणें वाङ्मात्रा होत तोंपर्यंत तर्पण ह्मणजे तृप्ति करणारें औषध तें डोळ्यांवर धारण करावें.

तर्पण करून स्नेहाचे योगानें कफाचें आधिक्य झालें असतां उपाय.

स्विन्नेनयवपिष्टेनस्नेहवीर्येरितंततः ॥ यथास्वंधूमपानेनकफमस्यविशोधयेत् ॥९८॥

तर्पणाचे स्नेह वीर्येंकरून उत्पन्न जाहला जो कफ त्याचें जव भिजवून वांटून धूमपान करून शोधन करावें.

तर्पणप्रयोग किती दिवस करावा त्याची मर्यादा

एकाहंवात्र्यहंवापिपंचाहंचेष्यतेपरम् ॥

नेत्राचे ठायीं तर्पणप्रयोग करावयाचा तो एक दिवस किंवा तीन दिवस अथवा पांच दिनसपर्यंत करावा हें उत्कृष्ट प्रमाण जाणावें.

तर्पणाचें तृप्तिलक्षण.

तर्पणतृप्तिलिंगानिनेत्रस्येमानिभावयेत् ॥९९॥ सुखस्वप्नावबोधत्वंवैशद्यंवर्णपाटवम् ॥
निवृत्तिर्व्याधिशांतिश्चक्रियालाघवमेवच ॥ १०० ॥

सुखेंकरून झोंप येत्ये, सुखेंकरून जागा होतो, डोळ्यांना निर्मळपणा येतो, डोळ्यांची कांति चांगली होत्ये. नजर साफ होत्ये. रोगाचा नाश होतो आणि क्रियालाघव ह्मणजे

सर्व नेत्ररोगांवर तिसरा लेप.

दग्ध्वाग्नौसैंधवंलोध्रमघृच्छिन्नघृतेघृते ॥ पिष्टमंजनलेपाभ्यांसद्योनेत्ररुजापहम् ॥ ८४ ॥

सैंधव आणि लोध्र हीं दोन औषधें अग्नीवर भाजून मेण व तूप एकाजागीं करून त्यांत तीं औषधें वांटून डोळ्यांमध्यें अंजन करावें आणि बाहेरल्ये अंगीं त्या औषधांचा लेप करावा तेणेंकरून नेत्रसंबंधीं पीडा तत्काळ दूर होते.

चवथा लेप.

लोहस्यपात्रेसंघृष्टोरसोनिंबूफलोद्भवः ॥ किंचित्घनोबहिर्लेपान्नेत्रवाधांव्यपोहति ८५

लोखंडाचे पात्रांत निंबूचा रस घोटून किंचित घण जाहल्यावर डोळ्यांचे बाहेरले अंगीं लेप करावा तेणेंकरून नेत्रसंबंधीं रोग दूर होतो.

अर्मरोगावर लेप.

संचूर्णमरिचंकेशराजस्वरसमर्दनात् ॥ लेपनादर्मणानाशंकरोत्येपप्रयोगराट् ॥ ८६ ॥

मिरें माक्याचे रसांत वांटून डोळ्यांवर लेप करावा तेणेंकरून शुक्लार्म व अधिमांसार्म इत्यादिक नेत्ररोगांमध्यें अर्मरोग आहेत ते दूर होतात.

आंजणी पुळीवर प्रतिसारण.

स्विन्नांभित्वाविनिःपीड्यभिन्नामंजननामिकाम् ॥ शिलैलानतसिंधूत्थैःसक्षौद्रैःप्रतिसारयेत् ८७

डोळ्याचे कोंरीचे ठायीं अंजननामिका म्हणून पुळी होते तिला आंजणी म्हणतात या पुळीला स्वेदयुक्त करून म्हणजे वाफाऱ्यानें घाम काढून फोडून पिळावी. नंतर मनशीळ, वेलची, तगर, सैंधव या चार वाण्याचें चूर्ण करून मधांत कालवून त्या पुळीचे ठायीं प्रतिसारण करावें म्हणजे तें औषध त्या पुळीवर चोळावें.

नेत्ररोगांवर तर्पण.

अथतर्पणंवक्ष्यिमिनेत्रतृप्तिकरंपरम् ॥ यद्रुक्षंपरिशुष्कंचनेत्रंकुटिलमाविलम् ॥ ८८ ॥ शीर्णपक्ष्मशिरोत्पातकृच्छ्रोन्मीलनसंयुतम् ॥ तिमिरार्जुनशुक्रायैरभिष्यंदाभिमंथयैः ॥ ८९ ॥ शुक्राक्षिपाकशोथाभ्यांयुक्तंवातविपर्ययैः ॥ तन्नेत्रंतर्पणेयोज्यंनेत्रकर्मविशारदैः ॥ ९० ॥

नेत्रांचे ठायीं तृप्ति करणारें असें तर्पण सांगतें. ज्या नेत्रांना रूक्षपणा, शुष्कपणा, वाकडेपणा व गढूळपणा आहे अशा प्रकारचे नेत्र, ज्या पापण्यांचे केंस झडून गेले असे, शिरोत्पात, कृच्छ्रोन्मीलन, तिमिर, अर्जुन, शुक्र म्हणजे फूल, अभिष्यंद, अधिमंथ, शुक्राक्षिपाक, सूज व वातविपर्यय इतक्या रोगेंकरून व्याप्त जे नेत्र त्याचे ठायीं तर्पण योजावें. म्हणजे तृप्ति करणारें औषध योजावें.

ज्यांचे ठायीं तर्पण योग्य नाहीं ते.

दुर्दिनात्युष्णशीतेषुचिंतायासभ्रमेषु ॥ अशांतोपद्रवेचाक्षिणतर्पणंनप्रशस्यते ॥ ९१ ॥

दुर्दिन म्हणजे मळभ आलें असतां, फार शीत व उष्ण काळ असतां, शरीराचे ठायीं चिंता, परिश्रम, व भ्रम, हे उत्पन्न असतां आणि नेत्रसंबंधीं शूलादिक उपद्रव शांत झाले नसतां हीं तर्पणांमात्रा योजूं नये

रूक्ष नेत्र जे त्यांस स्निग्ध पुटपाक योजावा, स्निग्ध नेत्र जे त्यांस लेखन पुटपाक योजावा, दृष्टीस बळ येण्याविषयीं इतर ह्मणजे रोपण पुटपाक योजावा. तो पुटपाक नेत्रांचीं दुष्ट झालें जें पित्त, रक्त, व्रण व वायू हे दूर करितो. या पुटपाकाची वेगळी वेगळी योजना पुढील श्लोकांत सांगेल.

स्नेहन पुटपाक

पिमांसवसामज्जामेदःस्वाद्वौषधैःकृतः ॥ ७ ॥ स्नेहनःपुटपाकस्तुधार्योद्विवाक्शतेदशोः ॥

तूप, हरिणादिकांचें मांस, मज्जा व मेद हीं सारीं तूपमिश्रित करून वांटावीं आणि वाद औषधें ह्मणजे काकोल्यादिगणाचीं औषधें यांचें चूर्ण करून त्या मांसादिकांत मिळवून एक गोळा करून भोंवतालीं जांबुळ आंबा इत्यादिकांचीं पानें गुंडाळून त्याजवर माती लावून पुटपाकाचे रीतिनें अग्नि द्यावा. नंतर तो गोळा बाहेर काढून माती व पानें दूर करून पिळून रस काढून डोळ्यांमध्यें घालून नेत्रांच्या दोनशें वाङ्मात्रा होत तों काळपर्यंत धारण करावा याला स्नेहनपुटपाक ह्मणतात.

लेखन पुटपाक.

जांगलानांयकृन्मांसैर्लेखनद्रव्यसंयुतैः ॥ ८ ॥ कृष्णलोहरजस्ताम्रशंखविद्रुमसिंधुजैः ॥
समुद्रफेनकाशीसस्त्रोतोजदधिमस्तुभिः ॥ ९ ॥ लेखनोवाक्शतंधार्यतस्यतावद्विधारणम् ॥

हरिणादिकांचें काळजाचें मांस, लोहचूर्ण, ताम्र्यांचें चूर्ण, शंखपोंवळीं, सैंधव समुद्रफेन, हिराकशी सुरमा व शेळीचे दह्यावरली निवळी हीं नव लेखन द्रव्यें जाणावीं. यांचें चूर्ण करून त्या मांसांत मिळवून त्यांत दह्याची निवळी घालून वांटून गोळा करावा आणि पुटपाकाची कृती पूर्वी सांगितली आहे त्या कृतीनें तो गोळा भाजून नंतर बाहेर काढून पिळून रस काढून डोळ्यांमध्यें घालून शंभर वाङ्मात्रा होत तों काळपर्यंत धारण करावा. याला लेखनपुटपाक ह्मणतात.

रोपण पुटपाक.

स्तन्यजांगलमध्वाज्यतिक्तकद्रव्यपाचितः ॥ १० ॥ लेखनात्त्रिगुणोधार्यःपुटपाकःसुरोपणः ॥ वितरेत्तर्पणोक्तांतुक्रियांव्यापत्तिदर्शने ॥ ११ ॥

स्त्रीच्या स्तनाचें दूध, हरिणादिकाचें मांस, मध, तूप व कटुकी हीं सारीं त्या मांसांत मेळवून गोळा करून पूर्व पुटपाककृतीनें तो गोळा भाजून नंतर बाहेर काढून पिळून रस काढून डोळ्यांमध्यें घालून तीनशें वाङ्मात्रा होत तोंकाळपर्यंत धारण करावा. याला रोपण पुटपाक ह्मणतात. जर पुटपाकाचें आधिक्य अथवा कमीपणा होऊन डोळ्यांना जडपणा व निस्तेजपणा इत्यादिक उपद्रव प्राप्त झाले तर तर्पणाचे ठायीं जशी क्रिया सांगितली आहे तशी करावी ह्मणजे तसे उपाय करावे.

संपक्व दोष झाला असतां अंजन व साधारण अंजनाचें विधान.

अथसंपक्वदोषस्यप्राप्तमंजनमाचरेत् ॥ हेमंतेशिशिरेचैवमध्याह्नेंजनमिष्यते ॥ १२

डोळे उघटणें मिटणें या क्रियेला हलकेपणा येतो हीं लक्षणें तर्पणेंकरून नेत्रतृप्ति असता होतात असें जाणावें.

तर्पण फार झालें असतां लक्षण.

अधसाश्रुगुरुस्निग्धंनेत्रंस्यादतितर्पितम् ॥

तर्पणेंकरून नेत्र तृप्त फार झाले असतां डोळ्यांतून पाणी येतें, डोळ्यांना जडपणा व चिकटपणा येतो.

तर्पणहीन झाले असतां लक्षण.

रुक्षमसाविलंरुग्णंनेत्रंस्याद्धीनतर्पितम् ॥ १ ॥

तर्पणेंकरून नेत्र तृप्त झाले नसता डोळ्यांना निस्तेजपणा येतो व रक्तवर्ण होऊन व रोगेंकरून व्याप्त होतात.

तर्पण करून नेत्र अतिस्निग्ध व हीनस्निग्ध झाले असतां उपाय.

रुक्षस्निग्धोपचाराभ्यामेतयोःस्यात्प्रतिक्रिया ॥ २ ॥

तर्पणेंकरून अतिस्निग्धनेत्र जो त्याचे ठायीं रुक्षोपचारेंकरून चिकित्सा करावी, हीनस्निग्धनेत्र जो त्याचेठायीं स्निग्धोपचारेंकरून चिकित्सा करावी म्हणजे उपाय करावा.

पुटपाक.

अतऊर्ध्वंप्रवक्ष्यामिपुटपाकस्यसाधनम् ॥ द्वौबिल्वमात्रौमांसस्य पिंडौस्निग्धौसुपेषितौ ॥ द्रव्याणांबिल्वमात्रंतुद्रवाणांकुडवोमतः ॥ ३ ॥ तदेकस्थंसमालोड्यपत्रैः सुपरिवेष्टितम् ॥ पुटपाकेनतत्पक्त्वागृण्हीयात्तद्रसंबुधः ॥ ४ ॥ तर्पणोक्तविधानेनप्रयोजयेत् ॥

यानंतर पुटपाकाची साधनक्रिया सांगतों. हरिणादिकांचें मांस दोन बिल्व प्रमाण घेऊन तें मांस घृतादिक पदार्थ स्नेह यानें युक्त करून बारीक वांटावें. शुष्क औषध जीं सांगेल तें एक बिल्वप्रमाण व दूध पाणी इत्यादिक द्रव द्रव्यें एक कुडव प्रमाण हीं सारीं त्या मांसांत मेळवून मांसाचा गोळा करावा. नंतर जांभूळ अथवा आंबा इत्यादिकांचीं पानें आणून त्या गोळ्याभोंवतीं गुंडाळून त्याजवर मातीचा लेप करावा. नंतर पुटपाकरीतीनें तो गोळा भाजून नंतर बाहेर काढून माती व पानें दूर करून तो गोळा पिळून रस काढावा, आणि तर्पणाचे विधींची कृति वर सांगितली आहे तशी कृति करून तो रस डोळ्यांमध्यें घालावा.

पुटपाकासंबंधी रस डोळ्यांत घालावयाचें विधान.

दृष्टिमध्येनिषेच्यःस्यान्नित्यमुत्तानशायिनः ॥५॥ स्नेहनोलेखनश्चैवरोपणश्चेतिसत्रिधा ॥

तो पुटपाकसंबंधी रस स्नेहन, लेखन व रोपण या भेदेंकरून तीन प्रकारचा आहे. हा मनुष्याला उताणें निजवून डोळ्यांत दृष्टीचे मध्यमार्गी नित्य घालावा.

स्नेहनादि भेदेंकरून पुटपाकाची योजना.

हितःस्निग्धोतिरुक्षस्यस्निग्धस्यापिहिलेखनः ॥६॥ दृष्टेर्बलार्थमितरःपित्तासृग्व्रणवातनुत् ॥

अंजनाविषयीं रसाचें प्रमाण.

रसक्रियानूत्तमास्यात्त्रिविडंगामताहिता ॥ मध्यमाद्विविडंगारस्यात् हीनात्वेकविडंगिका ॥ १९ ॥

रसक्रिया ह्मणजे द्रवरूप अंजन त्याची मात्रा तीन वावडिंगाचे बियाइतके प्रमाणाची, डोळ्यांत घातली असता ती उत्तम रसक्रिया जाणावी. दोन वावडिंगांइतके प्रमाणाची डोळ्यांत घातली असतां ती मध्यम रसक्रिया जाणावी एक वावडिंगाइतके प्रमाणाची, ती हीन रसक्रिया जाणावी ह्मणजे कनिष्ठ जाणावी.

वैरेचन अंजनाविषयीं चूर्णांचें प्रमाण.

वैरेचनिकचूर्णंतुद्विशलाकंविधीयते ॥ मृदौतुत्रिशलाकंस्याच्चतस्रः स्नेहिकेंजने ॥ २० ॥

वैरेचनिक चूर्ण जें तें द्विशलाक ह्मणजे सळईला दोन वेळ लावून ती सळई दोनदां डोळ्यांत आडवी फिरवून काढावी मृदु अंजनाचे ठायीं औषधाचें चूर्ण तीन वेळ सळई लावून तीनदां डोळ्यांत घालून काढावी, तूप आदिकरून जे स्नेह पदार्थ तिहीं शीं युक्त असें अंजन असतां सळईला चार वेळ चूर्ण लावून ती सळई चार वेळ डोळ्यांत घालून काढावी.

सळईचें प्रमाण व ती कशी असावी तें.

मुखयोः कुंठिताश्लक्ष्णाशलाकाष्टांगुलोन्मिता॥अश्मजाधातुजावास्याःत्कलायपरिमंडला २१

पाषाणाची अथवा सुवर्णादि धातूंची अशी सळई आठ अंगुळ प्रमाण करून तिचीं तोंडें गोलदार करावीं, बारीक करूं नये, आणि तीं लाखेचे दाण्याप्रमाणें सुंदर वाटोळी करावी.

लेखनादिकांचेठायीं सळईचें प्रमाण.

ताम्रलोहाश्मसंजाताशलाकालेखनेमता ॥ सुवर्णरजतोद्भूताशलाकास्नेहनेमता ॥२२॥ अंगुलीचमृदुत्वेनकथितारोपणेबुधैः ॥

लेखन अंजनाचेठायीं ताम्याची अथवा लोहाची अथवा पाषाणाची अशी सळई योजावी व स्नेहन अंजनाचे ठायीं सोन्याची अथवा रुप्याची अशी सळई योजावी व अंगुळीला मृदुपणा असतो यास्तव रोपण अंजनाचेठायीं अंगुळी योजावी ह्मणजे अंगुळीनें डोळ्यांत अंजन करावें.

कोणत्या समयीं व कोणत्याभागीं अंजन करावें तो प्रकार.

सायंप्रातर्वांजनंस्यात्तत्सदानैवकारयेत् ॥ २३ ॥ नातिशीतोष्णवाताभ्रवेलायांसंप्रशस्यते ॥ कृष्णभागादधःकुर्यादपांगंयावदंजनम् ॥ २४ ॥

सायंकाळीं व प्रातःकाळीं अंजन करावें, सर्वकाळ करूं नये. फार शीतकाळ व फार ऊष्णकाळ व वायु व मळभ असता अंजन करूं नये. डोळ्याचे काळे बुबुळाचे अधोभागीं कोरीचे ठायीं अंजन करावें.

चंद्रोदयवर्ति

शंखनाभिर्बिभीतस्यमज्जापथ्यामनःशिला ॥ पिप्पलीमरिचंकुष्ठंवचाचेतिसमांशकम् ॥ २५ ॥ छागीक्षीरेणसंपिष्यवर्तिकुर्याद्यवोन्मिताम्॥ हरेणुमात्रांघृष्ट्वाजलैःकुर्याद-

पूर्वाण्हेचापराण्हेचग्रीष्मेशरदिचेष्यते ॥ वर्षासुनाभ्रेनात्युष्णेवसंतेचसदैवहि ॥ १३

परिपाकास गेले आहेत दोष ज्याचे असा मनुष्य, जो त्याचे डोळ्यांना अंजन प्राप्त झालें असतां पांच दिवसांनंतर घालावें व अंजनाचा साधारण विधि तर शिशिरऋतु ह्यांचे ठायीं माध्यान्हकाळीं ह्मणजे दोन प्रहर दिवसास डोळ्यांत अंजन लावें, ग्रीष्मऋतु व शरद्दतु यांचे दोन ठायीं प्रहर दिवसास व त्याचे अलीकडे घालावें व मळभ असतां व फार उष्ण काळ असतां अंजन करूं नये, वसंतऋतूचे सर्वकाळ अंजन प्रशस्त आहे.

अंजनाचे भेद.

लेखनंरोपणंचैवतथातत्स्नेहनांजनम् ॥ लेखनंक्षारतीक्ष्णाम्लरसैरंजनमिष्यते ॥१४॥
कषायतिक्तरसंयुक्तस्नेहंरोपणमंजनम् ॥ मधुरस्नेहसंपन्नमंजनंचप्रसादनम् ॥ १५ ॥

लेखन, रोपण व स्नेह या भेदेंकरून अंजन तीन प्रकारचें, त्यामध्यें खारट, व आंबट हे रस ज्या अंजनामध्यें आहेत तें लेखनांजन जाणावें व कषाय ह्मणजे तिक्त ह्मणजे कडू या दोहों रसेंकरून युक्त असून जें अंजन स्नेहयुक्त असें तें रो... जाणावें. मधुर रसेंकरून युक्त असून जें अंजन स्नेहयुक्त असतें तें प्रसादन स्नेहनांजन जाणावें.

गुटिकादि भेदेंकरून अंजन तीन प्रकारचें.

गुटिकारसचूर्णानित्रिविधान्यंजनानिच॥कुर्याद्यथोत्तराकर्यागुल्याहीनानिचयथोत्तरम् १

गुटिका ह्मणजे गोळी व रसरूप, अंजन व चूर्णे अशी तीन प्रकारचीं अंजनें ज... तीं अंजनें, गुटिकेपेक्षां गुणाला कमी व रसापेक्षां चूर्णे गुणाला कमी अशीं उ... गुणाला हलकीं जाणावीं आणि तीं अंजनें शलाका ह्मणजे सळई तिणेंकरून अथवा ...ळीकरून डोळ्यांत घालावीं.

जे अंजनाविषयीं योग्य नाहींत ते.

श्रांतेप्ररुदितेभीतेपीतमद्येनवज्वरे ॥ अजीर्णेवेगघातेचनांजनंसंप्रचक्षते ॥ १७ ॥

श्रमित मनुष्य, रुदन केलेला, भय पावलेला, मद्यपान केलेला, नवज्वरी, अ... असतां, मूत्रादिकांचा अवरोध असतां यांचे ठायीं अंजन करूं नये.

या तोलेंकरून अंजनाचें प्रमाण.

हरेणुमात्रांकुर्वीतवर्तितीक्ष्णांजनेभिषक् ॥ प्रमाणंमध्यमेध्यर्धंद्विगुणंतुमृदौभवेत् ॥१८॥

तीक्ष्ण अंजन जें त्याचे ठायीं हरेणुकेचे बियाइतके प्रमाणाची अंजनाची गोळी वातीसारखी करावी, तशीच मध्यम अंजनाचे ठायीं हरेणुकेचे बियेपेक्षां जास्ती ह्मणजे बियेइतके प्रमाणाची गोळी करावी व मृदु अंजनाचे ठायीं हरेणुकेचे दोहीं बि... प्रमाणाची गोळी वातीसारखी लांब करावी.

रोगणी कुसुमिकावर्ति.

॥ ३२ ॥ जातीकुसुमपंचाशत्मरि-

॥ सूक्ष्मपिष्टाजलेवर्तिःकृताकुसुमिकाभिधा ॥ ३३ ॥ तिमिरार्जुनशु-

॥ एतस्याश्चांजनेमात्रामोक्तासार्धहरेणुका ॥ ३४ ॥

फुलें ऐंशी, पिंपळीचे आंतले दाणे साठ, जाईचीं फुलें पन्नास व मिऱ्यें सोळा चूर्ण करून पाण्यांत वांटून गोळी करावी हिला कुसुमिकावर्ति म्हणतात ही रेणुकेचे बियांइतकी पाण्यांत उगाळून डोळ्यांत अंजन केलें असतां तिमिर, फुलें व मांसवृद्धि हे रोग दूर होतात.

रातांधळें दूर करण्याविषयीं वर्ति.

गोशकृद्रससंयुक्तावर्तिर्नक्तांध्यनाशिनि ॥ ३५ ॥

१ हळद २ दारुहळद ३ चमेलीचा पाला ४ निंबाचा पाला ५ हे पांच वानें घेऊन गाईचे शेणाचे रसांत बारीक वांटून गोळी करून रातांधळें दूर होण्या- डोळ्यांत अंजन करावें.

नेत्रस्रावावर स्नेहनवर्ति

...पथ्याबीजानिएकद्वित्रिगुणानिच ॥ पिष्टावर्तिजलेःकुर्यादंजनंद्विहरेणुकम् ३६

...स्रावंहरत्याशुवातरक्तरुजंतथा ॥

आंवळ्याचे आंतलें बीज एक भाग, वेहळ्याचे फळाचे आंतलें बीज दोन भाग, आंतलें बीज तीन भाग हीं सारीं बीजें एकत्र करून पाण्यांत बारीक वांटून गोळी करावी. नंतर ती गोळी रेणुकेचे दोन बियांइतकी पाण्यांत उगाळून डो- अंजन करावें तेणेंकरून नेत्रांतून जलस्राव होतो तो लवकर दूर होतो व वातरक्त- पीडा दूर होत्ये.

रसक्रिया.

तुल्यमाक्षिकसिंधूत्थसिताशंखमनःशिला ॥ ३७ ॥ गैरिकोदधिफेनंचमरिचैचेति- चूर्णयेत् ॥ संयोज्यमधुनाकुर्यादंजनार्थरसक्रियाम् ॥ ३८ ॥ वर्त्मरोगार्मतिमिरकाचशु- क्रहरांपराम् ॥

गोरचूत १ स्वर्णमाक्षिक २ सैंधव ३ खडीसाखर ४ शंख ५ मनशीळ ६ गेरु ७ समुद्रफेण मिऱ्यें ९ हे नऊ वानें समभाग घेऊन बारीक चूर्ण करून मधांत कालवून डोळ्यांत करावें. येणेंकरून पापण्याचे रोग व अर्मरोग, तिमिर, काचबिंदु, फुलें हे रोग दूर होतात.

फुलें दूर होण्याविषयीं रसक्रिया.

...क्षीरेणसंयुक्तोघृष्टःकर्पूरजःकणः ॥ ३९ ॥ क्षिप्रमंजनतोहंति कुसुमंचद्विमासिकम् ॥

चिकांत कापूर वांटून डोळ्यांत अंजन केलें असतां दोन महिन्याचें फूल असलें लवकर दूर होतें.

अनम् ॥ २६ ॥ तिमिरंमांसवृद्धिंचकाचंपटलमर्बुदम् ॥ रात्र्यंधंवार्षिकंपुष्पंवर्तिश्चंद्रो-
दयाजयेत् ॥ २७ ॥

शंखनाभि १ बेहळ्याचे फळाचे आतली बी २ हिरडे ३ मनशीळ ४ पिंपळी मिऱ्यें ६ कोष्ठ ७ वेखंड ८ हीं आठ औषधें समभाग घेऊन शेळीचे दुधांत बारीक जव प्रमाण गोळ्या वातीसारख्या लांबे ल्या कराव्या त्यास चंद्रोदयावर्ति असें नाव नंतर एक गोळी रेणुकेचे बीइतकी पाण्यात उगाळून डोळ्यात अंजन करावें तिमिर, मांसवृद्धि, काचबिंदु, पटलगत रोग, अर्बुद, रातांधळें व एक वर्षाचें फूल, हे दूर होतात

फुलें भूर इत्यादिक रोगांवर लेखनीवर्ति

पलाशपुष्पस्वरसैर्बहुशःपरिभाविता ॥ करंजबीजवर्तिस्तुशुक्रादीन् शस्त्रवल्लिखेत २८

करंजाचे बियाचें चूर्ण करून पळसाचे फुलाचा रस काढून त्या चूर्णाला त्या रसा बहुत वेळ पुटें देऊन बारीक खलून वातीसारख्या लांबट गोळ्या बांधाव्या. नंतर गोळी पाण्यात उगाळून डोळ्यात अंजन करावें. तेणेंकरून शुक्र म्हणजे फुलें आदिशब्दें करून मांसवृद्धि भूर इत्यादिक रोग शस्त्रानें कापून काढिल्यासारखे दूर होतात

दुसरा प्रकार

समुद्रफेनसिंधूत्थशंखदक्षांडवल्कलैः ॥ शीग्रुबीजयुतैर्वर्तिःशुक्रादीन् शस्त्रवल्लिखेत २९

समुद्रफेण १ सैंधव २ शंख ३ कोंबड्याचे अंड्याचे वरची टरफलें ४ शेवग्याचें बीज ५ हीं पाच औषधें समभाग घेऊन पाण्यात वांटून वातीसारखी लांबट गोळी करावी आणि डोळ्यात अंजन करावें तेणेंकरून फुलें भूर इत्यादिक रोग शस्त्रानें कापून काढिल्यासारखे दूर होतात

लेखनीदंतवर्ति

दंतैर्दंतिवराहोष्ट्रगोश्वाजसरोद्भवैः ॥ शंखमुक्तांभोधिफेनयुतैःगर्वैविचूर्णितैः ॥ ३० ॥
दंतवर्तिःकृताश्लक्ष्णाशुक्रार्णनाशिनीपरा ॥

हत्ती, डुकर, उंट, बैल, घोडा, बोकड आणि गाढव याचे दांत, शंख, मोतीं व समुद्रफेण या साऱ्याचें चूर्ण करून पाण्यात खलून वातीसारखी गोळी करावी या गोळीला दंतवर्ति म्हणतात नंतर ती गोळी पाण्यात उगाळून डोळ्यातील फुलें दूर होण्यापर्यंत अंजन करावें

तंद्रा दूर होण्याविषयीं लेखनीवर्ति.

नीलोत्पलंशिग्रुबीजनागकेशरयंतथा॥३१॥एतत्कल्कैःकृतावर्तिरनितद्रांविनाशयेत ॥

निळें कमळ, शेवग्याचें बीज व नागकेशर हे तीन याने समभाग घेऊन पाण्यात वाटून लांबट गोळी करून पाण्यात उगाळून डोळ्यावर झापड पडते ती दूर होण्यापर्यंत अंजन करावें

गुळवेलीचा अगरस १ कर्ष प्रमाण काढून त्यांत मध व सैंधव एकेक मासा घालून चा-
ळें मर्दन करून डोळ्यांत अंजन करावें. तेणेंकरून पिल्ल मे तिमिर काचबिंदु कंडू लिंगनाश
डोळ्याचे पांढरे जाग्यावरील व काळे बुबुळावरील हे सर्व रोग दूर होतात.

भंजनविषयीं पुनर्नवेचीं अनुपानें.

दुग्धेनकंडूंक्षौद्रेणनेत्रस्रावंचसर्पिषा ॥ पुष्पंतैलेनतिमिरंकांजिकेननिशांधताम् ॥५०॥
पुनर्नवाजयेदाशुभास्करस्तिमिरंयथा ॥

पुनर्नवा दुधांत उगाळून डोळ्यांत अंजन केलें असतां डोळ्यांची कंडू दूर होते. मधांत उगाळून अंजन केलें असता नेत्रस्राव दूर होतो. तुपांत उगाळून अंजन केलें असतां फुलें जातात. तेलांत उगाळून अंजन केलें असतां तिमिर जातें. काजींत उगाळून अंजन केलें असता रातांधळें दूर होतें. याविषयीं दृष्टांत, सूर्य जसा काळोखाचा लवकर नाश करितो तशी ही पुनर्नवा अनुपानाचे भेदेंकरून हे सर्व रोग दूर करिते.

नेत्रस्रावावर रोपणी रसक्रिया.

बब्बूलदलनिःक्वाथोलेहीभूतस्तदंजनात् ॥ ५१ ॥ नेत्रस्रावंजयत्येपमधुक्तोनसंशयः ॥

बाभुळीचे पानांचा काढा लेहीभूत ह्मणजे घण होईतोंपर्यंत करून त्यांत थोडी मध घालून डोळ्यात अजन करावें. तेणेंकरून नेत्राचे ठायीं जो जलस्राव होतो तो खचित दूर होतो.

दुसरा प्रकार.

हिज्जलस्यफलंघृष्ट्वापानीयेनित्यमंजनम् ॥५२॥ चक्षुःस्रावोपशांत्यर्थंकार्यमेतन्हौषधम् ॥

हिंगणबेटाचें फळ पाण्यात उगाळून नेत्रस्राव दूर होण्याविषयीं नित्य डोळ्यात अंजन करावें.

नेत्र प्रसन्न होण्याविषयीं स्नेहनीरसक्रिया

कतकस्यफलंघृष्ट्वामधुनानेत्रमंजयेत् ॥ ५३ ॥ ईपत्कर्पूरससितंस्मृतंनेत्रप्रसादनम् ॥

निर्मळीचें फळ मधांत उगाळून त्यांत थोडा कापूर मिश्रित करून नेत्र प्रसन्न होण्याविषयीं अंजन करावें.

शिरोत्पात रोगावर अंजन

सर्पिःक्षौद्रांजनंस्यात्शिरोत्पातस्यशांतये ॥ ५४ ॥

तूप व मध हीं एकत्र करून याचें डोळ्यांत अजन करावें, तेणेंकरून नेत्ररोगामध्यें शिरोत्पात रोग आहे तो दूर होतो.

आधळेपण दूर होण्याविषयीं रसक्रिया

कृष्णसर्पवसाशंखःकतकाफलमंजनम् ॥ रसक्रियेपमचिरादंधानांदर्शनमदा ॥ ५५ ॥

काळे सर्पाची वसा ह्मणजे मासस्नेह, शंख व निर्मळीचें बीज हीं तिन्ही एकत्र खलून डोळ्यात अंजन करावें. येणेंकरून आधळे मनुष्याला लवकर दिसूं लागतें.

लेखन चूर्णांजन

दर्भांडत्वक्शिलाकाचैः शंखचदनगैरिकैः॥ द्रवैरंजनयोगोपपुष्पार्मादिविलेखनः ५६

फार झोंप येते ती दूर होण्याविषयीं लेखनी रसक्रिया.

...वलालासंघृष्टैर्मरिचैर्नेत्रमंजयेत् ॥ ४० ॥ अतिनिद्राशमंयाति तमःसूर्योदयेयिनम् ॥

मध व घोड्याची लाळ या दोहोंत मिर्ये वांटून फार झोंप येत्ये ती दूर होण्याविषयीं डोळ्यांत अंजन करावें. याविषयीं दृष्टांत, सूर्योदय झाला असतां जसा अंधार दूर होतो तशी या अंजनेंकरून झोंप लवकर दूर होत्ये.

डोळ्यांवर झांपड पडते ती दूर होण्याविषयीं रसक्रिया.

जातीपुष्पंप्रवालंचमरिचंकटुकीवचा ॥ ४१ ॥ सैंधवंवास्तमूत्रेणपिष्टंतंद्राघ्नमंजनम् ॥

जाईचीं फुलें, तिचे अंकूर आणि मिर्ये, कटुकी, वेखंड व सैंधव हीं औषधें समभाग घेऊन बोकडाचे मुतांत वांटून डोळ्यांत झांपड पडत्ये ती दूर होण्याविषयीं अंजन करावें.

सन्निपातावर लेपनी रसक्रिया.

शिरीषबीजगोमूत्रकृष्णामरिचसैंधवैः ॥ ४२ ॥ अंजनंस्यात्प्रबोधायसरसोनशिलावचैः ॥

शिरिस १ पिंपळी २ मिर्ये ३ सैंधव ४ लसूण ५ मनशीळ ६ वेखंड ७ हीं सात औषधें समभाग घेऊन गोमूत्रांत वांटून संनिपातापासून जी संज्ञा नष्ट होत्ये ती दूर होऊन मनुष्य सावध होण्याविषयीं हें डोळ्यांत अंजन करावें.

दाहादिकांवर रसक्रिया

दार्वीपटोलमधुकंसनिंबपद्मकोत्पलम् ॥ ४३ ॥ प्रपौंडरीकंचैतानिपचेत्तोयेचतुर्गुणे ॥ विपाच्यपादशेषंतुघृतंनीत्वापुनःपचेत ॥ ४४ ॥ शीते तस्मिन्मधुसितांदद्यात्पादांशकांनरः ॥ रसक्रियेपादाहाश्रुरक्तरागरुजोहरेत ॥ ४५ ॥

दारुहळद १ पटोल २ ज्येष्टीमध ३ कडूनिंब ४ पद्मकाष्ठ ५ कमळ ६ पांढरेंकमळ ७ हे सात वाने समभाग घेऊन थोडे कुटून त्यांत पाणी त्या औषधाचे चौपट घालून चवथा हिस्सा पाणी राहीं तोंपर्यंत काढा करावा. नंतर तो काढा गाळून फिरून घण होई तोंपर्यंत कढवून घट्ट करावा. नंतर त्यांत त्याचे चवथाई मध व खडीसाखर घालून डोळ्यांत अंजन करावें. येणेंकरून दाह, स्राव, रक्तविकारानें डोळ्यांना रात येतो तो रोग दूर होतो.

डोळ्याच्या पापण्यांचे केंस येण्याविषयीं व कंडू इत्यादिकांवर रोपणी रसक्रिया.

रसांजनंसर्जरसोजातीपुष्पंमनःशिला ॥ समुद्रफेनोलवणंगैरिकंमरिचानिच ॥ ४६ ॥ एतत्समांशंमधुनापिष्टंप्रक्लिन्नवर्त्मनि ॥ अंजनंक्लेदकंडूघ्नंपक्ष्मणांचप्ररोहणम् ॥ ४७ ॥

रसांजन १ राळ २ जाईचीं फुलें ३ मनशीळ ४ समुद्रफेण ५ सैंधव ६ गेरु ७ मिर्ये ८ हे आठ वाने समभाग घेऊन चूर्ण करून मधांत वांटून डोळ्यांत अंजन करावें. तेणेंकरून पापण्यांचे रोगामध्यें उत्क्लिष्ट वर्त्मरोग आहे तो व डोळ्यांचा चिकटपणा व कंडू हे रोग दूर होतात व पापण्यांचे केंस झडून गेले असतां ते फिरून येतात.

तिमिरादिक रोगांवर रोपण रसक्रिया

गुडूचीस्वरसःकर्षःक्षौद्रंस्यान्माषकोन्मितम् ॥ सैंधवंक्षौद्रतुल्यंस्यात्सर्वमेकत्रमर्दयेत ॥४८॥ अंजयन्नयनंतेनपिल्लार्मतिमिरंजयेत ॥ काचंकंडूलिंगनाशंशुक्लकृष्णगतान्गदान ॥४९॥